४ जुन्या काळच्या पत्रव्यवहाराचीं पुडकाच्या पुडकी पुष्कळ गृहस्थांकडे लोळत पडलेली सापडतील परंतु ती मिळण्याचीच मोठी मारामार आहे या पत्र-व्यवहाराची ऐतिहासिक दृष्टीनेच काय किंमत असेल ती असेल, बाकी दुसऱ्या दृष्टीने पहाता त्याची कांहीं किंमत ह्या काळीं दिसत नाहीं तेव्हा हे लेख वाण्याच्या दुकानात किंवा कसरीच्या भक्ष्यस्थानीं दवडण्यापेक्षा त्याचा जीर्णोद्धार करण्याविषयीं त्याच्या रक्षकाचे मनात कोणतेही रीतीनें भिंबले तर इतिहासाचे कामास मोठी अनुकूलता होईल

[ हा काव्येतिहाससंग्रहकाराचा मूळचा उपोद्घात तसाच येथें घेतला आहे ]

# पत्रें, यादी वगैरे



ले १ (४११) ] [ श १५८० फा व ७ ता ५ मार्च १६५९

श्री

सन १०६८ फसली फेरिस्त नवर

तहनामा राजश्री खेम सांवत व लखम सावत देसाई बहादूर प्रांत कुडाळ याजकडील पीतांबर शेणवई कारभारी येऊन ठराव करून दिला सुरू सन तिस्सा खमसैन अल्फ

स्वराज्य साधनाच्या ठायां वकिलापाशीं मध्ये राहून तुरुक लोकाचें साधन करावें कलम १

प्रांतातील जमाबंदीच्या चौकशीस हुजुरून कारकून व लोक राहतील ते ठेवून त्यांच्या नेमणुकीबद्दल हुजूर अमल पैकी पावत करावें कलम १

प्रांत मजकूरची देशकत वतनें तुमची व बहादूर किताब अजरा [ मऱ्हा ] मत चालेल त्यांतील किल्ले, कोट व ठाणीं तुमच्या स्वाधीन केलीं आहेत तेथें दस्तान करून जतन करावीं तेथें हुजूरचे कारकून व लोक येतील ते ठेवावे कलम १

प्रांत मजकूरचे महाल वगैरे चालत आहेत आकार होईल त्याचा ऐवज दरसाल निम्मे हुजूर पावता करावा, निम्मा आकार राहील त्यांत तीन हजार लोक पायदळ हेटकरी ठेवावे आणि ज्या वेळेस हुजूर चाकरीस बोलाविले जातील तेव्हा तीन हजार लोकानिशीं सेवा करावी खासा जातीने येण्याचे प्रयोजन पडेल तेव्हा बोलावणे होईल तेव्हा येत असावें कलम १

किल्ले फोंडे प्रांत तालुका घेऊन हुजूर ठेविला त्यास हरएक प्रसंगास कुमक राखीत जावी बिदनूर वगैरे दरयानच्या रूढण्या घेण्यास स्वारी होईल त्याच्या कुमकेस जात असावें कलम १

शके १५८० विलंबीनामसंवत्सरे फाल्गुन वद्य ७ एकूण पांच कलमे करार करून तहनामा दिला असे " मोर्तब "

ले २
(२१)

[ श १५९६ ज्ये व १३
ता २१-६-१६७३

श्री

कानूजाबता राज्याभिषेक शके १ आनद नाम सवत्सरे ज्येष्ठ वद्य १३ त्रयोदशी भोमवासरे

**मुख्य प्रधान** याणा सर्व राजकार्य करावे राजपत्रावर शिक्का करावा सेना घेऊन युद्धप्रसग व स्वारी करावी व तालुका ताबिनात स्वाधीन होईल त्याचा रक्षून बदोबरत करून आज्ञेत वर्तावें सर्व सरदार सेना [ याणीं ] याजबरोबर जावे त्याणा मर्यादसमेत चालावें येणेप्रमाणें मोर्तब कलम १

**अमात्य** याणा सर्व राज्यातील जमाखर्च चौकशा करून दप्तरदार फडणीस [ हे ] यांचे स्वाधीन असावे लिहिणें चौकशीनें आकारावें फडणिसी, चिटणिसी पत्रांवर निशाण करावें युद्धप्रसग करावे तालुका जतन करून आज्ञेत चालावे मोर्तब कलम १

**सचीव** याणा राजपत्रे शोध करून अधिक उणें अक्षर मजकूर शुद्ध करावा युद्धप्रसग करून तालुका स्वाधान होईल तो रक्षून आज्ञेत वर्तावें राजपत्रांवर चिन्ह समत करावें मोर्तब कलम १

**मत्री** याणीं सर्व मत्रविचार राज्यकारणे यातील सावधतेनें विचार करावें आमन्त्रण, वाकनिसी त्यांच्या स्वाधीन तालुका जतन करून युद्धादि प्रसग करावे राजपत्रावर समत चिन्ह करावें, मोर्तब कलम १

**चिटणीस** याणा सर्व राज्यातील राजपत्रें लिहावीं राजकारणपत्रें, उत्तरे लिहावी सनदा, दानपत्रें वगैरे महाली हुकुमी याचा जाबता फडणिसी अलाहिदा त्याप्रमाणें लिहावा हातरोखे

**सेनापती** याणा सर्व सैन्य सरक्षण करून युद्धप्रसग स्वारी करावी तालुका स्वाधीन होईल तो रक्षून हिशेब रजू करून आज्ञेने वर्तावें फौजेच्या लोकाचें बोलणें बोलावे सर्व फौजेचे सरदार याणा त्याजबरोबर चालावें मोर्तब कलम १

**पडितराव** याणीं सर्व धर्माधिकार, धर्म, अधर्म पाहून शिक्षा करावी शिष्टांचे सत्कार करावे आचार, व्यवहार, प्रायश्चित पत्रें होतील त्याजवर समत चिन्ह करावे दान प्रसग, शाति, अनुष्ठान तात्काळ करावें मोर्तब कलम १

**न्यायाधीश** याणीं सर्व राज्यातील न्याय अन्याय मनास आणून बहुत धर्में करून न्याय करावे न्यायाचा निवाडपत्रे याजवर समत चिन्ह करावें मोर्तब कलम १

**सुमत** याणीं परराज्यातील विचार करावा त्याचे वकील येतील त्याचे सत्कार करावें युद्धादि प्रसग करावे राजपत्रावर समत चिन्ह करावें मोर्तब कलम १

**फौजेचे सबनीस बक्षी** याणीं सर्व फौजेचा हजेरी चौकशी करावी यादी करून समजवावे रोजमुरा वाटणें, सत्कार करावा युद्धादि प्रसग करावा मोर्तब कलम १

**सेनाधुरधर** याणा बिनी करावी, आघाडीस जावें, फडफर्मास करावी, लूट करणें, मना करणें, चौकशी, ताकीद त्याजकडे, पुढें असून

नाजूकपत्र याजवर मोतब अथवा खास दस्तक मात्र वरकडाचा दाखलाचिन्ह नाही चिटणी खानाच करावे मोर्तब कलम १

किल्ले, कोट, ठाणी जंजिरे येथील कायदे करून दिले त्याप्रमाणे हवालदार, सुभेदार, कारखानास सबनीस, सरनोबत, तटसरनोबत लोक याचे जाबते करून दिले त्याप्रमाणे चालून सावधतेने स्थळे रक्षावात तगिरी बदला हुजुरून व्हावा बेजमा नेमणूक ताठ केदार याजकडे दरवाजा किल्या [ याजवर] हवलदार याचा हुकूम शिक्के त्यान्च्या नावचे कारखानिसा, सबनिसी, जाबता अलाहिदा असे मोर्तब कलम १

आठरा कारखान्याचे अधिकारी याणा खासगाचे अधिकारा यान्च्या इतल्यात चालून दफतरा हिशेब गुजरावे मोतब कलम १

आबदारखाना चिटणीस याजकडे सरफ खाना सुद्धा अधिकार सागितला मजालसी विडे, अत्तरगुलाब व हारतुरे, फळफळावळ खुष बई खेरदी, जमाखर्च याणी करून हिशेब दफ तरी गुजरावा मोर्तब कलम १

पागा जुमलेदार, सरदार याणा कद करून दिली त्याप्रमाणे चालून सेनापती व प्रधान यान्च्या समागमे कामकाजे करावा मोर्तब कलम १

सेना रक्षण करावा. मोर्तब कलम १

सुभे मामले तालुकेदार, यास ज्याजकडे जे नेमल त त्याणा जाबत्या प्रमाणे चालावें हुजूरचे दरखदार चिटणीस, फडणीस, मुजूमदार यांच्या इतल्यानें चालून हिशेब गुजरावे मोतब कलम १

बारा महालचे अधिकारी याणा आपापले काम दुरुस्त राखून हिशेब आकारून दफतरात गुजरावे मोर्त कलम १

दरुणी महालाच कामकाज दिवाण नेमून दिले त्याणा सर्व पाहून करावे चिटणीस फडणास याणा आपलाले दरखाचे कागद लिहावे त्यांजवर निशाणचिन्ह दिवाणानीं करून त्यास समजून मोर्तब समक्ष करावे मोर्तब कलम १

पोतनास याणा पोत जमाखर्च लिहिणे करावे नजरपेशकशा जमा करावी पोतदार याणा पारख करावी कलम १ मोतब

अष्टप्रधान याजकडे पेटे व तालुके व स्वारीस जाणे त्यास दरखदार सर्व हुजूरच्या नाव, त्याच्या दाखल्यानी पत्रव्यवहार करावा स्वारीस जावे त्यास मुतालीक करून दिले त्याणा सर्व व्यवहार चालवावा हुजूर राहवें कलम १ मोर्तब

एकूण कलम बारा मोर्तब §

* बारा महाल —पोते–कोठा–पागा–दरजा–टकसाळ–सादागिरा–इमारत–हवेला—पालखी–थट्टी–चौबिना–शेरी महाल

§हा व यान्याच सारखे आणखी काही कागद ' सनदा पत्र ' पृ १२० पासून पुढे छापलेले आहेत कागदाची मिति ज्येष्ठ व॥ १२ या दिवशी खरे जंत्रीत रविवार आहे, भोम वार नाही त्याची इंग्रजी तारीख २१ जून स १७४ येन भारतवर्ष २ मराठ्याचे दप्तर या प्रकरणात, इ० ऐ० वि० वि० ख १ पृ २१ व ख ३ पृ २५ यांत अशाच प्रकारचे कागद आहेत तसेच भा इ स म इतिवृत्त १८३२ पृ २०३ आणि चित्रगुप्त-बखर पृ १०४५ पहा

ले ३ (४०६) ]

[ श १६१० ज्येष्ठ शु १०
ता ९ मे १६८८

श्री

सन १०९८ फसली श्रीमन्महाराज शभु छत्रपती शेज नबर २५

यादी श्रीमन्महाराज शभुछत्रपति याची स्वारी सगमेश्वर मुक्कामीं होता ते समयीं अवरगजेब पादशहा याची फौज शके १६१० विभवनामसवत्सरे ज्येष्ठ शुद्ध १० रोज मदवासरी येऊन लढाई जहाली त्या लढाईत म्हालोजी घोरपडे फौजे सुद्धा लढून ठार झाले त्यास पुत्र तीन

१ सताजी घोरपडे वडील पुत्र १ बहीरजी घोरपडे दुसर पुत्र
१ मालोजी घोरपडे तिसरे पुत्र

एकूण ३

या तीन असामाना व विठोजी चव्हाण यांणा फौज सुद्धा तुळापूर मुक्कामा अवरगजेब पादशाहाचे लस्करावर छापा घालून पादशाहान्या डेऱ्याचे सोन्याचे कळस आणून श्रीमन्महाराज राजे साहेब विशाळगड मुक्कामा होते त्यांच्या पुढें ठेविले ते समयीं महाराजांची मर्जी सतोष होऊन चवघाचा सन्मान करून व वस्त्रे, भूषणे, जवाहीर देऊन सताजी घोरपडे यास ममलकतमदार हा किताब दिला बहीरजी घोरपडे यास हिंदूराव म्हणून किताब दिला, व मालोजी घोरपडे यास अमिरुलउमराव म्हणून किताब दिला व विठोजा चव्हाण यास हिम्मतबहादर हा किताब दिला नतर विशाळगड मुक्कामा रामचद्र पडित आमात्य यांणा महाराजाच्या सेवेशा विनती करून सताजी घोरपडे यास सेनापतिपद देविले नतर महाराजाची स्वारी काहीं कारणामुळें चदीस निघोन गेली बरोबर नानाप्रकारचे वेष धारण करून घोरपडे व चव्हाण वगैरे सेवक लोक निघून गेले तेथे चदी मुक्कामा घोरपडे यांणीं काजकामें बहुत केला पुढें चदीहून आल्यावर सताजी घोरपडे सेनापति प्रांतात स्वाऱ्या करून राज्य काबीज करीत होते पुढे श्रीमन्महाराज राजाराम साहेब छत्रपति यांणी किल्ले †शिवगड एथे शके [ १६ १ ] साला कैलासवास केला पुढें सताजी घोरपडे यास म्हसवडकर माने यांणा दगाफटका करून शके १६३५ ¶साला मारले पुढे त्याचे चिरंजीव पिराजी घोरपडे यास सेनापतिपद दिले, तें शके १६३७ सालीं ते पुढे शके १६५० सालीं स्वामिकार्यावर हलकरणी कसबा नूल या गांवावर लढाईत ठार पडले पुढें त्याचे पुत्र राणोजी घोरपडे यास सेनापतिपद जहाले

१ महाराज सरकारातून राणोजी घोरपडे सेनापति यास तालुका सुद्धा इसन्ने सल्लासीन मया अल्लफ दफतर दिमत मुजमू विरोधीकृतनाम सवत्सरे छ १ माहे मोहरम श्रीमन्महाराज शभुछत्रपति महाराज यांणीं मनोळीच्या मुक्कामीं सरजाम निवडून दिला *आषाढ शुद्ध २ गुरुवार ( २५–६–१७३१ )

---

† सिंहगड ले ९ पहा ¶ हा शक चुकला आहे श १६१९ आषाढमासा सताजी मारला गेला जे श

ले ४
(४३३)

श १६१४ श्रावण व ११
ता २९ जुलै १६९२

श्री

तालीक फेरिस्त न १३

राजश्री सताजी घोरपडे गोसावि यास

छ अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नेहांकित रामचद्र नीलकठ अमात्य आशीर्वाद सुरुसन सलास तिस्सैन मध्या[1] व अलफ राजश्री छत्रपति स्वामी कर्नाटकात जातेसमयीं तुम्हांस या प्रातात ठेउन गेले त्यासमयीं इकडे गनिमाची धामधूम बहुत होउन कुल देशदुर्ग हस्तगत केलीं होतीं ता गेला राज्यामध्यें काहीं अर्थ उरला नाहीं कुल् मराठे याणीं इमान खत्ता करून गनिमाकडे गेले परतु तुम्ही इमान खत्ता न करिता राजश्रीच्या पायाशीं बहुतच एकनिष्ठा धरून जमाव वरून शेख निजाम व सर्जाखान व रणमस्तखान व जानसरखान असे उमदे वजीर उडविले जागोजाग गनीमास कोट घालून नेस्तनाबूद केलें आणि देश सोडविला राज्य सरक्षणाच्या प्रसगास असाधारण श्रम केले, अवरगजेबास दहशत लाविली पुढेंही कित्येक स्वामिकार्याच्या ठायी हिम्मत धरिता या करिता तुम्हावरि राजश्री स्वामी सतोष होऊन मामले मिरज क्यांती २० बेवीस एथील देशमूख होत ते नस्तनावूद झाले, त्याच्या वशीं कोणी नाही, त्याचे मुतालिक होते ते बळावून देशमुखी वतन खात होते तेही दुर्बुद्धि धरून गनिमाशी मिळून फिसालत केली, एकनिष्ठा धरून इकडे येऊन भेटले नाहींत, म्हणून त्यासि देशमुखी दूर करून तुम्हांस अजरामरामत देशमुखी मामले मजकूरची अवलाद अफलाद वतन करून दिली असे पुत्रपौत्रीं चालवून देशमुखीचा हक्क लाजिमा व इनामत व इसाफतीचे गांव सालाबाद पहिले देशमुखास चालले असतील तेणेंप्रमाणें खाऊन वतनाचा मामला चालवून सुखरूप रहाणें तुम्हास देशमुखी नूतन करून अजरामरामत दिली म्हणून शेरणी तुमच्या माथा होन पातशाही ५००० पाच हजार करार केले असत याचा वसूल हुजूर घेतला छ २४ जिल्काद मोर्तब हुजूर

---

१ मध्या हा शब्द चुकून अधिक लिहिला गेला आहे

ले ५
(४०९)

श १६३४ चैत्र व १३
ता २२-४-१७१२

श्री

सन ११०१ फसली

फेरिस्त नबर ६

शिक्का

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३८ नदननामसवत्सरे चैत्र बहुल त्रयोदशी भोमवासरे क्षत्रियकुलावतस श्री राजा शिव छत्रपति स्वामी यांणी राजश्री

शिक्का शिक्का " कृष्णाजी भास्कर *उपनाम पडित गोत्र काश्यप यास दिलें इनामपत्र ऐसी जे तुम्ही स्वामींचे पुरातन सेवक, स्वामींच्या पायाशा निष्ठा धरून अत करणपूर्वक सेवा केली किल्ले विशाळगड अवरगजेबानें हस्तगत करून उदितसिंग रजपूत किल्ले मजकुरा ठेवून मनसुबी केली, ते स्थळ स्वामीच्या शासनावश व्हावे या गोष्टीचा प्रयत्न तुम्हीं विशेष केला उदितसिंगाशीं राजकारण करून त्याला खालीं उतरिले ते समयीं आपला भाऊ केशव भास्कर यास उदितसिंगाच्या समागमे त्याच्या देशास जावयास दिले आणि स्थळ स्वामींच्या शासनावश केले ते समया तुमच्या विषया राजश्री परशराम पडित प्रतिनिधी याणा एक गाव इनाम करून द्यावा म्हणून विनति पूर्वी केला होती, ती साप्रत तुम्हीं स्वामींची सेवा प्रेमभावें करून स्वामास सतोषी करून एक गाव आपणास लेंकराच्या लेंकरा चाले ऐसा इनाम करून दिला पाहिजे म्हणून पन्हाळ्याच्या मुक्कामा तुम्हीं स्वामीसंनिध विनति केली, त्याजवरून स्वामी तुमच्या सेवेवरि सतोषा होऊन तुम्हास नूतन इनाम कुलबाब कुलकानू देखील हालीं पट्टी व पेस्तरपट्टी झाडझाडोरा व जल तरु पाषाण सहित, खेरीज हक्कदार व इनामदार करून मौजे वल्बरतें तर्फ सगमेश्वर देहे १ एक रास इनाम आजरामरामत करून दिला असे, तरि तुम्ही मौजे मजकूर पूर्व मर्यादेप्रमाणे चतु सीमा याचे स्वाधीन करून हरदू इनाम तुम्हीं व तुमचे पुत्रपौत्रादि वशपरपरेनें अनुभवून स्वामींची सेवा करून सुखरूप राहणें. स्वामी तुम्हास मौजे मजूर इनाम सुरक्षीत चालवितील जाणिजे निशाण निदेश समक्ष " मोतब "

---

* हे हल्लीं उपनाव जमेनीस लावितात याचें घराणे मलकापुर सस्थान विशालगड व मौजे साल्लें ताळुके सगमेश्वर येथें नादत आहे वशावळ पहा, मावलकर सरदेसाई घ इ भाग १ पृ ६८ व भाग २ ते ६८-७१

ले
(४२८)

[ श १५४९
इ स १६२७ ]

श्री

सन १०३७ फसली फेरिस्त नं० ५

## कैफियत शहाजी महाराज भोसले याची

इब्राहिम आदिलशहा मृत्यु पावले [*] सन १०३७ हिजरी छ ११ माहे मोहरम ते समया मिरजा महमद व दौलतखान याणी त वर्तमान प्रगट न होऊ देता दरवाजा बंद करून, सर्व मुत्सद्दी यांस बोलावून सांगितलें की, पादशहाचा हुकूम सुलतान महमद यास माझ्या पाठीमागे तख्तावर बसवणे म्हणून जहाला आहे त्या वेळी दौलतखान याणी एकलासखान यास विचारले त्याणी " बडे साहेबांस विचारावे, आणि आम्हांस पादशहाच्या पाठी मागे कारभार करण्याची इच्छा नाही दुर्वेष पादशहा व सुलतान महमद या उभयतांतून बिबा बडेसाहेब यांच्या विचारास येईल त्यांस तख्तावर बसवावे " असे सांगितलें नंतर तेथून दौलतखान बिबी बडेसाहेब यांच्या महालात जाऊन याप्रमाणें विनंति केली त्याणीही सांगितले की, " पादशहाची आज्ञा जहाली असेल त्याप्रमाणे करावे "

नंतर तेच दिवशीं सुलतान महमद यास तख्तावर बसविले ते समया वय पधरा वर्षांचे होते एकलासखान यास घरास जावे म्हणून सांगितले आणि दियानतुल्मुल्क व आकारजा वगैरे ब्राह्मण यास कैद केले आणि इब्राहिम पादशहास यवना पद्धतीप्रमाणे नेऊन माती दिली

दुसरे दिवशी दुर्वेष पादशहा व दुसरा एक होता त्यास नजरबंदात ठेविल्यावर दियानतुल्मुल्क व आकारजा व ब्राह्मण यांस कैदेतून मोकळीक करून पूर्ववत् प्रमाणे कामास ठेविले आणि मंडळीस किताब दिले ते आकारजा यास काम मुल्की व दियानतुल्मुल्क यास सरखेली व मिरजा महमद यास मुस्तफाखान व दौलतखान यास खवासखान असें देऊन वाढविले

सन मजकुरी निजामशहा अहमदनगर ऊर्फ बेदर याणी आपला गेलेला प्रांत परत घ्यावा म्हणून फौजेसह तयार होऊन किल्ले दारूर येथें आले विजापुराहून वजीर यास समागमे फौज देऊन त्याजवर रवाना केले उभयतांचा लढाई झाला बेदरवाले नामोहरम होऊन पळाले नंतर काही दिवसांनी फौज देऊन येऊन विजापूरच्या पादशहाकडील सिआदतखान व यतिबारखान यास धरून नेले आणि आपल्या रुबरू आणवून वस्त्र भूषणे व

---

[*] ता १२ सेप्टेंबर १६२७

घोडे देऊन रवाना केले आणि आपण फौजेसुद्धा कृष्णाकिनाऱ्यास टेऊन राहिले नतर काही दिवसानी हमीदखान यास फौजेसह विजापुरानजीक जाऊन ब्राह्मणपुरीच्या दरवाजावरून लढाईस प्रारभ केला आतून नबाबखान व एकलासखान व यतियादखान सरनोबत व आणखी सरदार फौज घेऊन बाहेर निघून लटाई झाली ते वेळेस हमीदखान नामोहरम होऊन पळाले

नतर चार महिन्यानीं वर्तमान आलें कीं कदमराव बकापूरकर याणा बडाई केला त्याजवर पादशहा यांणीं मीर अलीरजा यास फौज देऊन रवाना केले ते जाऊन पोहचल्यावर एक वर्षपर्यंत लढाई होत होती शेवटा कदमराव यास हिजरी सन १० ८ छे १० रबिलावल रोजीं कैद करून मारिलें

दिल्लीकडून शहाजहा पातशहा याणा वस्त्रे भूषणे शेखमहमुद्दान याजबरोबर पाठविलीं, ता सनमजकूर छ १० जमादिलावल रोजा पावला नतर कचेरी करून वस्त्रे घेतला मुस्तफाखान म्हणजे महमदअमीन हे फार दिवस निजामशहाशा द्वेष करात होते, कारण मलिक अबर हे त्याचे श्वशूर त्यास त्याणीं मारिले यामुळे मलिक अबर याचे पुत्र फत्तेखान याणा मुस्तफाखान याचे विचारें निजामशाही दौलतीचा विभाग करावा, आणि वरकड सरदार याच्या चित्तास ही गोष्ट येईना तेव्हा काजा सय्यद रणदुल्लाखान याजकडील वकील याणी कचेरात येऊन पादशहास सागितले जे, इच्छा दूर होऊन निजामशाही ताळुका घ्यावा हे योग्य नाही कारण निजामशाही दौलत बुडाली असता सबब आपणास व मोगल यास पडेल, आणि काहीं दुष्टोत्पत्तीस द्वेष आला असता कठाण होईल, याजकरिता दौलत निजामशाही कायम राखावा त्याजवरून मुस्तफाखान व काजासय्यद याजमध्ये विरुद्ध वाढलें खवासखान याणा मुस्तफाखान याजपाशा करार केला परतु मुस्तफा याच्या आग्रहामुळे मोगलाशी स्नेह केला, आणि अबरखान व अ ला सखान व सट्याराव घाटगे वगैरे यांस जाहागार जास्ती देऊन फरहादखान व खैरियतखान व आणखी सरदार याचा स्नेह करून रणदुल्लाखान यास कुमक मोगलास पाठविली निजामशहा याजबरोबर द्वेष मुस्तफाखान यांणा केला आणि मोगल याशा स्नेह केला यास्तव सर्व मुत्सद्दी द्वेष करू लागले आणि खवासखान व मुस्तफाखान याजम येही विरुद्ध वाटले अदीलशहा व मोगल या उभयताना मुलक वाटून घ्यावा असे ठरून शेख महमुद्दीन यास वस्त्रे, भूषणें देऊन दिल्लीस रवाना केलें इतक्यात वर्तमान समजलें का, मोगल याणा आपला क्रिया सोडून किल्ले दारूर कृष्णेच्या काठा आहे तो घेण्याकरिता फौज मोगल याजकडील आली, असें

---

१ तारीख २८ नोव्हेंबर सन १६२८

२ निजामशाही=अहमदनगरवाले-अथवा दौलताबादवाले

ऐकताच अदीलशहा पादशहा याणा वकिली व पत्र मालिकमरजान याजकडे पाठवून शेख मइनुद्दीन यास कैद केले हें वृत्त शहाजहा पादशहा याणा ऐकून क्रोधायमान होऊन असफखान व अबदुल्लाखान व खाजेजादखान व इरादतखान व अबदुल हसन बक्षी व आकिदतखान व राजे ला ज शिंग व राजे राम हे फौज देऊन या मोहिमेस रवाना केले असफखान हसनाबादपर्यंत येऊन प्रात लुटण्यास प्रारभ केला आणि विजापुराकडाल नजीक हाउद रजोरंग म्हणून आहे तेथे येऊन राहिले अदिलशहा याजकडील फौज बाहेर येऊन दररोज लढाई होत होता मोगलाकडाल सरदार शिकदर अल्ला छ २ माहे शाबान रोजीं लढाईत पडले नतर छ ९ माहे मजकुरीं फौज तयार होऊन शहरच्या आसपास आला आणि लढाईस प्रारभ केला तो अदिलशहाची फौज हतवैर्य होऊन एकाएकी बाहेराल फौज पडून लढाई दिली ते समया ता फौज घाबरी होऊन पळाली, ता आतून मुरारपत फौज घेऊन पाठीवर चालले तो ता फौज आपल्या सरहद्दात गेला नतर मुरारपत फिरून किल्ले परडा येथे राहिले तो किल्ला विजापुराकडे होता याचे कारण पूर्वा आकारो अवान किल्लेदार निजामशाही तेथे होता, तेव्हा निजामशहा याची दौलत गिरिफ्तारींत अला, यामुळे तो किल्लेदार अदिलशहा याजकडे मिळून हिजरा सन १०४० छ १० माहे मोहरम रोजा किल्ला दिला त्या किल्यावरील तोफ मुलुख मैदान¹ होता ता विजापुरास पोहचवावा म्हणून पादशहाचा हुकूम मुरारपतास झाला त्या प्रमाण तोफ सन मजकुरा छ १५ माहे सफर रोजीं गरबी बुरुजावर ठेवली

त्या समयीं असफखान याचा मोड होऊन पळाले, हे वृत्त शहाजहास कळून बहुत हैराण झाले, आणि मोहबतखान यास लाहोरहून आणवून बऱ्हाणपूरचे साहेब सुभा व फौज देऊन दक्षिणेस पाठविले फत्तेखान² याणा निजामशहा दौलत जप्त केला हे वर्तमान

---

१ मुलुख इ मैदान = मैदानचा सिंह मलाक इ मैदान=मैदानचा राजा दुसरे नांव बरोबर आहे असें ग्रांटडफ् साहेबाचें म्हणणे आहे ह्या तापेच्या तोंडाचा व्यास ४ फूट ८ इंच आहे व पोकळीचा व्यास २ फूट ४ इंच आहे सन १८०३ साला ही तोफ विलायतेस नेण्याचा विचार चालला होता, पण मुबईपर्यंत आणण्याचे सबधे रस्त्याची वगैरे अडचण म्हणून तो तसाच राहिला औरगजेबान स० इ० १६८६ मध्ये विजापूर घेतल त्या वेळीं आपल्या विजयाच्या स्मरणार्थ ह्या तोफवर एक लेख खोदला ह्या वरून हा तोफ त्या सालीं ओतिली अशा कितीकाचा समज होतो पण तो चुकीचा आहे ही स० इ० १५४९ सालीं अहमदनगर येथें चलिबी रुमीखानाने ओतिली ( पहा मु ार १।०७१ )

२ फत्तेखान हा मलीक अबर याचा मुलगा हा पहिल्याने विजापूरवाल्याच्या धाकाने मोगलाच्या स्वाधीन झाला व दौलताबाद किल्ला त्याण मोगलाच्या ताबेत दिला पण पुढे पुन फत्तेखान मोगलाकडून विजापूरवाले याम मिळाला शाहाजीची जहागार फत्तेखान यास मोगल याणीं लावून देऊन त्यास निझामशहाचा मुक्त्यार नेमिले होते, त्यामुळें शहाजीचें व फत्तेखानाचे वाकडे होते

मोहबतखान यास समजल्यावर दौलताबादेस गेले हे वर्तमान आदिलशहा याणी ऐकून फौजेमुद्धा या मोहिमस निघाले मोहबतखान दौलताबादेस जाऊन ते शहरपन्ना घेऊन किल्ला घेण्याच्या तरतुदींत होते आतून फत्तेखान याणीं अदिलशहास पत्र लिहिलें कीं, आपल्या कडून काहीं कुमक येऊन पोहचली असता परचक्राचा पराभव करून किल्ला पादशहाच्या हवाला करितों कारण किल्यात सामान व सरजाम काहा नाहा याजवरून पादशहा यांणीं खवासखान यास सागितले त्याणा आज्ञेप्रमाणे फौज व सामान मुरारपतासमागमे* देऊन रवाना केले आणि मुरारपतास सांगितले जे, जातांच सामान पोहचते करून कुमक करावी, आणि कपेहि करून किल्ला दौलताबादेचा मोहबतखान यास हस्तगत होऊ देऊ नये मुरारपत दौलताबादेजवळ येऊन पोहचले फत्तेखान याणा लटाइ बद केली, कारण फत्ते जहाली असता पादशाही पत्र त्याच्या नावे येईल फत्तेखान याणा मुरारपतास लिहिले की, किल्यात काही जखीरा व सामान नाहा तरी जलद पाठवावे याणा लिहिलें जे तुम्ही जखीरा मागण्याचे कारण काय? तुम्हास याविणे गरज नाहा किला आमच्या स्वाधीन करून बाहेर जाणें नाही तरी तुम्हास कद करून दौलताबादेच्या बुरजावरून खदकात टाकवीन फत्ते खान यांणा मुरारपत ऐकत नाहीं सबब मोहबतखान याजकडे मिळाले आणि त्यास पत्र पाठविलें जे, तुम्ही आमची कुमक केली असता किल्ला तुमच्या स्वाधीन करितो त्याजवरून मोहबतखान याणा विचार केला की, काहा प्रयत्न न करिता किल्ला हातास येतो म्हणून पत्राचे उत्तर व क्रियाशफती देऊन हरकामात कुमक करितों म्हणून सागून पाठविले नतर किल्ला त्याच्या स्वाधीन केला तेथ आपल्या पुत्रास ठेवून निजामशहा व फत्तेखान यास बरोबर घेऊन बऱ्हाणपुरास निघाले आणि किल्ला लढाई व श्रम सायास न करिता आला यास्तव व लष्कर श्रमी झाले याजबद्दल दररोज कोश दोन कोश चालाव हे वर्तमान आदिलशहा याणीं ऐकून त्याच्या पाठीवर सरदार फौज देऊन रवाना केले ते आल्यावर मोहबत खान याणा द्रव्य देऊन आपली व लष्कराची मोकळीक करून घेतली, आणि आपल्या सरहद्दींत पोहचले

शहाजी महाराज व मुरारपत व रणदुल्लाखान मागे फिरून शहाजी महाराज नाशिकाकडून भीमगडास गेल, रणदुल्लाखान व मुरारपत त्र्यंबकाकडून विजापुरास आले, खवासखान मुरारपतावर बहुत रागास येऊन बोलले की, तुम्ही फत्तेखान याचें न ऐकता किल्ला मोहबतखान यास देविला आणि पादशाही द्रव्यही बहुत खर्च झाल, मुरारपत काहा एक उत्तर न देता स्तब्ध बसले, पादशहात निजामशाहावर पादशहा नाहीं, याजमुळे आदिलशहा व शहाजहा ह उभयता तो मुलख घेण्याचा प्रयत्न करू लागले, आणि सिद्दी रेहान सोलापुरीं होते शहाजी महाराज भीमगडा होते, श्रीनिवासराव जुन्नरास

---

* मुरारपत—हा मोठा कर्ता ब्राह्मण होता, बारबल, जनार्दनपत, अक्कण्णा व मादण्णा वगैरे सडळीप्रमाणेंच बहुतेक सर्व कारभार याजकडे असे

होते, सिद्दी साया सैफखान तळ कोंकणात होते, सिद्दी अंबर, जाजिरा राजपुरा होत आणि दुसरे किल्लेदार व जमीदार आपलाले ठिकाणीं प्रांत घेण्याच्या उद्योगांत होते सिद्दी रेहान थोड्या फौजेनिशीं मोहबतखान याजशीं युद्ध करून यश संपादिलें, आणि निजामशाही स्वार चार पांच हजार त्याजपाशीं जमले होते खवासखान याचा स्नेह पूर्वापासून होताच, त्या वेळेस अदिलशहा याची फर्मान लिहून हाफीजनसरुल्लाह याजबरोबर पाठविला जे, " तुम्ही पुरुषार्थ करून मोहबतखान याजबराबर लुटला यास्तव तुम्हावर संतोष होऊन फर्मान पाठविला आहे तरि फर्मान देखतांच कोणा विश्वासूक इकडून पाठवून देणे म्हणजे जे बक्षिस मिळावयाचे तेही प्राप्त होईल "नंतर हाफाजनसरुल्लाह याचा सन्मान बहुत करून त्याजबराबर आपल्याकडाल सिद्दी पोलाद दौलतखान व न्यामतखान व विनंतिपत्र देऊन रवाना केले ते येऊन पावल्यावरि पादशहा व खवासखान याणी यास कोल्हापूर व कऱ्हाड हे परगणे दिले आणि पोलादखान व दौलतखान यास जवळ राहण्याविषयीं हुकूम झाला

शहाजी महाराज भीमगडा जाताच निजामशाही प्रांत पुणें व जालना बालेघाटपर्यंत व जुन्नर व अहमदनगर व संगमनेर व नाशिक व त्र्यंबकपर्यंत घेतले आणि सात आठ हजार स्वार ठेवून प्रांत लुटू लागले इरादतखान दौलताबादेस होते त्यास मालोजी भोसले याजकडून स्नेह केला आणि उमेदवार शहाजहा पादशहा यांच्या कृपेचे म्हणून मनसब बेवीस हजारी करार करून फर्मान शहाजी महाराज यांच्या नांवे व वस्त्रे पादशहाचा आणून दिल आणि शहाजीमहाराज ज्याप्रमाणे सांगतील त्याप्रमाणे दिल्लीहून आणवून देऊन शहाजहाचे चाकर करून विजापूरच्या पादशहाचा मुलूख [ १ ] असे इरादतखान यांच्या चित्तांत होते हे वृत्त महाराजास समजून हे हुशारच होते मुरारपंतास न कळतां खवासखान याजकडून कागदपत्रे येत होता शहाजी महाराज याणी लिहिले का, तुम्हांकडून काहीं उपराळा जहाला असतां आम्हीं पुनरपि निजामशाही उभी करितो त्यास खवासखान यांच्या चित्तांत होते, परंतु मुस्तफाखान यांच्या विचारास येईना खवासखान दौलताबादेस गेले अजुर्दे-पणानें इरादतखान याशी स्नेह केला आणि शहाजीमहाराज याचें भय होते, परंतु ही मस-लत, याजवरून बहुत संतोष वाटला आणि पत्राचे उत्तर पाठविलें कीं, वंश निजामशाही म्हणून गादीवर बसवावें असे लिहिले मुरारपंत याजबराबर फौज देऊन रमजेस शहाजी महाराजाकडे रवाना केले शहाजी महाराज श्रीवर्धन किल्याहून निघून कोंकणात जाऊन निजामशाहा वंश कैदेत होते त्यातून दहा वर्षांचा मूल मुरतजा नामें होता त्यास आणून भीमगडा येऊन तक्तावर बसविले आणि प्रांत घेण्याच्या उद्योगास लागले सिद्दी साबा सैफखान कोंकणप्रांत घेऊन भीवडीस होता, त्यास शहाजी महाराज याणी पत्र आपल्या व मुरारपंत यांच्या नांवें तुम्हीं निजामशहास येऊन भेटाव असे लिहिल तेव्हां महाराजाच्या लिहिण्यास राजी न होतां आदिलशहाचा चाकरी करावी म्हणून कोंकणप्रांत शहाजीमहा-राज यांच्या स्वाधीन करून निघाले ता शहाजी महाराज याणी फौज त्याच्या पाठलागास

पाठविली तेव्हा उभय लष्करची गाठ पडून युद्ध होऊं लागले दोहोकडील मनुष्यें बहुत जाया झालीं सिद्दी अबर तोफखान्याचा सरदार होता त्यास कैद केला, आणि सैफखान याच्याही फौजेस वेढा दिला इतक्यात मुरारपताकडील फौज कुमकेस येऊन सैफखान यास घेऊन नतर विजापुरास जाऊन पादशहाचा भेट घेतली बादशहानी त्यास दोन ल होन देऊन हरपनहळी येथे ठेविले नतर काहीं दिवसांना मृत्यु पावले शहाजी महाराजाना श्रीनिवासराव यास मेजवानीस बोलावून कैद करुन त्यांजकडील किल्ले व प्रात घेऊन मुरतजा पादशहास जुन्नरास घेऊन येऊन द्रव्य व सरजामहा बहुत सग्रह केला दहा बारा हजार स्वार जमविले

हें वर्तमान मोहबतखान यास कळून, बहुत क्रोधायमान होऊन, शहाजहा पादशहा याच्या आज्ञेवरून शहाजादा § दारुशकोह यास बऱ्हाणपुराकडून परडे किल्यास वेटा घातला आणि सुरंग काटण्यास सागितला किल्यातील फौज तयार होऊन युद्ध करात होते असे चार महिने युद्ध चाल्ले ते समया मोहबतखान याणा विचार केला की, येथे बसून उपयोग नाहा म्हणून काहा निमित्त करून बऱ्हाणपुरास गेले

सुलतान महमद याची मातुश्री हिजरी सन १०४३ छ ३ माहे सफर रोजा मृत्यु पावली ते समयीं खवासखान याणीं मुस्तफाखान यास कैद केले आणि वरकड मुत्सद्दी यासही दूर केले आपल्या तर्फेचे त्या कामावर ठेविले तेव्हां मुत्सद्दी याणीं खवासखान यास पत्र लिहिले का, मुरारपत कामास योग्य नाहा, याकरितां त्यास काशीस जाण्यास निरोप द्यावा म्हणजे आम्हा तुमच्या पक्षाना वागतों तेव्हा याणा लिहिले जे, तुम्हीं आज त्यास राजी नाहीं उद्या आम्हांसही राजी नाहीं म्हणून असे उत्तर आले त्याजवरुन सर्वत्रानी शेख मइनुद्दीन यास शाहाजहाकडे रवाना केले का, विजापुरी बहुत अव्यवास्थितपणानी वागतात याजकरिता कुमकेस फौज पाठवून, बदोबस्त करून, विजापूर आपल्या ताब्यात घ्यावे आणि अली खैरयतखान व अली खुदावतखान व महमद याकुबखान व राघोपत व खेलोजी भोसले व सज्यराव घाटगे वगैरे विजापूरन्या सरहद्दातून निघून गुलबर्ग्यास येऊन राहिले. इमामखान हवालदार आनिकेरेचा याणी बड केले त्याच्या पारिपत्यास खवासखान याणी मुरारपत व फौज रवाना केली आणि काहा फौज मुत्सद्दी यान्या रोखास ठेविली मुत्सद्दी याणा विचार करून खवासखान याच्या पारिपत्यास विजापुराकडे निघून मलिक रेहान सोलापुराहून निघून कमलापुरीं येऊन मिळाला राघोपतास सागितलें कीं, तुम्ही भीमानदी भरली आहे, त्यास पलीकडे जाऊन उतरावें, आम्हीही येऊन पोहचतो नतर राघोपत गेले खवासखान याणा मलिक रेहान याजबरावर राजकारण लावून बोलणें लाविलें जे, "रणदुल्लाखान वगैरे हे दोलत गारत करण्यास तत्पर जहाले तुम्ही दौलतीचें कल्याण करणारे तेव्हां

§ ग्राटडफ म्हणतात शहाजादे सुजा यांस पाठविलें

हें योग्य नव्हे " मालिक रेहान हे रुसून टाकळीहून निघून मदप येथे गेले. राघोपंत भीमा उतरून पांच सहा हजार फौजेनिशीं देवगावच्या सुमारे राहिले. मुरारपंत वेढा मोडून निघाले ते राघोपंताचे वृत्त ऐकिलें. तेव्हां विचार केला कीं, ते सर्व एकत्र झाले नाहींत तों पर्यंत जाऊन गांठावें असें योजून आनाकरेहून पस्तीस कोस एक रोज व रात्रींत येऊन लढाई सुरू केली. सय्यद उसमान, शेलार मोठे बहुत शूर मुरारपंताकडील ठार झाले आणि राघोपंताकडील लष्कर मुरारपंतावर पडून बहुत जाया जखमी जहाले. लष्कर पळूं लागलें तेव्हां मुरारपंत पधरा स्वारानिशीं सावनुरास जाऊन तेथें निजामशहा कडील मुस्तफाखान होता त्याची भेट घेऊन, तेथून निघून द्वारकेस[1] गेले. तेथून मौजे मदगी रणदुल्लाखान याच्या जहागिरींतील लुटून कृष्णातीरीं येऊन राहिले. तेव्हां सर्वांनीं विचार करून खवासखान याजकडे विजापुरास जावें म्हणून तो धारवाडचे नाईकवाडी याजबरोबर नदी उतरून धारवाडास गेले. रणदुल्लाखान यास मुरारपंताचा मोड होऊन पळाले हें वर्तमान समजताच आपण फौजेनिशीं भीमा उतरून विजापुरानजीक जाऊन राहिले. खवासखान याणीं विजापूरचे दरवाजे बंद करून लढाईचा बेत केला, रणदुल्लाखान याणीं खवासखान यास निरोप पाठविला जे, शहरचे दरवाजे उघडावे आणि तुम्हीं सर्व अमिराप्रमाणें रहावें. ते याणीं ऐकिलें नाहीं. तेव्हां आदिलशहा याणीं सिद्दी रेहान यास बोलावून आणून सांगितलें जे, या वेळेस कार्य साधावयापूर्वी सिद्दी मजकूर व मातुश्री इब्राहिम आदिलशहा याच्या कारकीर्दीत नौरसपूर येथें विकावयास सौदागरांनीं आणिले तेव्हां सिद्दीमजकूर पादशहानीं खरेदी घेऊन आपले पुत्र सुल्तान महमद यास दिला व त्याच्या मातुश्रीस अर्गीमान हजारी याणीं घेतली. त्यापासून शहाजाद्या बराबर सिद्दी मजकूर नेहमीं असे. एके दिवशीं शहाजादे याणीं त्याची टोपी हौदांत टाकली तेव्हां तो पादशहाकडे फिर्याद गेला. पादशहा याणीं टोपी काढून देण्यास सांगितलें आणि जवळ होते त्यास सांगितलें कीं, पादशाही सुल्तान महमद करील तेव्हां हा वजिरी करील. तेव्हां सिद्दी मजकूर याणीं करीम खान व हुसेनखान या दोघास हस्तगत करून खवासखान याच्या पारपत्यास तयार होऊन कचेरींत बसले. खवासखान पालखींत बसून घरास निघाला तों करीम खान याणीं उरावर खंजीर मारला हुसेनखान याणीं वार मारला असतां खवासखान जखमी होऊन आपल्या घरास गेला. सिद्दी रेहान याणीं पाहिलें कीं खवासखान जखम सोसून गेला तेव्हां हा वांचला असतां आपल्यास नीट नाहीं म्हणून पादशाहाकडे जाऊन खाजगीचे लोक घेऊन जाऊन खवासखान याचें घर लुटून पाडून शिरच्छेद केला. हुसेनखान तयार होऊन हत्तीवर बसून खंदकापर्यंत आला. त्यास सिद्दी मजकूर लोकांसुद्धां जाऊन लोक मारून त्यास मारिला. त्याचा बंधु दाऊदखान पादशहाच्या कृपेंत होता त्यासही मारला. रणदुल्लाखान वगैरे मुत्सद्दी पादशहाच्या आज्ञेनें त्याच रात्रीं येऊन अहापूरच्या हौदावर येऊन उतरले. तेव्हां पादशाहानीं खवासखान व मुबारकखान याचें शीर पाटींत घालून रणदुल्लाखान वगैरे मुत्सद्दी याजकडे पाठविलें. दुसऱ्या दिवशीं सर्वत्र

---

१ या धामधुमींत द्वारकेस जाऊन परत दक्षिणेंत आले हे मोठें नवल आहे

आल्यावर पादशहा तख्तावर बसून सिद्दी रेहान यास किताब एखलासखान हा देऊन वजिरी दिली नबाबखान यास प्रांताचा बंदोबस्त सांगितला अहमदखान दरद खुदावतखान यास सरनोबती दिली हिजरी सन १०४५ त खवासखान याणी वजिरी आठ वर्षे केली

नंतर कांहीं दिवसांनीं मुस्तफाखान बळगावच्या किल्ल्यात कैदेत होता त्यास आणा-वयाकरिता शहाहसन फकरजाबादेस रवाना केले त्याणी जाऊन नववे दिवशी त्यास विजापुरा पाहचविले त्यास पादशहाना सर्फराजी करून ठेविले मुरारपंत पांच हजार स्वारांनिशीं धारवाडास आले तो किल्लेकरी याणीं किल्ल्यात घेतलें नाही तेंव्हा लढाईस तयार झाले ते समयीं दलपतराव व सूर्याराव व नाईकवाडी क्रियाप्रमाण घेऊन भेटीस आले नंतर कैद करून काही लोक मारिले पण तेथे चार रोज राहू न दिलें तों खवास-खान यास मारलेली खबर आली तेथून रात्रीस पळून हरिहरास गेला तेथील अमलदार याणी कैद करून विजापुरीं पोंहचविला तेंव्हा रुबरु पादशहास शिवीगाळ केली त्याजमुळे जिव्हाच्छेद करून गाढ्यावर बसवून शहरांत फिरवून मारिला खवासखान यास मारिल्यावरि एक महिन्यानं हे वर्तमान झाले हिजरी सन १०५७ त मुस्तफाखान यास फौज देऊन कर्नाटकास रवाना केलें पेशजी शहाजी महाराज व असदखान यास रवाना केलें मागून मलिक रेहान वगैरे सरदार रवाना केले कृष्णाकिनाऱ्यास युद्ध झाले शहाजी महाराज याणीं मोड केला ते समयीं शहाजी महाराजाचा हत्ती आणि सरंजाम लुटून नेहला मुस्तफाखान याणीं आपल्या लष्करचे बुनगे बंकापुरास पोंहचवून कुमक पाठवावी म्हणून पादशहास पत्र लिहिले गाजीखान व मलिक रेहान गजीकोट घेण्यास रवाना केले ते तेथें जाऊन वेढा घालून बसले होते ते समयीं हुकूम आला जे, मुस्तफाखान याच्या कुमकेस जाणे तेंव्हा ते सर्व सोडून तिकडे निघून गेले तो बंकापुराजवळ नबाब मुस्तफाखान याची भेट झाली मुस्तफाखान सर्वांस मेजवानी करून लढाईस निघाले येलूर येथें लढाई सुरू झाली मलिक रेहान याणीं आपली फौज एक वेळ शहाजी महाराज असदखान याच्या फौजेवर पडून मोड करावा असा बेत करून चालून घेतले असदखान याच्या घोड्यास जखम लागून घोडा पडला बाबाकरी व खवाजहुसेन याणीं कोतवाल घोडा आणिला त्या घोड्यावर बसून निघाले नबाब मुस्तफाखान लष्कर सुद्धां तळ्याच्या कांठीं उभें राहून तमाशा पहात होते तेथून मागें सरून मलिक रेहान याचा तमाशा पहावा म्हणून मागे सरून उभे राहिलें इतक्यांत मलिक रेहान मोड होऊन पळाले आल्यावरि नबाब याणी शाबासकी देऊन आपली तरवार दिली आणि मलिक रेहान यास सांगितलें कीं, तुम्ही शहाजी महाराजाकडील हत्ती लुटून ठेविले ते पादशहाकडे पाठवावे त्याणीं उत्तर दिलें जे, तुम्हाकडे हत्ती देणार नाहीं पातशहाकडे आम्ही जाऊ त्या वेळेस हत्ती गुजरू हे वर्तमान पादशहास समजल्यावर मुस्तफाखान यास लिहिले जे, मलिक रेहान याणीं शूरत्वें लढाई केली हें प्रसिद्ध झालें असतां त्याचें चित्त अजुर्दा करणें हें योग्य नाहीं जे वेळेस येथें येईल त्या वेळेस हत्ती घेतील असें येताच मुस्तफाखान चंदीकडे

निघून गेले मलिक रेहान यास कन्या दोन उपवर झाल्यामुळे लग्न करण्याकरितां मुस्तफाखान याजबरोबर गेले नबाब व शहाजी महाराज याजमध्ये वैमनस्य येऊन शहाजी महाराज मुगलयांशीं वागूं लागले सन मजकूर छ १९ माहे रज्जब रोजीं मुस्तफाखान याणीं मलिक रेहान व बाजीराव घोरपडे व यशवंतराव व असदखान यास फौज देऊन शहाजी महाराजास कैद करण्यास रवाना केले तो शहाजी महाराज आपल्या डेऱ्यात रात्रीं रागरंगांत निमग्न होते ना येऊन वेढा घातला शहाजी महाराजास हें वर्तमान कळतांच घोड्यावर बसून जावें तो बाजीराव घोरपडे याणीं येऊन पाय धरिला आणि मुस्तफाखान याजकडे घेऊन गेले महाराजाचे स्वार तीन हजार होते ते पळून गेले लूट पुष्कळ सापडली छ

माहे मजकुरीं खैरायतखान मेला मलिक रेहान मुस्तफाखान याचा विश्वास धरीत नव्हता भेटीस गेले असतां बहुत हुशारीनें रहात शहाजी महाराजास धरल्यावरि जाणखी दोन हजार स्वार ठेविले मुस्तफाखान याणी सांगून पाठविले कीं, फौज ठेविण्याचें कारण काय ? याणीं सांगून पाठविलें जे, चंदीस वेढा आणि शहाजी महाराज कैदेत, चहूंकडून गलिम असे जाहे त्यास कोणाकडून काहीं भय न होईल याजकरितां ठेविलें नंतर निरोप घेऊन चालिले छ - माहे मोहरम सन १० ० सोमवारीं तिसरे प्रहरीं सुलतान महमद आदिलशहा मृत्यु पावले, वय वर्षे ८० दौलत केली वर्षे १

यास पुत्र अली आदिलशहा सन १०८८ सालीं झाले ते गादीवर बसले पवाचा वजीर अजब खानमहमद यास मारून वजिरी इब्राहिमखान यास दिली अली आदिलशहा याचा मातुश्री बडेसाहेब मक्केस निघाली त्याजबरोबर वजीर गेले तेव्हां वजिरी अबदुल महमद यास दिली

## हकीकत खान यास मारण्याची .

शहाजादा पादशाह नजरबंदांत होते औरंगजेब फौज घेऊन दक्षिणेस निघाले हें वर्तमान अली आदिलशहा याणी ऐकून खानमहमद याजबरोबर सरदार व फौज देऊन सामोरे रवाना केले ते जाऊन पोंहचले एके दिवशीं अवरंगजेब याची फौज अडचणीच्या जागीं उतरली तेव्हां खानमहमद यानीं रस्ता बंद केला सबब बहुत हैराण होऊन पादशहानी त्यास चिठी पाठविली की, तुम्ही आमची मुरवत ठेवून रस्ता सोडला असतां स्नेहांत अंतर करणार नाहीं, आणि दिल्लीचा शहाजादा दक्षिणेस कोणही पहाणार नाहीं खानमहमद स याकाळीं नमाज करून काहीं पटत बसले होते तो ही चिठी आली तिच्या पाठीवर लिहून पाठविले की, आज रात्रीस निघून जावें अशी रवाना करून आपल्या मंडळास सांगितले कीं, आमचा मृत्यु समीप आला अवरंगजेब रात्रीस निघून गेले अफजुलखान बहुत कठोर होता, त्याणीं हें ऐकताच खानमहमद याजपाशीं येऊन सांगितले जे, हा समय आहे, तरि जाऊन गांठू खान महमद याणी उत्तर दिले कीं, गेला, तो गेला जाऊं द्या अफजुलखान बोलले की, कोठें जातो ? पाठलाग केला असतां सापडेल खानमहमद याणी विचा-

रिलें जे, त्यास धरून काय करणल ? शहाजादा दिल्लीचा त्यास धरिलें असतां बहुत अरिष्टें होतील, असे सागून तसेच ठेविले अफजुलखान याणीं विचार केला जे, हे करणे खान महमद यांचें तेव्हा क्रोधायमान होऊन विजापुरास जाऊन तरवार पादशाहापुढें ठेऊन हा सर्व मजकूर विदीत केला पादशहा बहुत अजुर्दा होऊन खानमहमद यास येण्यास पत्र पाठविलें तेव्हा त्याणीं हलके हलके मुक्काम करून विजापुरास आले तो मक्केदरवाजाच्या लोकास हुकूम होताच येताच मारिले सन १०६७ हिजरात

कोकणप्रांत चेऊल व दाभोळ व वेगुर्लें व साळसी व को वा वगैरे बदरे विजापुराकडे होतीं पूर्वी दौलत निजामशाही बुडविली तेव्हा प्रात शहाजहापादशहाकडे निम्मा व सुलतान महमद अदिलशाह याजकडे निम्मा वाटून घेतला तेव्हा सारा कोकणप्रात विजापुराकडे आला त्याचा मामलत मुल्ला महमद यास सागितली आणि त्यापैका दोन महाल पुणें व सुपें शहाजी महाराजास जहागिरात दिले होते तेथे शहाजी महाराज जमेदाराप्रमाणे वतनदारी करून राहिले सुलतान महमद याणी कर्नाटक प्रात घेण्यास सर्व सरदार फौज देऊन रवाना केले त्या समयीं शहाजी महाराजही गेले तिकडे वडील पुत्र संभाजीराजे मृत्यु पावले शिवाजी महाराज त्या दोन महालची वहिवाट करून पुणें मुक्कामीं रहात होते पादशहा सुलतान महमद यास रोग उत्पन्न होऊन अतकाळ समीप आला त्याजमुळें प्रा(ता)त शत्रूचा उपद्रव बहुत झाला सबब मुल्ला अहमद यास कोकणातून येण्याविषयी हुकूम जहाला त्याजवरून तेथून विजापुरा आले तो प्रांत मोकळा पाहून, शिवाजाराजे याणी तजवीज करून, कित्येक मराठे जमवून कित्येक किल्ले घेतले बारीचे किल्ले सरजाम विरहित होते ते हलके हलके घेतले इतवयात पादशहाचा काळ जहात्याचे वर्तमान ऐकून बहूत सतोष होऊन कोकण प्रात घेतला आणि किल्ले नवे बाधावयास लाविले पूर्वीपासून चाळीस किल्यावर सामान भरलेले होते त्यापैकी रायरी किल्ला घेतला तेव्हा त्याच्या पारिपत्यास अली अदिलशहा याणा अफजुलखान यास रवाना केले ते जाऊन लढाई देऊन किल्ले सोडून घेतले तेव्हा शिवाजी महाराज याणीं विचार करून बोलणे लाविलें की, आमचे सर्व अन्याय पादशहाकडून क्षमा जहाल्यास आणि पादशहाची भेट करविली असता पूर्वीप्रमाणें चाकरी करू तेव्हा अफजुलखान याणीं बरें आहे म्हणून सागितलें नतर त्यास मेजवानीस जावली किल्यावर यावे म्हणून सागून पाठविले तेव्हा तो निघोन आला येताच त्यास मारिला सन १०७० हिजरात

हे वृत्त पादशहास समजल्यावर बहुत क्रोधायमान होऊन कोणास पाठवावे या विचारांत होते तो सिद्दी जवाहर कर्नुळास बड करून होते त्याची अर्जी आली जे सर्व अन्याय क्षमा करून अभय जहाल्यास सवेंशा येऊन हजर होईन पादशहानीं उत्तर लिहिले का तुम्ही म्हणता ते कबूल, तरि जलद येऊन पाचावें त्याजवरून सिद्दी मजकूर आले त्याची सरफराजी करून किताब सलाबतखान देऊन शिवाजी महाराज याच्या पारिपत्यास रवान

* वर मुल्ला " महमद " असे आहे

केले नंतर येऊन लढाई देऊन कित्येक किल्ले घेतले शिवाजीराजे पन्हाळ्यास येऊन राहिले सिद्दी मजकूर किल्ल्यास वेढा घालून बसले तो महाराज याणा स्नेहाचे बोलणे लावून आपल्या आधीन केला हें वर्तमान पादशहास समजताच खुद्द पादशहा निघाले ते मिरजेस येऊन पोंहचले हे वर्तमान शिवाजी यास कळताच निघोन गेले सिद्दी मजकूर करनुळाकडे गेले किल्ला पादशहाच्या स्वाधीन जहाला सन १०७७ हिजरा

नंतर पादशहा विजापुरास निघोन गेले सिद्दी जवाहर पन्हाळ्याहून निघाला तो प्रांत लुटीत खंडणी घेत चालला त्याच्या पारिपत्यास खुद्द पादशहा फौज घेऊन निघून कृष्णेच्या तटाका राहिले तो खबर आली कीं, सिद्दी याकुत हवालदार तोरगळकर याणी बंड केले तेव्हा तिकडे जाऊन त्याचें पारपत्य करून रायचुरास गेले सिद्दी जवाहर लढाईस तयार होऊन आले अबदुल महमद वजीर जाऊन युद्ध होऊ लागलें सिद्दी मजकूर याचा फोज सिकस्त होऊन रायचुरास गेले तेथें एक रात्र राहून दुसऱ्या दिवशा तुंगभद्रा उतरून करनुळाकडे गेले पादशाहा यशस्वी होऊन रायचुरास गेले तेथे किल्लेदार सिद्दी मजकूर याजकडील होता त्याणें विचार करून किल्ल्या पादशहापाशीं आणून दिल्या, आणि कृपा संपादून घेतली नंतर पादशहा किल्ल्यात गेल्यावर मुसलखान व जबदस्त यास हुकूम जहाला का, फौज घेऊन जाऊन परडे किल्ल्याच्या सुमारें राहून सिद्दी मजकुराकडून उपद्रव जहाला असतां पारपत्य करावे सरदार मजकूर हुकुमाप्रमाणे तुंगभद्रा उतरून राहिले तो फौज आली या करितां सिद्दी मजकूर फार क्रोधायमान होऊन सिद्दी मसाऊद याजबराबर फौज देऊन रवाना केला तो आल्यावर उभय लष्कराचे युद्ध होऊन सिद्दी मजकूर याचा मोड होऊन करनुळाकडे पळून गेला हे वर्तमान सिद्दी जवाहर ऐकून फार खिन्न जहाला त्यास पूर्वी रोग लागला होता आणि हे दुःख झाले यास्तव बहुतच रोगानं ग्रासून त्यांतच मरण पावला नंतर त्याचा पुत्र अबदुल अजीज व सिद्दी मसाऊद याणा अबदुल महमद वजीर याचा स्नेह केला त्यांणीं पादशहास मागून सर्फराज करून चावरास ठेविले

हिजरी सन १०७३ यांत भद्राप्पा नाईक राजे जमीदार मुलनार सुभे बिदनूर याणा बडाई करून पादशाही मुलुक घेतला सबब खुद्द पादशाहा तयार झाले आणि पुढे त्याच्या पारपत्यास सय्यद इलपास यास सर्जेखान हा किताब देऊन फौजेसह रवाना केलें मागाहून आपणही गेले सर्जेखान तेथें जाऊन लढाई देऊन कित्येक किल्ले परत घेतले पादशहाही बंकापुरास येऊन पोहोंचले हे ऐकून बहुत संतोष होऊन युद्ध करू लागले कर्नाटक प्रांत घेण्यास अबदुल रहीम बहलूलखान यास पाठविलें होतें, त्यास हुजूर येणे म्हणून आज्ञापत्र पाठविलें त्याजवरून ते आले त्याची सर्फराजी करून सेनेसहीत सर्जेखान याजकडे निघाले सर्जखान बिदनुरीं लढत होते तेथें जाऊन फौज मिळाली भद्राप्पा नाईक वीर सोडून बिदनुरांतून कोलीदुर्गास गेले बिदनूर घेऊन पादशहा कोलीदुर्गाकडे निघाले इतक्यात बहलूलखान याच्या विद्यमानें बोलणें केलें जे, दरसाल खंडणी देऊन राहू तें पादशहानीं कबूल करून पूर्ववत् प्रमाणें रहाण्यास हुकूम दिला ते समयीं भद्राप्पा नाईक याणीं नजराणा बहुत दिला

पादशहा निघून विजापुरास आले नतर मुल्ला अहमद यास कर्नाटक प्रांता रवाना केले त्यावर तिकडे जाऊन चदावर घेतलें आणि बाकीचे किल्लेही घेतले

इकडे अलमगीर याणा जयसिगराजे शिवाजी महाराज याच्या पारपत्यास दक्षिणेस रवाना केले त्याणीं विजापूर प्रातास उपद्रव केला सबब अदिलशहा याणा मोठमोठे सरदार सल्लाह अलमगीर व आपल्याम ये असावा म्हणून रवाना केले परतु त्याणा काहीं ऐकिलें नाहा तेव्हां आदिलशहा याणा अबदुल महमद याजबराबर फौज देऊन रवाना केले. तों खबर आली कीं, जयसिंगाकडील सरफराज याणीं पाच सहा हजार फौज घेऊन जाऊन मगळवेढ्याचे ठाणे घेतले त्या वेळेस सर्जेखान मगळवेढ्यास जल्द जाऊन लढाई दिली सर्जेखान याची फत्ते जहाली सर्फराज निघून गेले आणि सर्जेखान पादशहाच्या फौजेत दाखल जहाले अबदुल महमद वजीर व पोलादखान व अजीजखान व गालीबखान व दियानतराव वगैरे तयार होऊन दक्षिणेंतील फौजेची व हिदुस्थानच्या फौजेची कित्येक दिवस लढाई होत होती इतक्यांत हैदराबादवाले कुतुबशहाचे पत्र अल्लीआदिलशहास आलें जे कुमकेची जरूर असल्यास पाठवितो याणा फार उत्तम आहे म्हणून उत्तर पाठविलें त्याजवरून कोणी नेकनामखान याजबराबर फौज देऊन पाठविले तेहा येऊन पावले तों एके दिवशीं वर्तमान आले की, अलमगीर याजकडून सलाबतखान जयसिंगाकडे येत आहे त्यावरून सर्जेखान फोजेनिशी त्याचे तोंडावर जाऊन लढाई दिली फत्ते सर्जेखान याची झाली हैदराबादकर याची व अल्लीशहा यांची फौज एकदर लढता तेव्हा परिणाम नीट नाहीं, म्हणून जयसिंग दिल्लीस निघून गेले पादशाह विजापुरास आले

नतर अल्ली आदिलशहा नेहमा ऐषआरामात नाटकशाळेच्या सगतीस घालवू लागले छ ४ रबिलावल रोजीं मुजफरखान बिंदनुराहून आले त्यास सामोरे पादशहाची स्वारी जावी म्हणून निघाले तों रस्त्यात वारा लागून प्रकृति बिघडल्यामुळे परत येऊन दाखल झाली नतर तिसऱ्या प्रहरा बेशुद्ध झाले एक दिवस एक रात्र तसेच होते दुसरे दिवशीं काहीं शुद्धि आली, परतु अर्धे आग गेलें हें पाहण्यास अबदुल महमद व खवासखान आले, पाहून परत गेले मिरजा युसफबेगखान व धर्माजीपत डबीर बादशहा जवळ राहून दरवाजा बद करून येणें जाणें दिंडींतून यावें असे केले आणि औषध उपाय हकीम शमशुदीखान याजकडून करवात परंतु शुद्ध पूर्ववत्प्रमाणें [ न ] आली आणि रोग दिवसें दिवस वृद्धिंगत जहाला दौलतीचे काम अबदुल महमद वजीर करीत होते एक दोन दिवस पादशहाच्या समाचारास गेले खवासखान चहू दिवसाना येऊन हुजरे यांस बोलावून नेत पादशहाकडे वजीर याचें जाणे येणे होते त्या प्रमाणेंच दियानतराव जात येत होते, परतु दौलतीच्या कामात खलेल जहाली नाही दियानतराव सर्वकाळ अबदुल महमद याचें कोणत्या वेळेस काय होईल या विवचनेंत राहिले युसफबेगखान खवासखान याच्या तर्फेनें वागू लागले अबदुल महमद वजीर व दियानतराव याचा व धर्माजीपत डबीर यांचा द्वेष पडून धर्माजीपत मुजफरखान याच्या विचारें वागू लागले पादशहा याणीं

विचार केला जे, खवासखान व मुजफरखान यांस वजिरी करण्याचें सामर्थ्य नाहीं आणि अबदुल महमद याणीं दहा बारा वर्ष वजिरी करून माहितगार व कार्यकर्ते आहेत व शिवाजी महाराज व बहलूलखान राजी आहेत तरि त्यास आणून, शाहजादा शिकंदर यास हवाली करून त्यास आपल्या समक्ष तक्तावर बसवून त्याणा कारभार करावा त्याज वरून अबदुल महमद यास बोलावून आणून या प्रमाणे सांगितले नंतर त्याणा कबूल केले नाहीं तेव्हां आपल्या मागें दौलतीची व्यवस्था कशी होईल? अलमगीर पादशहा व शिवाजी महाराज हे उभयता वाट पहात बसले आहेत त्यास हेच उत्तम तुम्हीं शिकंदर पादशहास तक्तावर बसवून प्रांताचा बंदोबस्त तुम्ही करावा त्याणीं उत्तर दिलें कीं, माझ्यानें हे काम होत नाहीं या कामास खवासखान योग्य आणि त्याचा बाप या कामांत मेले आहेत त्याजवरून पादशहा अजुर्दा होऊन बसले जे आपल्यामध्ये सामर्थ्य राहिलें नाहीं, त्यास दियानतराव वगैरे याणीं अबदुल महमद यास सांगितले परंतु त्याणा मान्य केलें नाहीं आणि बोलिले कीं, खवासखान याणा शाहाजादे यांस तक्तावर बसवून आपण वजिरी करावी आणि आम्हास किल्ले शहादुर्ग व सागर व गुलबुर्ग देऊन मोगलाई तोंडावर ठेवावें बहलूलखान याजकडे मिरज आहेच आणि पन्हाळ देऊन शिवाजी राजे यांच्या तोंडावर ठेवावे, आणि मुजफरखान यास बिदनुरीं ठेवावें त्याजवरून खवासखान बहुत खुषी होऊन अबदुल महमद व खवासखान यांचे क्रियाप्रमाण जहाले जे, पादशहा मृत्यु पावल्यावर दुसरे दिवशी याप्रमाणे करावें पादशहास रोगानें बहुत हैराण केले ते समयीं दियानतराव खवासखानाकडे मिळाले बमाजीपंत डबीर मुजफरखान याजकडे मिळाले परंतु अबदुल महमद व दियानतराव याणा मुजफरखानाचे काहीं चालू दिले नाहीं पादशहास सांगून बिदनुरास रवाना केलें नंतर बमाजीपंत याणीं पादशहास सांगून परत मुजफरखानास आणविलें त्याणी फौज यादवाडांत ठेवून एक रात्रींत येऊन पावले आणि सरकारकून पादशहाच्या सन्निध राहून खवासखान याचा येण्याची परवानगी बंद केली आणि सांगितलें जे, तुम्हास येणें असल्यास एकटे यावें यामुळें याचे व त्याचे वेमनस्य पडले मीरजा युसफबेगखान पादशहास रोग उत्पन्न जहाल्यापासून शेवटपर्यंत एक क्षणभर सोडून गेले नाहींत, आणि खवासखान याची तर्फदारी करीत होते पादशहास मृत्यूच्या पूर्वीं पंधरा दिवस श्रम पडला होता युसफखान याणीं सर्व कारभार खवासखान याच्या स्वाधीन केला त्याणीं पादशहाचा अंतकाळ समीप आला हे पाहून आंत जाऊन युसफखान याच्या मार्फतीनें वाड्याचा बंदोबस्त करून किल्ल्याचाही केला हिजरी सन १०८३ ता १२ शाबान रोज रविवार पांचव्या तासीं अली आदिलशहा मृत्यु पावले नंतर सरदारांनीं जाऊन माती दिली, आणि घुमजही बांधला

त्याच दिवशीं शहाजादा शिकंदर याचें वय पांच वर्षांचें होतें त्यास तक्तावर बसवून द्वाही फिरविली दुसरे दिवशी अबदुल महमद यांणीं खवासखान याजकडे सांगून पाठविलें जे, कराराप्रमाणे किल्ले द्यावे त्याणीं उत्तर दिले कीं, तूर्त किल्ले देता येत नाहींत कारण शहाजादा लहान आहे,यास्तव दोन वर्षे झाल्यावर पहातां येईल यावरून अबदुल मह-

मद अजुद होउन दिल्लीस निघून गेले तेथें जाऊन हा सर्व वृत्तात अवरगजेबास विदीत केला वैरी चहूकडे छपून होते, त्यास ही सधा सापडला शिवाजी राजे याणीं पन्हाळा घेउन प्रातांत फौजा रवाना केल्या त्याजवर विजापुराहून नबाब अबदुल करीम फौज देऊन रवाना झाले ते येउन पन्हाळ्या नजीक पावले तो शिवाजी महाराज तयार होऊन लढाई सूर्योदयापासून अस्तमानपर्यंत जहाली दोहाकडील लष्कर बहुत जायाजखमा जहाले नबाब याची सिकस्त होउन तिकोट्यास राहिले विजापुराहून नवी फौज येऊन पावली हे वृत्त महाराजास कळून आपले सरदार याजवर क्रोधायमान होउन बोलले जे, तुम्ही नबाबास जाऊ दिले आणि आपले यश आपल्या हाते सोडिले, यावरून दोन चार सरदारास जिवे मारविले

अवरगजेब पादशहाच्या चार पिढी पासून दक्षण घ्यावा हा सकेत होता, परतु ते जहाल नाही याजकरिता प्रथम नबाब बहादरखान यास लाहोराहून आणवून रवाना केले ते पेडगावा येउन राहिले खवासखान वजीर याणीं हे वर्तमान शमशुदीखान हकीम यास सागितले हकीम याणा खवाजे अमीन काश्मारी नबाबाचे परम विश्वासुक, यास आपलेसें करून, नबाबाची व खवासखान याची दोस्ती करविली आणि बोलणे लाविलें जे, शाहरबानु ऊर्फ पादशहा बिब्बी कन्या अदिलशहाची उपवर आहे ती शहाजादे यास देऊन मोहीम शिवाजी महाराज याजवर करवावी, आणि सुलतान शिकदर यास किताब पादशाही अलमगीर यास आणवावा याप्रमाणें खवाजे अमीन याणीं नबाबापाशीं रदबदली करून खवासखान यास किताब नवाजिषखान व पोषाख आणून दिले बाकीचे ही चालविले, परतु चहूकडून गलिमाची गल्बल झाली मिरजा बकर शमशुदीखान हकीम याचे बधू त्यास नबाबापाशीं वकिलीस ठेवून कारभार करीत होते मिरजा बकर काही कामामुळें विजापुरीं आले खवासखान यास हकीम याचे द्वेषी जे होते त्याणीं चाडी सागून काढविलें पुढे काही दिवसानीं मिरजा बकर यासही काढिले नतर वकिलास श्यामराव यास ठेविले नबाब याणीं त्याची भेट घेतली कारण या करण्यामुळें शिवाजी महाराज याणा पचमहाल घेण्यास फौज रवाना केली आणि काहीं दिवसानीं आपणच गेले, आणि नबाबाकडून काहीं खलेल न व्हावी म्हणून त्याजकडे बोलणें लाविलें जे, पेशजी केलेले अन्याय क्षमा करून दक्षणेची देशकत आपले पुत्र सभाजी महाराज याच्या नावे सनद द्यावी म्हणजे नवीन किल्ले घेतले ते परत देऊ, आणि सभाजीराजे यास चाकरीस देऊ बहादरखान याणी विचार केला की, काहीं एक श्रम न करितां साध्य होतें यावरून अवरगजेब पादशहाकडून देशकतीचा फर्मान आणवून सय्यदखान याजबरोबर पाठविला तो शिवाजी महाराज यांणा कोंकणप्रात घेतल्यानतर याची भेट घेउन बोलिले कीं, हें कर्तव्य आम्हास नाहीं आणि यवनाची सेवाही करणें नाही त्यानतर सय्यदखान माघारे येउन सर्व मजकूर नबाबास सांगितला नबाबही बहुत क्रोधायमान जहाले हे वृत्त पादशहास कळल्यावर आपलें पारिपत्य होईल यास्तव, खवास खान यास घेऊन महाराजावर मोहिम करावी, असा विचार करून खवासखानाकडील श्याम-

राव होते त्याचा भेट घेतला नव्हता त्यास बोलावून आणून भेट घेतली आणि स्नेहाच बोलण लागिल श्यामराव थाणा खवासखानाची कन्या बहादरखान यान्च्या पुत्रास द्यावा असे ठरवून विजापुरा येऊन खवासखानास सांगितल्यावरून बहुत संतोष होऊन भेट भीमेच्या कांठीं व्हावी असा बेत केला नबाब पेडगावाहून निघून चालले आणि महमद अमीन यास खवासखान यांजकडे रवाना केले ता ते विजापुराहून हिजरा सन १०८६ छ १० रज्जब राजा निघाले त्याची याची भेट वाटेंत जहाली नबाबाचें पत्र खवासखानास दिल नंतर काही दिवसाना भीमातटा उभयताची भेट होऊन सन्मान जहाले बोलणे होऊन छ २० शाबान रोजीं विजापुरास आले

नबाब अबदुल करीम बहलूलखान हे सरलष्कर होते याचे व खवासखानाचें नम नस्य होतें खवासखान याचा व बहादुरखानाचा स्नेह जहाल्यामुळें खवासखान याचा स्नेह बाह्यात्कारें करून त्यास मेजवानीस म्हणून बोलावून त्यास कैद करून बंकापुरास रवाना केले दुसरे रोजीं छ ४ रमजान रोजीं विजापुरीं जाऊन वजिरी करू लागले आणि खवासखान याच्या तर्फेचा मनुष्यें होता त्यास निरोप दिला आणि खकरखान यास प्रांताचे बदोबस्तास रवाना केल तेव्हा पूर्वीचे मुत्सद्दी वगैरे याचा द्वेष पडला खकरखान यानीं आपलीं मुलें माणसे शहादुर्गांत ठेवून चालले ते शेखमुजहान यानीं आपलें लष्कर एकचित्त करून सांगितलें जे, खकरखान यास पुरुषार्थें करून मारावा म्हणजे अबदुलकरीम याची समजूत करणें अशक्य नाही त्यांनीं उत्तर दिले जे, तुम्ही सांगाल ते प्रमाण तें समयीं खकरखान याना शेखमुजहान यास मेज वानीस बोलाविले ते आले तों सामोरे आपल्या डेऱ्यांतून बाहेर आले आणि त्याचा हात धरण्यास आपला हात पुढें केला, इतक्यात शेख यांना त्याचे दोन्हा हात एका हातीं धरून दुसरे हाता कटयार होती ती चालविली, तो ते त काळ मृत्यु पावले हे वृत्त अबदुल करीम यास समजल्यावर ते बहुत श्रमी जहाले, आणि विचार केला का, ते लोक खवासखानास सोडविण्यास बंकापुरास गेले असतां कठीण, यास्तव आपल्याकडाल कोणी तेथें होते त्यास लिहून पाठविलें कीं, पत्र पावताच खवासखानास जिवे मारावे असें पत्र जाताच मारिलें सन १०८६ छ १० माहे जिल्हेज नंतर त्याना गुमट विजापुरी बांधविला होता तेथें आणून गुमटांत माती दिली छ २० जिल्हेज

त्या दिवसापासून अबदुलकरीम फार सावधगिरीने दहा बारा हजार स्वार ठेवून वागत सर्व सरदार वगैरे लोक याचा द्वेष करूं लागले सबब कित्येक वेळ लढाया झाल्या सिद्दी मसऊद जादुनीस सलाबतखान याच्या जाग्यावर होते त्यानीं विचार करून दक्षणी फोज जमवून अबदुलहसन कुतुबशहाकडे गेले त्यानीं ठरविले ज, अबदुलकरीम, बहलूलखान व सिद्दी मजकूर सरदार वगैरे याचें सख्य असावें आणि अबदुलकरीम यानीं अफगानी लोक ठेविले त्याचे तैनातीचे रुपये सहा लक्ष देणें ते सिद्दी यानीं द्यावे नंतर अबदुलकरीम यानीं त्या लोकांस निरोप देऊन विजापूर किल्ला सिद्दी मजकूर याच्या स्वाधीन करावा नंतर आकाजीपंत वकील आपणाकडून आहेत त्यास वजिरी देऊन सिद्दी मजकूर यांनीं प्रांताचा

बदोबस्त करून शिवाजी राजे वगैरे याचे पारपत्य करावे असें ठरविले इतक्यांत बहलूलखान मृत्यु पावले त्याना दोन वर्षे वजिरी केली

तेव्हां सिद्दीमसऊद येऊन वजिरी करून राहिले तो बहलूलखानाचे पुत्र दिलेरखान व सिद्दी मजकूर याचे वाकडे येऊन सिद्दी मजकूर बेजार होऊन रात्रास निघून अदुनास गेले त्याच्या जागा शामशुद्दिनखान हकीम वजिरी करू लागले नतर काहा दिवसाना सिद्दी येऊन आपले वजिराचें काम पाहू लागले परतु सिद्दी व दिलेरखान यामध्ये बहुत लढाया जहाल्या नतर दिलेरखान विजापूर प्रातास उपद्रव करू लागले त्याणेही कांहा जहाल नाहीं नतर सिद्दी मजकूर याची व आपली मैत्री व्हावी याकरिता बहुत मेहनत केली परतु तेही साध्य जहालें नाहा आणि शहाजादा अलमगीर यास बदोबस्त करण्याविषया वरचेवर लिहीत होते, आणि दुसरे सरदारहा लिहीत होते अवरगजेब पादशहाकडून पत्रे शहाजाद्यास रागाचा येत होता दिलेरखान मृत्यु पावल्यानतर सन १०९१ हिजरात शिवाजा महाराज याणा कैलासवास केला नतर सभाजीराजे गादीवर बसून दौलत करून मसऊदखान याजकडे मिळून मोगलाच्या प्रातास उपद्रव करू लागले विजापूरच्या दौलतींत बखेडा फार जहाला, यामुळे बदोबस्त न होई सबब मसऊदखान बेजार होऊन अदुनास गेले तेव्हा वजिरीचे काम शेख मखदूम व अबदुल रऊफ चालवू लागले शिकदर आदिलशहाहा त्या उभयताच्या स्वाधीन जहाले परतु शहरबानू ऊर्फ पादशहा बिब्बा कन्या अलीआदिलशहा याची व वडील बहाण शिकदर अदिलशहाचा प्रौढ व शहाणा होता, याजकरिता जे करणे ते पादशहा बिब्बीच्या विचारे करात होते तेव्हा हे उभयता कामांत वागतात हे बिब्बीच्या चित्तास येईना ते समयीं या दोघाना विचार केला कीं, ही अशीच राहिली असता आपला दोघाचा बदोबस्त कराल याजकरिता इजला काढावी म्हणून पादशहा बिब्बाकडे आले आणि विनती केली का, आपणास रधूच्या राज्याच अगत्य असल्यास दिल्लीस जाऊन आपले लग्न पेशजी बहादरखान याच्या विद्यमाने अवरगजेब याचे पुत्र महमद अज्जम या समागमे करावे, आणि या दौलतीस उपद्रव न होईल असें करावे नाहापेक्षा अवरगजेब येऊन जब रीने दौलत घेऊन तुमचे लग्न आपल्या पुत्राबरोबर करितील असें सागितलें आणि तिच्या दाईकडून सागून पादशहा बिब्बीस राजी केली नतर छ १४ माहे रबिलावल भृगुवारीं निघून दिल्लीस रवाना जहाली मागाहून शमशुद्दीनखान हकीम जाऊन मिळाले दिल्लीस जाऊन पोहचल्यानतर हिजरी सन १०९० छ १ रजजब रोजा लग्नसमारभ जहाला लाखों रुपये खर्च, दानधर्म वगैरे केला

महमद अज्जमशहा यास किताब पादशाही छ ७ माहे मजकुरीं दिला आणि सभाजी राजे यांच्या पारपत्यास व दक्षणेच्या बदोबस्तास छ ५ माहे रमजान रोजीं रवाना केले ते छ १२ जिलकाद रोजीं बऱ्हाणपुरीं आले तेथें चार महिने राहून ६ हिजरी सन १०९३ रबिलावल माहिन्यात तेथून कूच करून अवरगाबादेस येऊन राहिले तेथे सहा सात महिने राहून तेथून निघून सन मजकुरीं छ १ जिल्काद रोजा अहमदनगरास आले त्यापूर्वी

शहाजादे शहाअलम यास किताब बहादुरशहा देऊन कोंकणात रवाना केले ते रामघाट उतरून कोंकणात गेले आणि बंदोबस्त करून साळशी वेंगुर्लपर्यंत गेले त्यांच्या महर्गते- मुळे व सभाजी राजे यांच्या उपद्रवास्तव बहुत लष्कर हराण होते इतक्यात अवरंगजेब याचा हुकुम परत येण्याविषयी जहाला आणि शहाजादा अजीजहा यास विजापूरचा मुलूक लुटण्यास रवाना केले अजीजहा आज्ञेप्रमाणे प्रांत लुटीत जाऊन धारवाडास वेढा घालून कित्येक दिवसांत किल्ला घेतला यापूर्वी महमद अज्जमशहा यास विजापुरास वेढा घाल ण्याविषयीं हुकूम जहाला त्याप्रमाणें त्याणी वेढा घातला फाज थोडी सबब अज्जमशहा याणी शहाअलम व अजीजहा यास फौज घेऊन येणे म्हणून हुकूम केला त्याप्रमाणें ते दोघे येऊन सामिल जहाले नंतर अहमदनगराहून खुद्द स्वारी हिजरी सन १ ९ छ १ माहे जमा- दिलावल रोजी कूच करून सोलापुरास आले अज्जमशहा यांच्या फाजत धान्य मिळेनासे जाहलें हें पादशहास वृत्त कळल्यावर त्यास माधार आणवून गाजीवदीखान यास नवी फौज देऊन व सरंजाम दारूगोळा व धान्य भारी देऊन रवाना केले आणि हिजरी सन १०९७ छ १८ जमादिलाखर रोजी सक्त वेढा घालून चहूकडून गर्दी करून लढाई केली परंतु आतून तोफा व बंदुका वगैरेंनी बाहेरील फौजेस जवळ येऊ दिले नाही हे वृत्त अवरंग जेबास समजल्यावर आपण खुद्द सन मजकुरी छ माहे शाबान रोजीं कूच करून छ २१ माहे मजकुरीं रसूलपुरानजीक मुक्काम केला, आणि सर्वत्र सरदार यांस आणून सांगितले की, प्राणापेक्षाही पराकाष्ठा करून किल्ला घ्यावा तेव्हा मोर्चेबंदी होईना सबब पाथरवट वगैरे लोकांकडून खडक खणून काढावे असें करून लाविले परंतु आतून त्यासही जवळ येऊ दिले नाही तेव्हा अलमगीर याचा एक कोसावर मुक्काम होता तेथून कूच करून शहरानजीक येऊन उतरले शहाजादे व उमराव व सरदार यांस हुकूम केला जे, सर्वांनी एकवेळा हल्ला करावा हें वर्तमान किल्ल्यातील लोकांस कळताच घाबरे झाले आणि आदिलशहा व मुत्सद्दी यांणीं विचार केला जे, सल्ल्याशिवाय दुसरे उपाय नाहीं यावरून अवरंगजेबाकडे छ १ जिल्काद सन मजकुरीं हाफाज अबजुल व सय्यदखान तरी व मुनशी अबदुल रऊफ व शेख हुशेन व मुनशी सर्जेखान व सय्यद मखदुम बरोबर देऊन गाजीवदीखान याच्या विद्यमाने सल्याचे बोलणें करावें म्हणून पाठविलें ते येऊन गाजीवदीखान याच्या विद्यमानें बोलणे ठरवून त्याच रात्रीं परत गेले आणि शिकंदर आदिलशहास सांगितलें की किल्ला स्वाधीन करावा नंतर छ ३ माहे मजकुरीं गाजीवदीखान याजकडे जाऊन पादशाही चाकरीस राहिले अबदुल रऊफ गाजीवदीखानापाशीं राहिले छ ४ माहे मजकुरीं सन १०९७ हिजरी सोमवारी चवथे प्रहरीं शिकंदर अदिलशहा याणीं जवाहीर व द्रव्य दानधर्म करून वाकींचे खंदकांत टाकून आपण बाहेर निघून किल्ला स्वाधीन केला, आणि आपण जाऊन अवरंगजेब याची भेट घेतली त्याणीं बहुत कृपायुक्त सन्मान करून आपले खासे डेऱ्याजवळ डेरे देऊन बायकामुलांनिशीं ठेविले आणि सालीना एक लक्ष रुपये खर्चास द्यावे असे ठरविलें अबदुल हसन कुतुबशहा याची कन्या आणून लग्न केलें अबदुल रऊफ व सय्यद मखदुम यास किताब मनसब हफ्तहजारी दिली दिलेरखान दुसरे सरदार यांस किताब रुस्तुमखान हा दिला, आणि

विजापुरास किताब दारलजफर विजापूर दिला दुसरे दिवशा छ ५ माहे मजकुरी खासा स्वारी किल्यांत जाऊन किल्ला पाहून परत लष्करात दाखल जहाली रुस्तुमखान यास मनसब पंज हजारी देऊन विजापूरचा मामलत दिली अदिलशाही दौलत त्या दिवसापासून गेली शिकंदर अदिलशहा अतकाळपर्यंत नजरबदींत होते ते तक्तावर बसल्यापासून चवदावे वर्षी कैद केले नजरबदात चवदा वर्षे होते नतर सन १११९ हिजरींत मृत्यु पावले त्याचा तपशील पुढे आहे

अवरगजेब विजापूर घेऊन किल्ले ठाणा घेत घेत चालले तो ल्हानशी गढी होती तेथाल किल्लेदार लढू लागला त्यास सर्वत्रानीं सांगितले जे, तुझ्या पादशहास कैद करून सर्व दौलत घेतली हें लढणें व्यर्थ आहे त्याणीं उत्तर केले जे, जो पर्यंत आमचा पातशहा जिवत आहे तो पर्यंत अलमगीर म्हणजे पदार्थ काय ! ! हे वृत्त अवरगजेबास कळून बहुत रागास येऊन खरबूज जहर भरून पाठविले, त्याणा आज्ञे प्रमाणे जाऊन खावयास सागितल्याप्रमाणे शिकदर अदिलशहा याणीं खाऊन अतकाळ समीप आला ते समयीं सागून पाठविले कीं जे, तुमची कांहीं इच्छा असल्यास सागावी त्याप्रमाणे करिता येईल याणा सागून पाठविले कीं, माझी इच्छा परिपूर्ण झाला परतु एक राहिली ता पूर्ण करावी ती कोणती म्हणाल तरी आमचे शरार विजापुरीं नेऊन सार्थक करावे या प्रमाणें अवरगजेबास सागितले नतर त्याच दिवशीं गुरुवारा सन १११९ हिजरी शिकदर आदिलशहा मृत्यु पावले या नतर अवरगजेब याणा त्याचे प्रेत विजापुरास पाठवून सार्थक करविले

अवरगजेब तेथून दीड महिन्याने छ २ माहे जिल्हेज रोजीं कूच करून छ २८ माहे मोहरम रोजीं गुलबर्गेस गेले तेथून बेदरास जाऊन तसेच हैदराबादेस जाऊन राहिले सन १०९८ हिजरी छ ४ जिल्काद रोजीं गोवळकोंडा किल्ला घेतला आणि अबदुल हसन कुतुबशहास कैद करून दौलताबादेस पाठविलें सगर किल्ला विजापुराकडील पामनाईक महार याजकडे होता तो किल्ला सन मजकुरीं छ २ सफर रोजीं घेऊन सरतगड नांव ठेविले तेथून निघून छ ३ जमादिलावल रोजीं गुलबर्गेस आले तेथून कूच करून छ २२ माहे मजकुरीं विजापुरास दाखल होऊन खवासखान याच्या हवेलीत राहिले महमद अज्मशहा याणीं बेळगांवचा किल्ला घेऊन अज्मनगर नांव ठेविलें अ द न जा किल्यात सिद्दीमसऊद अदिलशाई होता तो किल्ला गाजीउद्दीनखान याणा छ १८ शवाल रोजीं घेतला सिद्दी मजकूर यास मनसब हफ्तहजारी दिली

अवरगजेब विजापुरीं होते तेथें कांहीं महामारीचा उपद्रव ईश्वरसत्तेने उत्पन्न होऊन लाखा मनुष्ये मेलीं अवरगजेब याची स्त्रीही बरोबर होती तीही मेली तेव्हा पादशहास बहुत दुःख झाले, आणि वरकड मनुष्यें मरण पावलीं त्याचे सार्थक होईना सबब गाड्यावरून नेत होते तों एका दरवाजानें सातशें गाडे गेले असेच सर्व द्वारें गेले व जात होते पधरा दिवसांनीं तो उपद्रव कांहीसा शमला नतर अवरंगजेब छ १८ रबिलावल रोजीं कूच करून अकुळजे नजीक मुक्काम केला महामारीचा उपद्रव तीन वर्षे होता

नंतर अवरंगजेब छ १ माहे मजकुरा कोरेगावाहून निघून छ ९ जमादिलावल कृष्णाकांठी माजे विदरा येथे राहिले तथ दोन महिने राहून तेथून कूच छ १८ श रोजा करून गलगल्यास जाऊन राहिले आणि तेथे शेखनिजाम यास किताब मुकर देऊन पन्हाळा घेण्यास रवाना केले संभाजी महाराज रायगडाहून कवगुलशन दिवा निघून संगमेश्वरा व बाग होता तेथ जाऊन राहिले, मुकरबखान पाच सहा हजार घेऊन गेले हे वृत्त महाराजास कळून सहा सात हजार स्वारानिशीं येऊन लढाई दिला यताकडील लोक जायाजखमी जहाले मुकरबखान याजकडील अमान खानकरी व प खान काशिमरा व गंगाराम व आपाजीपंत हे मोठे मानकरी पडले महाराजा कृष्णाजी घोरपडे व दौलतराव शिंदे व शेखमिरा वगैरे मानकरी पडले कबगुलशन जखम लागली ते वाड्यांत छपून होते ते धरून छ ५ जमादिलावल रोजा कुट्टब बहादुरगडीं केदेंत ठेविले नंतर संभाजी राजे यास छ ० माहे मजकुरीं कैद केलें त्यास घेऊन अवरंगजेब याजकडे गेले त्यावर छ २९ माहे मजकुरा नी ल फिरवून म शेखनिजाम याणी जिवादारस्य श्रम केले सबब त्यास किताब फत्तेजंग देऊन मनसब हजारी दिला नंतर सन ३३ जलूषी छ ५ माहे मोहरम रोजीं रायरी किल्यास स राजे यांचे पुत्र शिवाजी व त्यांचा मातुश्री व द्रव्य फार सापडलं, यतिकादखान किताब जुलफुकारखान दिला शिवाजीराजे व त्यांच्या मातुश्रीस जुलफुकारखान गेले नंतर पादशहाना एकदर डेऱ्यात येऊन तेथील देखरेख असदखानास पाह हुकूम जहाला आणि त्या वेळेस शाहूराजे यांचे वय १० वर्षांचे होते त्यास किताब र व चौघडा व मनसब हफ्तहजारी देऊन बहुत तरतुदीने खर्च वगैरे बंदोबस्त ठेविला

छ माहे सफर सन मजकूर रोजा रुस्तुमखान याणी रायचूर किल्ला घेतला नांव फैराजगड ठेविले नंतर अवरंगजेब गलगल्याहून कूच करून विजापुरास आले आणखी फिरून गलगल्यास गेले आणि सन ३८ जलूसी छ २० माहे शाबान रोजा करून विजापुरास आले नंतर सन ३९ जलूसी छ १७ शाबान रोजा पादशहा कूच मौजे भरमपुरी× नजीक भीमाकांठा येऊन राहिले सन ४१ जलूसी छ ६ शाबान चंदी जुलफुकारखान याणी घेतला सर्व सरदार किल्ले घेण्यास रवाना केले त्याणी घेतले अवरंगजेब कोंकणप्रांत घ्यावयास गेले सन ४३ जलूसी छ ५ जमादिलावल निघून मिरजेस येऊन राहिले महमद अज्जमशहा सन ४४ जलूसी छ २५ जमादि पासून छ १३ जिलकाद पर्यंत वेढा घालून सातारा घेतला आणि अज्जमतारा नाव ठे छ ३ माहे मोहरम रोजा अज्जमशहा याणी परळीचा किल्ला घेतला आणि नौरसतार ठेविलें नंतर पन्हाळ्यास जाऊन वेढा देऊन सन ४४ छ १ मोहरम रोजा किल्ला घे

---

* कवि कलुष=ऊर्फ कबजी × ब्रह्मपुरी

आणि नबीशाहदुर्ग नाव ठेविले सन ४५ खिलना किल्यास वेढा घातला खुद्द पादशहा अर्ध कोसावर उतरून बहुत विचार करून सन ४६ छ २२ जिल्हेज रोजीं किल्ला घेतला नतर छ ७ मोहरम रोजा कूच करून पन्हाळ्यास येत होते वाटेने परजन्यामुळे फार गिरीफ्तर जहाले परतु तसेच पन्हाळ्यास आले नतर छ १० जमादिलाखर रोजीं कूच करून बहादर गडास आले तेथून छ २४ रज्जब रोजा कूच करून छ १८ शाबान रोजीं खडाळ्यास पावले नतर ४७ सन छ २७ जिल्हेज रोजीं कूच करून पुण्यास आले तेथून सन ४८ छ २३ माहे जिल्काद रोजा कूच करून मसुदाबाद ऊर्फ खेडें येथे साडेसात महिने राहिले नतर छ ४ माहे रज्जब रोजीं जुन्नर घ्यावयास कूच करून निघून आले वाकनगिरी एथें रामनाईक महार याचा भाऊ होता त्याजवर फौज रवाना केली तेव्हा कुलिचखान बहादर वगैरे व महमद अमीन याणा पुरुषार्थ करून लढून किल्ला घेतला नतर अवरगजेब देवापुरीस कृष्णे तीरीं छावणी झाली तेथें कांहा पादशहास स्वस्थ वाटत नव्हतें ते कांहा दिवसानीं आरोग्य जहालेवर तेथून कूच करून सन ५० छ १ माहे शाबान रोजीं बेत्रीस वर्षांनीं अहमदनगरास आले नतर सन ५१ माहे शव्वाल अखेरीस बादशहास अजार उत्पन्न जहाला, तो फारच वृद्धिंगत होऊन सन मजकूर छ २८ माहे जिलकाद रोजीं म्हणजे हिजरी सन १११७ भृगुवारीं दुसरे प्रहरीं मृत्यु पावले

नतर सदुकेंत घालून रोज्यास नेऊन छ १५ जिल्हेज रोजी इंदुवारीं सार्थक केलें त्यास पुत्र चार होते त्यांपैकीं महमद अकबर हे बापाबरोबर द्वेषबुद्धीने वागू लागले नतर कांहीं दिवसांना आपण दौलत करावी या उद्देशाने फौज जमविली, आणि लढाईस उभे राहिले, तेव्हा युद्धप्रसगीं शिकस्त होऊन पळून इराणास गेले तेथाल पादशाहानीं बहुत सन्मान करून सहा लक्ष रुपयाची जहागीर दिली पुढे काहीं दिवसांनीं ते तिकडेच मरण पावले नतर अवरगजेब दक्षिणेस आले, आणि विजापूरचे शिकदर पादशहा व हैदराबादचे तानाशहा पादशहा या दोघास दस्तगीर करून त्याची दौलत आपल्या स्वाधीन करून घेतली शिवाजी राजे वगैरे बड होते त्यांचेंही पारपत्य केले आणि सर्वकाळ ईश्वरप्रीत्यर्थ घाल वीत पन्नास वर्षे दौलत केली ती शास्त्राधारें केला आणि सन ५१ जलूसी म्हणजे हिजरी सन १११७ जिलकाद महिन्यात खुजस्तेबुनयाद ऊर्फ अवरगाबाद येथून शहाजादे महमदअज्जम यास सुभे गुजराथेस रवाना केले ते दोन मुक्काम गेल्यानतर नवे घेतलेले सुभे विजापूर व हैदराबाद येथे राहण्यास शहाजादे कामबक्ष यास विजापुरास जाऊन पावले होते महमदअज्जम यास हे वर्तमान समजतांच येऊन पावले आणि बापास ताबुतात घालून लष्कर घेऊन दिल्लीस निघाले बापाचा ताबूत बापाने सागितल्याप्रमाणें रोजेस नेऊन सार्थक करून कबर बाधविली आणि आपण लष्करसुद्धां पुढें रवाना झाले ते जाऊन *शहाजानाबादेस राहिले आणि दौलत करू लागले महमद अज्जम शहाजादा यास शहाअलम म्हणत होते, ते बहुत तामसी होते तेही तेथेंच राहिले तों उभयतांमध्ये द्वेष पडून उभयताना फौज जमाव करून

* शहाजहानाबाद = दिल्ली

अक्बराबादेनजाक+ येऊन उभयताची लढाई जहाली हिजरी सन १११८ छ १० रबिलावल रोजा ते समयी शहाअलम यांणा आपले बंधु महमद अज्जम यास व त्याचे पुत्र महमद बेदरबख्त व वालाजहा या त्रिवर्गास मारून शहाजहानाबादेस जाऊन राज्य करू लागले शहाजादे कामबक्ष विजापुराहून निघून हैदराबादेस जाऊन दौलत करीत होते तेव्हा शहाअलम यास अयोग्य वाटून फौजेसह हैदराबादेस येऊन सन ११२० हिजरी छ १० रबिलावल रोजीं लढाई देऊन कामबक्ष यास व त्याचा पुत्र तान वर्षांचा होता त्यासह मारून दिल्लीस परत गेले तेथून लाहोरास गेले तेथे सहा वर्षे राहिले काहींसा बदोबस्त प्रांताचा जहाला होता तो सन ११२३ हिजरी छ १७ माहे मोहरम रोजीं मृत्यु पावले

त्यास पुत्र चार प्रथम पुत्र महमद मगरुद्दीन त्यासच जहादार म्हणतात त्याचे बधु धाकटे महमद अजिमुद्दान याची व त्याची लढाई होऊन महमद अजिमुद्दीन ठार जहाले नतर आणखी दोन बधु रफिउलदराजत दुसरे खुजस्त अरतर यास काही फोज व सरजाम देऊन ठेविले होते ते दोघे बदलून युद्धास सिद्ध जहाले नतर या त्रिवर्गाचे युद्ध होऊन शेवटा महमद मगरुद्दीन याणीं त्या उभयतास मारिले नतर लाहोराहून कूच करून शहाजहानाबादेस येऊन पावले महमद अजिमुद्दीन यान्या वेळा महमद फररुसेर होते तेव्हा हा वृत्तात जहाला ते समयीं येथे नव्हते आपले वडील सुभे बगाल्यात रहात होते तेथच होते तयें हें वर्तमान श्रवण करून बहुत क्रोधावेशें लष्कर घेऊन दिल्लीस निघून जागोजागा ठाणीं घालीत चालले ते अक्बराबादेस आले जहादार पादशहा शहाजाहानाबादेस होते जुलफुकारखान अवरगजेब यान्या वेळचे होते त्याजवर बहुत विश्वास ठेविला होता आणि फौज तयार करून फरुक्सेर याजवर चालून आले ते येऊन अक्बराबादे नजाक आले ता इकडून फरुक्सेरही गेले उभयताचा मुकाबिला होऊन लढाई जहाली उभय लष्करचा मनुष्यें बहुत जायाजखमी जहालीं त्या समयीं जहादार याचा मोड होऊन पळून जुलफुकारखानासुद्धा शहाजहानाबादेस गेले त्याच्या पाठीवर फरुक्सेर फौजसुद्धा जाऊन शहाजहानाबादे नजीक बारापळीस राहिले असदखान वजीर अलमगीर यान्या वेळचा किल्यात होता त्यानीं जहादार बादशहास येताच धरून कैद केले आणि फरुक्शेर यास लिहून पाठविले ते येऊन पावताच फरुक्शेर तयार होऊन शहरांत जाऊन दाखल झाले आणि त्याच समयीं आपले चुलते जहादार यास कैदेतून आणवून आपले बापाच्या मुबदला त्यास किल्याच्या बाहेर मारविलें नतर किल्यात जाऊन पूर्वीची दौलत व नवे दोन सुभे घेतले ते असे फरुक्सेर वल्द महमद अजिमुद्दीन वल्द महमद व अज्जम वल्द महमुद्दीन अवरगजेब बहादर अलमगीर पादशहा गाजा याच्या स्वाधीन जहाले सन ११०८ हिजरींत कैफीयत समाप्त

---

+ अकबराबाद=आग्रा

ले ७ ]
४१ ]

[ श १६३६ मार्ग वद्य १४
[ ता २४-१२ १७१४

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ४१ जयनाम सवत्सरे मार्गशीर्ष बहुल चतुर्दशी भृगुवासरे क्षत्रियकुलावतस श्रीराजा शभुछत्रपति स्वामी याणीं

मिराशी याणीं व गावकरानी मौजे पायरे तालुका साळशी यासि, आज्ञा केली ऐशी जे, मौजे मजकूर रामजी बाबाजी दिमत हिरसावत याजकडे वतनाच्या ऐवजा मुकासा दिला आहे त्याप्रमाणे करार आहे तरि तुम्ही हे जाणून गावींचा ऐवज रामजी बाबाजी याजकडे पाववणें दुसरेयाजकडे एक रुपया वसूल न देणे बाबतीचा ऐवज पेस्तर साला कोटाकडे पाववणे जाणिजे लेखनालकार " मोर्तब " असे

---

ले ८ ]
४१४ ]

[ श १६३९ कार्तिक वद्य ५
[ ता २-११ १७१७

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ४४ हेमलबानामसवत्सरे कार्तिक बहुळ ५ भोमवासरे क्षत्रियकुलावतस श्रीराजा शभुछत्रपति स्वामी याणीं

राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान भावी सुभा परगणे कुडाळ यांसि आज्ञा केली ऐशी जे, नागण प्रभु देसाई परगणे मजकूर हे पूर्वी कोट कुडाळ येथे होते त्यास खेमसावताने कोटास परीघ घालून कोट हस्तगत केला ते समयीं बरा शर्त करून नागण प्रभु स्वामीकार्यावर खर्च जहाला त्याच्या बायका काशीबाई व येसूबाई उभयता आहेत त्याचा योगक्षेम चालवावा हे स्वामीस अवश्यक यास्तव स्वामी उभयतां बायकावर कृपाळू होऊन शभर होन निशाणा होनाचा गांव इनाम द्यावा असा सिद्धात करून यास नूतन इनाम कुलबाबकानु खेरीज हकदार व इनामदार करून मौजे अडेली तालुका तळवडे हा गाव इनाम अजराम(राम)त करून दिला असे तरि तुम्हा मौजे मजकुरी सदर्हूप्रमाणे इनाम यास नेमून देऊन बायकाचा योगक्षेम चालवून सुखरूप रहात ते गोष्ट करणें सालदरसाल ताजे सनदेचा उजूर न करणे तालीक लिहून घेऊन अस्सल सनद परतोन देणे जाणिजे निदेश समक्ष ' मोर्तब " असे

---

ले ९ ] [ श १ ४०
( ४०२ ) ] [ इ १०१८

श्री

सन ११२८ फसली फेरिस्त नंबर

यादी स्मरणार्थ सुरुसन तिस्सा अशर मय्या व अल्फ शके १६८० राज्याभिषेक शके ८५ बाकानिशीस पूर्वी लिहिले जे राणोजी चव्हाण हे पूर्वी शक्कत महाराज याज पाशा चाकरीस होते पायी शिपाई मर्द कि० वे च घेतला उपयोगी बहुत दिवस सरकारी चाकरी उमेदीने करू लागले सरकारही वाढवात चालले मालोजी घोरपडे हे [ व ] चवाण आप्त एकविचारें सरकारचाकरी करात होते गाळमोटावर सरकारकामावर आले याचा पुत्र विठोजी चव्हाण लहान होते मालोजी घोरपडे याणा मुलाविषया सरकारात अर्ज करून मुलाचा बंदोबस्त करून रायगडा असामी देऊन ठेविले पुढें थोर होत चालला, त्यास आपल्या बराबर वागवून सरकार काम करवात पुढे संभाजी महाराज किल्ला पन्हाळा येथे राहिले त्याजपाशी फौजेत घोरपडे काहा स्वारानिशी होते आपल्याबराबर विठोजी चव्हाण यासही स्वार करून देऊन आपल्या बराबर चाकरी करवीत होते पुढ मालोजी घोरपडे याचा काळ जहाला त्यास पत्र तिघे त्यात प्रमुख ज्येष्ठ संताजी घोरपडे व विठोजी चव्हाण हे मिळून एकविचारें चाकरी करीत होते शक्कत यान्या अखेर व संभाजी महाराज याच्या अखेरपर्यंत चाकरी केली नंतर राजाराम साहेब यान्या कारकीर्दीत संताजी घोरपडे व विठोजी चव्हाण याणीं तुळापूरच्या* मुक्कामा जाऊन पादशहा यान्या फोजेवर छापा घालून पादशहाच्या डेऱ्याचे •कळस सोन्याचे घेऊन राजाराम साहेब याजपाशा विशाळगड मुक्कामी आणून नजर केली त्या समयीं घोरपडे तिघा बंधूंस किताबती देऊन विठोजी चव्हाण यास किताबत समशेर बहाद्दर म्हणून देत असता त्याणीं अर्ज केला कीं, ' महाराज, पूर्वी आमचे वडील मोगलाईत चाकरी करीत होते त्यास हिम्मत बहाद्दर ही किताबत होती ती द्यावी " म्हणून अर्ज केला तेव्हां संतोष होऊन महाराज याणीं हिम्मत बहाद्दर म्हणून किताबत दिला साडेतीन वस्त्रे कंठी, शिरपेच, तोडा याप्रमाणे दिले आणि घोरपडे यासही देऊन नंतर हिम्मत बहाद्दर विठोजी चव्हाण यास दिले शके १६१० विभवनाम संवत्सरे श्रावण शुद्ध ५ सोमवारा वस्त्रें जहालीं रामचंद्रपंत अमात्य यांचे दिमतीस स्वाधीन केले नंतर चंदी मुक्कामीं काजकामें बहुत केला जुलफुकारखान याणा चंदीस वेढा शके १६१० साली घातला तेव्हां महाराज निघोन देशा यावयाच्या संधीत शके १६१८ बेंगळूर ताळुक्यात लढाई जहाली तेथे विठोजी चव्हाण पडले त्याचे पुत्र उदाजी-राव चव्हाण यास स्वारींत हिम्मत बहाद्दरीचीं वस्त्रें दिला वयवर्षें १९ याचे धाकटे बंधु सारेंच कुटुंब चंदीस होतें त्यात होते पुढ विशाळगड मुक्कामा स्वारी येऊन नंतर सिंहगडास

---

* लेखांक ३ पहा

म_राज जाऊन फौज जमा करून शाहू महाराज व येसूबाई साहेब वगैरे मडळा पादशहाचा मुक्काम अवरगाबादेवर होता तेथें बेगम याजपाशीं मडळी शाहू महाराज सुद्धा होते ते हस्तगत करावे म्हणून राजाराम महाराज याणा अवरगाबाद मुक्कामा जाऊन छापा घातला परतु शाहू महाराज हस्तगत झाले नाहात राजाराम साहेब माघारे सिंहगडास येऊन काळ जाहला शके १६२१ प्रमादिनाम सवत्सरे फाल्गुन वद्य ८ स नतर ताराबाई साहेब व शिवाजी महाराज, कारभारी रामचद्रपत अमात्य मिळून राज्य करू लागले त्याजपाशीं उदाजी चव्हाण चाकरी करीत होते त्याजकडे तालुका विजापूर व ठाणें व अठरा परगणे मण-गुत्ती सुद्धा जुनाट शिरोळ, रायबाग वगैरे ठाणी व खेडीं होतीं पुढ देशीं शाहू महाराज शके १६२९ सर्वजितनाम सवत्सरीं आले नतर आइसाहेब याचा व त्याचा कलह वाढत चालला त्यात ताराबाई साहेब याचे पुत्र शिवाजी महाराज यांचा काळही जहाला सभाजी महाराज मोगलाईंत जाऊन खटपट केला तिकडून सिद्ध जहाले नाही देशा येऊन पन्हाळ्यास जाऊन उदाजीराव चव्हाण याच्या हातून दगा करवू लागले म्हणून शाहू महाराज याणीं श्रीपतराव प्रतिनिधी व धनासिंगराव जाधव सेनापती यास रवाना केले उदाजीराव चव्हाण शिराळे गुमट ऐथे होतें, तेथे येऊन वेढा घातला या सधीस सभाजीराजे कुटुबसुद्धा श्रीनरसोबाच्या वाडीस जावयास निघाले होते तेथेंच उदाजी चव्हाण त्याच्या कुमकेस गेले शिरोळ येथील वेढा उठवून उदाजी चव्हाण यास ठाण्यातून लष्करात आणिले नतर दुसरे दिवशी पुन लढाई झाली तेव्हा यांचा मोड जहाला चव्हाणसुद्धा निघून महाराज पन्हाळ्यास आले. जाधवराव व प्रतिनिधी याणी बुणगे लुटले महाराज यांच्या उभयतां मातुश्री याची भेट घेऊन सन्मान केला राजसबाईसाहेब व सभाजी महाराज याचे कुटुब सुद्धा पन्हाळ्यास रवाना केले ताराबाई साहेब तुम्हापाशीं रहातें 'म्हणाली म्हणून सातान्यास घेऊन गेले नतर शाहू महाराज व सभाजी महाराज याचा तह शके १६५१ त झाला नतर उदाजी चव्हाण सभाजी महाराज यांजकडे राहून शाहू महाराजाच्या राज्यात दगा करू लागले म्हणून शाहूमहाराज याणीं आपल्याकडे नेऊन अथणी विजापूर देऊन ठेविले असता दिलेले अजमीर जवळा (कोल्हापुरकर सभाजा) याची कुमक करू लागले सबब शाहू महाराज याणा रागे भरून याची खोड जात नाहीं म्हणून बाजीराव पेशवे पारपत्यास पाठविले ते मिरजेस आल्यावर उदाजी चव्हाण पळून मोंगलाईत गेले त्याजकडील तालुका पेशवे यांणीं घेऊन बदोबस्त करून सातान्यास गेले या नतर शाहू महाराज याच्या अखेरीपर्यंत देशीं आले नाहींत नतर नानासाहेब भाऊसाहेब पेशवे यांच्या कारकीर्दीत उदाजी चव्हाण यास मोगलाईंतून घेऊन आले त्यास सरजाम देऊन ठेविले थोडक्याच दिवसांत मिरज प्रांतीं एका खेड्यावर रोखा केला गावकर याणीं रोखा टाकिला याजबद्दल स्वारी केली त्या ठाण्यावर घोडीस गोळी लागली घोडी उधळली रिकिबीत पाय अडकून डोचकें फुटून मेले उभयता पुत्र विठोजी चव्हाण व प्रीतिराव चव्हाण मोगलाईतून देशीं येऊन डिगरजेस राहिले विठोजी चव्हाण डिगरजेस नेहमीं राहिले प्रीतीराव चव्हाण करविरीं शिवाजी महाराज याज

पाशीं येऊन राहिले पूर्वी लिहिलेल्या शके १४० च्या मधील सालात चव्हाण प्रकरणां हकीकत याकनिशात लिहून ठेविली आहे मुहरम अखेर तिसत मया व अल्फ ते दिवशी लिहून ठेविले

---

ले १० ]
( ८० १ ) ]

[ श १६४ श्रावण शु १
[ ता १७१७ मन १७१८

श्री

फसली सन ११०८ फेरिस्त न ४

यादी युवराजा व अष्टप्रधान पद द्यावयाच्या समया वस्त्रे वगैरे शके राज्याभिषेक ४५ विलंबीनाम संवत्सरे सुरुसन तिस्सा अशर मया अल्फ

१ युवराजा

वस्त्रे पाच भरगची

१ मदील १ चादर १ पटका १ किनखाप पान व १ महमुदी पान एक एकूण सनगें ५

१ दागिने

१ शिरपेंच १ कंठी मोत्याची १ चौकडा १ मोत्याचा तुरा १ जगा दागिने ५

१ कित्ता

१ शिक्केकटार १ चौघडा १ हत्ती १ चौरी सोन्याच्या दांडाची १ ढाल तरवार १ जरीपटका १ घोडा १ चोपदार

२ २ २ २

३ एकूण कलम

१ पंत प्रधान यांस युवराजा अन्वये

१ सेनापती याम सदहू अन्वये

१ पंत आमात्य

१ वस्त्र

१ मदील १ चादर १ किनखाप पान १ महमुदी पान एकूण सनगें चार ४

१ दागिने

१ चौकडा १ तुरा मोत्याचा १ कंठी मोत्याची १ शिरपेंच एकूण दागिने चार ४

१ कित्ता

१ शिक्केकटार १ चवरी सोन्याच्या दांडीची १ ढालतरवार १ कलमदान रुप्याच्या दांडीचें १ हत्ती १ घोडा

३ एकूण कलम

१ पत सचीव यास पत अमात्याप्रमाणें
१ पत सुमत सदहू अन्वयें
१ पत मत्री यास सदहूप्रमाणें
१ पडितराव यास सदहूअन्वयें ढालतरवार खेरीज करून
१ न्यायाधीश यास पत सुमत, मत्रीअन्वयें
१ पत राजाज्ञा यास सदहू अन्वये

१०

१ उपप्रधान यास वस्त्रे ३॥ साडेतीन
१ तिवट १ दुपेटा ॥ किनखाफ १ महमुदी पान
सदहूप्रमाणे अष्ट प्रधान यास वस्त्रें द्यावयाचीं
१ चिटणवीस यास
१ वस्त्रें–मदील १, झगा १, इजार १, दुपेटा, दुमजन १ एकूण
१ दागिने–कठी मोत्याची १, चौकडा १, शिरपेंच १ एकूण
१ कित्ता कलमदान रुप्याच्या पेटीचें १, चवरी रुप्याच्या दाडाची १, घोडा १

३ एकूण कलम

१ फडणवीस वस्त्रें ३॥ साडेतीन, कलमदान रुप्याच्या दांडीचें १
१ पोद्दार यास वस्त्रें साडेतीन, कलमदान रुप्याच्या दाडीचें १

१४

येणेंप्रमाणें राज्याभिषेकसमयीं शककर्ते महाराज यांनीं वस्त्रें वगैरे सन्मान दिला असे छ २९ साबान

---

ले ११ (४९८) | श १६४२ भाद्रपद वद्य ३ ता। ८-९-१७२०

श्री

राजश्री देशाधिकारी व देशलेखक वर्तमान व भावी मामले दाभोळ प्रात सुवर्णदुर्ग गोा यांस

छ अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्ने॥ कान्होजी आगरे सरखेल रामराम सुरू सन इहिदे अशरीन मया व अल्फ राघो बल्लाळ देसाई ता पचनदी प्रात मजकूर यानीं विनती केली कीं, आपले वडिलीं तर्फ मजकुरीचें देसाईपण साध्य केलें आपणाजवळी अदिलशहा पातशहाचें फर्मान होतें तें वामधूमप्रसगीं राजपुरकराची स्वारी कसबे मजकुरीं पडली तेव्हा गाव जाळिला, आपलें घर दग्ध जहालें, त्यामध्यें कागदपत्र दग्ध होऊन गेले आपणाजवळीं आश्रय कांहीं राहिला नाहीं परंतु भोगवटा चालिला आहे, तो मनास आणून साहेबीं पत्र करून द्यावयाची आज्ञा केली पाहिजे, व पातशहाचे कारकीर्दीस हकलवाजिमे होते ते महाराज राजश्री थोरले कैलासवासी स्वामीनें दूर करून वतनदारास मुशाहिरे

यांचा मोईन करून दिली ते वख्तीं आपणास मो॑न दामेठी लारी २०० दोनशें केली होती त्यास आपले चाकरावरी नजर देऊन कोणे सालीं शभर, कोणे सालीं पाऊणशें रुपये साहेब पावीत असताती ऐशायास सन समान अशर मयामध्यें दुतर्फा मुलकाचा तह होऊन वतनदारांस हक्काची मोईन केली ते वख्तीं आपणास मोईन रुपये ७५ पाऊणश मुकरर केली आहे त्याप्रमाणें सनद सादर होऊन पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चाले ऐसे आज्ञापत्र देविलें पाहिजे, म्हणून विनंती केली ते मनास आणून तुम्हास पत्र सादर केलें असे देसाई मारनइलेचें पूर्वोक्त मनास आणितां, प्रथम मूल पुरुष नारोबा देसाई, त्याचा पुत्र मालोबा देसाई, त्याचा पुत्र दादोबा देसाई, त्याचा पुत्र बाळाजी, त्याचे पुत्र हल्लीं राघो बल्लाळ व गणो बल्लाळ, एकूण पाच पिढ्या वतन चालवीत आले आहेत म्हणून पुरातन लोकीं शाहिदी दिली देसाईपणाचे वतनाचा भोगवटा चालला आला आहे, व हक्काची मोईन सालीना रुपये ७५ पाऊणशें सन समान अशर मयामध्यें मुकरर केली आहे त्या प्रमाणें देसाई मारनइलेस व त्याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेस वतनाची सेवा घेऊन हक्काची मोईन पावीत जाणें साल्दरसाल नूतन पत्राचा आक्षेप न करणें तालीक लेहून घेऊन अस्सल पत्र देसाई मानिइले याजवळी देणें रा छ १५ माहे जिल्काद मोर्तब सुद ( शिक्का पत्राचे पाठीवर आहे )




---

ले १२ )
(४१२) }

{ श १६४२ आश्विन शु ७
{ ता २७।१०।१७२०

श्री

राजश्री फोंडसांवत भोंसले देसाई प्रांत कुडाळ गोसावी यांसि

छु अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य

प्रति राजश्री राजा शंभुछत्रपति उपरी बद्दल देणें बा ग मी न मा र ख(द)कर्ज राजश्री हरी सांवत यास रुपये ६००० सहा हजार रुपये देविले आहेत सदर्हू ऐवज अधी अर्धी मशारनिल्हेच्या जमावाकडे बिनकसूर आदा करणें सदर्हू ऐवज दरसाल दोन हजार प्रमाणें तीन सालें पावणें छ ५ जिल्हेज सुरुसन इहिदे अशरीन मया अल्फ बहुत काय लिहिणें " मोर्तब " असे

---

ले १३ )
(४२१) }

{ श १६४३ वैशाख वद्य २
{ ता २-५-१७२१

श्री

सन ११३० फसली फेरिस्त न १

वेदशास्त्रसपन्न राजमान्य राजश्री दादभट बिन पिल्भट उपनाम भट उपाध्ये स्वामींचे सेवेसी—सेवक चांदोजी घाटगे नाव जाधव व कारकून जंजिरे सिंधुदुर्ग दडवत विनंती सुक

सन इहिदे अशरीन मय्या व अल्फ उपाध्येपणाचा पृथक् तुम्हास व कृष्णभट अभ्यंकर महाजन मौजे मालवण यास पृथक् होऊन जजिरा आली त्याजवर हुजर मजालस छ जमादिलाखरीं सदरहू अश्वारूढ व तटसरनौबत व बारगार व नायकवाडी लोक मिळून तुमचा त्याचा करिना मनास आणितां तुम्ही व जजिराच्या लोकानीं उपाध्येपणाचें वर्तमान सागितलें कीं, महाराज राजश्री थोरले कैलासवासी स्वामी यानीं राज्य आक्रमण करीत असतां कुडाळ प्रातास जमाव पाठवून काहीं मुलूख कबदस्त करिता केवळ प्रात मल्हुरी होती ते समयीं महाराज राजश्री बसनूर प्रांत मोहीम करावया निमित्य आरमाराच्या जमावानिशीं मौजे मजकूर एथें आले त्या उपर दर्यामध्यें बेट ( मौजे मजकूर एथें आले ) नजीक दृष्टास पडलें तेव्हां या बेटाचें नांव काय म्हणून पुसिलें, त्यावर कृष्ण सावत देसाई व भानजी प्रभुदेसाई प्रात मजकूर यानीं सागितलें कीं, या बेटाचें नाव कुरटें असे सागितलें त्यावरी राजश्री स्वामी बेटावरी येऊन जागा पाहिला तें स्थळ उत्तम विस्तीर्ण आटोपसारखें दिसलें त्या उपरी रा। स्वामींना आज्ञा केली कीं या जागी बिल्द किल्ला बांधून वसवावा, म्हणून आज्ञा करून किल्ला बांधावयास हुकूम केला आणि आरमारच्या जमावानिशीं राजश्री स्वामींनीं बसनूराची मोहीम केला जजिरा बाधवयास राजश्री स्वामींनी मुहूर्त कारते समयीं पडितराव व उपाध्ये ज्योतिषी होते तथापि आज्ञा केली कीं पेस्तर सपूर्ण प्रात हस्तगत करणें आहे हें कृत्य होतच आहे ऐशियास गावाचा उपाध्या असावा म्हणून आपणास व आपला मामा जानभट अभ्यंकर उपाध्ये मौजे मजकूर असे दाखल्यास धरून आणून छ १४ जमादिलावल* सन खम्मस सितैन मार्गशीर्ष बहुळ २ ते५ दिवशीं किल्ला बाधण्यास मुहूर्त करून चिरा भूमीमध्यें बसविला, आणि सिंधुदुर्ग असे नाव ठेविलें आणि आपणास व आपला मामा जानभट यास राजश्री स्वामींनीं सागितलें की तुम्हीं ब्राह्मण या जागीं सुखरूप राहणें, काहीं शका मनामध्यें न धरणें प्रात मजकूर हस्तगत जहालाच आहे काहीं किंचित् अद्दलशाई कुडाळापासून मामले फाड्यापर्यंत ठाणीं आहेत तीं दहशत खाऊन जातील महाराज राजश्री स्वामींचें राज्य प्रबळ होत आहे चिंता न करणें म्हणून अभय देऊन सागितलें त्याउपर आम्ही एथें राहिलों पळून जावें तर यत्न नाहीं त्यावर आपला मामा जानभट याणीं आपणास सागितले कीं तू म्हणजे एका पायानें क्षीण आहेस तुझेवस्तु हर कोठें जावतें येवते असा अर्थ नाहीं तू एथें राहणें, जजिराचे उपाध्येपण चालविणें जो उपाय होईल त्यावर आपला योगक्षेम करणें म्हणून सागितलें त्या गोष्टीस आपण मान्य होऊन या स्थलीं राहिलों आपला मामा जानभट मालवणीं जाऊन राहिला महाराज राजश्री स्वामींचें राज्य प्रबळ होऊन कुडाळापासून फोंड्या कडेवाड शिवेश्वर देवाचे महाल पर्यंत ठाणीं बसविलीं अद्दलशाई ठाणीं नि शेष निघोन गेलीं आपल्या मनाच्या ठायीं निर्धार जाहला जे, या उपर अद्दलशाईचा प्रसग हात नाहीं हेंच राज्य प्रबल जहालें" असा निश्चय चित्ताचे ठायीं केला आणि या जागीं राहिलों त्या उपर आपला मामा जानभट याणीं हि जजिरां वास्तव्य केलें परतु उपाध्यायपणाचा व्यवहार-सबधें जें कर्तव्य तें आपणच

---

* १६ जमादिलावल शके १५८६ = २५-११-१६६४

करीत होतों जानभटामध्ये व आपणामध्यें भिन्नता नव्हती असे असता महाराज राजश्री समाजी राजे तक्तारूढ जहाले त्या उपर सहासात वर्षांनीं शामल तांब्र फौजेनिशीं प्रात मजकुरीं आला त्यामुळे सपूर्ण प्रात उध्वस्त जहाला कितीएक मनुष्यें ताब्रेनीं धरून नेलीं ताब्राच्या भयास्तव ज्यास जिकडे मार्ग जहाला तिकडे मनुष्यें निघून गेलीं जानभट आपला मामा मालवणामध्यें कुटुबसह होता, तो ताब्राच्या धामधुमी करिता परागदा होऊन गेले कुडाळ प्रांतीं सपूर्ण धामधुमी जहाली त्या उपरांतिक खेम सावत देसाई प्रात मजकूर याणीं महाराज राजश्री स्वामीच्या राज्याची निष्ठा सोडून तांब्राचा अवलव धरिला आणि ताब्राकडील फौजदार महमद अब्बस व अबदुल राजखान यास जमावानिशीं कुडाळास आणिलें त्याच्या स्वाऱ्या मुलखामध्यें होत्या एकवेळ मौजे मजकुरीं स्वारी येऊन कित्येक लुटी नागाव करून मनुष्यें धरून नेलीं मौजे मजकुरचे देव श्रीनारायण व रामेश्वर एथें गोवध करून देवस्थानें भ्रष्ट केलीं जजिऱ्याच्या मनुष्यास बाहेर जावया करितां मोगलाच्या भयास्तव सावताच्या रिस्का ? करिता जागा नाहीं कोठून दाणा गल्ला येणें तो राहिला मनुष्यास अन्न नाहीं जो कोणी मूठमर्दानें दलाकडे जाऊन भाजीपाला आणून उदरपोषण करीत वाचला व कितीएक मनुष्यें जजिराच्या लोकांचीं मयत जहालीं असा प्रसग जाहल्यावर चाकर लोकाखेरीज जजिरे मजकुरीं जे कोणा होते ते बिदनूर प्रातीं जाऊ लागले ते समयीं जजिराचा मुद्राधिकार राजश्री कृष्णाजी मोहिते यांस होता त्याणीं व जजिऱ्याचा तटसरनोबत व नाइकवाडी याणीं आपणास पुसिलें कीं तू ब्राह्मण म्हणजे एका पायानें क्षीण आहेस, तुझ्यावस्तु कोठें जावतें असें नाहीं जजिरामध्यें अन्नाचें दुर्भिक्ष्य जाहलें त्याहीमध्यें कर्नाटकांतून वाणी उदमी उकडे तादूळ आणितात ते काहीं ब्राह्मणाच्या प्रयोजनाचे नव्हत आम्ही मराठे लोक भाजीपाला खाऊन धन्याची जागा जतन करीत आहों आमच्या निष्ठेस फलदाता ईश्वर आहे आम्हा चाकर लोकांस सुटका नाहीं तू ब्राह्मण करनाटकास जाणार तर सुखरूप जाणें आम्ही निरोप देत असों म्हणून आपणास सांगितलें त्यावर आपण उत्तर दिलें कीं आपण एथें आहों मागें तुम्हामध्यें राहून उपाध्येपण करून सुख भोगिलें आणि तुम्हास कांहीं काल विलग पडल्यावर टाकून जावें, ही गोष्ट ईश्वरास बरी मानवणार नाही, व महाराज राजश्री स्वामींनीं जे समयीं सिंधुदुर्गास मुहूर्त केला ते समयीं आपल्या मामास विचारिलें कीं, येथें ब्राह्मण कोण रहातो ते समयीं आपला मामा बोलला कीं आपला भाचा दादभट येथें राहून उपाध्येपण करील म्हणून बोलून महाराज स्वामींचे दृष्टीपुढें आपणास उभें केलें आपण ते समयीं महाराजा सन्मुख बोललों कीं आपण येथें राहून उपाध्येपण करीन म्हणून सांगितलें ती गोष्ट आपल्या चित्तामध्यें आहे ते केवळ महाराज स्वामीजवळ मी भाष्य दिल्यासारखी जहाली त्या गोष्टीस आता माझ्या हातून आता अतर करवत नाहीं होणार प्राक्तनाधीन आहे 'कोठेंही गेलों तरी सुटणार नाहीं असें असता ही जागा टाकून आपण जात नाहीं तुम्हाबरोबर जसें होईल तसें होऊ म्हणून बोललों त्या उपर जजिऱ्याचे नायकवाडी याणीं व लोकांनीं आपलें समाधान केलें कीं, आम्हा निमित्य तुम्ही म्हणून इतका निर्धार केला, त्यास आम्ही जें अन्न मिळवू त्यामध्यें तुमच्या प्रयोजनाचे सुरई तादूळ व नाचणे जे मिळ-

तील ते तुमच्या कुटुंबास देऊन, भाजीपाला आणू त्यातील विभाग तुजला देऊ म्हणून समाधान करून सांगितलें त्यावरून आपण राहिलों त्यास जजिऱ्यामध्ये पाच वर्षेपर्यंत मोठें महार्णवांतील दु खामध्यें गडकरी याच्या घरीं लग्न मुहूर्त, हव्यकव्य, बरें वाईट जो प्रसग जहाला जो सपादिला ज्यानें आपल्या उचितानें जें दिलें तें तितकें घेऊन लक्षश मानिलें,न्यून पूर्ण बोलिलों नाहीं कार्य-निमित्तें जे सर्व प्रसग धामधुमीकरिता तुटका जहाला असेल तो पदार्थ द्यावयास हे लोक अन-मान करणार नाहींत पदरीं नाहीं तेव्हा मजलाच कोठून देणार ? असें चित्तामध्यें मानून कार्य-प्रसग सपादिले कोणाचेंही न्यून पडू दिलें नाहीं व कोणा समागमें खटला न केला या-प्रमाणें पाच वर्षे दु खाचा घालविलीं उपरातीक सुभिक्ष्य प्रसग होत चालला महाराज राजश्री राजाराम चदी प्रातीं असता राजश्री रामचद्र पडित अमात्य विशाळगडीं राहून सपूर्ण तांब्र कोंकण प्रांत प्रवेश केला होता त्यास दहशत लावून नि शेष घालविला कुडाळ प्रातही राजश्री नरहर कृष्ण मुतालिक दिमत पत प्रतिनिधि व राजश्री सखोजी नाईक जगताप यास जमावासहवर्तमान पाठवून खेम सावत यास हातीं घेऊन कुडाळीं मोगल होता तो परा-भवातें पावविला प्रात मजकूर कबदस्त जहाला मनुष्यास जाण्यास व यावयास मुलुखगिरी मध्यें रहावयास जागा जहाला सुभिक्ष्य काल दृष्टीनें पाहिला त्या उपरांतिक ईश्वरी इच्छेनु-रूप होणारा सारखें कालचक्र प्रसग सन आर्बा तिस्सैन यामध्यें महाराजाचा प्रसग जजिरा प्राप्त जहाला ते समयीं उपल्ग मनुष्यें जितकीं होतीं तितकीं काहीं मेलीं व काहीं गेलीं जजि-राच्या लोकाचीं तर घरें बुडालीं ते समयीं आपण जातों तर कोणी नको न म्हणते परंतु आजपर्यंत येथें राहून काळ दुष्काळ काढून या लोकास सोबत दिली त्यास अशा प्रसंगास टाकून गेल्यावर ईश्वर बरें पहाणार नाहीं म्हणून निर्धार करून पाहिला होणार प्रसंग चुकत नाहीं, परंतु काहीं बुद्धिवाद सागावा दैवी मानवी उपाय करून अरिष्ट दूर करावें म्हणून लोकास व सुभानजी नलवडे मुद्राधिकारी यास सांगितलें आणि कितीएक शांति केल्या, व मौजे मजकूरचे देव ताम्र यानीं भ्रष्ट केले आहेत त्याची हि अर्चा शुद्ध करावी म्हणून सागि-तलें, आणि दोन देवस्थानें अर्चाशुद्ध शास्त्रसमतें बोलली आहेत त्याप्रमाणें करून देवस्थापना केली त्यावरून मौजे मजकुरचे ग्रामस्थ यांनीं देवासनिध उभें राहून सकल्प केला कीं, देवा, तुझी स्थापना या ब्राह्मणानें केली, हा मौजे मजकुरचा उपाध्या, परंतु या समयीं अधिक काही द्यावें म्हणून समस्त ग्रामस्त मिळून दोन देवालयाचा अभिषेक आपणास देऊन वृत्ति भूमीपत्र करून दिलें उपाध्येपण गांवचें व किल्याचें इस्तकबील पासून आजपर्यंत करीत असों असें असतां कृष्णभट महाजन जानभटाचे गोत्र पुरुष हे मौजे मजकुरीं येऊन राहून आपणा समागमें उपाध्येपणाचा खटला करू लागला त्यास पहिल्यापासून सदरहू वर्तमान विदित केलें आहे, मनास आणून मनसुबी करावी, म्हणून तुम्ही हजर मजालस करीणा सांगितला व जजिराचे मोतादिमत तटसरनोबत नाइकवाडी लोक याजवळही हजर मजालस आणिता त्यांणीं सांगितलें कीं, महाराज राजश्री थोरले कैलासवासी स्वामींनीं जजिरा वसाविला त्या दिवसा-दारभ्य आजपर्यंत दादभट उपाध्ये आम्ही जाणत आहों आमच्या घरचा मुहूर्त सोहळा,

हव्यकव्य, कोणीं केलें, कोणाची प्रथम पिढी, कोणाची दुसरी व कोणाची तिसरी अशा तीन पिढ्यापर्यंत हा उपाध्या, आम्ही याचे शिष्य दुसरा पदार्थ नाहीं हल्लीं कृष्णभट महाजन जानभटाचा गोत्रज म्हणून उपाध्येपणास भांडतो,तर ग्रामसंबधिक उपाध्यपण बहुत काळ दादंभटांनीं चालविलें आहे त्यास मौजे मजकुरचा उपाध्या जानभट, त्याचा गोत्रज कृष्णभट्ट, त्यास ग्रामसबधें उपाध्येपण जें असेल तें दादभट याणीं व कृष्णभटांनीं समजून रहावें जजिराचें उपाध्येपण दिवाणसंबाधिक व जितक्याच्या याणीं व याणी उदमी सावकार व सावकारी तांडेल व बनेतुम (?) इतक्याचें उपाध्येपण दादभट याचें आणि याणींच आजपर्यंत उपाध्यपण चालविलें कित्येक महार्णवाचे प्रसग सोसिले आम्हा लोकांबरोबर कितीएक काल दुष्काळ काढिला भाजीपाला खाऊन सोबत दिली आमचा काळ तुटका जे समयी जहाला ते समयीं आम्ही जितकें दिलें तितकें लक्षशहा मानून आमच्या घरचीं कार्यप्रस्तें केलीं महामारीचा प्रसग जहाला ते समयीं हा ब्राह्मण जिवंत राहून महामारीचें भय न धरिता कितीएक प्रकारें शांतीकर्में केलीं अरिष्ट निरसन होऊन त्यामुळे आमचे काहीं जीव वांचविले मौजे मजकुरचीं दवस्थानें भ्रष्ट जहालीं होतीं तीं या ब्राह्मणाने अर्चाशुद्ध करून स्थापना केलीं इतकी खस्त खाऊन आजपर्यंत उपाध्येपण केलें जजिरचें उपाध्यपण म्हणजे आम्हां लोकांचें, तें आम्ही तीन पिढयापयत वडिलांपासून या ब्राह्मणास दिलें आहे व दिवाणसबधीं कार्यप्रस्त प्रसगोचित होईल तेंही या ब्राह्मणाचें म्हणून लोकांनीं तुमचें वर्तमान सांगितलें व तुम्ही सदहू वर्तमान सांगितलें त्यावरून मनास आणितां, तुमचा भोगवटा मनास आणितां, जजिरा यास मुहूर्त केल्यापासून साठ वर्षें झालीं त्या दिवसादारभ्य उपाध्येपण करून जजिऱ्यास राहून कितीएक काळ दुष्काळ काढून भाजीपाला खाऊन गडकरी यास सोबत दिला, त्यांच्या घरचीं कार्यप्रस्तें सपादिलीं ज्याणें जें आत्मसतोषें दिलें तितकें दातृत्व घेतलें, न्यूनपूर्ण काहीं न म्हणिलें व महामारीचा प्रसग जहाला तें समयीं जजिऱ्यांत राहून भय न धरितां कितीएक शांती करून आरिष्ट दूर केलें मौजे मजकूरचे देव भ्रष्ट झाले त्याची स्थापना केली असे कितीएक श्रमसाहस या जागीं केले या करिता जजिऱ्याच्या लोकानीं विनती केली कीं, दादभट उपाध्या, याच्या उपाध्येपणास दुसऱ्यास सबध नाहीं, व आम्ही लोक काहीं दुसऱ्या ब्राह्मणास उपाध्या असें म्हणणार नाहीं आमचें वचन उपाध्येपणाचें या ब्राह्मणास दिल्याचें गुतून गेलें आता कांहीं भय नाहीं, म्हणावें असें नाहीं ? परतु यासी पुढें उपाध्यपणाचें पत्र असावें तें करून द्यावें आम्ही त्यास साक्षी असू पुढें आमच्या वंशीं जो कोणी होइल त्यांणीं दादंभटास व याच्या पुत्रपौत्रादि सततास भजून आपल्या घरचें कार्यप्रस्त होईल तें याजपासून करवावें ये विषयीं अतर करील त्यास काशीविश्वेश्वराची शपत असें असून चुकेल तो आमच्या वंशींचा नव्हे म्हणून शपत पूर्वक बोलले आणि सर्वांनीं विनता केली कीं, त्या वरून व तुमचे श्रमसहास इस्तकबाल पहिल्यापासून केले व तुम्हीं उपाध्यपण जजिऱ्याचें बहुत काल केलें आहां परतु पत्र असावें ही गोष्ट आम्हांस समजून व लोकांनींही तुमच्या विषयीं विनती केली त्याजवरून जजिऱ्याच्या उपाध्येपणाचें

पत्र करून दिलें असे. तुम्ही व तुमच्या पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें जजिऱ्याचे उपाध्येपण दिवाणसंबंधिक व लोकांच्या घरचें करीत जाणें जजिराचें उपाध्येपणास दुसऱ्यास संबंध नाहीं आपलें समाधान असू देणें मौजे मालवण येथील ग्रामसंबधिक उपाध्येपण आहे त्याचा अन्भव तुम्हीं व कृष्णभट महाजन घेत जाणें जाणिजे छ १६ माहे रजब हे विनती "मोर्तब असे"

---

ले १४ ]
( ४१९ ) ]

[ श १६४७ पौष शु. ७
[ ता ३०-१२-१७२५

श्री

सन ११३५ फसली                फेरिस्त नंबर २

तहनामा चिरंजीव राा संभाजीराजे यास प्रती शाहू राजे यांणीं लिहून दिला सुहूर सन सीत अशरीन मया व अल्लफ छ ५ माहे रबिलाखर* उर्फ पौष शुद्ध ७ गुरुवार विश्वावसुनाम संवत्सरे                वितपशील

हद्द श्रीकृष्णा धौम महाबलेश्वरा पासून दक्षिण तीर तहत निवृत्तिसंगम× पर्यंत कुल दुतफा मुलूख दरोबस्त ठाणीं व किल्ले तुम्हास दिले असत                कलम

श्रीसावित्री नदी संगमा पासून तहत समुद्रगामिनी पर्यंत दक्षीण तीर जजिर कोट किल्ले सुद्धा व ठाणीं दरोबस्त महाल अकोले‡ पर्यंत तुम्हास दिली असेत                कलम १

मिरज प्रांत व विजापूर प्रांतींची ठाणीं देखील अथणी, तासगाव वगैरे तुम्हीं आमच्या स्वाधान करावं                कलम १

इकडील चाकर तुम्हीं ठेवू नयेत व तुम्हांकडील चाकर आम्हीं ठेवू नयेत                कलम १

तुंगभद्रा दक्षिण तीरा पासून श्रीकृष्णा समुद्रगामिनी व श्री रामेश्वर देखील संस्थानें निमीं आम्हांकडे करार करून दिलीं असत                कलम १

मोंगलाईतील वगैरे उत्तरेकडील मुलूख सुटले त्यातील निम्मे प्रांत तुम्हांस देऊ व तुम्हांकडून सुटला असतां निम्मा प्रात आम्हांस द्यावा                कलम १

तुम्हाशीं जे वैर करतील त्याचें पारिपत्य आम्हीं करावें आम्हाशीं जे वैर करतील त्याचें पारिपत्य तुम्हीं करावें तुम्हीं आम्हीं एकविचारें राज्याभिवृद्धि करावी                कलम १

एकूण सात कलमें करार करून तहनामा लिहून दिला असे सदर्हु प्रमाणें आम्ही चालू कांहीं अंतर येणार नाहीं "मोर्तब" §

---

* पौषांत जमादिलावल महिना आहे × कृष्णा घटप्रभाचा ‡ अकाला कारवारचे द० स बीस मल § लेखांक १८, १९, २० पहा

ले १५ } { श १६४८ फाा
(१६९) } { फेब्रुवारी स १७२७

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री अबाजीपंत स्वामी गोसावी यांसि

पोष्य बाजीराऊ बल्लाळ नमस्कार विनंती उपरी येथिल कुशल जाणून स्वकीय लेखन करीत जाणें विशेष तुम्हाकडून एक दोन पत्रें आलीं व चिरंजीव राजश्री चिमाजी यानीं लिहिलें त्यावरून सविस्तर अर्थ कळों आला ऐसियासि मुलकाच्या बंदोबस्ताबद्दल फौज या प्रांतें ठेवावी लागते त्यास कांहीं फौज आगेजणी केलिया खेरीज राहते असें नाही यास्तव तुमच्या आगमनाचा मार्ग लक्षावा लागला तरि जे क्षणीं तुम्हास पत्र पावेल ते क्षणीं अविलंबे स्वार होऊन आलिया उत्तम आहेत पूर्वी हि पत्रें पाठविलीं आहेत परंतु यावयास विलंबावर घातलें या उपरि दिरंग लावावा ऐसें न करणें त्वरेनें आलें पाहिजे तुम्ही येथें आलियावरि येथील बंदोबस्त तुमचे स्वाधीन करून राजदर्शनास जावें लागतें ज्यांनीं रहावें त्यांनीं आगेजणी करून बाकी भरावी आणि लोक ठेवणें ते तुमचे विचारें ठेवावे लागतात आम्हाकडे सरकार इजारा करून घेतले दरगावीची बोली औरंगाबादेस गेलियावरि करून घ्यावेशी केली आहे तेंही होईल साराच प्रसंग इकडील अनुकूळ केला परंतु तुमचे येण्यामुळें तटला आहे तुम्ही आलियाविना कांहीं होत नाहीं तरी लौकर लौकर येणें आलियावरि तुम्हांस ठेऊन आम्ही हुजूर जाउन कळलें पाहिजे विना तुम्ही आल्याखेरिज राऊत राहत नाहीं ×कंठी जी कडील कारभार तसाच बुडतो सर्व प्रकारें आमचा घात न करणें लौकर येणें, कीं पुढें तरी मामलियांची सावरासावर होईल वारवार लिहावें तर अडलेंसें दिसतें परंतु न लिहितां उपाय नाहीं लौकर येणें तुमचें येणें झाल्या खेरीज आमचें येणें होतच नाहीं लोभ असो दीजे हे विनंती

---

ले १६ } { श १६४९ चैत्र शु॥ १
(१६७) } { ता १२-३-१७२७

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५३ प्लवंग संवत्सरे चैत्र शुद्ध प्रतिपदा रविवासरे क्षत्रिय-कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणीं* राजश्री अबाजी त्र्यंबक यांसि आज्ञा केली ऐसा जे +मनसुब्याचा अर्थ सविस्तर राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांस लिहिला आहे

---

× कंठी जी म्हणजे कंठाजी कदम असावा शाहू रोजनिशी ले २५ वरून या कागदाचा काळ वर अदाजें दिला आहे +हा 'मनसुबा' निजामावरील धामधुमीचा होय. पहा शाहू रो १९-३० * येथें कोरी जागा आहे

त्यावरून कळेल तरि तुम्ही पडित मशारनिल्हेस चार गोष्टी विचाराच्या सागोन अमित्राचे पिछावरि * × कृत्यत (कियेत) फितूर तुटे तो अर्थ करणे तुम्हीं स्वामींजवळ बोलोन गेलां काय, करितां काय, हा विचार कळत नाहीं राजश्री प्रधानाचे व राजश्री सेनापताचे चित्तीं विचार काय आहे हा तऱ्ही शोध घेऊन लेहून पाठवणें त्यावरून स्वामी निश्चिती मानितील *गूज काढावयाचा विचार चित्तात येत नसेल तरि इलाज काय ? वारवार ल्याहावयाची सीमा झाली परतु कार्यभागाचा विचार दिसत नाहीं या उपरि तरि गूज काढवें फितूर तुटावा ऐसें चित्तात असेल तरि पत्रदर्शनीं फौजेनिशीं अमित्राचे पिछावर येऊन त्याची ऽवाताहात करणें ‡बहुत काय लिहिन

---

ले १७
( ४१५ )

श १६५० आषाढ वद्य १
ता ११-७-१७२८

श्री

सन ११३८ फसली

फेरिस्त न १

स्वतिश्री राज्याभिषेक शके ५५ किलकनाम सवत्सरे आषाढ बहुळ १ सोम्यवासरे क्षत्रिय-कुलावतस राजश्री राजाशभुछत्रपति स्वामी याणीं समस्त राजकार्यधुरधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री कृष्णाजी पडित प्रतिनिधी यास आज्ञा केली ऐशी जे, स्वामींनीं स्वामीकार्याविषयीं तुम्हांस आज्ञा केली आहे

हुजूरचा कारभार पूर्वी ज्या पद्धतीनें राजश्री परशराम पडित करीत होते त्याप्रमाणें करावा आपल्या गळ्यास जाबसाल देणें त्यास स्वामीचे मुख्यच तुम्ही आहा कलम १

खासगी पागा व पीलखाना अठरा कारखाने व लोकाचा रोजमुरा याचा हिशेब मनास आणून मोईनजाबते करून द्यावे स्वामी त्याप्रमाणें चालवितील कलम १

सर कारकून व सरदार जिल्हेचे हिशेब व हुजरे यांची बोलाचाली तुम्ही मनास आणून स्वामीस विदित करीत जावी कलम १

राजश्री यशवतराव गोपाळ व शिवाजी शकर व चिंतो महादेव व जिवाजी राघोजी याजकडील हिशेबकितेब तुम्हीं मनास आणावे हे स्वामींनीं तुमच्या स्वाधीन केले आहेत कलम १

सोंधेबिदनूर येथील हिशेबाकितेब मनास आणावे तेथील खर्चाची बदोबस्ती करून ऐवज मनास आणावा कलम १

पन्हाळा पावनगड येथील हिशेब मनास आणून बदोबस्ती करावी व सिंधूदुर्ग कलम १

---

ऽ वरील सेनापतीच्या उल्लेखावरून हा त्याचा फितूर निजामुल्मुल्क याजकडे झालेला असावा असें दिसतें तो फितूर नाहींसा करण्यास निजामावरच हल्ला करावा असा शाहूचे लिहिण्याचा भाव दिसतो ‡ येथून खुद्द महाराजाचें अक्षर

× वार जमत नाहीं ? * गुज = मनांतली तेढ ?

येणेंप्रमाणें स्वामींनी सहा कलमी धदा तुम्हांस सांगितला असे तुम्ही बरी चौकशी मनास आणून कारभार करावा स्वामींनीं दिन प्रतिदिनीं तुमचें उर्जीत करून चालवावें यास अन्यथा नाहीं तुमची जिल्हे भूदरगड, सामानगडची राज्यकार्यानिमित्य स्वामींनीं घेतली असे हे एका वर्षानें तुमची तुम्हांस करार करून द्यावी बहुत लिहिणे तरी तुम्ही सूज्ञ असा

---

ले १८ }
( ४१६ ) }

{श १६५२ अ भा० शु ६
{ता ८-८-१७३०

श्री

सन ११४० फसली

फेरिस्त न ३

राजमान्य राजश्री नीलकंठराव त्र्यंबक यांस आज्ञा केली ऐसी जे तुम्ही तीर्थरूप राजश्री शाहूराजे दाजी ह्याजवळ बोली करणें

उत्तम पक्ष कऱ्हाड पावेतों ×सारद, विजापूर, मिरज अगदीं स्थळें इकडील इकडेच असावीं कोकण दाभोळे पासून किल्ले वसत गड व कुपणे दया करून द्यावा कलम १

कनिष्ठ पक्ष शिराळ्याच्या डोंगराची सारद करावी स्थळें इकडील इकडे असावींत कोकण विजापूर मिरज सदहू प्रमाणें कलम १

यामध्यें जे बोली ठरविली त्याविषयीं राजश्री शाहूराजे दाजी याचें शफतपूर्वक लिहिलें घ्यावें व सनमादिक सरकारकून व राजश्री फत्तेसिंग भोसले यांचें लिहिलें द्यावें इमान बोल तुम्हीं द्यावा बोलाचा निश्चय करून मातुश्री आईसाहेबास बहुमानार्थ न्याव यास मातबर त्यास घेऊन व मातुश्री आईसाहेबही जावयास मसादतदेखील साहित्य मागून आणावें

मध्यम पक्ष बनाम व मलकापूर सुभ्याची सारद स्थळें इकडील इकडे असावींत विजापूर, मिरज व कोकण दाभोळ्यापासून क० १

रदबादलमुळें तिन्हीही पक्ष न व्हत तरि हद्द वारणा तहत रामेश्वरापर्यंत मुलूख व यामध्यें गड किल्ले देखील कोपल निर्वेध विजापूर, मिरज व निम्में कोकण राजापूर सुभा देखील संगमेश्वर यापासून व भगवत रामचंद्र अमात्य व कृष्णाजी पंडित प्रतिनिधि, हिंदुर व घोरपडे व सगुणाबाई व राणोजा घोरपडे व शिंदे व नरगुदे यांस अनुमधानें लागलों असतील त्यांस परिछिन्न अस्थपत्र द्यावें इकडील सेवक इकडे असावे ये विषयीं गेल्या अनुसधानास नसाहित असावींत भिवरेपलीकडे याचा लाब मुलूख द्यावा कलम १

या प्रमाणें बोली करणें व त्यांचे प्रांतांत इकडील सेवकांचीं वतनें व इनामें तीर्थरूप राजश्री थोरले कैलासवासी स्वामीपासून आहेत तीं चालवावीं अशी बोली करणें सुहूर सन इहिदे सलासीन मया व अलफ जाणिजे छ ५ माहे सफर "मोर्तब" *

---

* ले १४, १९, २० पहा × सारद = सरहद्द

ले १९
( ४५६ )

श १६५३ चैत्र व २
ता १३-४-१७३१

श्री

( तालीक )

तहनामा चिरंजीव राजश्री संभाजी राजे यासिप्रति शाहूराजे याणी लिहून दिल्हें सु॥ इहिदे सल्लासान मया व अल्फ [ शिक्का ] छ १६ सवाल शके १६५३ विरोधिकृत नाम संवत्सरे चैत्र वद्य द्वितीया, बितपशील

इा वारुण महाल तहद संगम दक्षणतीर कुल दुतर्फा मुलुख दरोबस्त देखील ठाणीं व किल्ले तुम्हांस दिल्हे असत कलम १

तुंगभद्रापासून तहद रामेश्वर देखील संस्थानें निम्मे आम्हांकडे, निम्मे तुम्हाकडे करार करून दिल्हे असत कलम १

किल्ले कोपल तुम्हांकडे दिल्हा त्याचे मोबदला तुम्ही रत्नागिर आम्हाकडे दिल्ही कलम १

वडगांव ठाणें पाडून टाकू कलम १

तुम्हासी जे वैर करतील त्याचे पारिपत्य आम्हीं करावें आम्हाशीं जे वैर करतील त्याचें पारपत्य तुम्हीं करावें तुम्हीं आम्हीं एक विचारें असावें राज्याभिवृद्धि करावी कलम १

वारणेच्या व कृष्णेच्या संगमापासून दक्षणतीर तहद निवृतिसंगम तुंगभद्रा पावेतों दरोबस्त देखील गड ठाणीं तुम्हांकडे दिल्हीं असत कलम १

कोंकणप्रांत साळशी पलीकडे तहद पंच-महाल आकोल पावेतों दरोबस्त तुम्हांकडेस दिल्हे असे कलम १

इकडील चाकर तुम्हीं ठेवू नये व तुम्हीं कडील चाकर आम्हीं ठेवू नये कलम १

मिरज प्रांत विजापूर प्रांतींचीं ठाणीं देखील अथणी तासगांव वगैरे तुम्हीं आमचे स्वाधीन करावीं कलम १

एकूण नऊ कलमें करार करून तहनामा लिहून दिल्हा असे सदहूप्रमाणें आम्ही चालवू, यांसि अंतराई होणार नाहीं मोर्तब चिटणिशाकडाल §यादी

---

लें० २०
( ४१८ )

श १६५३ चै व २
ता १३-४-१७३१

श्री

सन ११४० फसली फेरिस्त न २२

तहनामा राजश्री संभाजीराजे सुरुसन इहिदे सल्लासीन मया व अल्फ छ १६ शौवाल बितपशील

---

§ ले० १४, १८, १९ २० पहा अशा सारखाच एक तहनामा (श १६२९ मधील) ख २० ले २८२ मध्यें आला आहे

इस्तकबिल वारणा तहत संगम कृष्णा तीर कुल्ह्‌दुतर्फ मुलूख दरोबस्त देखील ठाणीं किल्ले दिले आहेत

तुंगभद्रापासून तहत रामेश्वर देखील संस्थानें निम्मीं राजश्री संभाजी राजे यास दिलीं किल्ले कोपल त्यास दिला त्यांणीं मुबदला रत्नागिरी द्यावी

वडगाव किल्ला पाहू जे तुम्हास वैर करतील त्यांचें पारपत्य आम्हीं करावें आम्हाशीं वैर करतील त्यांचें पारपत्य तुम्हीं करून तुम्हीं आम्हीं एकविचारें राज्याची अभिवृद्धि करावी

वारणेच्या व कृष्णेच्या संगमापासून दक्षिणतीर तहत निवृत्तिसंगम तुंगभद्रा पावेतों दरोबस्त देखील गड ठाणीं दिलीं असत कोंकण प्रांत साळशी पलीकडे तहत पंचमहाल अकोले पावेतों दरोबस्त इकडील चाकर त्याणीं ठेवू नयेत व तिकडील चाकर आम्हीं ठेवू नयेत मिरज प्रांतींचीं ठाणा व तासगांव देखील आमच्या स्वाधीन करावें

एकूण नऊ कलमी करार करून सदरहू प्रमाणें तह दिला असे सदरहू प्रमाणें नऊ स्वहस्ताक्षर मजकुराप्रमाणें करून देऊ यादीप्रमाणें ×

---

लें० २१ (४१७) — श १६५३ चै व ६ ता १६-४-१७३१

श्री

सन ११४० फसली — फेरिस्त न ४

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५७ विरोधिकृत नाम संवत्सरे चैत्र बहुल ६ भृगुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपतीस्वामी यांनीं राजश्री सुभानराव मोरे यास आज्ञा केली ऐशी जे स्वामींची व चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांची भेट झाली वारणेपासून तुंगभद्रा पावेतों मुलूख दरोबस्त देखील गड, कोट, ठाणीं त्यांजकडे दिलीं किल्ले कोपल चिरंजीव राजश्री याजकडे देविले असे तरी त्याचीं पत्रें घेऊन येतील त्याच्या स्वाधीन कोपल किल्ला करणें जाणिजे बहुत काय लिहिणें, " मोर्तब " ×

---

ले २२ [१६६] — श १६५५ ज्येष्ठ व ७ ता २४।५।१७३३

॥ श्री ॥

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री अंबाजीपंत स्वामी गोसावी यांसि

सेवक बाजीराव साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल तागाईत ज्येष्ठ कृष्ण सप्तमी गुरुवार पर्यंत यथास्थित जाणून स्वकीय लिहिणें विशेष-तुमचीं दोन तीन पत्रें व

---

× ले १९ २० पहा

बाळाचें+ पत्र व राजश्री स्वामींचीं पत्रें ऐशीं काहा काळीं परवा ऐशा पावलीं त्यांत सारांश कीं, " छावणी केली उत्तम केले खर्चास व लोक राजश्री स्वामी पुरवितात प्रतिनिधीस व सरलष्कर,कृष्णाजी दाभाडे रवाना केले महाडास येतील † उदाजी चव्हाणाकडील कारकुनास सागोन दोन हजार प्यादे आणविले आहेत तेही येतील सभूसिंग चव्हाण यासही बोलाविलें आहे तेही आलियावर रवाना होतील साचिवासही निरोप दिल्हा " म्हणून सविस्तर लिहिल्याप्रमाणें कळलें परतु येथील मनसबा ऐसा आहे ‡शेखजी आम्हास भेटले खोकरीची वाट मात्र त्याणीं दाखवून दिल्ही काम करिता इतकेच केले येथें येतांच दुसरे दिवशीं त्यास बोलावून हत्ती, वस्त्रें देत होतों, खर्चाची रदबदल करू लागले तेव्हां बोली करून तूर्त दहा हजार रुपये त्याचे पदरीं घातले बहुमानासाठीं बहुतसा आग्रह केला परतु ते करून घेईनात लोक कोणी त्याजवळ राहिले नाहींत सारे उठउठोन आपापले कबिले काढावयास गेले तेव्हा गड सुटले नव्हते आता गड सुटले सारे कबिले मुलखातच मागती राहिले लोकांस मागती बोलावू पाठविले आहे येतील तेव्हा खरे पहिले लोक कोणी शें दोनशे भेटले त्यास अटक करून ठेवावे तरि कौल दिल्हा कार्य होतें कौलाचेच होते यास्तव त्यास अटकही करिता नये यास्तव निरोप दिल्हा आतील राजकारण होतें ते तो पहिलेंच दिवशीं वारले आता प्रस्तुत काही शेखजीच्यानें कार्य होत नाहीं बरेही वाटत नाहीं चार महिने येथें राहिल्या उपरि मग त्याच्याने तरतूद होईल ते करतील खर्चास मागतील तसें देणें लागेल गड घेतले त्यापैकीं अवचितगड त्याचे हवालीं कबिले ठेवावयास करावा असें झालें तोही त्याचे हवालीं केला न करावा तरि बेदील होतो करावा तरि इतबारही पुरेना परतु करणें प्राप्त झाला केला या जातीचे त्याचे वर्तमान आहे §खानजादा थोरला मेला त्याचा लेक बाहेर होता तो आम्हाजवळ आहे, आणि लहान भाऊ त्याचे सहा जण आहेत हाही मूल शहाणाच आहे आत सिद्दीसमूल व सिद्दीअबर अ फ ला नी ऐसे आहेत बाराशें माणूस किलियावर आहे पहिले थोडके होते आलीकडे अजनवेली व *उदेरीहून मदत त्यास आली एकून भरती झाली आहे अजनवेलही मजबूतच आहे उदेरीही मजबूतच आहे चारी जंजिरे त्याचे बरे खबरदार मुसलमानच आहेत अजनवेलीस कांहीं मराठे असतील त्यांकडे विजयगड, गोवळचा कोट दोन आहेतच तिसरा मडणगडही त्याने बळाविला आहे रायगडावर तीन चारशें माणूस मुसलमान आहेत चार पाचशें मराठे आहेत गड न [ ? ] बळाविला आहे जुजतात काहीं पैगामही वरील लागला म्हणून गेले आहेत ते लिहितात सत्यामिथ्या तहकीक तह किंवा नाहीं कळलें नाहीं वर्तमान येईल तें लिहून पाठवून ऐसें वर्तमान आहे सविस्तर कळावें म्हणून लिहिलें असे लोभ असो दिजे हे विनंती छ २२ जिल्हेज शनवार

---

† हें पत्र हबशी याच्या मसलतीच्या सबधाचें आहे ‡ शेखजी—हा जजिऱ्यातील एक फितुरी येथें अक्षर गेलें आहे § शिद्दीच्या मुलांपैकीं वडील * उदेरी कीं खादेरी तें स्पष्ट नाहीं तरी पुढील सदर्भावरून उदेरीच असावें + बाळाजी बाजीरावाचें

ले २३ } [११९] } { श १६५६ { सन १७३४

॥ श्री ॥

—विज्ञापना—चिरंजीव राजश्री संभाजी आंगरे कुलाबियाहून विजयदुर्ग प्रांतें जावयास स्वार होते समयीं मजला व चिरंजीव राजश्री मानाजी आंगरे यास ऊजारे कुलाबास ठेऊन कारभार संपूर्ण निरोपिला त्याप्रमाणें त्यांची आज्ञा वरिष्ठ स्थानीं मानोन एकनिष्ठपणें वर्तणूक करून यथाज्ञानें देशदुर्गांचा परामर्श रक्षणयुक्त करावयाचें तें केले शिपाई लोक आदिकरून मातबर सरदार नामांकितांस खावया खर्चावयाचा अनुपत्य जाला त्याची समाधानें शब्द-गौरवानें व किंचित् देऊन घेऊन राखिली चिरंजीव संभाजी आंगरे इकडे आले म्हणजे तुमची उर्जितें करून म्हणोन कित्येक शपतपूर्वक लोकांशीं भाषण करून महाराजाचे जागे जुने व नवे शामलापासून घेतले ते हा कालपर्यंत जतन केले कारभार प्रसंग कांडा पावेतों केले ते चिरंजिवाचे आज्ञे खेरीज केला नाहीं तदनंतर चिरंजीव विजयदुर्गाहून कुलाबा आले. आम्हांस व सर्व लोकांस आल्हाद जाला कीं, अत पर आपलें उर्जित होईल व आम्ही काम-काज केलें हें धनी दृष्टीनें पाहून गौरशी करील म्हणोन आस्था होती ते गोष्टी त्याहीं एकी-कडे ठेवून आम्हांशीं व चिरंजीव मानाजी आंगरे याजशीं दुरोक्ताचे भाषण करूं लागले. नित्य नवेच कारभारसंबधें आरोप ठेऊन प्रथमता मजला बाहेर घातलें तदोत्तरीं मानाजीस जीवनमुक्त करावयाचें आरंभिलें हें त्यास कळताच हिम्मत धरून प्रात:काळीं तो निघोन रेवदंडियास गेला संभाजी आंगरे यानीं देशदुर्गांचा परामर्श बंदोबस्त करावा, लोकांचीं समाधानें करावीं ते किमपि न केली जे दिवशीं चिरंजीव मानाजी आंगरे निघोन आले त्याचे दुसरे दिवशीं उदेरकर शामलांनीं थळच्या चौबुर्जी सनिध मोर्चा होता त्याजवरि घातले जुझ बरें दाट जाहाले मुर्चायातील तोफ शामलानीं नेली तथापि तेथील लोकाचें समाधान व मोर्चाची बंदोबस्ती न करितां दुसरे दिवशीं चिरंजीव संभाजी आंगरे निघोन सुवर्णदुर्गास गेले आणि तमाम लोकांनीं अवसानें सोडलीं महाराजाचे जंजिरे व कोट, ठाणीं नाजूक वरघाटे तामानें उदंड उत्पात केले राजे स्वारीस आले होते परंतु महाराजाचे एक-निष्ठ सेवक होते त्याणीं देशदुर्गें जतन करून फिरंगी, इंग्रज, शामल वगैरे शत्रूवरि स्वामींचा प्रताप कोदंड फिरवून शत्रु पादाक्रांत केले हल्लीं तरि सुगम प्रसंग महाराजासारखा धनी सर्व प्रकारें अभिमानी चित्तावरि धरितील तरी कुमशाम शासनाक्रांत करितील या समयीं फिरंगी, इंग्रेज, हबशी याणीं महाराजाच्या स्थळाची चालना करावी ऐसें नव्हते परंतु कालवशें करून जालें त्यास उपाय काय ? आपण महाराजाचे सवेशीं यावें याच उदेशें लवलीया* पर्यंत आलो त्यास राजमाचीकराकडील कांहीं वृत्त आढळलें यास्तव तिकडे गेलों राजमाचीचा बंदोबस्त केला व या उपरि कुलाबां जाऊन बंदोबस्त करितो लोकांस

—हें पत्र लक्ष्मीबाई आंग्रे यांनीं शाहूमहाराजास लिहिलेलें आहे * लवलें = लोवलें हा गांव संगमेश्वराजवळ आहे

विना दिल्या घेतल्या खेरीज समाधान होतें ऐसें नाहीं तमाम लोक बेदिल, निराश्रित, धनी नाहीं, ऐसें त्याचें चित्तात जालें साहित्य तो जालें पाहिजे या जिल्ही या मु त शी ल जिल्हा राजश्री प्रधान पताचा आहे सर्व प्रकारें हशमांनीं व फौजेनें व कित्येक गोष्टीनें सजुदे आहेत महाराजानीं कृपाळू होउन राजश्री प्रधानपतास आमच्या साहित्याविशीं आज्ञा करावी महाराजाचे आज्ञेप्रमाणें ते साहित्य करतील व लोकास समाधानपूर्वक डौलें तीस पसतीस पाठवावी तें त्यास देऊन मनोधारण करून या जिल्हियाचा बदोबस्त करून महाराजाचे पायासंनिध येतो आम्हास महाराजाचे पायाखेरीज दुसरा अवलंब आश्रा आहे ऐसें नाहीं जरी डौलें येत नाहीं तरी लोक तजा वजा जाहाले सभाजी आंगरियानीं तो या जिल्हियाची उपेक्षा केली आहे महाराजास एक एक स्थळ निर्माण करिता काय श्रम लागले आहेत ? ते स्थळें अनियासें शत्रूचे हातात जाऊ सकते लोकाचा इतबार पुरत नाहीं लोक कष्टी आहेत कोणे समयीं त्यास काय बुद्ध सुचेल व कोणाकडे डोळे देतील तें न कळे शत्रु तरी उशापायेतरास सकळ सामुग्रीनें सिद्धच आहेत तरी महाराजानीं कृपाळू होउन डौलें अगत्य पाठवावी साराश महाराजानीं सध्या दोन गोष्टी कराव्या एक प्रधान पतास साहित्याची आज्ञा करावी, दुसरे डौलें पाठवावी म्हणजे बदोबस्त महाराजाचे प्रतापें करून होतो. आम्हांस महाराजाचे पाया खेरीज दुसरा आश्रा आहे ऐसें नाहा देवधर्म मायबाप सर्व महाराजाचे पाय आहेत सदर्हूप्रमाणें साहित्याची आज्ञा करणार महाराज धनी आहेत

चिरंजीव राजश्री मानाजी आंगरे याणीं राजकोट, चेउल आपले हातीं घेतलें हजार पांचशें माणूसही जमा केले आहेत व फिरंगी व इग्रज ही अनुकूल करून घेतले

---

ले २४ ) ७ { श १६५६ भाद्र
( ४२ ) } { सन १७३४ आगष्ट पूर्वी

श्री

श्रीमन्महाराज परमहंस परशराम बाबा स्वामीचे सेवेशीं आज्ञाधारक चरणरज बाजीनें कृतानेक विज्ञापना, स्वामींनीं आशीर्वाद पत्र पाठविलें तें पावलें कितेक मजकूर लिहिला त्यास आमची निष्ठा स्वामीचें पायां शिवाय नाहीं, हें आम्ही काय सांगावें ? जैसा स्वामी बुद्धि चित्तांत धरतील तैशा होईल असो ते इतका परिहार व्याहावा असें नाहीं आम्ही लेकरें खरीं आज नव दिवस जाहले राजश्री × × × स्वामी निरोप देत नाहींत आता दोन प्रहरीं राजश्री आबाजीपतांचें+ पत्र आलें कीं पुणेस लवकर येईन असें त्यांचें पत्र आलें आहे तर ठरावितां येईल सेवेशीं आज्ञा पा ही विज्ञापना

---

+ अंबाजीपंत पुरदरे हा १६५६ भाद्रपद शु ८ (२५।८।१७३४) रोजीं वारला त्या पूर्वीचें हें पत्र (भा इ स मंडळ ग्रंथांक ३३ पुरंदरे दप्तर भा १ पृ ६७)

ले २५ [२५]

श १६५७ श्रावण व १
ता २४-७-१७३५

श्री

वेदशास्त्रसपन्न राजश्री नारायण दीक्षित पाटणकर स्वामींचे सेवेशी—विद्यार्थी बाजी राव बल्लाळ प्रधान नमस्कार विनती येथील कुशल ता। छ १४ रबिलावल जाणोन स्वकीय लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे विशेष स्वामींनें मथूरे सन्निध धर्मकृत्यास दहा गांव मागितले त्यास तेथें आपला अमल बैसला म्हणजे दहा गाव तुम्ही मागाल ते इनाम करून देऊ सुरु सित सल्लासैन मया व अलफ बहुत काय लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनती

---

ले २६ [४२०]

श १६५८ चैत्र शु १
ता २-३-१७३६

श्री

सन ११४५ फसली

फेरिस्त नबर

शिक्का

स्वास्तिश्री राज्याभिषेक शके ६२ अनल* नाम सवत्सरे चैत्र शुद्ध प्रतिपदा भोमवासरे क्षत्रिय कुलावतस श्री राजा शभु छत्रपती स्वामी याणीं वलदेज यांस करून दिला तह नामा ऐसी जे- वलदेज कुडीदोर जुली यासेफाल तेजफन खाल्नेस बदर कोची यांणीं जजिरे सिंधुदुर्गचे बदरास आपणाकडलि जाहजावरून नुबल दलील व पित्रलेनजाई या दोघाजणांबराबर कोल्हापूर मुक्कामीं पत्र पाठविले असतां जहाला करार बितपशाल

१ वलदेज बदर कोची याचे बाबद हद्दीचे कोपानीं महाराजा सन्निध बसून बोली केली कीं, स्वामींची व वलदेजाची गोडी व खुलासा बळकट झाला आहे तो यावत् चद्रसूर्य तोंवर करार चालावा मध्यें अतर होऊ नये कलम १

१ महाराजानीं आपणास मालवणच्या बदरीं वखार बाधावयास जागा दिली आहे तो वेंगुर्ल्यास वखार होती त्यास त्यानें आपला खर्च लावून बाधून द्यावी वेंगुर्ल्यास पहिलें आपलें चालवीत होते तसें चालवावें म्हणून विनती केल्याप्रमाण करार असे कलम १

१ जहाज बदरांत येतां वादळानें शिकस्त जहालें तरि आपले लोक लावून जिन्नस निघेल तो आपला आपल्यास काढून द्यावा त्यास खर्च लागेल तो वरकड बदराच्या शिरस्त्याप्रमाणें वलदजानीं आपणाकडून द्यावा कलम १

पूर्वी वेंगुर्ल्यास फैतारी (फॅक्टरी) म्हणजे वखार होती ती लुटून नेली त्या गोष्टीबद्दल आपल्या मनामध्यें काहीं नाहीं कलम १

---

* अ अधिक पडला आहे नल पाहिजे

१ आणखी सोईकर वखारीस जागा मागतील त्यास तेथें जागा न द्यावी जहाजावरून जिनस उतरेल त्याची व येथील जिन्नस भरीत करतील त्याची जकात घेऊ नये वेंगुर्ल्यास चालत होतें त्याप्रमाणें चालवावें कलम १

१ वखारींत कोणी चोरी केली तर त्याचे पारपत्य करावे कोणी वखारीवर चढाई केली तरि त्यास मारून काढावें नेक (ला) मत्ता आणून द्यावा कलम १

१ आपणाकडील उदमी माल नेतील त्याचा पैका न देतां दगाबाजी करतील त्यांचें पारपत्य करून पैका घेऊन आपणास द्यावा व आपले चाकर कोणी पळून जातील ते कबजी मुलुखांत उमगतील त्यास धरून आणून द्यावे कलम १

१ आता या बोलीखेरीज काहा बोली असली तरि पुढें होईल कलम १

---

एकूण कलमें आठ शालिवाहन शके १६५८ सोळाशें अठ्ठावन्न नियाबाच निगादास्त अग्यद ? " मोर्तब " तारीख २९ माहे शब्वाल सुरुसन शीत सल्लासीन मया व अलफ

---

ले २७ [ ४४ ]

श्री

श १६५९ पौष व १४ ता ८-१-१७३८

श्रीमत परमहस+ महाराज श्री स्वामींचे सेवेशीं,

चरणरज बाजीराव बल्लाळ प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल महाराजांचे आशीर्वादे पौष वद्य चतुर्दशी पावेतों मुक्काम भूपाळ यथास्थित असो विशेष या प्राता फौजे सहित आलों नबाबाचा* व आमचा मुकाबला व्हावा तो नबाब भूपाल टप्पा अशीरी यास गेले छ× ३ रमजानीं एक युद्ध जाहलें दुसरें कालही एक युद्ध नबाबाचें व लोकाचें‡ झालें बरासा तमाशा नबाबानीं पाहिला महाराजाचे प्रतापे मोर्चें नबाबावरील सलाबत बरीशी चढली नबाब भोपाळचे आश्रयास तीस चाळीस हजार फौजेनिशीं बसले आमचे मोर्चें बाद घोडी वरि बसले आहेत कराळचा मार देत आहेत मोगलाचा आरगानरगा केला आहे दाणा, गल्ला, वैरण, काडी कुल बाद जाहली आहे बगसाचीच गत यास झाली आहे स्वामींच्या आशीर्वादें निजाम उल्मुल्क या ठिकाणीं बुडत आहे अगर सुटका झाली तरि उत्तमच होईल नबाब किल्लेबद झाले त्यामुळें त्यांची अब्रू राहिली नाहीं आपला आशीर्वाद समर्थ आहे सर्व आशीर्वाद महाराजाचा आहे सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

+ ' परशरामबाबा ' हें नांव स्वामी परशुराम येथील भार्गवरामाचे भक्त होते म्हणून त्यास पडलें परमहस दीक्षा ग्रहण केल्यावर ब्रह्मेंद्रस्वामी असें नांव त्याच्या गुरुजीनें त्यास ठेविलें ब्रह्मेंद्रस्वामींचें चरित्र पृ०२पहा ‡म्ह० आमच्या फौजेचें * हे नबाब निजामउल्मुल्क होत हें पत्र इ० १७३८ सालीं निजामास कोंडलें असता लिहिलें हें स्पष्ट आहे × श १६५९ पौष शु ५ ( ता १५-१२-१७३७ )

ले २८ }
[ ४३ ] }

{ श १६५९ माघ शु २
{ इ १७३८ जाने ११

श्री

श्रीमत महाराज श्रीपरमहंसबावा स्वामींचे सेवेशीं अपत्य चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल माघ शुद्ध द्वितीयापर्यंत स्वामींचे आशीर्वादें करून यथास्थित असो विशेष तीर्थरूप राजश्री रायाकडून[1] पत्रें स्वामीस आलीं तींच व जिन्नस पाठविलीं आहेत त्याजवरून विदित होईल सारांश स्वामींचा अशीर्वाद तीर्थरूपाचे मस्तकी आहे तत्प्रभावेंकरून म्लेंच्छ मोठा गर्वेंकरून आला तो गर्वहत जाहला समूळीं अविलंबेंच बुडालियाचें वृत्त येईल ते मागाहून सेवेशीं लिहून पाठवितों अवरंगाबादेची फौज त्याचे कुमकेस जाणार, शहर सोडून फुलदरीस आली आहे स्वामींच्या आशीर्वादें ये फौजेचा नि पात इकडेच होईल असो आशीर्वाद दिला पाहिजे होतें तें स्वामींच्या आशीर्वादें होतें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले २९ }
[ ५५ ] }

{ श १६६० फाल्गुन शु ६
{ ता ४-३-१७३९

श्री

श्रीमत महाराज श्री परमहंस बाबा स्वामींचे सेवेशीं,

आपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत फाल्गुन शुद्ध षष्टीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला तुम्हीं वसईवर लगट करून शिमगे पूर्णिमे आलीकडे श्रीनें तुम्हास वसई दिली ऐशियास स्वामी साक्षात्कार ईश्वराचा अंश आहेत स्वामींचे मुखांतून निघेल त्याप्रमाणें होईल येविषयीं संशय नाहीं स्वामींनीं कृपा करून अभय उत्तरें देऊन वसई दिली म्हणोन आज्ञा केली तेव्हां वसई दिलीच स्वामींचे अभय [ वचन ] पूर्ण चितात धरून आज्ञेप्रमाणें शरीरद्वारा साहस करणें तें आम्ही सर्वही करीत असों तरि शिमगे पूर्णिमे आलीकडे वसईवर स्वामींचा ध्वजारोपण करण्यास स्वामी समर्थ आहेत सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना

---

ले ३० }
[ ४५ ] }

{ श. १६६१ चैत्र व ५
{ ता १७-४-१७३९

श्री

श्रीमत महाराज परमहंस स्वामींचे सेवेशीं,

चरणरज बाळाजी बाजीराव कृतानेक विज्ञापना येथील कुशल तागाईत चैत्र वद्य पंचमी मंगळवार मुकाम म्हसाळ कृष्णातीर येथें स्वामींचे कृपेंकरून सुखरूप असों विशेष

---

१ राया=राव=बाजीरावसाो प्रधान

वसईकडलि† वर्तमान तर मोर्चे लागले आहेत दोन तीन सुरुग जवळही गेले आहेत व पांच धमधमे तयार झाले आहेत परतु सुरगास पाणी लागल्यावरून मोर्चे चालत नाहींत लष्कर फार, दोन तीन महिने एक जागां मुक्काम झाला गवत चद्दू गांवाहून आणावें लागतें असें वर्तमान तेथील आहे तें स्वामींस तीर्थरूप राजश्री आपा सेवेशीं लिहीतच असतील मीही वर्तमान विदित व्हावें म्हणून लिहिलें आहे +इराणी तो वे या स (तहमास?) कुलीखान यानें पादशाह व सर्व लोक कैद केले, आणि आपण दिल्लीस येऊन तक्तावर बसणार पुढें दक्षणेवर चाल करावी हाच त्याचा पुर्ता आशय आहे असो पुढें होईल वर्तमान तें शेवटीं लिहून पाठवू तीर्थस्वरूप राजश्री $राऊ ब्रह्माणपुराजवळ आहेत येथील वर्तमान तर तूर्त राजश्री छत्रपती स्वामींचा मुक्काम येथेंच आहे विशेष अर्थ लिहावयास योग्य आहे असे नाहीं सर्व आश्रा व आशीर्वाद आमचे मस्तकीं असे तो वसईही येईल तहमास कुलीखानासही पोंचेल स्वामीनींही सदैव लेखकास आज्ञा करून तीर्थस्वरूप राजश्री आपास लिहिलें पाहिजे स्वामींचा कृपा आहे तों सर्व घडतच आहे वरकड विशेष अर्थ आहे असें नाहीं सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले ३१
[ ४३९ ]

श १६६१ वैशाख शु १५
ता १२-५-१७३९

श्री

त्यात * बुदले भरून छ ३ ‡ सफरीं कुल अवघी सिद्धता करून, लोकास सुरुग उडताच हल्ला करण्याविशीं ताकीद केली छ ४ रोजीं सुरुगास बत्या दिल्या राजश्री ×राणबाकडील पांच सुरुग उडावे त्यात चार उडाले एक उडावयाचा होता तोंच लोकांनीं तातड करून हल्ला केली तों पांचवा सुरुंग उडाला तेणेंकरून लोक बहुतकरून दगडांनीं दडपले तैसे हल्लेस हशमाचे लोक चटले होते तेही उडाले, व फिरगी यानें हुक्के व गरनाळा, दारूचीं मडकीं, बरखदाजी, रजगिरी येणेंप्रमाणें अतिशय मार दिला यामुळें ते दिवशीं लोक कच मोहरे जाले काम कारेगार जालें नाही दुसरे दिवशीं दोन सुरुग उडता राहिले होते, त्यांचा शोध करून, बत्या ठीक करून, साऱ्या लोकाची निवड करून, हल्लेविशीं ताकीद केली, आणि सुरुंगास बत्ती दिली त्याने निम्मे बुरूज उडाला लोकांनीं जीवित्वाकडे दृष्टी न देतां चालोन गेले फिरगी याणीं आंतून मेढा घालून बळ धरिलें होतें हल्ला करितांच हुक्के व गरनाळा, दारूचीं मडकीं, राळ, माशाचें तेल, बरखदाजी ऐसा सीमे परता मार दिला परतु लोकांनीं मेला तो मेला, जळाला तो जळाला, त्याजवर दृष्टि न देता ज्या जागा गेले त्या जागांच

---

† वसईचा किल्ला घेतल्याची हकीगत साष्टीची बखर पृ० १६-२२ यांत पहावी-
+ नादीरशहा ( १७३८।३९ ) $ राऊ—राव—बाजीराव
* हें पत्र असें त्रुटितच सापडले आहे मजकुरावरून हें कोण्या सरदारानें शाहू-महाराजांस लिहिलें असावें ‡(ता १-५-१७३९) ×राणबा=राणूजी शिंदे

कायम राहून फिरंगी यासही मार दिला त्यांणीं तो जे जे जागा खिंडारें पडला होतीं त्या जागां दारूचा मडकीं व राळ टाकून होमच मांडिले तैसेच लोकानीं सोसून कायम राहिले फिरंगी याणा तो हिंमतीची व मर्दुमीची सीमा केली तथापि बाहेरील मार बहुत जाला आंतील चांगलेच माणूस रेणोळ व ढो णें व मोठे मोठे फिरंगी मेले त्यामुळे व बाहेरील मारामुळें बेऔसान होऊन कौल मागावयास माणूस पाठविलें त्यांजवरून कौल देऊन त्यांजकडील तिघे भले माणूस आणिले त्याजपाशीं करार करून तहनामा देऊन आंत पाठविले हत्यार व कबिले सामान सुद्धां सोडावे ऐसा करार केला सहा दिवसाची मुदत दिली जागा जागां गलबतें आणावयास माणसें पाठविलीं आहेत व जमाही झालीं आहेत सत्वर जाऊन किल्यावर निशाण चढेल ऐसें विस्तारें वृत्त लिहिलें श्रवणें बहुत आनंद जाला त्याचा विस्तार लिहितां विस्तार आहे वसई [ म्हणजे तेथें ] एक्या तोंडानें झुजावें कोट बिलंद, गची रूंद मोर्चा अथवा सुरुंग चालवीन म्हटल्यास पाणी लागतें फिरंगी-यांसारखे झुजणार असें असोन अप्रतिम तर्तूद करून उघडे सुरुंग चालविले त्यांणीं ही प्रत्योपकार यथाविध केला तत्रापि स्वामींचे पुण्य व पराक्रम अप्रतिम तन्मुलें त्याजवर सलाबत बसून ईश्वरावर तवकल केली तन्मुलें फिरंगी यावर सलाबत बसली दक्षिणची फौज म्हणजे मऊ लागलें म्हणजे बेजरब घेणार, कठीण लागलें म्हणजे फिरोन पहाणें नाहीं ऐशी पूर्वापार या राज्यांतील तऱ्हा [ असें ] सरदारांस कर्म जहालें नाहीं, पुढेंही होणें नाहीं, हा तो निश्चयच आहे स्वामी केवळ ईश्वरी अवतार, तन्मुलें ह्या फौजेस ह्या हिंमती जहाल्या ज्या प्रकारें वानरांकरवून लंका घेविली त्या प्रकारें हे गोष्ट जहाली दक्षिणी फौजेस उपास करून व छातीचा कोट करून झुजावें हे हिंमत पूर्वीं कोणी केली ऐसें ऐकिलेंही नव्हतें परंतु स्वामी साक्षात् ईश्वराचे अवतार ह्यामुळें हें कर्म होतें येथें संशय नाहीं सर्व प्रकारें ओढ, उपास करून हिंमत धरणें आणि येणेंप्रमाणें झुंजणें ही गोष्ट सर्व स्वामींच्या पुण्याची आहे नाहीं तरि औरंगजेब पूर्वीही पातशाह जहाले होते त्यानीं हीं कर्मे करावीं परंतु त्यांस ही तवकल न जहाली स्वामींचें पुण्य थोर, तत्प्रभावें हें होतें नाहीं तरी ह्या गोष्टी विचाराच्या वाटेनें या समयांत व्हाव्या ऐसें येत नाहीं स्वामी ईश्वराचे अवतार हे गोष्ट खरी येथें संशय नाहीं आम्ही मानवी लोक, नानाविध मनाचे प्रकार, निश्चय होत नाहीं सारांश येतदर्थीं पर्याय मनात आणिता अंत चित्तांत येत नाहीं सर्व गोष्टी ईश्वरा-वतारासारख्या आहेत जे सेवक हे पराक्रम पहात असतील त्याचे जन्म धन्य आहेत जे कामास आले त्याणीं तो हा लोक व पर लोक साधिला ज्या पासून ईश्वराची सेवा जितकी घडावयाची असते त्याप्रमाणें घडते साराश, हे तर्तूद, हे मर्दुमी, या समयांत हे हिंमत, हे गोष्ट मनीं ही कल्पवत नाहीं हीं कर्मे ईश्वरासमान आहेत सेवेशीं श्रुत होय हे विनंति

---

ले ३२ } [ ५६ ]	{ श १६६१ वैशाख व० १ ता १३-५-१७३९

श्री

श्रीमत महाराज राजश्री परमहंस बावा स्वामीचे सेवेशीं,

चरणरज चिमणाजी बालक विज्ञापना येथाल वर्तमान तागाईत वैशाख वद्य १ पावेतों महाराजाचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष स्वामींचे आज्ञेप्रमाणें भानिवास केदार याजसमागमें पुतळ्या १२५ रुपये १२५ एकूण सवाशें पुतळ्या व सवाशें रुपये पाठविले आहेत सेवेशी प्रविष्ट जाहलियाचें उत्तर सादर जाहलें पाहिजे, व सर्व स्वामींच्या आशीर्वादें-करून फत्ते जाहलेयाचें वृत्त सविस्तर काल लेहून सेवेशा विनतीपत्र ×पाठविलें आहे तें पुण्याहून रा। अताजी नारायण याणा स्वामींचे सेवेशा पावतें केलेंच असेल सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

पैवस्ती चद्र २४ सफर सन तिस्सा सल्लासेन हे ज मा अ से [ १ ]

---

ले ३३ } [ ५७ ]	{ श १६६१ ज्येष्ठ वद्य ६ ता। १५-६-१७३९

श्री

श्रीमत् महाराज श्री परमहंस बावा स्वामींचे सेवेशीं

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत ज्येष्ठ बहुल षष्ठीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष सोमाजी बराबर स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें +तें प्रविष्ट होऊन सतोषावाप्ती जाहली वसई फत्ते जाहली यावरून स्वामींनीं मजला कित्येक कृपा उत्तरें गौरवून दाशरथी आदिकरून साक्ष-उपसाक्ष देऊन आज्ञा दिली तर सर्व सामर्थ्य स्वामींचे आशीर्वादाचें वसई दिल्ही दिल्ही हें उत्तरें त्रिवार स्वामींनीं लेख केलीं व स्वामींनीं पाटसास मज दर्शन दिलें तेथेंही वसईविशीं अभय दिलें तदनरूप स्वामींनीं वसईवर सुदर्शन प्रेरून धर्मद्वेष्टे यांचा नि पात केला येरवीं वसई सई होती असें [ नवतें ], व टोपकर अग्निरूप होते त्यांच्या सर्व शक्ती कुंठित करणें हा प्रताप स्वामींचा, आम्हां मानवी लोकांचें हें कृत्य नव्हे श्री रघुनाथ [ याणीं ] वानरां हस्तें समुद्रीं पाषाण तरवून लकेशादिक त्रिकूटाचळाचें मर्दन केलें, तैसेंच श्रीकृष्णें यादवा हस्तें म्लेच्छादि दैत्यांचें निर्दळण केलें, याच प्रकारें पाश्चात्यांचें उपमर्दन स्वामींनीं करून•वसईत ध्वजारोपण केलें स्वामी मूर्तिमत ईश्वररूप आहेत स्वामींचा प्रताप कर्तृत्व वर्णावयास

---

×ले ३१ पहा + ले ३१ चे पत्राचा जबाब

आमची बुद्धि नाहीं प्रपाचिक विचारें स्वामींनी मज महत्त्व देऊन आज्ञा दिला तर हे सर्व भूषण स्वामीचे आहे मी स्वामींचा असे

पुतळ्या पाठविल्या त्या निफासी आहेत त्यांस फांसे करावयास सोनें तोळे ५ पांच पाठवणें म्हणून आज्ञा त्याजवरून सदहू पांच तोळे सोनें सोमाजी बराबर पाठविलें आहे

लक्षुमणराव याजबाबत सातशें रुपये आम्ही पुण्यास येऊन सेवेशीं पाठवून देऊ

जिन्नस पाठविणे वजन पक्के

८३ साकर

८३ गूळ

८८॥ केशर

८८१ कृष्णागर

८८८३ कस्तुरी तोळे

फिरंगी कागद गड्डी २

पवळी माळ १०८

येणेंप्रमाणें पाठवणें म्हणून आज्ञा त्यावरून साताऱ्याहून देवविलें

८३ साकर

८३ गूळ

पुण्याहून देवविलें वजन पक्के

८८॥ केशर

८८१ कृष्णागर

८८८३ कस्तुरी

फिरंगी कागद गडी २

पवळ्याची माळ १०८

मोतें दर रुपयास मोतीं १ एक प्रमाणें मोतीं सव्वाशे पाठवणें म्हणून आज्ञा त्यास येथें मोतीं नाहींत स्वामीचे आज्ञेप्रमाणें पुण्यास खरीदी करून पाठवावयाविशी लिहिलें आहे मोतीं मिळाला तर पाठवितील मोतीं न मिळत तर सव्वाशें रुपये सेवेसीं पाठवितील

पांच कारकुनांस पाठवितों त्यांस धंदे सांगणें म्हणोन आज्ञा ऐशास आम्ही पुण्यास आल्यावर स्वामानीं दोन अथवा तीन कारकून पाठवून द्यावे हे विनती आमची आहे असें असता स्वामींनीं पाच कारकून पाठविले तर स्वामी-आज्ञा आमचे वस्तु मोडवेल असें नाहीं येविषयीं सोमाजी विनती करील त्याजवरून विदित केलें आहे स्वामींची आज्ञा सोमाजीनीं जबानी सांगितली त्याजवरून वस्त्रें पाठविलीं व सोमाजीस, सोमाजी बरोबर दोघे होते त्यांस दिलीं

कारकुनास वस्त्रें

१५ तिवटे

३ पासोडिया

१८

सोमाजीस रुप्याचे कडें दिलें, सोमाजी-बरोबर दोघे होते त्यांस दोन पासोड्या दिल्या

१९०॥ [ ? ] पुण्याहून देवविले

येणेंप्रमाणें सेवेशीं पाठविलें आहे विदित जालें पाहिजे सेवेशीं श्रुत व्हावें हे विज्ञापना

---

ले ३४ } [ १ ] } { श १६६२ पूर्वी { सन १७४०

श्री

वेदशास्त्रसपन्न राजश्री ‡ दीक्षित बाबा स्वामीचे सेवेशीं,

विद्यार्थी बाजीराव बलाळ प्रधान साष्टांग नमस्कार विनती उपरी येथील कुशळ

---

‡ हे नारायण भट दीक्षित पाटणकर होत हे पुढें काशीस जाऊन राहिले

स्वामीचे आशीर्वादें करून यथास्थित असों विशेष मौजे **राजणगाव** पो मजकूर हा गांव खासगत मुकासा आहे तो राजश्री **बाबूराव मल्हार** यास दिला आहे त्यास राजश्री **मानाजी जाधव** याजपासून चिरजीव **राजश्री चिमणाजी** यांणीं बाकीचे ऐवजीं पैका घेतला त्यास दरम्यान तुम्हींच अहा तुम्हा आपले हाते कारभार विल्हेस लाविला आहे हल्लीं मौजे मजकुरासि वगैरे गांवासि कटकट करणार म्हणून कळलें स्वामींनीं दरम्यान होऊन त्याजकडील कारभार चिरजीवापासून फैसल करून घेतला असता हल्लीं ते कटकट करणार, ही गोष्ट उत्तम आहेशी नाहीं स्वामींनीं त्यास माकूल करून सांगणें ते रीतीनें सांगावे आणि मौजे मजकुरास कटकट न करिता अमल सुरळीत चालेल तें करावें अगोदर स्वामीस लिहिले असावें यास्तव लिहिलें आहे तरि त्यास फजित करावयाचें ते करून मौजे मजकुराचे वाटेस न जात तें करणें लोभ असो दीजे हे विनती *

---

ले ३५ } { श १६६२ चैत्र वद्य १०
[ ५८ ] } { ता १० ४ १७४०

श्री

**श्रीमित् परमहस बावा स्वामाचे सेवेशीं**

चरणरज **चिमणाजी** बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विनतां येथील कुशळ तागा ईत छ ३ मोहरम चैत्र वद्य दशमी मुक्काम किल्ले § कोरिगड घाटमाथा यथास्थित असो विशेष **औरगाबादेहून पारनेरनजीक** आलों तेथें राजश्री +**सभाजी** आगरे सरखेल एका-एकीं आलीबागेंत उतरोन **हिराकोट** घेतला, **सागरगड** घेतला, **चौलच्या** कोट घेतला, **थळचा** कोट घेतला, **आलीबागेंत कुलाब्याचें** पाणी बद केलें ये समय येऊन आपलें रक्षण करावें ऐसें ×**मानाजीचें** पत्र **ऽनानांजवळ** आलें येताच **नानांनीं** चार पाचशें राऊत **वासुदेव** जोशी व **विठ्ठल** शिवदेव व अताजी **नारायण** या समागमें देऊन रवाना केले आम्हास **मानाजीचें** पत्र होतें तें आम्हाकडे पाठविलें पत्र मार्गी पावलें तेंच दिवशीं लाब मजल करून **घोडनदीवर** मुक्काम केला तेथून **मानाजीस** आश्वासनाचें पत्र लिहून रवाना केलें दुसरे दिवशीं विसां कोसांची मजल करून **लोहगांवास** आलों **मानाजीचे** कुमके-विषयी इग्रजासही पत्रें पाठविलीं तेंच दिवशीं **पुण्याहून** चिरजीव **नानांस** रात्रीं बोलावून आणून त्या समागमें सारी फौज देऊन रवानगी केली ते येथून पाचवे रोजीं **कुलाबियास** जाऊन पोंहोचले आपणही **पुण्यास** जाऊन तीन दिवस तेथें राहून **मातुश्रीचें** दर्शन व आज्ञा घेऊन स्वार होऊन काल येथें आलों नाना तेथें पावले तेच दिवशीं **सभाजीकडील** चौकी बाहेर उभी **हिराकोटाजवळ** आश्रयास होती, ते मारिली पचवीस तास माणूस कापून काढिलें

---

* सदहू अस्सल पत्र डुबेरकर बर्वे याजपाशीं आहे § **कोरी** की **कारगोरी** ?
+ सभाजी हा कान्होजी आंग्रे यांच्या औरस पुत्रांपैकीं धाकटा × **मानाजी** हा **कान्होजी**-च्या राखपुत्रांपैकी एक याजकडे कुलाबा किल्ला होता ऽ **नाना=बाळाजी बाजीराव**

§तुळाजी आगऱ्या जखमी धरून आणिला आहे इंग्रजहि अगोदर कुलाबियास येऊन पाणी, सामान जें पाहिजे ते कुलाबियास पोचविले,व सांप्रत तो आरमारानशीं कुलाब्याजवळ आहे तेथून तोफाचा मार दिला त्यामुळ आलीबागेतून सरोन हिराकोटचे उत्तरेस आश्रयाने मोर्च बांधून राहिले आहेत नाना सागरगडाखालून खाडीचे कडेनें गेले तेथें पंचवीस माणूस संभाजीकडील आलें होतें त्यांत सरदार होता तो व पांच सात माणूस जिवें मारिलें व वरकड पळाले सा सातजण धरून आणिले जर संभाजी लौकर निकाल काढून जीव वाचवून निघोन गेला तर उत्तमच जालें ऽगुराब व थोरलीं गलबतें इंग्रजाचे भयानें सुवर्णदुर्गाकडे लावून दिला आहेत लहान गलबतें व ऽमहागिऱ्या मिळोन साठ ×दागिने तरतीं साखरीचे खाडीजवळ ठेविला आहेत जर धीर धरून मोर्चेबंदी करून राहिला तर मोर्चे लावून पारपत्याचा विचार करणें तैसा स्वामींच्या आशिर्वादाचे बळें करीतच आहों इंग्रजांस मार्ग देऊन जाऊ द्या म्हणून संभाजीनें सांगून पाठविलें होतें परंतु इंग्रजानें मान्य केलें नाहीं आम्हीं =औरंगाबाद प्रांतीं आहों, ये प्रांतीं ध्यान नाहीं, ऐसा समय पाहोन, [संभाजी] आले होते तुमचा आशीर्वाद आमचे मस्तका असतां त्यास समय काय फावणार आहे! कळावें म्हणून लिहिलें असे मानाजींची स्थापना आम्हीं केली परंतु त्यास स्मरण न राही ऐसें जहालें कितेक प्रकारें वावगी वर्तणूक आम्हांशीं केली त्याचा विस्तार लिहिल्यानें चित्तात येणार नाहीं जे समयीं पाय पाहू तेव्हा विदित करू उरण जागा फिरग्याचा तो आपणच बळावली तैसेंच आमचे उरावर बांधिला (?) तेविशीं व पैक्याविशीं वारवार लिहिलें, परंतु ते गोष्ट चित्तांत न ये आज पांचा वर्षांत एक पैसा आमचा देणें तो दिला नाहीं बहुतच अमर्यादा मांडिली यास्तव त्याचेही डोळे उघडावे, याकरितां तजविजेनें पाल व मिरगड दोन्ही जागे संभाजीच्या हातास जात होते, तेथील लोकाचा दिलासा करून ते जागे घेऊन आपलीं निशाणें चढविलीं तैसेंच फिरंगी याचें उरण बळाविलें होतें तेंही घेतलें आजच फत्ते जाल्याचें पत्र उरणाहून आलें सारांश त्याचे डोळे उघडले व सर्व प्रकारें संभाजीचे हातोन जीवही ये समयीं वाचविला असे सारांश इतकाही प्रताप स्वामींचे आशीर्वादाचा आहे तेणेंकरून सर्व विचार होतात दुसरा अर्थ नाहीं कर्ज फिटेल ऐसें स्वामींचे मुखावाटे निघालें आहे, तेंही शेवटास जाईल. स्वामींच्या आशीर्वादावेगळें दुसरें जाणत नाही उद्यां परवां घाट उतरोनही कुलाब्या पावेतों जाणार आहे तेथें न पावतां अगोदर संभाजीचा निकाल जाला तर उत्तमच आहे नाहीं तर तेथवर जाऊन

---

§तुळाजी–कान्होजीच्या राखपुत्रांपैकीं एक हा संभाजीच्या पक्षाकडे होता ऽएक प्रकारचें तारू ×दागिने=नग (तारवाचें) =औरंगाबाद प्रांतीं निजामाचा वडील पुत्र नासिरजंग याजबरोबर लढाई सुरू होती, तेव्हां बाजीरावाच्या कुमकेस आपा ससैन्य वर घाटीं गेले होते स १७४०.

होईल वृत्त ते लिहून पाठवू निरतर आशार्वाद पत्र पाठवीत जावें सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना

---

ले ३६ }
[ ११ ]}

{श १६६२ आश्वीन व ५
{ताा २९-९-१७४०

श्री

तीर्थरूप वेदशास्त्रसपन्न राजश्री (दीक्षित स्वामी वडिलाचे सेवेशीं,

अपत्य चिमणाजी बल्लाळ व बाळाजी बाजीराव कृतानेक साष्टाग नमस्कार विनती येथील क्षेम आश्वीन वाा ५ मुक्काम कसबे पुणें स्वामींच्या कृपेंकरून यथास्थित असे विशेष स्वामीनीं ज्येष्ठ शुद्ध १० चें पत्र पाठविलें तें पावलें साविस्तर अर्थ कळला सारांश स्वामींचे आशीर्वादाचा सर्व आमचा विचार आहे स्वामींच्या आशार्वादापेक्षा दुसरे दैवत जाणत नाहीं

ससर्गदोषाचा× परिहार करावा याविशीं आज्ञा लिहिली तर अवश्यक स्वामाचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक करू

कोणी मंत्रशास्त्री भेटतील आणि काहीं अनुष्ठान करा म्हणतील तर ते गोष्ट न करणें, कोणाचा मंत्र न घेणें, शिवपूजन व विष्णुपूजन व गायत्रीचा जप व वेदोक्त अनुष्ठानें करीत जाणे, म्हणून लिहिलें, तर आज्ञेप्रमाणें करीत जाऊ स्वधर्में करून आचरण करणें, कोणीं दुराचरणी असतील त्यांस शासन करावें म्हणून लिहिलें, त्यास अवश्यमेव लिहिल्याप्रमाणेंच वर्तणूक करू

रायोचे[१] वैभवाची वृद्धी व्हावी यास्तव आपण बहुत श्रम आजपावेतों केले, पुढें जोंपर्यंत आपण आहें तोंपर्यंत तुमच्या कल्याणास्तव श्रम करावयास अनुमान न करू म्हणून लिहिलें, तर राऊ स्वामींस मातापित्राचेठायीं मानीत होते, त्याच्या कल्याणास्तव स्वामींनी श्रमे[२] केलें

---

* पारसनीसकृत ब्रह्मेंद्र–चरित्र ले ५६ येथें हेंच पत्र आहे ग्रांट डफ व्हॉ १ पा ४०२ (१८६३) यांत या पत्राचा दाखला दिला आहे, व सर्व वर्णन या पत्राबरहुकूम दिलें आहे काही वाक्यें तर या पत्रांतील वाक्याचें भाषांतरच आहे उपकारबद्ध मानाजीचें पत्र पुढें ले ३९ पहा

× थोरले बाजीरावानें मस्तानी घरात बाळगिल्यानें सर्व कुटुबीयांस जो ससर्गदोष पर्यायानें झाला त्याबद्दल–( नारायण दीक्षित पाटणकर चरित्र पृ ४३ )

१ रायाचें—रावाचें—बाजीरावाचें बाजीरावास या पत्रामध्यें पुष्कळ ठिकाणीं राया, राऊ किंवा राव असें म्हटलेलें आढळतें

२ देवतार्चन ( सदर चरित्र पृ ४३ )

तर ते गोष्टीचें अपूर्व काय आहे ? बालकाचें कल्याण इच्छावें हे मातापितरांस सांगावे लागतेंसें नाही पुढें ही आम्ही लेकरे स्वामीची आहों आमचे कल्याण व आमची बुद्धि उत्तम कर्माच्या ठायीं दिवसेंदिवस [ लागून ] यशाची अभिवृद्धि होय, ऐसा आशीर्वाद स्वामी देतीलच, व देवाची प्रार्थना करतीलच यात सशय नाही

राजश्री लक्ष्मण× शंकर,बुंदेलखडातील,त्याचे हातून स्वामीकडे खर्चास रवाना करवितों तो ऐवज स्वामीपाशीं पावता होईल, तो घेऊन उत्तर त्याजपाशीं द्यावे ऐवजाचा अंगीकार करावा माघारा सर्वथा पाठवू नये †

अकरा कावडी रामेश्वरास पाठवाव्या म्हणून आज्ञा लिहिली, ऐशियास स्वामींना तेथें* ब्राह्मण योजून तेथूनच कावडी अकरा रामेश्वरास रवाना कराव्या त्यास पैका पडेल तो लिहून पाठवावा पाठवून देऊ

राज्यप्राप्तीकरितां पूर्वी सत्तावीस लक्ष दूर्वा वाहिल्या आहेत बाकी त्र्याहात्तर लक्ष राहिल्या आहेत त्याचा विघ्न राजश्री वासुदेव[1] दीक्षितास ठावका आहे तेविशीं त्यांस सांगितलें असे ते दुर्वा देवांस वाहतील

चिरजीव नानास आमची आज्ञा मान्य असे असेल तर, त्याचें पत्र आज पावेतो आम्हास आलें नाहीं त्याचें पत्र आलियावर त्यास पत्र पाठवीत जाऊ, म्हणून लिहिलें, तर आज पावेतों रायांनीं स्वामीचे आज्ञेस उल्लघन न केलें, व आम्हास स्वामीचे आज्ञेहून दुसरें दैवत नाहीं तोच विचार चिरजीव नानाचा आहे स्वामींची आज्ञा म्हणजे केवळ दैवत असेंच मानून वर्तणूक करितील सांप्रत त्यांच्या आमच्या नावाचें एकच विनतिपत्र लिहिलें आहे स्वामींनीं त्यांस आम्हांस एकच आशीर्वादपत्र पाठविलें तरी कार्यास येईल चिरजीव नानाचा आमचा कांही इतका दुसरा विचार आहे असें नाहीं

आजपावेतों जालें तें जालें, पत्र दिलें होते ते फिरोन घेतलें,[1] पुढें नवें जें प्राप्त होत जाईल त्याचा दुहोत्रा घेत जावा म्हणोन लिहिलें, तर दुहोत्राचा करार करावा असें काय आहे ? साराश मीठ-जोड स्वामींच्या आशीर्वादें होईल वरकड स्वामींची सेवा जे प्रकारें करणें ते प्रकारें करण्यास अतर सर्वथा होणार नाहीं

साराश स्वामींचे आज्ञेचें उलंघन केल्यास कोण उत्तम फल पावेल ? आम्हास तो

---

* म्ह कीशाहून × नारो शकरचा भाऊ

१ हें नारायण दीक्षित याचें चिरजीव नारायण दीक्षित काशीस गेल्यानतर वासुदेव दीक्षित सस्थानचे मालक झाले

* नारायणभट्ट दीक्षित पाटणकर कायगावकर

† ले ३७ पहा

३ बाळाजी बाजीराव

२ श्री विद्यागणपती (द्वादश भुजाची मूर्ती) औरंगाबादेनजीक सातारें येथें दीक्षिताचे वशजांजवळ आहे

स्वामीवेगळें दुसरे दैवतच नाहीं हेच बुद्धि वडिलाचे आशीर्वादेकरून स्थिर राहील हा सिद्धांत आहे तेणेंकरून सर्व उत्तमच होईल यात सशय नाहीं कृपा पाहिजे हे विज्ञापना

---

ले ३७ } { श १६६२ मार्गशीर्ष शु ५
[ १० ] } { ता। १३-११-१७४०

श्री

वेदशास्त्रसपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामीचे सेवेशीं

विद्यार्थी चिमणाजी बल्लाळ साष्टाग नमस्कार विनती उपरी येथील कुशल ता। मार्गशीर्ष शुद्ध पचमी जाणून स्वकीय लिहीत गेलें पाहिजे विशेष वेदशास्त्रसपन्न राजश्री नारायण दीक्षित यास रुपये १५००० पधरा हजार राजेश्री लक्ष्मण शकर याजकडून देवविले आहेत × मशारनिल्हे प्रांत बुदेलखड येथें गेलियावर वसूल करून दीक्षिताकडे श्रीस पावते करतील तुम्हांस कळावें म्हणोन लिहिलें असे बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हे विनती

मार्गशीर्ष वद्य २ शके १६६२ रौद्रनामसवत्सरे

---

ले ३८ } { श १६६२ माघ शु ९
[ ४९ ] } { ता। १४-१-१७४१

श्री

श्रीमत परमहस महाराज श्री स्वामीचे सेवेशीं

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक साष्टाग नमस्कार विनती येथील कुशल तागाईत छ ७ जिलकाद पावेतों स्वामीचे कृपावलोकनें करून यथास्थित असे विशेष बहुत दिवस आशीर्वादपत्र पाठवून परामृष न केला, असें नसावें चरणरजाचा परामृष सदैव करावा तीर्थरूप आपानीं कैलासवास केला हें वर्तमान स्वामींनीं ऐकिलेंच असेल मोठा घातच झाला तीर्थरूप × राऊ यांणीं कैलासवास केलियास आठ महिने न झाले तो श्रीनें हा प्रसग घडविला एकाएकींच श्रीनें दु खार्णवा पाडलें होणार बळवत श्रीइच्छेस उपाय काय ? वडील होते त्याजवरि स्वामींची कृपा होती जो जीवित्व तों पर्यंत कीर्तीच जाहली त्या माघारी चरणरजावरि महाराजांची कृपा आहेच व कृपेमुळें कल्याणच होईल नबाब निजामउल्मुल्ख याचा व नासरजगाचा कलह निर्माण झाला होता त्यास आम्ही साहित्य करिता निजामउल्मुल्ख याचें केलें त्यावरून नासरजग फकीर

---

×थोरले बाजीराव श १६६२ वैशाख शु १३ (ता २८-४-१७४०) रोजी मरण पावले आणि चिमाजी अप्पा श १६६२ पौष शु १० (ता १७-१२-१७४०) रोजी निवर्तले हें पत्र बाजीरावाच्या नतर व चिमाजाच्या हयातींतील आहे × ले ३६ पहा

× ले ३६ पहा

जाहले तदोत्तर आसफज्याची भेट झाली बहुमान आदर फारच केला सर्वप्रताप स्वामींचे कृपेचा आहे स्वामीवाचून आम्हास दैवत नाहीं वरकड विस्तार काय लिहिणें? सेवेशी श्रुत व्हावें हे विज्ञापना

---

ले ३९ } { श १६६३ चैत्र व ४
[ १०० } { ता २५-३-१७४१

॥ श्री ॥

राजश्री बाळाजी पंडित प्रधान द्राजा गोसावी यासी—

छ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो मानाजी आंगरे वजारतमाब रामराम विनंती उपरि येथील जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे विशेष सांप्रत पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं मोंगल आगळीक करून पुढे येत आहे म्हणून आपण मजल दरमजल मोंगलाचा उपमर्द करावयाकरितां जात आहेत ऐसें वर्तमान परस्परें कळोन येत असे हा काल पावेतों मोंगल आपले दर्पे कडून स्नेहात असतां या समयीं दुर्बुद्धि धरिल्यावरून आपण पारिपत्याचा विचार योजिलाच असेल व योजावा हाच प्रसंग प्राप्त असेल दुसरा विचार आचार पारिपत्याविना येग्यात पडोन येत नसतील ऐसेंच दिसतें, असो आपला पुण्योत्कर्ष समर्थ आहे तत्राप आपण खासा आहांत मानमार्ग पाहून कर्तव्यांत येणें तेंच येईल व आणतीलच मोंगलाचें सामान जथलें असेल आपलें जथोन फौजेचा गाहा होत असेलच व पुरता होय तावत्काल सलाबतीखालें राखणें धरणें त्या रीतीनें आपण धरतीलच न कळे एखादे समयीं सरदार मामलेदाराकडून आगळीक होऊन थोडकेच सामानानशीं मोंगलाचे फौजेस तोंड करावयाचा विचार करतील तरि एक वेळ शेर जाहला म्हणजे गोष्ट कार्याची नाहीं हे विशीं लिहावेसें काय? कैलासवासी राऊ व आपा तांब्राचे उपमर्द करीत आले त्या युक्ति प्रयुक्ति सर्व आपण पाहिल्या असत मसलतीच्या प्रसंगाचा गरगशा तो आहेच त्याजमध्यें स्मरणपूर्वक संतोषाचें वृत्त लिहून पाठवीत असावें रा छ १८ माहे मोहरम बहुत काय लिहिणें कृपा असों दीजे हे। विनंती मोर्तबसूद

---

१ही भेट वऱ्हाडचे आग्नेय कोपऱ्यास पैनगंगा व वर्धा यांचे संगमाजवळ माहूरच्या दक्षिणेस एदलाबाद येथें ता ७ जानेवारीपासून ता १३ जानेवारीपर्यंत झाली हें पत्र त्या मुक्कामाहूनच लिहिलें असावें निजामुल्मुल्काचा पुत्र नासिरजंग यानें बंड केलें, औरंगाबादे जवळ त्याचा मोड झाला व तो फकिराचे कपडे घालून जवळच रोझें येथील अवलियाच्या कबरीजवळ बसला ग्रांट डफ भाग २ पृ १४ ( १८६३ ) व सरदेसाई रि० मध्यविभाग २ ३० पहा

* ले ३५ पहा मानाजीस नानांनीं एप्रिल १७४० मध्यें त्याचा भाऊ संभाजीपासून वांचविलें होतें

ले ४० } शा १६६५ वैशाख वद्य ५
[ ४७ ] } ता २४-४-१७४४ चे सुमारास

श्री

श्रीमत महाराज राजश्री परमहस बावा स्वामींचे सेवेशीं

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथाल कुशल स्वामींचे आशीर्वादें यथास्थित असो विशेष चिरजीव राजश्री जनार्दनपत* यावें लग्न वैशाख बहुल पचमीस योजिलें असे तर स्वामींनीं कृपा करून कार्य सिद्धीस पावविलें पाहिजे पाहिलें विनतीपत्र सेवेशीं पाठविलें आहे परतु प्रविष्ट झालें असेल नसेल न कळे यास्तव हल्लीं विज्ञाप्ति लिहिली आहे आम्हीं लेंकरें, स्वामींनी कृपा सर्व प्रकारें करावी हे उचित असे बहुत काय लिहिणे कृपा केली पाहिजे हे विज्ञापना

---

ले ४१ } शा १६६३ मार्ग० व १३
[ २६ ] } ता २४-१२-१७४१

॥ श्री ॥

सहस्रायु चिरजीव विजयी भव राजमान्य राजश्री बाळाजी बाजीराव प्रधान याप्रति श्री वाराणशीहून नारायण दीक्षित अनेक आशीर्वाद उपरी येथील क्षेम मार्गशीर्ष वद्य १३ जाणोन समस्त सुखरूप असों विशेष तुमचे पत्र आलें, पावोन बहुत समाधान जाले विशेष तुमची व चिरजीव वासुदेव दीक्षिताची भेट जालीं हें वर्तमान दीक्षितांहा लिहिलें जे, " बहुत सन्मान केला घाटावरून पुढें मनुष्य पाठवून बलावून सर्व सविस्तर वर्तमान सांगितलें बहुत सत्कार केला " तरि [ यांत ] अपूर्व काय आहे ? हें तुम्हांस योग्यच आहे न कराल तर अपूर्व !

यानतर ऐकितो की जे सर्वांस क्रोधें आहात तर ते सर्व तुमच्या वडिलापासून सोभतीस आहेत त्याचा अन्याय जाला [ तर ] तुम्हीं क्षमा करावी हें तुम्हा योग्यच आहे बहुतसा आतिशय न करावा

यानतर तुमच्याविषयीं आपण जे ईश्वराची प्रार्थना करावयाची ते करीतच आहो तुम्ही म्हणाल जे लोभामुळें करितेत तर ईश्वर जाणे, कैलासवासी बाळाजीपतापासून× आमचें त्याचें चालत आले आणखी आमच्या वचनाचा विश्वास असे त्यापेक्षा तुमचे तीर्थरूपांची निष्ठा उभयतांच्या आमच्या स्थळी असे, जे तीर्थरूपासारखे मानीत असत आम्हीं क्रोधेंकरून नाना प्रकारें रागीजोन पत्रें लिहीत असों परतु त्यांस क्रोध तिलमात्र

---

* हा बाजीरावाचा कनिष्ठ पुत्र भिडे यांची कन्या सगुणाबाई हिच्याशीं याचा विवाह या पत्रातील मित्तीस ( तारीख २४-४-१७४४ ) झाला या तारखेपूर्वी थोडे दिवस हें पत्र लिहिलें आहे ख ४ पृ ११७ व ख २ पृ ९९ वरून हीच मिति येते ह्या हिशेबानें हें पत्र पुढें जावयास पाहिजे पण चुकीनें येथें लागलें × बाळाजी विश्वनाथ

येत नसे आणखी आपणही त्याजकरितां श्रम केले ते ईश्वर जाणे त्यापेक्षा तुमचें उत्कृष्ट नांव व्हावें ऐसा ईश्वरें आम्हास दृष्टात जाला आहे परतु तुम्ही कारभाराविषयीं अत्यत सावध रहाणें कोणे गोष्टीची चिंता न करणे तुमच्या पित्याच्या स्थळीं ममता होती त्यापेक्षा तुम्हांवर अधिक आहे बरें हेच ईश्वराजवळ प्रार्थना करितों जे यांचे उत्कृष्ट चालो आणखी काय लिहावें ?

यानतर आमच्या सोबतीस दहा वर्षें रामाजी +केशव आहे आमचा म्हणवितों त्यास खानदेशचे महाल पहिले कोणी न करी तेव्हा आम्ही या ब्राह्मणास देवविले, त्यास पांच सहा वर्षें चालत होतें, त्यास एका महापुरुषानें आपलें पुण्य खर्चून मामल. काढिला त्यास दोन तीन वर्षे तो ब्राह्मण आमच्याच आशेनें राहिला आहे यदां तुम्ही देणारच होता हें दीक्षितांहीं आम्हांस लिहिलें होतें त्यास आता गतवर्षीं ज्यास महाल होते त्याणें चढविला, परतु तोटा आला, त्याजवर आपांहीं त्यास वास सहस्र सूट दिल्ही असतां यदां सोळा सहस्र चढ करून मामला त्यानें केला बरें तुमच कार्य जाहलें तेंहे आम्हांस समाधानच आहे परतु तेच महाल एक वेळ त्या ब्राह्मणास करून द्यावे हा हेत आमचा आहे याकारितां लिहिलें असे सुज्ञाप्रति बहुत काय लिहिणे ? येथें वैशाखमासीं पंचपक्वान्नांचें लक्ष भोजन करावयाचा प्रारभ करून मग कार्तिकमासापर्यंत वाचलों तर एक वेळ त्या प्रांतास सिंहस्थास गोदा स्नान करून, उत्तम लक्ष भोजन गोदातारीं करून, सर्वांच्या भेटी घेऊन यावें दर्शनानतर सर्व विदित होईल हे आशीर्वाद

---

ले ४७ } [४८] }

{श १६६४ माघ शु ५ {ता. १९-१-१७४३

श्री

श्रीमत महाराज—श्री परमहंस बावा स्वामींचे सेवेशीं

चरणरज सदाशिव चिमणाजी साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल माघ शुद्ध पचमी पर्यंत स्वामींचे आशीर्वादें करून यथास्थित असों विशेष स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें शिरसा वदिलें पैकियाविषयीं स्वामींनीं आज्ञा केली त्यासियास प्रस्तुत येथें ओढीचा प्रसग असे तो काय ल्याहावा ? स्वामींनीं पैकियाविषयीं चार महिने कृपा करावी तीर्थरूप राजश्री नाना स्वारी करून आलियावरि स्वामी आज्ञा करतील त्याप्रमाणें वर्तणूक करतील सारांश हा मामला स्वामींच्या आशीर्वादाचा आहे उभयतां तीर्थरूप असतां यथास्थित चाललें, त्याप्रमाणें किंबहुना याहून विशेष चालावें हें स्वामीस आवश्यक आहेच स्वामीही कृपा करणें ते करतील व करावी [ हें ] उचित असे सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

+हा रामाजी केशव नागपूरकर भोंसल्याकडील की काय ? उपनाव तिखे, पहा ना. भो. ब पृ. ७९, ८० व ना भो का ले ५५

ले ४३ } [४०] }                                                    { श १६४४ फा शु ३ { ता १६-२-१७४३

श्री

श्रीसकळतीर्थरूप राजश्री श्रीमत्परमहंस स्वामींचे सेवेशीं

अपत्यसमान शाहूजी राजे कृतानेक दंडवत विज्ञापि येथील कुशल फाल्गुन शुद्ध तृतीया सौम्य वासर स्वामींचे आशीर्वादें यथास्थित असों विशेष स्वामींनी आशीर्वादपत्र पाठविलें, तेथें आज्ञा जे, श्वाने जे वदविलें त्यास सदेह आहे असे नाहीं पत्र पत्रिकार्थ जाणून जतन करून ठेवणे म्हणून त्यावरून स्वामींनी आशीर्वादप्रसाद दिला त्यास सदेह चित्तात आणिजेतो असें नाहीं सूचनार्थ विनति लिहिली होती त्यास निवार्हरूप पत्रिकाच आज्ञा प्रमाण, सग्रहीं ठेविली असे, विदित होय श्रीपदप्रसाद पाठविला तो पावला सेवेशीं विनति

---

ले ४४ } [४१] }                                                    { श १६६६ भाद्रपद शुद्ध ३ { ता २९।८।१७४४

श्री

श्रीसकलतीर्थरूप श्रीमत् परमहस श्री स्वामींचे सेवेशीं

अपत्यसमान शाहूजी राजे कृतानेक दडवत विज्ञापि येथील कुशल भाद्रपद शुद्ध तृतीया सौम्यवार स्वामाचे आशीर्वादें यथास्थित असों विशेष साप्रत स्वामींचें आशीर्वादपत्र येऊन परामृष होत नाहीं याकारिता चित्त सापेक्षित असे तरि सर्वदा आशार्वादपत्र पाठवून चित्त सानदित केलें पाहिजे हे विनंति

---

ले ४५ } [१०४] }                                                    { श १६६७ वैशाख व ४ { ता ८-५-१७४५

॥ श्री ॥                                                    छ १६ रविलोखर

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बापूजी भीमराव स्वामी गोसावीं यांसि— पो बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशळ लिहीत जाणें विशेष —येरूळकर मोंगल व खोजजी वगैरे यांचें व राजश्री राघो गोविंद याचें युद्ध जहालें परस्पर माणसें घोडीं पडलीं राघो गोविंद खानदेशांत गेले त्याचे मागें मोंगलाची फौज लागली आहे मशारनिलेची कुमक करणें जरूर तरि तुम्ही बाहीर बुनगे देपूर वेलापुराकडे ठेऊन, सडे जाऊन, राघो गोविंद यास सामील होणें तुम्ही जाता कोण्हाशीं कजिया न करणें मोंगल बळें येऊन कलहास प्रवर्तेल तर मग जैसें

---

१ ले ४७ पहा २ कमावीसदार परगणे नेवासें पहा ना रो भा १ ले ३८१, ४४७ व भा २ ले १८, ६६, १३५, १७४, ३२३

बनेल तैसे तुम्हांस करणेंच लागेल कराल करणें राघोपताचा पिछा सुटे ऐशी तजवीज करणें वरचेवर वर्तमान लिहीत जाणें बहुत काय लिहिणे हे विनंती

---

ले ४६
[६०]

श १६६७ जेष्ठ शु॥ १०
ता २९-५-१७४५

॥ श्री ॥

छ १९ जमादिलोवल प्रहर दिवस प्रात काळ

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बापूजी भीमराव स्वामी गोसावी यासि— पो बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें विशेष–तुम्ही रा राघो गोविंद यांचा व अतुरक्र मोंगलाचा कजिया जाहालियाचा मजकूर दोन चार बद विस्तारें लिहिला, परंतु कोणे गोष्टी वरून कजिया व्हावयास कारण काय, तो मजकूर किमपि लिहिला नाहीं याजवरून तुमच्या लिहिण्याची तारीफ काय ल्याहावी ? जरी शिंपी, रंगारी यांचे मजकुरावरून अतुरक्र मोंगलानीं कजिया फैलाविला असेल तर तो जूजे मुकादिमा आहे जेसा जेथें जीव देखावा तैसा तेथें पैका वसूल करावा जातीचा मुकादिमा त्यास पैका सुटेल असें नाहीं व पैका दिल्या खेरीज तेही जातींत येथपूर्व वर्तणार नाहीं या करितां दारनादार पाहून घेणें तें घ्यावें व त्यानींहा बोलावें असें असोन जूज कारभारावरून इतकें दररोज लावावेंसें नाहीं थोडे बहुतांनीं कजिया चुकेल तर चुकवणें माणसें इकडील मेला व जखमी जाली याजप्रमाणें तिकडीलही मेलीं व जायां जालीं असतील त्याचा मजकूर नाहा, परंतु घोडीं गेला मेलीं असतील तीं यावीं येणेंप्रमाणें होऊन अमल करार वाके चालवीत असिलियास कजिया वारून टाकणें वर्तमान वरच्यावरी लिहीत जाण जाणिजे छ ८ जमादिलोवल सु॥ सीत आर्बे मया व अलफ बहुत काय लिहिणे अगर मामलतीवरून कजिया जाहाला असेल आणि सालबसाल मालियत चालत आल्या प्रमाणें सुरळीत करून देतील तरी उत्तम आहे कजिया वाढवू नये याप्रमाणें करावें तरि तुम्ही काय त्याशीं बोलतां व ते काय कोठपर्यंत बोलतात, व कोणत्या गोष्टी [ वर ] अट येऊन पडते तें वरचेवर वर्तमान लिहीत जाणें जाणिजे बहुत काय लिहिणें हे विनंती ऽ

---

* बापूजी व बाजी भिवराव हे रेटरेकर यांचें घराणें पेशव्यांचे ऋणानुबंधी होय

ऽ ले ४५ पहा १ किरकोळ, अल्प

ले ४७ }
[ ७९ ]}

{ श १६६७ ज्येष्ठ शु० १४
{ ता। २-६-१७४५

श्री

तीर्थरूप राजश्री नाना स्वामींचे सेवेशीं

आपत्ये सदोबानें साष्टांग नमस्कार विनती उपरि येथील कुशल ता। छ १२* जमादिलोवल मुक्काम पुणें स्वामींच्या आशीर्वादें करून यथास्थित असें विशेष—स्वामी कोठ आहेत, माघारे फिरले न फिरले, कोणे जागा आले, हें काहींच वर्तमान कळत नाहीं, तरि स्वामानीं सविस्तर वर्तमान वरच्यावरि ल्याहावयास आज्ञा केली पाहिजे इकडील वर्तमान तर आम्ही राजश्री+——स्वामींचा निरोप छ ३ जमादिलोवलीं घेऊन पुण्यास आलों स्वामींस वर्तमान कळावें यास्तव लिहिलं असे राजश्री बाबूजी नाईक यास राजश्री स्वामींनी कर्नाटकाचा मामला मुक्कासा सांगून गौरव केला तो अर्थ विस्तारें स्वामींस लिहिलाच आहे, त्याजवरून विदित होईल राजश्री आबाजी नाईक राजश्री स्वामाच्या दर्शनास गेले होते त्यास छ ५ जमादिलोवलीं राजश्री स्वामींनीं निरोप दिल्हा वस्त्रें १ मदील, १ महमुदीचा झगा, १ चादर मोराची १ पदक हत्तीचा मजुरा दिल्हा

येणें बहुमान करून आबुराव किताब देऊन निरोप दिल्हा स्वामींस कळावें यास्तव लिहिले असे बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनती

---

ले ४८ }
[ ४६ ]}

{ श १६६७ श्रावण शु॥९
{ ता॥ २- ७ १७४५ पूर्वींचे

श्री

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना ऐशी जे स्वामींनीं चिठ्ठी पाठविली तेथें कित्येक खेदयुक्त पर्याय लिहिला, तो कळला ऐशियास आम्हा स्वामींचा लेंकरें आम्हास इतके पर्याय स्वामानीं लिहावे हे काय आहे ? आम्ही स्वामी खेरीज आहों असे नाहीं जशी आमची निष्ठा पायाशी असेल तदनुरूप फल पत्रीं काय ल्याहावें ? हे विज्ञापना

---

* हें पत्र भेलशाचे स्वारींत नानासाहेबास लिहिलें आहे ही स्वारा ता। २०-११ १७४४ पासून ता। १-८-१७४५ पर्यंत झाली

+राजाचें नाव अदबे खातर न घालतां 'राजश्री' शब्दापुढे कोरी जागा टाकून पुढें 'स्वामा' वगैरे बहुमानदर्शक शब्द लिहिण्याचा वहिवाट असे

ले ४९ }
[ ८१ ] }

{श १६६७ चैत्र शु ११
{ता २३-१२-१७४५

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी बाजाराव स्वामी गोसावी यासि पोष्य सदाशिव चिमणाजी नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत जाणें विशेष तुम्ही निरोप घेऊन गेला तेव्हां राजश्री त्र्यंबकराव याजकडील स्वार पथक तुम्हाबरोबर पाठवितों म्हणोन सांगितलें व त्याजवरून मशारनिल्हेकडील कारकुनासही आज्ञा केली ते तुम्हाकडे आले त्याणी तुम्हांस खर्चावेचाचा मजकूर पुसला त्यास तुम्हीं त्याजपाशीं साफ बोलला कीं, " श्रीमंत राजश्री नाना स्वामी याणीं काहा आपल्यास द्यावयाची बेगमी केली नाहीं आपण कोठून द्यावें ? तरि श्रीमंत राजश्री भाऊ यांजपाशीं जाऊन आपली रोजमरीयाची बेगमी करून घेणें " त्याजवरून मारनिल्हेचे कारकून येथें आले कीं, " आपल्यास खर्चावेचास देत नाहीं याप्रमाणें बोलतात तरि त्याजबरोबर जाऊन पोटास काय करावें ? आणि जावयासही मागें पुढें घेतात " त्यास तुम्ही सरकारचें निशाण व हत्ती बरोबर घेऊन जातां फौज अलबता हजार बाराशें असली पाहिजे केवळ हत्ती आणि चार तट्टें आपण जाईन म्हटल्यास कैसें बनतें ? ह्यांमध्यें राजश्री राणोजी शिंदे* लांबले तेथ पर्यंत तुम्ही जा[ ल ] तापर्यंत बरोबर फौजही पाहिजे, व जे फौज येईल त्यास काहीं पोटासही दिल्हें पाहिजे विना दिल्याघेतल्याबगर सरदारी कैशी चालते ? व बोज कैसा राहतो ? हा अर्थ तो सर्वही तुम्हांस ठावकाच आहे हें जाणून राजश्री त्रिंबकराव विश्वनाथ याजपाशीं तुम्ही बोलला होता कीं, " श्रीमंत राजश्री नाना स्वामींनीं तों कांहीं खर्चावेचाची बेगमी केली नाहीं भाऊ जवळ मागावें तरी त्यांस काहा लिहिलें नाहीं ऐसें असता हे कांहीं देतात ऐसें नाहीं सरदारी तो चालली पाहिजे. याजकारितां श्रीमंताचे नावावर व सरदारीवरी पाच हजार रुपयेपर्यंत घेऊन रोखा लिहून दिल्हा घेऊन जातों पुढें देणार खावंद आहेत " ऐसें बोल्ले असता मारनिल्हेकडील कारकुनास साफ जाब दिल्हा हें कैसें कार्यास येतें ? या उपरी मारनिल्हेस पाठवावें तरि ते जात नाहींत तरी मशारनिल्हेचे राऊत तुम्हांबरोबर पाहिजेत व यास राजश्री रामचंद्र बावापर्यंत जा[ ल ] तों, थोडें बहुत खर्चा[ स ] देऊन घेऊन जावें लागतें तरि या पत्राचें उत्तर जलदीनें पाठवावें कीं, मशारनिल्हेकडील राऊत पाठऊन द्यावे त्यास थोडें बहुत खर्चास देऊन घेऊन जातों, या प्रकारचें उत्तर जलदीनें पाठऊन द्यावें म्हणजे तेंच पत्र बजिन्नस त्यास दाखऊन त्याजला तुम्हाकडे रवाना करितों साराश बाकी सरदारीचा बोझ उचलल्याखेरीज भारीपणा कैसा पडतो ? केवळ आंगावेगळेंच टाकलें तरी सरदारीचा आबही राहिला पाहिजे हा अर्थ सर्व तुम्ही जाणतां लिहिणें काय आहे ? तरी या पत्राचें उत्तर जलदीनें पाठऊन द्यावें दिरंग न लावावा रा छ १०× जिल्हेज बहुत काय लि–हिणें हे विनंती

---

* राणोजी सिंदे ता १९-७-१७४५ रोजीं निवर्तला त्या पूर्वीचें पत्र असलें पाहिजे

× ले० ५६ पहा

ले ५० [९९]

श १६६८ वै शु ६ ता १०-४-१७४६

श्री

राजश्री मल्हारजी होळकर व राजश्री जयाजी शिंदे गोसावी यासी

अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नो बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद सु॥ सीत आर्बेन मया व अल्फ राजश्री अर्जुनासिंग राजे हे बगाल्याचे सालीं हुजूर आले त्या तागायत हुजूरच आहेत त्यास हे हुजूर आल्या आगोदर याजकडे जागा होती ते जागा राजश्री सभासिंग याणीं हे हुजूर आल यास्तव झुजून घेतली याचा कुवर तेथें कामास आला याप्रमाणें नाश जाहला त्यास हे हुजूर आले होते कीं, पुढें काहीं राज्य आपल्या जिमे करून घ्यावें, श्रम करावे, साहस करावें, कृपा सपादून घ्यावी ऐसें असता हे उमेद एकीकडेच राहोन यांची जागा होती ती जाऊन रहावयास स्थल नाहीं ऐसें जालें, आणि त्यांणीं तो एकनिष्ठा धरून बसले आहेत ऐशास आमच्या विचारें ऐसें आहे जे, याणीं आपल्या बऱ्याकारणें कश्यप* धरला, चार वर्षें जहालीं आणि याची दाद न लागे तेव्हा ही गोष्ट योग्य नाहीं हें जाणून निकाल या प्रकारचा काढला आहे जे, हे हुजूर फिर्याद आले होते, त्या आगोदर याजकडे गाव गव्या ज्याप्रमाणें चालत आले आहेत त्याप्रमाणें चालवावें अधिकही कांहीं देऊ नये, त्यांत उणे करू नये ये विशीं यदा सभासिंग याजकडील तह सरकारचा होणें तो जहालियावरी सदर्हू प्रमाणें याची जागा यास द्यावयाचा करार करून याचे जिमे करावी जाजती उपसर्ग लागों न द्यावा याप्रमाणें खामखा करावें कदाचित बुंधेले म्हणतील कीं, याची पुरातन जागा काहीं नाहीं, ऐसे असतां काय म्हणून ते जागा द्यावी। तरि हे पुरातन आहेत म्हणोन द्यावा ऐसें नाहीं हे सरकारात आले त्या आगोदर याजकडे जागा होती, त्यापासून याजकडे चालत नाहीं कजिया करितात यास्तव हुजूर फिर्याद आल्या आगोदर याजकडे होती त्याजप्रमाणें याजकडे चालों देत तें करणें या उपरी याचें काम लावणीवर न घालणें हे बहुत येथें हैराण जहाले आहेत व यांची हैराण गत दूर होणें तें करणें जाणिजे छ २९ रविलोवल बहुत काय लिहिणें

लेखन सीमा

---

ले ५१ [६९]

श १६६८ ज्ये व ३० ता ७-६-१७४६

श्री

राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावी यांसी

छ अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नो बाळाजीराव प्रधान आशीर्वाद सुरूसन

* कच्छप म्ह० कांव

सबा आर्बेन मया व अलफ तुम्ही पत्र छ २४ रबिलाखरचे पाठविल तें छ २४ जमादिलो वलीं प्राविष्ट झालें जैतपुरास राजश्री जयापा अगोदर येऊन मोर्चे दिले मागून आम्ही आलों बुंधेलियानीं जैतपुरास सामान बरें विपुल ठेविले होतें तोफा, जेजाला व बरन्दाज दारुगोळा व बाजे सामान बहुत होतें रेवणींतून हमेशा झुजत आपलेकडाल हजार माणोस मेले चार हजार जखमी जाले तथापि सुरग चालून दोन सुरग उडविले, काहीं भिंताड पडलें तेणें करून गावकरी कौलास येऊन अजीच किल्ला फत्ते केला म्हणोन विस्तारें लिहिलें तें श्रवण होऊन सतोष जहाला जैतपूर बांकी* जागा व लढाऊ सामान बहुत, दारुगोळा विपुल असता तुम्ही व बाजे सरदारांना व लोकानीं श्रम साहस करून जागा फत्ते केली शाबास तुमची व शाबास लोकाची मोठी गोष्ट जहाली जैतपूर लहान सामान्य जागा न हती जर हस्तगत न होतें तरि बदनक्षास कारण होतें तुम्हासारखे उमदे सरदार इसे पडल्यावर जैतपूर काय आहे ? किंबहुना याहूनही बाकी बिकट जागा असल्यास हस्तगत कराल या उपरिही तिकडाल नवल विशेष व कर्तव्य मनसुबा उल्लेख पुर सर लिहीत जाणें जाणिजे छ २८ जमादिलोवल बहुत काय लिहिणे, पै।। व जा-पासुन स्वामीन (?) पै।। छ शाबान मु।। गहबरा पै।। सेवढा

(शिक्का)

(लेखन सीमा)

---

ले ५२ [७४]

श १६६९ आषाढ शु १
ता ८-६-१७४६

श्री

राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावी यासी—

छ अखडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—स्नो बाळाजी बाजीराव प्रधान अशीर्वाद सु।। सबा आर्बेन मया व अलफ तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें बुंधेलियानीं बदमामली केली तहरहावर गोष्ट पडून बेरीज ठहरली वोला काहीं दिल्या कुवर वोलेस यावे इतकी बाकी असता उभयता राजे पळून गेले कालिंजर व अजेगडास गेले बुंधेलियाचा मोठा गुबर होता तो त्याचा त्यांणीं गमाविला अत पर जें करणें तें नेट धरूनच करावें लागेल स्वामींच्या पुण्यप्रतापकरून उत्तम होईल, म्हणोन लिहिलें तें कळलें ऐसास तुम्ही श्रमसाहस कर्तव्य तें केलें, व बुंधेली याचा बचाव करून दारमदार केला असतां त्याचे दुरादृष्ट, दुर्बुद्धे तदनुरूप याचे मनात येऊन पळून गेले, येणेंकरून सर्व गोष्टीनें खराब तेच जहाले तुम्ही कर्तव्य तें करालच व केलेंच पाहिजे असो, येविशींचे कितेक पर्याय राजश्री रामचद्रबाबांच्या पत्रीं लिहिलें आहेत त्यांजवरून कळेल आपल्याकडील सदैव वर्तमान लिहीत जाणें जाणिजे छ २९ जमादिलावल बहुत काय लिहिणें पै।। छ ७ साबान मु।। गहबरा पेाा सेवढा

(शिक्का)

(लेखन सीमा)

---

* सरदार-शिंदे व होळकर

ले ५३
[६२]

श १६६८ श्रावण शुद्ध ११
ता १७-७-१७४६

श्री

राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावी यासी—

छ अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नो बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद सुा सबा आर्बैन मया व अलफ तुम्ही फौजसुद्धा बुंदेलियावरि कालिंजराकडे गेलिया आलीकडे कांहीं वर्तमान अवगत होत नाहा पत्रही येत नाहा तरि प्रस्तुत तुम्ही कोण्हे जागा आहा, काय मनसुबा योजिला आहे झुधेलियानें सुप्रवृत्त होऊन तुमच्या मनोदयानुरूप मामलियत विल्हेस लाऊन टाकली कीं नाहीं ? यां, तह करू नये झुजावेंच,ह्याच त्यानीं विचार चित्तात आणिला आहे ? पुढें तुम्ही काय कैसें करावयाचें केलें आहे ते सर्व वरचेवरी लिहिणें इकडील कांही नवीन लिहिजेसें नाहीं अद्यापि सातारियासच आहों, पुढें होईल वर्तमान ते लिहिले जाईल जाणिजे छ ९ रज्जब बहुत काय लिहिणें




पै॥ छ ३ रमजान

लेखन
सीमा

ले ५४
[८२]

श १६६८ भाद्रपद वद्य ९
ता २९।८।१७४६

॥ श्री ॥ छ २२ साबान

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना व राजश्री भाऊ स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि राजश्री फत्तेसिंग बावा यांणीं सांगितलेयाप्रमाणें स्वामीस लेहून पाठविलें त्याचें उत्तर स्वामींनीं लिहिलें त्यात मजकूर कीं, रघोजी बावांस कर्नाटक होतें कीं काय ? हा अर्थ स्पष्ट उघडला पाहिजे दुसरे बावांनीं तमाम सरदार सरजामी फौज जमा करावी कर्नाटकांत पाय पडला तरि घालावा न पडे तरि वराड देवगडाकडे जावें गेले तरी चालेल परतु हिम्मत जाली पाहिजे व निरोपहि घ्यावा आपण खामखा यावा बाहेर निघावें आम्हीही फौजेचें साहित्य करू कर्ज मात्र आम्हास द्यावयास अनुकूल पडणार नाहीं बावानीं उत्पात केला तरी कर्नाटक यास होईल कीं काय हा शोध बावानीं थोरले वाडियात चालून पहावा म्हणून लिहिलें ऐशियास फत्तेसिंग बावाचा कारभार आहे,तो स्वामी जाणतात त्याचें सर्व साहित्य मनसुब्याचें आपण केलें पाहिजे पैका कर्ज द्यावयास मात्र मिळणार नाहीं तरी तेवढी गोष्ट नसो, परतु वरकड तरी सर्व जालें पाहिजे सरजामी फौज ते मेळवितील आपली ही मातबर फौज समागमे व मनसबा आपणास करावा लागतो,* याचा स्पष्ट भाव त्या.शीं बोलला पाहिजे तेव्हां ते उद्योगास लागतील ऐशीयास त्यास सरदारी

---

* थोरले वाडियात= थोरली राणी सकवारबाईकडे १ किंवा २ जरूर, निश्चित

करणें आणि आम्ही होऊन उत्पात कां करावा ? त्याची त्यास दरकार आहे कीं नाहीं ? असें स्वामी म्हणतील तरा त्याची त्यांस आवश्यकता असावी [हें] उचितच, परतु त्यांस घरीं राहिल्यानें काय सुख नाहा ते बाहेर निघोन हैराण व्हावे ? मशारनिल्हेनीं स्वामींचा अविलब धरिल्यास तीन वर्षें जालीं, परतु फलादेश काहीं उत्कर्ष करून जाला नाहीं हें त्याचें टेपर स्वामावर आहेच दुसरें, हे लगामी असल्यास कित्येक गोष्टी उपयोगास पडतात बाहेर काढिल्याने त्याचें टेपर दूर होऊन त्यांत आपलाही कार्यभाग असे डौल चित्तात आणून बाहेर निघण्याविशीं उत्तेजन देऊन करावे त्यास येविशीं स्पष्ट स्वामींचा भाव कळला पाहिजे तेव्हां त्याशीं बोलावें अथवा त्याणें विचारल्यास अव्वल जाब करावा कर्नाटक रघोजी-बावास होते न होते, याचा अर्थ पेशजी चोपदारास मोघम लिहिलाच आहे अद्यापि काहीं चर्चा नाहीं परतु राजश्रीचा भाव आबाजी नाईक यास पुढें करून रघोजीस आत घालावा असा आहे हाच घडिल्यास फत्तेसिंगबावासही त्यामध्यें मिळावयास उत्पात केलाच पाहिजे न करीत तरी आम्ही करावा काय निमित्य कीं, बाबूजी नाईक व आबाजी नाईक याच्याशीं खरी का व्या [?] लागावयाची बाकी राहिलीच नाहीं आबाजी नाईक जाले तरी काय ? वाडियातील वगैरे पेच पडतील, व आपण वाढविला त्याचे बरे कसें चालावें या अर्थें मात्र आबाजी नाईक यास पुढें करणें नाहीं तर रघोजी बावांचेच स्वाधीन, असें जालियास कर्नाटक त्यांचे घरास जाऊ देणे उचित नाहा यास्तव जरूर पाय धरून वोढावे येविशीं स्वामींची आज्ञा काय ? तिसरें फत्तेसिंग बावानीं थोरले वाडयातील मर्जी कर्नाटक होतें न होतें हे पहावी ऐशी आज्ञा स्वामींची तरि थोरले बाईचें कर्ज नाइ-कांकडे आहे त्याचा निकाल तीं आधीं पुसताल दुसरें राजश्रींचे देणें याचा विचार जाला पाहिजे जे कर्नाटकाचा कारभार जालियास दिवाणात ऐवज देणें पडेल तो फत्तेसिंगबावा स्वामींस द्यावा म्हणतील हा एक पक्ष दुसरें कदाचित् बाईनीं म्हटले कीं, आबाजी नाईकास पुढें करून राजश्री दुसरे साहिल्यास देणार तरी नाईक माझे अगत्यवादाचा, मी कर्ज दिल्हे आहे तें मामल्यावरीच दिल्हें आहे, तेव्हां मामलाही माझाच आहे आबाजी नाईकास समागमें घेऊन तुम्हींच करावें म्हणजे दोन्हीही पक्ष मजकडेच लागले रघोजी धाकटे बाईचे पक्षींचा, त्यासही तोंडघशी दिल्हें असें बोलली तरी याचा विचार काय करावा आणि जरी बाईसीं लाघावळ लाऊन काहीं आशा दर्शविली व राजश्री धाकटे बाईचे अगत्यवादामुळें रघोजीस कर्नाटक सागणार असें बोलल्यास, आबाजी नाईक यांस राखून तुम्ही करा असें बाई बोल तीलसें वाटतें यास्तव सुचला विचार स्वामींस लिहिला आहे तरी तींहीं पर्यायाचे स्फूर्दरूप समर्पक सालजाब पाठवावयास आज्ञा करावी त्रिचनापल्ली बाबत सन सीतचे ऐवजाचा हिशेब वगैरे याची पुरवणी आलाहिदा लिहिली आहे त्याचेंही उत्तर सादर करावें विदित जाहालें पा सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले ५५ }
[७३] }

{ श १६६८ कार्तिक व ३
{ ता २१-१०-१७४६

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रामचद्र बावा स्वामी गोसावी यांसी—

पोष्य बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनती उपरि येथाल कुशळ जाणोन स्वकीय कुशळ लिहीत जाणें विशेष—दरबारचा मजकूर विस्तारें सरदारास× लिहिला त्याजवरून कळेल आमचा गुता आजपर्यंत दरबारीं व्हावयास कारण काय म्हणाल, तर राजश्री स्वामींचें सरकार कर्जदार झालें व महालचे खर्च आनिवार नित्य कथळे, यास्तव राजश्री स्वामींनीं आपले कारभारी यास ताकीद करून बदोबस्त करितात घरच्याच कारभारांत राजश्री स्वामी दग आहेत त्याहीं होऊन आम्हास निरोप द्यावा तर आपले कारभारांत गिरीफदार आम्हीं विनती करावी तर त्याची मर्जी दीक पाहून आज पावेतों चर्चा न केली राहात राहात गोष्ट राहिली आम्ही निरोपाच्या विचारात आहों राजश्री स्वामींची मर्जी पाहून निरोप घेऊन, परतु (?) यश येणें आमचें तिरूडे होतें असा विचार नाहीं निरोपासच किती दिवस लागतील तें नकळे निरोप होऊन पुणियास आलियावर कोंकणचा वगैरे कारभार करणें लागेल तुम्हांस कळावें याजकरिता लिहिलें असे छ १६ सव्वाल बहुत काय लिहिणें हे विनती

---

लें० ५६ }
[ ९७ ] }

{ श १६६८ कार्तिक वद्य ४
{ ता २२-१०-१७४६

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रामचद्र बावा स्वामी गोसावी यासि —

पोष्य बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहिणें विशेष किल्ले कन्हारा हा दतीयेकरानीं पैगाम करून घेतला, आणि झाशी प्रांतीं उपसर्ग करीन आहेत, सरकारची बाकी येणें ते देत नाहींत, मवाशी मनमानें तैसी करितात, म्हणोन राजश्री नारो शकर याणी लिहिले, त्यास येविशीं त्यांणीं तुम्हांसही लिहिणें तें लिहिलेंच असेल तुम्हीही या गोष्टीची पैरवी चित्तात उचित कर्तव्य ते आणलीच असाल त्यास यदा दतीयेकरानीं दो चौं प्रकारें लबाडीच केली विना त्यास वोडसेकरासारखाच नतीजा दिल्या खेरीज हलखुद राहोन सरकारचा अमल सुरळीत देतात ऐसें नाहीं ऐशियास मानिल्हेची मदत फौज पाठवून केली पाहिजे, कीं दहशतीनेंच कन्हान्हा सोडीत आणि आपले जागां जाऊन सरकारी अमल सुरळीत चालतात याजकरितां येथूनही मीरखान वगैरे मारनिल्हेचे ताबिर्यांतील पथकें आहेत त्यास ताकीदपत्रें लिहिलीं आहेत व त्या प्रांतीं इज-

---

× शिंदे-होळकर

तखान वगैरे आहेत त्यास ताकीद करून फौजसुद्धा मार निळेकडे पाठवणें म्हणजे फौजेच्या दबाबानें जे काम होणें ते होईल मुलकात फितुर होणार नाहा यद्यपि दतीयेकर कन्हान्हा धरून बसलेच तरी काय मुजाका आहे ? फौज त्या प्रातीं फिरू लागलियावरि त्याचा आटा बद करील ऐसा प्रकार आहे तरि जें करणें तें विचारें यांची पैरवी करून सुरळीत होय तें करणें र॥ छ १७ सवाल बहुत काय लिहिणें हे विनती

---

लें० ५७ [ ५१ ] | श १६६८ कार्तिक व ६ ता। २४-१०-१७४६

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रामचद्र बावा स्वामी गोसावी यास—

पो॥ बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशळ लिहीत जावें विशेष राजश्री अर्जुनसिंग राजे याची जागा बुंधेलियांनीं जबरदस्तीनें घेतली हे पदरीं पडले, याची स्थापना करावयाचें आमचे वचन गुतलें आहे, तरी तुम्ही याचा आगत्यवाद धरून याची जुनी जागा बुंधेलियांनीं घेतली तेथें यांची स्थापना करून जागा यांचे हवालीं करावयाचा प्रकार राजश्री अमृतराव शकर यास सागितला आहे हे सागतील तदनुरूप जुने जाग्यावर स्थापना करून सर्व प्रकारें चालवणे साराश आम्ही बगालियास गेलों ते सालीं बुंधेलियानीं याजपासून जागा घेतली ते यांची याचे हवालीं करणें जाणीजे छ १९ सवाल बहुत काय लिहिणें हे विनतीं — *

---

लें० ५८ [ ९५ ] | श १६६८ कार्तिक व १० ता। २८-१०-१७४६

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रामचद्र बावा स्वामी गोसावी यासि—

पोष्य बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहिणें विशेष –राजश्री राजे अर्जुनसिंग धधेरे याचे वडील लेक बुंधेलियांस मिळोन याचे कनिष्ठ पुत्राशीं झुज केलें दोन तीन महिने लढाई जाहाली नाइलाज देखोन यांचे कनिष्ठ पुत्रानीं जोहार करून आपण कटून? मेला मग बुंधेलियाचे आसरियानें यांचे वडील पुत्रांनीं घेतलें भेलशाचे स्वारीस अर्जुनसिंग याचे ज्येष्ठ पुत्रानीं भेटीस यावयाचें व नजर कबूल करावयाचें राजकारण लाविलें त्यास आम्ही उत्तर केलें कीं, “ अर्जुनसिंग आमचे पदरचे जागे × याचे तुम्हीं भेटीस येणें व नजर कबूल करणें ते आधीं अर्जुनसिंग यास भेटणें, ते आम्हांस आणून भेटवितील, उपरातिक नजर करार करू ” म्हणोन उत्तर केलें त्यास ते सालीं भेटीस न आले हल्लीं तुम्हाशीं भेटीचा पैगाम करतील, व नजर नियाज

---

* लें० ४९, ५७ पहा × मुलूख यांचा आहे

कबूल करतील अगर कबूल केली असली तरी तुम्हीं कबूल न करणें अर्जुनसिंगाचे हातून येऊन भेटतील, जागे खालीं करून याचे हवालीं करतील, तरि भेट घेणें अर्जुनसिंग पदरचे याची स्थापना करू ऐसें आमचे वचन गुतलें आहे याजवरि दृष्टि देऊन याची स्थापना करणें याचा लेक ज्येष्ठ फदफिरिंदाची गोष्ट सांगेल त्याजवरि सर्वथा न जाणें जाणिजे छ २३ सवाल बहुत काय लिहिणें हे विनंती *

---

लें० ५९ }
[ ६७ ] }

{ श १६६८ पौष व १
{ ता १६-१२-१७४६

श्री

पु॥ राजश्री रामचद्र बावा स्वामी गोसावी यासि—

विनंती उपरि दरबारचे वर्तमान व राजश्री श्रीपतरावें निवर्तलियाचा अर्थ पहिला तुम्हास लिहिलाच आहे आलीकडील वर्तमान तर श्रीपतराव याचे बधु राजश्री जगजीवनराव परशराम याजवरि राजश्री—स्वामींनीं कृपा करून छ १४ जिल्हेजीं पौष शुद्ध प्रतिपदेस प्रतिनिधीपद दिल्हें वस्त्रें व हत्ती, बहुमान दिला वरकडही त्याचे समागमीं मुतालीक व राजश्री कृष्णाजी परशराम यांचे पुत्र दोघे यासही वस्त्रें [ दिलीं ] राजश्री उदाजी चव्हाण येथेंच आहेत अद्याप काहीं बोलीचाली नाहीं पुढें होईल वर्तमान तें लिहिलें जाईल साराश उभयता महालचें+ अती प्राबल्य जहाले आहे याचा विस्तार कोठवरी ल्याहावा ? आम्ही युक्ति करून रेटणे तें रेटितों काहीं आइकावें लागतें काहीं करून देतों म्हणतों या रीतीनें येथील विचार आहे राजश्री रघोजी भोसले वराडांतून माहूर प्रातें आले त्यांच्या चित्तांत आमच्या मुलकात घासदाणे घ्यावे ऐसा विचार आहे जागाजागाहून महालकरी यांचीं पत्रें येतात मशारनिले तों स्नेहयुक्ति भावभक्तीचीं पत्रें पाठवितात तथापि त्याचा प्रकार कपटी आहे तो तुम्ही जाणतच आहां आम्हीही कागदींपत्रीं स्नेहयुक्तच लिहीत असतों पुढें होईल वर्तमान तें लिहिलें जाईल येथें येणार ऐसेंही वर्तमान आहे हे विनंती ×

---

ले ६० }
[ ७७ ] }

{ श १६६८ फाल्गुन व ८
{ ता २१-२-१७४७

श्री

पु॥ राजश्री रामचद्र बावा स्वामी गोसावी यासि विनंती उपरि बाबूजी नाईक

---

* लें० ४९, ५७ पहा १ मृ २५ ११ १७४६ २ वद्य पाहिजे

+ महाल = राजस्त्रिया, सक्वारबाई मोठी शिर्क्यांकडची व सगुणाबाई धाकटी मोहित्यांकडची

× हें पत्र नानासाहेबानें लिहिलें आहे यावेळीं शाहूमहाराज फार आजारी झाले होते

यांणीं कर्नाटक प्रांतीं न जावे गेले तरि बुडाऊन काढावे याजकरितां चिरंजीवांची× रवानगी कर्नाटक प्रांतीं केली त्याचा मजकूर विस्तारें लिहिलाच आहे प्रस्तुत नाईक यांणीं राजश्री—स्वामींस दोन लाख रुपये रोख द्यावे ऐसें केलें होतें ते रोख निशा केली बाकी राहिले ऐवजाचे हस्ते करून याद राजश्री येसाजी भोसले याजपाशीं दिल्ही व बेदनूरचा साडेतीन लक्षाचा क्तबा होता तो मारनिल्हे जवळ देऊन निरोप घेऊन गेले पुढें + नबाबास भेटून नबाब म्हणतील ते द्यावें आणि तेवटियावरि ठाकुरकीऽ वाढवून कर्नाटक प्रांतीं जावें ऐसें आहे नबाबाचा विचार पाहता दोही दगडीवर हात आहेत नाईकाची प्रतीक्षा करीत आहेत व आमची फौज सोंदें बिदनुर प्रांतें गेली आहे, यासही पैका न मिळावा याही उद्योगात आहेत श्री इच्छेनें इतकियाहा गोष्टीचें निराकरण होऊन उत्तमच होईल कांहीं फिकीर आहे ऐसें नाहीं तुम्हास वर्तमान कळावें म्हणोन लिहिलें असे पुढें ही होईल तें लिहिलें जाईल रा। या मनसब्याचे मजकूर किरकोळ किरकोळ फार आहेत पत्रीं काय ल्याहावे श्री कृपनें दर्शनोत्तर कळतील छ २२ सफर हे विनती *

---

ले ६१ [७८]

श १६६८ फाल्गुन व ९
ता। २२-२-१७४७

॥ श्री ॥

पु॥ राजश्री रामचंद्र बावा स्वामी गोसावी यांसि—विनती उपरि चिरंजीव राजश्री भाऊ निरोप घेऊन गेलियावरि कितूर म्हणोन ठाणें गिराशियानें राजश्री नारायणराव घोरपडे यांचें होतें तें बळाविलें म्हणोन घेउन दिल्हे .पुढें मजल दरमजल सोंधियाचे लतियात गेले आहेत सावनूरकरांचा तहरह होणें तें होत आहे अद्यापि चुकला नाहा सोंधेकरीयाची दररदबदल लागली असे बिदनुरास वकील गेले आहेत फिरंगीयावरी दबाव असे जयराम सावत येऊन भेटले आहेत तेही आपले साहित्येच्या गोष्टी बोलतात कीं रेडी वगैरे फिरंगियानें घेतले आहेत त्यास तवी पोहाचाऊन घ्यावी, आपली स्थापना करावी फिरंगी आपली बोली बोलतात कीं सावत आम्ही समजोन घेऊ तुम्ही त्याचा पक्ष न करावा या प्रकारचें वर्तमान आहे पहाता अर्थी फिरंगी बेइमान, त्याचें पारपत्य करावें तरि येसमयीं बनत नाहीं दोन्ही ही अलग अलग राखिले आहेत का कीं, सावनूरचा दारमदार करणें तो करून घेऊन, सोंधेकरांचीही मामलियत चुकऊन बिदनूरकरांकडे जावें तेथील मामलियत विल्हेस लाऊन खबरदार होऊन राखा [हा १] वें सारे पठाण एक्वट करावे नाईक आले तरि त्यांस धुडावून द्यावें ऐसा विचार असे पुढें विचारें होता होईल तें करीतच असों रा॥ छ २३ सफर हे विनंती २

---

× चिरंजीव—सदाशिव चिमणाजी + हे नबाब सावनूरचे ऽ ठाकुरकी=ऐश्वर्य
* ले० ६२ व ६३ पहा
१नाईक—बापूजी नाईक बारामतीकर २ ले ६२ व ६३ पहा

ले ६२ } [ ६८ ] } { श १६६९ वै शु ८ { ता ६-५-१७४७

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री रामचद्रबावा स्वामी गोसावी यासि—

पोष्य बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणें विशेष-तुम्ही पत्रें अधिक शुद्ध त्रयोदशीचीं पाठविलीं तीं छ २९ रबिलाखरीं पढरपुरा पावलीं सर्व वर्तमान कळले, त्यांचीं उत्तरें आलाहिदा पुरवणी पत्रीं लिहिली आहेत त्याजवरून कळेल येथील वर्तमान तरि आम्ही क्षेत्र मजकुरीं आहों या उपरि पुण्यास जाऊ चिरजीव राजश्री भाऊ याजकडील वर्तमान तरि ते सावनूर प्रातीं आहेत सावनूरकराची त्याची भेट होणार उपरातिक तिकडील तालामाला पाहून यावें फार तर पधरा दिवस तिकडे मोडतील नाईक सिरे प्रातीं आहेत नासरजग आरकाट-कडे जाणार तिकडे छावणी करणार पहावें नबाब बाजरानदीचे तारें जात आहेत औरगाबादेस छावणीस जाणार हेंही वर्तमान असे तुम्हास कळावें म्हणोन लिहिलें असे *साव नूरकरांची भाऊची भेट जहाली या उपरि पधरा विसा दिवसां आलीकडे चिरजीव येतील नाईक नासरजगाचे आश्रयाने ते प्रातीं छावणी करून बिदनूर प्रातीं उत्पात करणार व कर तील सांप्रत बरसात जवळ आला काय काय होते तें पहावें छ ६ जमादिलावल हे विनंती

---

ले ६३ } [ ४४२ ] } { श १६७० ज्येष्ठ शु ५ { ता २१-५-१७४८

श्री×

यादी× नबाब निजामन्मुलुख यांणीं नासरजगास उपदेश केला छ ४ जमादिलाखर सन ११६१ हिजरी

१ दक्षणचे सुभेदार सर्व प्रकारें महाराष्ट्र राजाशीं स्नेह राखावा हें उचित महाराष्ट्र दक्षणचे जमीदार आहेत

२ माणसाचे वधास विचार दूरवर करावा दाण्याचा कणसें नाहींत कीं वर्षास नवीन उत्पन्न होतील दड योग्य असेल त्यास काजीकडे हवाला घालावा व धर्मशास्त्राचा भार काजीवर ठेवावा

३ मुशाफरींत वय न्यावें नित्य नवें उदक व नवें स्थल व डेरियाची सावली अनुभ वावी मुशाफरींत लाभ बहुत आहे व मुलखाची उरतवारी होते पर्जन्यकाळीं एके ठिकाणीं रहावें पर्जन्यकाळात प्राणिमात्रास श्रम होतो, वश उच्छेद न व्हावा हें मुख्य कारण समजावें

---

१ बारामतीकर २ निजाम ३ ले ६० ६१, ६२ पहा हेंच पत्र खरे ऐ ले स भाग १ पृ ४ वर आहे * येथून खुद्द नानासो याचे हातचा मजकूर आहे

× येथें बाजूबर दौलतराव शिंदे याचे नावचा शिक्का आहे

४ लोकाचीं कामें आपले अधान आहेत येविषयीं केवळ ईश्वराची कृपा जाणून शास्त्राप्रमाणें आपला स्वधर्म करून दिवस काळीं व मुलकी कामात वाटून मोहेसबा इहलोक व परलोकविषयीं घेत जावा

५ दौलतीचा कायमी महापुरुषाचे कृपेनें असते केवळ बाह्य साहित्यानें निर्वाह नाहीं यास्तव सर्वभावे महापुरुषास शरण असावें

६ आकाश पृथ्वी व विश्व अनादि आहे सर्व भूमंडळास आपलाच विभाग समजून हक्क कोणाचा बुडवू नये

७ दक्षण सहा सुभे आहे पूर्वी दर सुभ्यास पातशहा वेगळा होता औरंगजेबापासून दरोबस्त तालुका एकास होऊ लागला यास्तव वेगळे वेगळे घरानदार माणसें ध्यानांत आणून कामकाज सागत जावे वर्षा दो वर्षा तालुकियाची तगीरी बदली करीत जावी यात विभाग सर्वांस पावता होतो

८ भावाबदाची परिवारीष करीत असावी बाहूबळ व अब्रूचें रक्षण यात आहे बेदिल असल्यास दौलतीस धक्का व फितुर करितात केवळ अन्यायास प्रवर्तल्यास शिक्षाही करावी

९ हलके मनुष्यास दरवाज्यावर उभे राहू न द्यावें सहवास तर बहुत दूर

१० उमदे माणसास हलकें काम व हलके माणसास उमदें काम सहसा न सागावें,

११ दक्षण सुभेदारी वतन नाहीं धनी याची मर्यादा पाळीत जावी विपरीत वर्तणूक जाहालिया ईश्वरापाशीं अन्याय व लोकात दुर्नाम होतें

१२ लढाईस आपणाकडून कदापि उद्योग न करावा आपण बलिष्ठ व शत्रु दुर्बल असें न समजावें भार ईश्वरास पडतो गर्व आवडत नाहीं जेथवर प्रसग न पडे तेथवर प्रयत्न करावा शत्रु अमर्यादेस प्रवर्तलिया हक्क आपला जाणून ईश्वरास साह्य समजून, पराक्रम करावा, भगवान् अवश्य जय करितो

१३ खजिना स्वारीसमागमें जरूर असावा येणेंकडून फौजेची खातरजमा असती व साहुकार मंडळी सरकारचे खजिन्यावर समाधान राखिते व शत्रूचा पराभव होतो

१४ फौजेचा हक्क आपरयावर ठेवीत न जावा आपले फौजेस शत्रूचे फौजेपेक्षां अधिक भीत असावें [१]

---

ले ६४ [३१७]

शके १६७० आषाढ वद्य १४
ता १३-७-१७४८

श्री

पु॥ राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावी यासि

उपरी बंगालियाकडील वर्तमान आलें कीं, राजश्री रघोजी भोसले याची फौज मोह-

---

१ ह्या कागदाचा उतारा नाना फडणीस याच्या स्वदस्तुरचा त्याचे चिरंजाव रावसाहेब फडणीस यांजपाशीं होता त्यावरून आमचे इंदोरकर स्नेही रा० रा० सावळ्याराम माधव यांणीं ही नक्कल करून पाठविली इतिहास संग्रह पेशवे दप्तर पृष्ठ ३१७ येथें हें प्रकरण विस्तृत दिलेलें आहे २ आढावा, हिसेब

बतजगानी कटकपर्यंत पिटोन घातली याचा जोरा पोंचला नाहा राजश्री अमृतराव बिदा होऊन गयेस लष्करात आलियावर सविस्तर लेहून पाठवून म्हणोन लिहिलें तें कललें या उपरि ही तिकडील वर्तमान येईल ते लिहिणें *अमृतराव तुम्हाजवळ आलेच असतील सविस्तर वर्तमान लिहिणें छ २७ रजब बहुत काय लिहिणे लेखनसीमा पौ॥ छ ४ रमजान

---

➡ ६५ } [ ९२ ] } {श १६७० चैत्र ता मार्च स १७४८}

श्री

चिरजीव राजश्री धोंडोबाऽ यासि—सदाशिवऽ चिमणाजी आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणे विशेष वारेचा प्रकार उपस्थित जाला होता तो तीर्थरुपानीं× सोडून तेथें धारेजवळ रा गोविंद हरी[1] यांस ठेवून आपण कोटयाच्या रोखें राणाजीचे सरहद्देस गेले तेथून दिल्लीचा मार्ग समीपच पठाणानाच येऊन लाहोर घेतलें वजीर व मनसूर अलीखान चाळीस कोसावर गेले पठाणाचाच सलाबत यांजवरी होती यास्तव वजिरानीं पादशहास बाहेर निघावयाविशीं लिहिलें होते पादशहा भगेद्रानीं बेथिस्त यास्तव पातशहानीं शहाजादियाचा मरातीब अलमगीर पादशहानीं बहादूरशहा व अजमशास दिल्हा होता त्याप्रमाणें देऊन शहाजादा वजीरासमीप पाठविला लढाई होणें होती पुढें कसकसे जहालें असेल वर्तमान येईल तें लेहून पाठवू येशवतराव पवार औरंगाबादेहून कूच करून गेले त्याचे मागे मागें राघो गोविंदें गेले होते गाठ पडों न देता ते झाडून गेले धारेस गेलेसें वर्तमान आलें आहे नबाब ब-हाणपुरास गेला पुढें जाईलसें दिसत नाहीं सुरतेकडेही जात नाहीं रा गोविंदराव तीर्थरूपाजवळ बोलत होते कीं, नबाब सुरतेस जातो दाभाडियाचे आपण साहित्य करावें तेव्हा निमे गुजराथ द्यावी [ म्हणजे ] साहित्य करू म्हणाले त्यास गोविंदराव आम्हाजवळ बोलिले, लक्ष रुपये रोख चहू पाच पावेतों परगणे जहाले तरी स्वामींनीं मान्य करून साहित्य करावें त्यास आम्ही म्हणालों कीं, पाच लक्ष रोख, पाचा लाखाची जागा द्यावी म्हणोन त्यास मारानिल्हे उमाबाई जवळ बोलले तीं मुलकाची गोष्ट मान्य न करीत पैका देऊ म्हणाली व तीर्थरूपाचें उत्तर तो निमे गुजराथ घेऊ तरीच साहित्य करू म्हणोन आलें जरी नवाब सुरतेकडे जाता तर दाभाडेही बोलते तें होत नाहीं याजकरितां तो प्रसग शिथिल पडला +

---

* अमृत शकर ले ५७ पहा

× नानासाहेबानीं १ पटवर्धन २ ले ४६ पहा ३ निजामुलमुल्क ४ चिटणीस ५ यशवतराव दाभाडे सेनापतीची आई

+ पठाणानीं लाहोर फेब्रुवारी १७४८ मध्यें घेतलें व निजामुल्मुल्क ता २१-५-१७४८ रोजीं ब-हाणपुरास मृत्यु पावला त्या दरम्यानचें हें पत्र पहा ले ६७

ऽ धोंडोपत पुरदरे साताऱ्यास छत्रपतीजवळ, व सदाशिवराव पुण्यास आहे

ले ६८ } { श १६७० चैत्र
[११४] } { मार्च सन १७४८

श्री

आशीर्वाद उपरि राजश्री गोविंदराव आम्हांजवळ बोल्ले कीं, लक्ष रुपये व दो चहू लक्षाचे परगणे दिल्हे म्हणजे साहित्य करावें म्हणोन त्यास आम्ही उत्तर केलें कीं, चार पाच लक्ष रुपये रोख व चार पांच लक्षाचा जागा याप्रमाणें द्यावी तुम्ही ठीक करणें म्हणालों तीर्थरूपांसही लिहिले तेथून उत्तर आलें कीं, ह्या गोष्टी तोंडच्या नाहींत मुलुखगिरी बुडवून नबाबाचा तह मोडा, तेव्हां हें कर्म करावें या गोष्टीस आपलें स्वाहितही पाहिलें पाहिजे निमित्तें गुजरात देतील तर करू म्हणून लिहिलें आहे प्रस्तुत तरी नबाब बरानपुरास आहे सुरतेकडे जात नाहीं याजमुळें दाभाडे बोलत नाहीं, व तर्थि [ रूप ] ही कोट्याचे रोखे गेले यास्तव सर्व प्रकारें मनसुबा शिथिल पडला

---

ले ६७ } { श १६७०
[ ८६ ] } { सन १७४८

॥ श्री ॥

पु॥ राजश्री रामचद्रबावा स्वामी गोसावी यासि—

विनती उपरि सफदरजग यास निमरजाबंद करून आपले लगामीं लावावयाचा विचार केला असे म्हणून लिहिलें तें कळलें ऐशीयास हा विचार उत्तम केला आम्हांसही दिल्लीहून लिहिलें आलें होतें आम्हीही त्यास येविशीं विचारानुरूप लिहिणें तें लिहून त्यास लगामीं लाऊन घ्यावें, त्यांनीं+रकारपूर्वकाचें साह्य न करावें असें करावें,म्हणोन लिहिलें असे तुम्हीही त्यास वरचेवर उचित जाणून लिहीतच असाल व लिहिणें ज्यात आपल्या मनसुबियास व कर्तव्यतेस उचित आणि उपयोगी, परिणाम उत्तम,लोकोत्तर, योग्यतर,लौकिक कीर्तीस्पद तेंच करणें व कराल हा निशा आहे सफदरजग‡ उमदा मनुष्य त्याचा स्नेह हरप्रकारें रक्षण करणें* उचित दुसरें, काशी त्याचे हातीं त्याशीं निखालसता असलिया कालगतीनें काशीचें स्पष्ट दर्शन होणार तो महा लाभ आहे यासाठींही स्नेह रक्षावा दुसरे अत्यंत अर्थाअर्थी सबध नाहीं जाहला अप्रिय भाषण करून विग्रह वाढविणें उचित नव्हे थोडासा तोटा जाहला तरी सोसून स्नेह रक्षणें उचित—असे हे विनती

---

× हें त्रुटिक पत्र सदाशिव चिमणाजीचें धोंडोबा पुरदरे यास, ले ६६ नतर लगेच लिहिलेलें आहे १ निमित्तच सागण्यास पाहिजे म्हणून, असा अर्थ

‡ सफदरजग—हा अयोध्येचा नबाब हा दिल्लीच्या बादशाहाचा वजीर होता ह्याचे व गाजीउद्दीन याचे वाकडें होतें. * येथपासून खुद्द खाशांच्या ( बाळाजी बाजीरावांच्या ) हस्ताक्षरीं मजकूर लिहिला आहे + रघूजी भोसले ले ६८ पहा.

ले ६८ } { श १६७१ आश्विन वद्य १
[ १ ] } { ता।१५।१०।१७४९

श्री

वेदशास्त्रसंपन्न राजश्री वासुदेव दीक्षित[1]

स्वामींचे सेवेशीं

विद्यार्थी बाळाजी बाजीराव नमस्कार विनंति उपरी येथील वर्तमान तागाईत आश्विन वद्य प्रतिपदा पावेतों स्वामींचे कृपेंकरून सुखरूप

सविस्तर अर्थ मी सेवेशी विदित केला होता राजश्री स्वामींचीहा मर्जीच राखून एक जशी आज्ञा केली त्याप्रमाणें मान्य करून पुढे स्वामींचे आशीर्वादें परपार पावू विस्तार ल्याहावा ऐसा काय आहे ? साराश स्वामींचीं लेंकरें आहों आपलेच आशीर्वादें सर्वही उत्तम होईल वरकड लिहिता विस्तारच आहे यास्तव उभयता वेदमूर्ति[2] निवेदन करिता विदित होईल बहुत काय लिहिणें ? हे विनंति

---

ले ६९ } {श १६७१ कार्तिक व २
[ १११ ] } {सन १५-११-१७४९

॥ श्री ॥

विनंती उपरि सुरतेस वकाल गेला त्याजकडील बोलीचालीचा काय मजकूर तो ल्याहावा म्हणून लिहिलें तें कळलें त्यास नारो तुकदेवु तेथें पावल्याचीं पत्रें आलीं परतु त्याची

---

१ हे वो शा रा नारायणभट दीक्षित याचे चिरंजीव नारायण दीक्षित हे मोठे विद्वान् व तपस्वी ब्राह्मण होते त्यास निरनिराळ्या राजपुरुषानीं इनाम दिलें आहे काशींतील ब्राह्मणास सुजाउद्दवला यार्णे मोठ्या सकटात घातलें असता तेथील ब्रह्मवृंदाची सुटका करणारे हेच दीक्षित होत ( पेशव्याची बखर पृ० ७३ पहा ) याशी व त्याच्या वंशजाशीं निरनिराळ्या राजपुरुषाचा पत्रव्यवहार राजप्रकरणींही सुरु असे नारायण दीक्षित हे पुढें काशी येथें श १६७० कार्तिक शु १४ ( २४-१०-१७४८ ) कैलासवासी झाले

याचे वशज श्री० रा० यज्ञेश्वर बाळकृष्ण दीक्षित कायगावकर याजकडून हा पत्र व्यवहार अशत आम्हांस मिळाला आहे ह्याजबद्दल आम्ही त्यांचे मोठे आभारी आहों

२ यावरून हें पत्र दोन ब्राह्मणाबरोबर पाठविलें होतें

३ **राजश्री स्वामी** हे शब्द प्राय तत्कालीन कागदांत छत्रपतींनाच उद्देशून योजीत असत नुसता **स्वामी** असा शब्द असल्यास तो तें पत्र ज्याला लिहिलें असेल त्यालाच अनुलक्षून असे **राजश्री स्वामी** आणि **स्वामी** या दोहोंतलि हा भेद लक्षात ठेविणें अवश्य आहे ४ नारायण दीक्षित तारीख २४-१०-१७४८ रोजीं निवर्तले आणि छत्रपति शाहू महाराज तारीख १५-१२-१७४९ या दिवशीं परलोकवासी झाले या दोन तारखाच्या दरमियानचें हें पत्र असलें पाहिजें असें समजून तारीख ठरविली आहे

बोलीचाली जाहालियाचा मजकूर काहीं लिहिला आला नाहीं त्याहीमध्यें राजश्री स्वामींX दुखणियाचीं वर्तमानें तेथें हजर जालीं असतील याजमुळे मोंगलही बोली सुधी बोलणार नाहीं तालामाला पहातील ऐसे आहे त्यास आलीकडे वर्तमान आलें नाहीं काय वर्तमान लिहिलें येईल ते सेवेशीं लिहून पाठऊ व्यंकटराव मोरेश्वर यांचीं पत्रे आलीं तीं सेवेशीं पाठविलीं असत त्याजवरून वर्तमान कळेल त्याकडील जाजती जासूद मागे पाठविलेच आहेत वरकड रघोजी भोसले यास व सैद शरीफखान यास पत्र पाठवरयाचें लिहिलें आहे ता द्या व या स(?) नाहींत गुप्तरूपें बातमी घेणे तेव्हा पत्रें नेलियास ठीक पडणार नाहीं व राहू ही देणार नाहीं स्वामीचे विचारें पत्रे द्यावीशीं जालियास लेहून पाठवावीं दारको रगनाथ याजपासून तिजाई ग्वालेरची रसद घेऊन हुजूर मामला ठेऊन सनद द्यावी असें लिहिलें होतें परतु तूर्त रसद न घेणें, पुढें लिहून त्या प्रकारें करणे म्हणून लिहिले ऐशीयास स्वामीस सनद कशी द्यावी हे लेहून पाठविलें त्याचे आधींच पैका रसदेचा घेतला होता स्वामींनीं सनद द्यावयाचें लिहिलें त्यावरोन देणार होतो परतु घालमेलीचें वर्तनामुळे दिल्ही नाहीं हल्लीं आज्ञेप्रमाणें सनद देत नाहीं रसद तो घेतलीच आहे पुढे आज्ञा होईल त्याप्रमाणे रसदेचे विल्हे होईल राा छ१५ जिल्हेज बहुत काय लिहिणें हे विनती

---

ले ७० [१७४]

श १६७२ भाद्र०–कार्तिक
सन १७५० सप्टेंबर ते नोव्हेंबर दरम्यान

श्री

चिरंजीव राजमान्य राजश्री* नाना यासि प्रति सदाशिव चिमणाजी आशिर्वाद उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहिणें विशेष तीर्थरूपांकडून पत्रें आलीं त्याचा वगैरे कित्येक अर्थ लिहिणें तो तुम्हास लिहिलाच आहे त्याची उत्तरें अद्यापि कांहीं येत नाहीं, तरि सर्व वर्तमान लिहिणें कर्नाटकच्या मामलियाची राजेश्रींचा पैका वगैरे कामें यमाजी शिवदेव व पाटणकर यांचीं करून पाठवावीं ता अद्यापि येत नाहीं व पैक्याचे गोपाळराव वगैरे यांजकडील कोणाकडून काय येतो तो मजकूर सविस्तर लिहून पाठविणें येथील विचार तर मा च शु रा हून कूच करून भडार कवठें येथें आलों येथें पाच सात मुक्काम होतील पुढें होईल तें वर्तमान लिहिले जाईल मातोश्री आईसाहेब याचा विचार काय ? राजेश्री स्वामींची मर्जी कशी ? वरकड सामादिक कोण कसे आहेत याचा अतर बाह्यता मजकूर लिहिणें तुम्हीं सविस्तर मजकूर पुण्यास लिहित असाल तेथील भाव भक्ति कळत असेल ते लिहिणें येथें तीर्थरूपानीं नायकाची समजावास काढावी, सरजाम घ्यावा,

X राजश्री स्वामी म्हणजे शाहू महाराजपत्र बहुधा रामचंद्रबाबाचें पेशव्यास पहा खरे भा १ सुरत शहरांतील धामधूम

* नाना पुरंदरे नानासाहेब पेशव्यांचे तर्फेचे

पुढें त्यांनीं दाभाडियाचा कारभार उरकायाजोगी फौज गेलचि आहे तें करून आम्हीं जातों तारावाईची गडबड राहिल्यास करनाटकांत पाय घालावा, बाबूजा नाईकानें भीकच मागावी हें बाबाचे मनात व दाभाडे याचाही निकाल करणे त्याचे हजार विचारच होतात यामुळें होत नाहीं तुम्हीं त्या शहावरच दररोज राहणें इकडे आम्हांसच मातबर गुता पडलियास तुमचे तिकडे जाणें कळतच आहे म्हणून लिहिलें होतें नाईकास तीन चार लाख यशवतराव पवाराचा सरजाम व काहीं गुजराथेंत यावें अशी मर्जी आहे आम्ही याप्रमाणेंच करावें असें लिहिलें आहे पवार कांहीं कामाचे नाहींसे दिवसेंदिवस रूप दाखवितात *बाबा दाभाडिया पासून पैका ध्यावयाचा मनसुबा करतात आम्हांसही लिहितात आम्हीं कामाचे नाहीं, न करावें असें लिहिले आहे करू दिलें, आव पुरला, तर जवळील गुत्ता उरकून पुढ जातील नाईकाचे याप्रमाणें तीर्थरूपाचेच विचारेंच आहे करतील आम्हांस मग गुत्ता नाहीं पैका मात्र पाहिजे आठ नव लाख त्यात बाबा तीन देतील वरकड तुम्हांस मी * येईल मजकूर लिहून पाठविणें हे आशिर्वाद

---

ले ७१ [ १८४ ]

श १६७२ मार्ग० पौष
१७५० डिसेंबर

श्री

चिरंजीव राजमान्य राजश्री नाना= यासि सदाशिव चिमणाजी आशीरवाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहिणें विशेष तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें राजश्रींचें लक्ष सर्व प्रकारें आहे तीर्थरूपांचा विचार कळतच आहे याचे कित्येक प्रकारचे पेंच पडणार त्याचा अर्थ राजश्री गोविंदराव यांणीं व तुम्हीं लिहिला तो कळला ऐशियास तुम्हीं लिहिल्या गोष्टी सर्व यथार्थच आहेत त्यास दाभाडियाकडील कारभार निरगमांत न ये मनसुबियास तोड पडेना वगैरे कित्येक पेंच उलगडले पाहिजेत यास्तव मानाजी पायगुडे व हरी राम यांस हजार तीन पावेतों फौजेनिशीं वारणेचें काठीं पाठवून आम्हीं पुणियास गेलों तिकडील मनसुबा लवकर उलगडून बाकी फौज पुढें कर्नाटक प्रांतीं जावयास येता त्यास तुम्हीं सर्व प्रकारें राजश्री स्वामींचें लक्ष आपलेवरि कायम राही ते गोष्ट करणें त्यात अतर पडू न देणें आणि वर्तमान लिहिणें ते पुणियाकडे लिहीत जाणें आम्ही पढरपुरापलीकडे कुरल्याजवळ आलों पाच सहा दिवशीं तीर्थरूपाजवळ पोहोंचतों पैकाही पाठविणें तो पुणियाकडे पाठविणें सातारियाचेंही बड मोडलें पाहिजे मूळ दाभाडे तेथें कांहींच होईना, करीनात, मनासही न ये, सशयच वाढतात यास्तव जाऊन नीट. करून होईल तें लेहून पाठवून दुसरें रविवारचें पत्र पाठविलें तेंही पावलें सर्व कळलें कान्होजी बावाजवळ मातुश्रीचे भाव निघाले व राजश्रीचा निरोप वगैरे सर्व लिहिलें तें कळलें तुम्ही

---

* रामचद्रबाबा ? = पुरदरे

बोलला ऐशियास हा डौल कामाचाच नाहीं मातुश्री नीट सागून राजश्री सोडावे लागतील याचें पुण्याहून लिहून पाठवू त्याप्रमाणें करणें मुख्य राजश्रींचा लगाम पुर्ता राहे तें करणें हें काम तुमचे हातीं आहे जरूर याप्रमाणें करणें मोठी गोष्ट आहे हजारों भातेनें खर्चवेच करून, वरतीं आपला मायेचीं माणसें पाठवून लगाम राखणें वरचेवर सर्वा मुतसदियाचे भाव लिहिणें मजवळ संदेह तुम्हास वाटतो ईश्वरी जुलूम आहे ! असें न करणें सविस्तर लिहिणें हें आशिर्वाद

---

ले ७२ } {पौष श १६७२
[ ३५९ ] } {जानेवारी १७५१

श्री

राजश्री जयाजी शिंदे गोसावी यासि

आशीर्वाद उपरि राजश्री महादोबाशीं आम्हाशीं विमनस्कता तीन वर्षें आहे सातारियापासून विशेष वृद्धि पावली तुमचे पक्षपातामुळें अतिकष्टी होते याजमुळें आम्हास हरएक कामांत मुरदाड करावें याची तजवीज रामचंद्र बावा भाऊकडे राजकारणें पत्रें जात येत असत आम्हापासून हरएक मसलत पुर्ती पायाशुद्ध शेवटास न जावी या भावे भाऊकडेच फौज पाठवावी, आम्हास घरीं बसवून गोविंदरायाचे आज्ञेंत वर्तवावें, उमाबाईस राखावें, ताराबाईसि गोविंदरायाचे मार्फतीनें चढवावें, आम्हावर सर्वांचे हुकूम रहावे, ऐसा विचार दिसोन आला तेव्हां आम्ही भाऊस साफ लिहिलें कीं, जर भाऊ असलेस तर पत्रदर्शनीं येणें दाभाडिया कडील काम चांगलें करू त्यावरून भिडेस पडून आले दाभाडियाकडील काम रगडून आरंभिलें नासरजंग मेला जफती करावी, दहावीस लाख मेळवावे, सरदारेंही बलवावे, हिदायत मोहिदी खानावर जावें, गरमी दाखवून जें मिळेल तें मेळवावें ऐसा विचार आम्हीं केला, याजमुळें बावांनीं बहुत वाईट मानून घरास गेले कोणी म्हणतात कीं ताराबाईकडे जातील परतु ते कुलीन, जुने चाकर, हरामखोरी कधीं करणार नाहींत ऐसें वाटतें कालगत मात्र न कळे असो आम्हाशीं बावाशीं तूट पडली भाऊ अर्धे इकडे अर्धे तिकडे रामचद्र बाबा बाह्यात्कारें आम्हाकडे, अतर्यामीं बहुत गुप्त रीतीनें बावाकडे येथें बाहेर तो सर्वत्र दाखवितात कीं, खावदाची मर्जी तेंच प्रमाण परतु अतर्भाव तुम्ही जाणतच आहां त्रिंबक विनायक कोनेरपत हे केवळ बावांचे ×गगोबाशीं त्याशीं राजकारण पूर्ण येथून मल्हार [ बा ] स लिहितील कीं, खामखां बावांचा पक्षपात करोन आमचे केलें घडावें मल्हारबा भला माणूस येखादे जागां वचनास गुतल्या आम्हांशीं तूट मात्र पडेल आमचे विचारें चाललें तर समजाविशी करावी, चालवावें, ऐसें आमचे मनांत आहेच आतां जहाले तरि बरें न जहालें तरि पुढें हा जो विचार आमचे मनापासून खुलासियानें

---

× गगोबा तात्या चद्रचूड हें सर्व पत्र खाशांच्या हातचें असून सपविलेलें नाहीं.

ठरेल तोच शेवटास न्यावा बागोबानीं त्रिंबक विनायकाचे मार्फतीनें लिहिलें तर साफ जाब करावा कीं, खावंदाशीं आम्ही इरे वाढविणार नाहीं ऐसें साफ बोलावें जें करणें तें आमचे विचारें करावें या मजकुरावर मल्हारबास कायम अगोदर करून ठेवणें असें असतां आम्हांशीं विरुद्ध करतील तर करोत आमची तवकल ईश्वरावर आहे तुमचे भरवासियावर ऐसें केलें

---

ले ७३ } {श १६७२ माघ शु ४
[ १२ ] } {ता २०-१-१७५१

श्री

वेदशास्त्र-संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशीं—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरि येथाल कुशल जाणून स्वकीय लेखन करीत असलें पाहिजे विशेष–काल तुम्ही गेलेस [ त ? ] त्यास तुमची त्यांची बोलाचाली होऊन काय मजकूर जाला हें तुम्हाकडून कांहींच लिहून न आलें यास्तव आजि येथें मुक्काम करून हें पत्र तुम्हास लिहिलें असे, तर त्याचा जाबसाल घेऊन बोली ठीक जाली असली तर तुम्हींच लौकर येणें, अथवा काय मजकूर जाला असेल तो लिहून पाठविणें त्यासारखा विचार केला पाहिजे आजि रात्रौ तुमचें कांहीं तरी लिहिलें यावें परंतु न आलें यास्तव मुक्काम केला आता पत्राचें उत्तर सत्वर पाठविणें बहुत काय लिहिणें हे विनंती

पौ माघ शुद्ध ४ रविवार शके १६७२

---

ले ७४ } {श १६७३ चैत्र शु १५
[ १७२ ] } {ता २०-३-१७५१

॥ श्री ॥

चिरंजीव नाना यांसि भाऊ आशिर्वाद सविस्तर तीर्थरूपांनीं लिहिलें आहे त्याव रून कळेल सारांश तुह्मीं सारे जमा करून काम उत्तमच जाहालें सलाबत वाढली तरी बहुत विचारें हावभरी न होतां सर्व कामें करणें आम्हींही दरमजल जसें वर्तमान येईल तसें फौज घेऊन पुढें येऊन रघोजी बाबास विचारें करून राखिलें पाहिजे ह्यां आणलियां त्याचें काम बुडतें पेंचहीं आहेत ह्मणून निरोप दिला फत्तेसिंगाचे× फौजेंत त्रिंबक हरी+ व दारखोजी पाटील सरदार ते आमचे बदल कदाचित राहिले तरि अक्कलकोटीं राहतील फौज ह्याचें आहे आठ कोस प्रमाणें दर मजल कडबे देशाचा दाणा खात ताजे होत येतों. वरकड तपशील काय लिहावा ? हजार प्रकारें सारे एक होऊन, आपले फौजेचा गाहा चांगला करून, आपण जरब न खातां जें होईल तें करणें पायगुडे वगैरे फौजही सामील जाहलीच आहे रवाना छ १३ जमादिलावल हे आशिर्वाद *

---

× फत्तेसिंग भोसले + त्रिंबक हरी पटवर्धन * ले ७५ चें पत्र पहा १ त्रास, कष्टी

ले ७५ [१६८]

श १६७३ चैत्र व १
ता ३१-३-१७५१

श्री

चिरंजीव राजश्री नाना+ यांसि बाळाजी बाजाराव प्रधान आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जाणें विशेष तुम्हीं पत्र छ २८ रबिलाखरचें पाठविलें तें छ १२ जमादिलोवलीं सांडणीस्वाराहातीं येऊन पावले " गाइक्वाडाचे आपले फौजेचें युद्ध छ २७ रबिलाखरीं झालें *गेंज्या पावेतों मोडून ताराज केले त्याचे बुनगे तिजाई लुटून आणिले उंटें, घोडीं, पालख्या घेतल्या " म्हणोन विस्तारें लिहिलें ते कळलें लेखनार्थ-श्रवणें संतोष झाला, मोठी गोष्ट झाली शाबास तुमची लोकांची! बरी केली! गायक्वाड वेणेवर राहिला तुम्ही कृष्णेवर आहा, म्हणोन साडणीस्वारांनीं सांगितलें त्यास राजेश्री मानाजी पायगुडे व तात्याही तुम्हाजवळ येऊन पावलेच असताल सारे एकदील होऊन गायकवाडास जाऊं न देणें जोर पोंहोंचल्यास लुटून नेस्तनाबूद करणें जों पर्यंत गायकवाड [याचा] वारापाणी झाला नाहीं तों फौज न फोडणें आमचा मोंगलाचा सलूखा झाला इकडील सर्व गुत्ते उरकले आम्ही मजल दरमजल येत असों आणि छ १२ जमादिलावलीं निजाम-कोंब्यावर मुक्काम झाला जलदीनें येतों गायक्वाड जाऊं न पावे तें करणें युद्धप्रसंगीं राजेश्री सोनजी भौस्कर[1] व राजेश्री बापूजी[2] बावा व सरकारचे हुजूरातचे लोक व राजहुजुरातच्या लोकांनीं शर्त केली बापूजी बावास तरवारीची जखम लागली, नागोरा यास गोळीची जखम लागली, म्हणोन [लिहिलें] तर ते थोर थोर मातबर लोक प्रसंगीं असतां का चुकतील[3]? व पुढेंही सर्व प्रकारें त्याचाच भरवसा असे तुम्हीं सर्वांचीं समाधानें करणें मोडली बाजी तुम्हीं सांवरली! जी गोष्ट तुमचे वडिलांचे वडिलास योग्य तें तुम्हीं केले! या उपर बहुत सावधतेनें जरब देणें मळमळीत न करणें आम्ही येऊन पोहोंचतों छ १४ जमादिलावल हे आशीर्वाद

---

+ नाना पुरंदरे—यांस चिरंजीव लिहिण्याचें कारण असें कीं अबाजीपंत पुरंदरे व बाळाजी विश्वनाथ हे आपणास भाऊ भाऊ समजत व हाच घरोबा पेशव्यानीं शेवटपर्यंत पुरंदऱ्यांशीं ठेविला होता तेव्हा नानाकडे धाकटे भावाचें नातें येत असावें याचें नाव त्रिंबक सदाशिव

१ 'भास्कर' आहे तेथें 'भापकर' असें असावें

२ हे बापूजी खंडेराव चिटणीस असावे रामराजाचें चरित्र पहा

३ येथपासून खुद्द खाशाचे हातचा लेख आहे

* गेंज्याचा माळ साताऱ्याजवळ आहे

ले ७६ } {श १६७३ वैशाख शु ८
[ २ ] } {ता २२-४-१७५१

वेदशास्त्रसपन्न राजमान्य राजश्री वासुदेव दीक्षित

स्वामीचे सेवेशी

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनति उपरी येथील कुशळ जाणून स्वकीय लेखन करीत असले पाहिजे विशेष राजश्री **शिवराम गोविंद भिडे** व सखाराम बापूजी नाईक भिडे व नेमीदास अनापत [ ? ] याजकडे सरकारचा ऐवज येणें तो आणावयासि राजश्री पाडुरग महादेव व यादाजी दादाजी दिा दादो महादेव यास फौज सुद्धां व बरोबर उट नफर २५ पचवीस देऊन पाठविले आहेत तर सदरहु ऐवज ×शहराहून बहूत तजविजानें रवाना करणे ऐवज पारखवयासि राजश्री बाबूजीनाईक दि॥ रामाजी नाईक पोतदार यांस पाठविले आहेत याचे मारफतीनें ऐवज पारखाऊन शहराहून बहूत तजविजीनें, सुरक्षित-पणे, कांहीं अटकाव, कजिया न होतां बाहेर काढून ठेविला पाहिजे. रॉ छ ६ जमादिलाखर बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हे विनति

---

ले ७७ } {श १६७३ वैशाख व १२
[ १७३ ] } {ता ११-५-१७५१

॥ श्री ॥

चिरजीव नाना यासि भाऊ, आशीर्वाद सविस्तर मजकूर भेटी नतर कळेल वरकड तरतुदेचा मजकूर तीर्थरूपानीं* लिहिला आहे त्याप्रमाणें करणें विशेष राजकारणांत असतील ते सविस्तर कोण कोणे प्रकारें व तुम्हांसीं ही दुसरे प्रकारे सदेहाचे लिहून पाठविणें त्याचा सुमार येथून केला पाहिजे तर सविस्तर लिहिणें वरकड सातारां कजिया न पडावा सर्व उत्तम परतु काले करून प्राप्त जाहालें तें आपले इजतीसाठीं केलें पाहिजे तुम्ही बहूत सावधतेनें सर्व करावयाचा काल आहे, परतु आलीकडे तुमचें सविस्तर पत्र येत नाहीं उचित नाहीं सर्व लिहून पाठविणें आमची रवानगी पुढें तुम्हाकडे करणार याचाही विचार सर्व लिहिणें सारांश इनाम देऊन रोजचे रोज येथें लवकर वर्तमान येई तें करणें रवाना छ २५ जमादिलाखर दादांस पांच सात रोज बरें वाटत नव्हतें इकडील पाणियानें परसाकडचें जाहलें होतें आता उतार पडून बरें जाहले येथील फौज दरमजल येते ही खबर तेथें पावलियावर कोणें प्रकारें भाव होतात हें सर्व लिहिणें वरकड हजार प्रकारें लबाडया करणार आमचे दरबारा गृहस्थ आहेत तें चुकत नाहीं सर्वही ईश्वर क्षेम करून परस्परें पेंच सुटताल असो पत्रीं विशेष काय लिहावें ? हे आशीर्वाद

---

× शहर=औरंगाबाद येथेंच यावेळीं निजामाची राजधानी होती राजवाडे खड १ लें १० प्रमाणें शिवराम गोविंद भिडे हा सावकार औरंगाबादेस सन १७५१ मध्यें होता त्यावरून या पत्राची तारीख ठरविली आहे भिडयांची वशावळ भा इ म त्रै व ९ ३ त आहे, तींत हें नांव नाहीं

* तीर्थरूपांनीं=नानासाहेब पेशवे यांनीं

ले ७८ }
[ ३५४ ]

{ श १६७३ जेष्ठ शु ९
{ ता। २२-५-१७५१

॥ श्री ॥

पुरवणी राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावीं यांसि

उपरि गायकवाडाचा× जो मजकूर जहाला तो तुम्हांस लिहिलाच आहे तदोत्तर मातोश्री आई साहेब* व राजश्रीनीं खालीं यावें, येविशींचा प्रेत्न बहुतां प्रकारें केला त्यांही जे जे मुद्दे घातले तेही मान्य केले असतां त्यांजकडून राजश्री मानसिंग जाधवरावें व आम्हांकडील मध्यस्त राजश्री महादजी नाईक निंबाळकर व धोंडो गोविंद आले गेले होते त्यां सह त्रिवर्गास गडावरि पाठविलें होतें त्यास गडावर न घेतलें आम्हाकडील मध्यस्त गडावरी न घेतले तर न घेवोत परतु त्यांणीं आपलेकडलि मध्यस्तांस तों घ्यावें त्यांस ही न घेतलें आईसाहेब वसवासी फार लोक व गडकरी यांचे चित्तांत आमचे सूत बनो न द्यावें[3] ××× वास घालून नाशितात गडकरी यांचे मतें सर्व सुभ्य आम्ही आहों मातोश्री व पेशवे एक जालियावर आम्हांस कोण पुसतो ? असा विचार आहे याजकरितां गडकरी यांस नरम करावयाचा विचार केला फौज व हशम पोख्त ठेवून आम्ही कूच करून आलों छ ७ रजबीं पुण्यास येऊन दाखल जालों या उपरि होईल वृत्त तें लेहून पाठवून येथील सव अर्थ तुम्हांस कळावा याजकरिता लिहिलें असें छ ७ रजब बहुत काय लिहिणें

लेखन सीमा

---

ले ७९ }
[ १६२ ]

{ श १६७३ ज्येष्ठ शु ९
{ ता। २२-५-१७५१

श्री

राजश्री जयाजी शिंदे गोसावी यांसि

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो। बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित असिलें पाहिजे विशेष तुम्ही जयनगर-हून निघालियावर एक पत्र आलें त्या आलीकडे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं

---

* आईसाहेब=ताराबाई, राजश्री=रामराजे

३ मधील अक्षरें फाटलीं आहेत

× गायकवाड ताराबाईस मिळून १५ हजार फौजेनिशीं पुण्यावर चाल करून आले होते

४ मानसिंग जाधवराव–उर्फ बाबजी सिंदखेडकर हा शाहूचा भाचा निजामानें फत्ते खर्ड्यांच्या लढाईंत त्याचा बाप मारल्यामुळें लहानपणीं आईबरोबर पळून साताऱ्यास आला शाहूचे पश्चात् तो ताराबाईचा कारभारी बनला व पेशव्याशीं तह झाल्यावर परत औरंगाबादेस गेला वंश औरंगाबादेस व वऱ्हाडांत देऊळगांव राजा येथें आहे (काळे वऱ्हाडचा इतिहास)

तुमची व नबाब वजीर यांची भेट जाली, यमुना पार होऊन कादरगजा जवळ दहा हजार पठाण सरदार सुद्धा बुडविला, तेंही वर्तमान परभारेंच येऊन पोचलें तदोत्तर अहमदखा पठाण बगास प्रयागास आसरा करून होता तो उठऊन फरोखाबादेस येऊन लढाईस नमूद जाहाला त्याची तुमची लढाई सुरू जाहली अहमदखा बगशानीं फरोकाबाद सोडून गगातीरास बेहडा अडचण जागा पाहून आराबा रचून त्याची तुमची नित्य लढाई होऊं लागली तथापि वर्तमान लिहिलें नाहीं याजवरून अपूर्वता, आश्चर्य वाटलें प्रस्तुत राजश्री दामोदर महादेव याचें पत्र छ ७ जमादिलाखरचें छ ५ रजबीं येऊन पावलें कीं, " अहमदखा बगस बाहादुरखा रोहिल्यास शरण जाऊन त्यास दहा बारा हजार स्वार व प्यादे यांजसीं कुमकेस आणिलें सरदाराची फौज व जाटाची फौज व नबाब वजिराची फौज गगापार होऊन छ३ जमादिलाखरी लढाई जाली बाहादुरखा रोहिला बुडविला हजारो घोडीं घेतलीं हत्ता पाडाव केले हें वर्तमान बगसानी ऐकून घाबरा जाला दुसरे दिवशीं पळून गगापार गेला लष्कराच्या लोकांनीं घोडीं पाडाव फार आणलीं तोफखाना पाडाव केला " म्हणोन लिहिलें तें श्रवण होऊन सतोषाच्या कोटी जाहल्या शाबास तुमच्या हिमतीची व दिलेरी-रुस्तुमीची व शाबास लोकाची ! आमच्या दक्षिणच्या फौजांनीं यमुना गगा पार होऊन रोहिले पठाणांसीं युद्ध करून आपण फत्ते पावावें हें कर्म लहान सामान्य न जालें ! तुम्हीं एकनिष्ठ, कृतकर्मे सेवक या दौलतीचे स्तब आहां ! ! जें चित्तावर धरितां तें घडून येतात पहिलीं यशावह कर्में सपादिलींत ततोधिक हें यश सपादिलेंत या यशास जोडाच नाहीं ! परतु केल्या मनसुबियाचा अर्थ किमपि लिहीत नाहीं ऐसें नसावें सर्वदा आपलें कुशल वृत्त लिहीत जाणें तेणें करून सतोष होत जाईल मोठा मनसबा कठीण होता नानाप्रकारचीं येथें वर्तमानें उठतात तुमचें पत्र तों येत नाहीं याजमुळें चित्त चिंतेंत होतें +इरान तुरान पावेतों लौकीक जाला कीं, वजीर मोडला, पैंळाला असता फिरोन फत्तेच्या मनसदींवर बसविला याजहून यश कोणतें अधिक आहे ? या उपरि तेथील रग भरून, स्वकार्य साधून, आपलें मुलुखांत येणें योग्य आहे छ ७ रजब बहूत काय लिहिणें लेखनसीमा

---

ले ८०
[ ३८५ ]

श १६७३ ज्येष्ठ शु १०
ता २३-५-१७५१

॥ श्री ॥

पु॥ राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावी यांसि

उपरि रेवामकुदपुरचा मामला बहुत आफ्तर पडला कमावीसदाराच्या साहित्यास तीन चार वर्षे फौज एकदर न गेली प्रस्तुत आपणास तो प्रांत जवळच आहे कोणी एक दोन पथके पाठविणें तीं पाठवून कादाराचा चौका बैसे, कमावीसदाराचा पैका उगवे, तें खामखा करावें रा छ ८ रजब तेथील बदोबस्त जरूर करावा बहुत काय लिहिणें लेखनसीमा

---

+ येथपासून खुद्द खाशांच्या हातचें अक्षर आहे

२ सफदरजगास पठाणांनीं पदच्युत केलें होतें त्यास पुन वजीरी दिला

ले ८१ ⎫
[ २५३ ]⎭

⎧ श १६७३ वैशाख
⎩ इ १७५१ मे

श्री

आशीर्वाद उपरि गुापासून ताराबाईशीं बिघाड पडला, याजमुळें नानाप्रकारें पेंच त्यानीं केले ज्याशीं आम्हीं गोड न बोललों तो त्यांचे लगामीं ज्याशीं आम्ही गोड बोललों तो ही त्यांनीं लटका चढीं लावून आपले लगामीं लाविलेच आहेत कोठें ताळ राहिला नाहीं यास्तव आम्हीं कबूल केलें कीं, दादोबास प्रतिनिधी द्यावी सर्व कारभार त्यांनीं करावा आमचा गुजराथ कर्नाटक दिल्याप्रमाणें चालवावें त्यांनींही कबूल केलें परतु खालीं उतरल्या वाचून, भेट जाल्यावाचून, जनात नीट दिसत नाहीं, सशय तुटत नाहीं, यास्तव बहुतां प्रकारें आग्रह करितों परतु खालीं उतरताच राजा पळून जाईल, अगर आम्ही मागती राजास हातीं धरून आपल्यास मुरदाड करतील, हा सशय मानून सकटांत आहेत परतु सभोंवतीं भलताच गुरें वळितो पोटास एक पैसा येत नाहीं सोनें,रुपें मोडून खावें येथ पावेतों आलें यास्तव मातबर मराठे मध्यस्त घेऊन उतरावें, ऐसा करार जाहला आहे, उतरलीं तर उत्तम, नाहीं तर एका खाशानें दहा हजार फौजेनिशीं येथें असलें पाहिजे मुरारजी[1] घोरपडे व मोंगलें[3] यांजकडे नानाप्रकारें आम्हाशीं अति वादास प्रवर्तून राजकारणें करितात सर्व सभाळलें पाहिजे घरकलह कठीण आहे येतद्विषयीं क्सें करावें ? तुम्हाकडे, मल्हारबाकडे देखील, राजकारणें करितात ऐसें ऐकितों त्यास तुम्हाशीं राजकारण केल्यास काय होणें ? परतु यत्नास चुकत नाहींत पुढें जें होईल तें लिहून पाठवू हे आशीर्वाद ×

---

ले ८२ ⎫
[ १६३ ]⎭

⎧ श १६७३ ज्येष्ठ व १३
⎩ ता १०-६-१७५१

॥ श्री ॥

राजश्री साबाजी सिंदेऽ गोसावी यांसि

छ अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद सुा इहने खमसेन मया व अलफ तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं ऐसें नसावें सर्वदा आपलें कुशल वृत्त लिहीत जावें यदा सरदारांनीं मोठा अवघड मनसुबा करून, यमुना-भागीरथी पार होऊन, पठाण रोहिल्याशीं गाठ घालून, युद्धप्रसग करून पन्नास साठ हजार फौज बुडविली तुम्हीं सर्व लोकांनीं जिवाची तमा न धरितां साहेब कामावरीच दृष्टि देऊन

---

१ यावरून हें पत्र जयापा शिंदे यास लिहिलें असावें असें होतें मल्हारबा=होळकर

× हें सर्व पत्र नानासाहेबाच्या हातचें आहे. २ गुत्तीकर ३ हैदराबादवाले

ऽ साबाजी शिंदे हे राणूजीचे कोण हें समजत नाहीं भाऊसाहेबाच्या बखरींत साबाजी शिंदे यांस दादासाहेबानीं पुढें लाहोर येथें ठेविलें असें आहे भा० सा० ब० पृष्ठ ५१ व ५७ पहा तेच साबाजी हे असावे हे हल्लीं जयाजी शिंद्यांच्या लष्करांत होते असें दिसतें

शत्रु शासनाक्रांत केलात तुमची निष्ठा दृढोत्तर, तद्योगें यश रामेश्वर इराण तुरान पर्यं-प्रफुल्लित जालें शाबास सरदारांची ! व शाबास तुम्हां लोकाची आहे ! ! दुसरियांस हें यश फार दुर्लभ असे इकडील वृत्त राजेश्री जयाजी शिंदे यांस लिहिलें आहे, त्याजवरून कळेल. अत:पर माघारें यावें रवाना छ २६ रजब बहुत काय लिहिणें लेखन सीमा

---

ले ८३ }
[ ३६४ ] }

{श १६७३ ज्येष्ठ व १३
{ता १०-६-१७५१

श्री

राजश्री जयाजी शिंदे गोसांवी यासि

छ अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणें विशेष तुम्हीं पत्रें छ १ जमादिलाखरचीं पाठविलीं तीं छ २३ रजबीं पावलीं लिहिलें वर्तमान त्यांत खु ला बाच सादलखान पठाण पठाणाचा हरोळ होता तो लुटून पस्त केला तदोत्तर अहमदखान पठाण प्रयागींहून जलद स्वारीनें फरोकाबादेस आला याची बातमी कळोन बुनगे कोशीं दुकोशीं ठेऊन सडे फौजनशीं मोर्चेबंदी करून राहिलों त्यास व आम्हांकडील मोर्च्यांचे × × × ×त होती मारामार × × × × असतां पचवीस रोज पर्यंत जहाले पठाणास सामान सरजाम पलीकडून पोंचत होता त्यामुळें आयास न येत तेव्हां नबाब मनसूर अलीखान वजीर आम्हा पासून पांच कोश कन्होज जवळ होते त्यांजकडून गंगेस पूल तयार करवून फौजा निवड करून पार उतरून त्याजकडील फौज रोहिले सुद्धां तीस हजार पावेतों होती त्यासि गांठ घालून पठाण लुटून मारून पस्त केला तेच दिवशीं मोर्च्यांतून अहमदखान पठाण रात्रौ पळोन गेला, त्याचा पिच्छा करून बुडविला दत्ताजी शिंदे यांणीं फारफार शर्त केली हत्ती, घोडे, उटें, निशाणें कुल लुगारा केला याउपरि वजीराशीं काशीं, प्रयाग क्षेत्राचा वगैरे मजकूर घातला आहे त्याचा निकाल जहालियावरि त्यासि यावयाचा विचार करून लेहून पाठवू म्हणोन विस्तरें लिहिलें तें कळलें ऐशियास, तुम्ही एकनिष्ठ मातबर सेवक, उमदीं उमदीं कामें दूरदेशीनें मनात आणून त्याचें ठायीं नेट मारून करणें आणि शिपाईगिरीची व मनसुबेबाजपणाची शर्त करून यशास पात्र व्हावें ऐसेच आहा तदनुसार हें महत्‌यश घेऊन वजीरास पठाणानीं व रोहिल्यानें फरारी करून तमाम दिल्लीपर्यंत आक्रमशक्त केली असता त्याची पुस्तपन्हा करून त्यासि नतीजा देऊन नेस्तनाबूद केलें वजीराचा बोलबाला करून, पादशाहत रोहिले पठाण घेऊ चाहात होते ते पादशाहाच्या घरात राखोन, त्यास सतोष व वचनास खरेपणा महत्‌ यशाची पराकष्ठा होऊन, स्वामिसेवा पैका व यश आजि तागायत जहाली नाहीं ती करून दाखविलीत याजवरून फार सतोष जहाला तुम्हांस योग्य तेंच केलें व पुढें ही कराल, हा निशाच आहे या उपरि साधल्या यशाचा लाभ अतितर मानून, काम काज करणें तें करून, सर्वांची मर्जी राखून, देशीं यावयाचा विचार केलाच असेल तर साविस्तर वर्तमान लिहिणें येथील वर्तमान तरि वरकड सर्व राज्य आमचे

लक्षाशिवाय नाहीं × मातुश्री चढीं लागलीं आहेत त्यास गडावरि दोन फळ्या राजश्री निराळे मातुश्री निराळी प्रस्तुत राजश्रींचें प्राबल्य आहे बहुधा उतरतील श्रीकृपें लौकरीच राज्याचें कल्याण दुष्ट दुर्बुद्धीनें राज्यांत बखेडा करितात त्यांचीं *काळीं तोंडें होऊन राज्य स्वस्थ होईल पुढें वर्तमान होईल तें लिहिलें जाईल जाणिजे छ २६ रजब बहुत काय लिहिणें    पौ छ ४ रमजान




---

ले ८४ } [ ३५८ ] }    { श १६७३ ज्येष्ठ व १४ { ता १-१६-१७५१

श्री

पुरवणी राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसांवी यांसि

उपरि नबाब गाजुदीनखान फेरोजजंग बादल बरसात दक्षणेस यावयाची तजवीज करतीलसें दिसतें फेरोजजंग नबाब आसोफज्याचे पुत्र खरेच परंतु बहुत दिवस दिल्लीस राहिले मुतसदगिरीचेंच काम केलें शिपायगिरी सरदारीचें काम त्यांस पडलें नाहीं प्रस्तुत ते सरदारीचे व बहादुरीचे कामास हिंमत करणार त्यास आम्हीं सलाबतजंगाशीं जागीरीची बोली लाविली आहे तेही आम्हाशीं बोलतात परंतु गाजुदीखानाची येण्याची गरमी असती तर चित्तानुरूप हेही आम्हाशीं बोलते जर चित्तानुरूप याजकडून कार्य न होतें तर त्याजकडून कार्याची पैरवी करून घ्यावयाची तजवीज करितों परंतु गाजुदीखान तुम्हाशीं बोलतील तुम्हांस वचनाशीं गोवितील तुम्ही वचनास गुतोन त्यांस घेऊन यावयाचा विचार कराल तर आम्ही सलाबतजंगाची दस्तगिरी केली, कांहीं वचनासही गुतलों, आमची जागिरीविशीं याजशीं बोली लागोन राहिली आहे गाजुदीखान येतातसें यांस कळोन हेही आम्हाशीं बोलतील पुतें वचनास गोवितील एकूण तुम्ही त्याजकडे वच- नास गुतला, आम्ही याजकडे गुतलों, येणेंकरून दोहींकडेही फार फार अवघड होऊन बेइ मानीचा शब्दारोप येईल त्यास ही गोष्ट सर्वथा कार्याची नाहीं प्रस्तुत कांहीं तुम्ही त्याजशीं वचनास गुतला नाहीं मोकळेच आहां ते बोलत असतील तर सुखरूप बोलोत तुम्हीं ही जाबसाल उचित रीतीनें करावे वचनास न गुतावें आम्ही याजशीं जागिरे- विषयीं बोलतों चित्तानुरूप यांजकडून काम जहाल्यास उत्तमच आहे जरी हे आमचे खातरखा कार्ये करून न देत तेव्हां यांजकडील बोली तोडून त्याजकडे बोली लावून त्यांज- पासून आपलें कार्य करून घ्यावें लागेल सारांश, इकडील प्रकार निवडला नाहीं तोंपर्यंत तुम्हीं गाजुदीखानाशीं वचनास न गुतावें इकडीलही सर्व अर्थ तुम्हांस कळावा याजक- रितां लिहिला असे पुढें होईल मजकूर तोही तुम्हांस लिहून पाठवून तदनुसार जसजसा

---

× या शब्दापुढील बरींच अक्षरें फाटलीं आहेत

* येथें बाजूवर बाळाजी बाजीरावांचा शिक्का आहे

विचार करणे तो करालच ×आमचे मतें याजशीं वचनाप्रमाणें जाहले आहे यानींच जागार दिल्ही तर तो यांसच राखावें त्याचा पक्ष न करावा याना लबाडी केली, नाट न देत, तर यांसि इमान उजवलें आम्हावर तर शब्द नाहीं ऐसे जानोजी निंबाळकर मध्यस्त आहेत त्या हातीं जाबसवाल करावे मग सुखरूप गाजुदीखानास आणून त्याचें पारपत्य करावें व त्यांपासून मातबरच पैका मुलूख घेणें तो घ्यावा ये गोष्टीचा स्पष्ट अर्थ श्रावण-भाद्रपद अखेर कळेल तदनुरूप जें कर्तव्य तें करावें जर केवळ त्याचें राजकारण तुम्हीं टाकिले, ते नाउमेद होऊन घरीं बसले म्हणजे, यांसही आमची गरज पडणार नाहीं त्यावि काहीं दिवस धातुपोषण बोलावें, याजपासून आपलें कार्य साधावें हे ताळ्यावर नच येत तर त्यासि शफतपूर्वक बोलून मग त्यास आणावें ऐसा कारेगारीनें मनसबा केलियावांचून प्रामाणिकता राहणार नाहीं जर तुम्ही त्यासि केवळ इमानपूर्वक बोललेस, आणि त्यास घेऊन याच मजलीस आलेस म्हणजे हे आमचे पाया पडतील आम्हासही याचें ऐकावें लागेल आम्ही यासि सलुख केला, तुम्हीं त्यासि इमान केलें, म्हणजे महा अप्रमाणिकतेचें कारण होणार बहुत लौकिक फटकळ होणार यास्तव त्याचें भय यास पडे, कार्य यांजपासून होय, ऐसे करावें हे ताळ्यावर नच येत तर आपलें इमान उगवलें ऐसें स्पष्ट बोलून मग सुखरूप तुम्हीं आम्हीं मिळोन गाजुदीखान उभे करून बेजरब यांस जरब द्यावी आपलें कार्य मातबर साधावें तुम्हांशीं ते बोलत असतलि तुम्हीं दसरिया पावेतों राजकारण राखावयाचे रीतीनें बोलणें इतक्यात यांसि आम्हीं बोली पाडून स्पष्ट निश्चय करून तुम्हास लिहून पाठवू तदनुरूप जें कर्तव्य तें करणें यानीं आमची रजावदी केली आणि तुम्ही त्यांसि वचन इमानास गुतलेस, त्यास घेऊन यांजवर चालून आलेस, म्हणजे सर्व प्रकारें लौकिक वाईट होईल *यास्तव विस्तारें लिहिलें असे सलाबतजग थोड्या दिवसांत अवरंगाबादेस दाखल होतील जानबा जाऊन जाबसाल करून येत तों उबार आहे या गोष्टीस दोन तीन महिने पाहिजेत इतक्यांत पावसाळा आहे चारी राजकारणें व्हावीं दसरिया नतर जें लिहून पाठवू तें करावें छ २७ रजब बहुत काय लिहिणें

पौा छ ४ रमजान




---

ले ८५
[ ५ ]

श १६७३ श्रावण शु १
ता १२-७-१७५१

श्री

वेदशास्त्रसपन्न राजश्री **वासुदेव दीक्षित** स्वामींचे शेवेशीं,

विद्यार्थी **बाळाजी बाजीराव प्रधान** साष्टांग नमस्कार विनती येथील कुशल

---

× येथपासून खुद्द नानांचें अक्षर

जाणून स्वकीय लिहिणे विशेष गाजुदीखान× वडील आणि पातशाही सनदेसहवर्तमान येतात त्याचे साहित्याविषयीं पातशहानीं सरदारास बहुत सांगितलें आम्हासहा लिहिलें आहे याप्रकारें पावतां सय्यद लष्करखान याणीं सलाबत × × × × विचार तो सांगून ते आलियावर परस्पर तह होय, कलह—वृद्धि न व्हावी, प्रजा सुखी असावी, याप्रकारें खानास करणें योग्य आहे मागें खानांनीं नागो रामा बरोबर पलीकडील वर्षी सागून पाठविलें होतें त्यात खानाचा मनोदय गाजुदीखानाकडेच स्पष्ट दिसत होता रामदासपताशीं चित्तापासून विमनस्कता, याजमुळें ही तिकडेच अनुकूळ मनोदय होता साप्रत मात्र कांहीं सशयात पडले असतील आपण त्याचा इतबारी, प्रमाणिक शहरात असेल त्यापासून लिहून पाठवावें, व आपलें ही पत्र त्याच अन्वयें जाऊन जाब सत्वर आला पाहिजे प्रसगीं खानांनीं गाजुदीखान याजकडे जाहलिया, एक निष्ठेस योग्य व लाभ ही त्यात व आमचे स्नेहास ही योग्य, असे तीन अर्थ घडतात सर्व प्रजांचें बरें होतें व गाजुदीखान नबाबाचा वडील पुत्र, आणि पातशाही सनदेसहित येतो, त्याकडे जाहलियास कोणेविशीं ही दोष नाहीं आम्हांस तो जें सरदार करून येतील तें निभावलेंच पाहिजे सलाबतजगासही हेंच योग्य आहे मागें नासरजग नबाबाशीं भांडले [ ते ] काय फळ व काय लौकिक पावले ? बाहेरील कोणी आला तर भांडणें योग्य, घरचे घरीं भांडणें सर्व प्रकारें योग्य नाहीं याच प्रकारें

---

× हा निजाम उल्मुल्काचा ज्येष्ठ पुत्र ह्यानें शिंदे होळकर मार्फत पेशव्याशीं स्नेहाचें बोलणें लावून दक्षिणचा सुभा सलाबतजगाकडे होता तो आपणाकडे व्हावा अशी मसलत मांडिली ह्या मसलतीच्या सबधानेंच खाला दिलेलीं पत्रें पेशव्यानें दीक्षित यास लिहिलीं इ० सन १७५१।५२

१ सय्यद लष्करखान हा औरंगबादचा सुभा गुप्तपणें गाजुदीखान याची मदत करीत होता सन १७५२ च्या एप्रील महिन्यात रामदासपत मारला गेल्यावर ह्यास बुसीनें दिवाण नेमिलें

* ह्या शब्दापुढील शब्द गेले आहेत किंवा पत्र लिहिणारानें गुप्त कारणासाठीं बळेंच लिहिले नसावे अशा ठिकाणीं फुल्या घातल्या आहेत

२ हा ब्राम्हण गृहस्थ बुसी याणें नासरजगाचा नाश करण्यास योजिला होता त्या प्रमाणें त्याणें नासरजगाच्या लष्करात फितूर करून शेवटीं नासरजग मारला गेला, नतर ‘ राजा रघुनाथ ’ असा त्यास किताब देऊन बुसीनें त्यास सलाबतजगाचा मुख्य प्रधान केलें सन १७५२ मध्यें मोंगलाचा पराजय झाल्यावर ह्याच्या फौजेंत आपसाआपसांत पगाराच्या बाकीवरून जो तटा झाला त्यात रामदासपत मारला गेला ( एप्रिल ता० ७ इ० स० १७५२ ) याचें व रामदासपताचें वाकडें होतें रामदासपताच्या मृत्यूपूर्वीचें हें पत्र त्यावरून तारीख ठरविली आहे

खानांनीं मसलत × × × कोणी कलहवृद्धीचा उपदेश × × × त्यास दाब दर्शित्व ख म वार [?] करून आपले हातीं घेणें योग्य आहे आम्हास तो खानाचा भरवसा पूर्ण आहे तथापि नवीन प्रसग आहे लिहून उत्तर आणणें योग्य आहे एतद्विषयीं काहीं सकलित खानास पत्र पाठविलें आहे हें जलद् पावतें करून सविस्तर उत्तर आणून पाठवावें तदनुरूप कर्तव्य तें केलें जाईल छ २९ साबान बहुत काय लिहिणें हे विनति कदाचित् खान फिरग्याचे भरावर जातील तर न जावें सर्व उमराव तिकडे होतील फिरगियाची फुलचरीसें सकट, मग नवें सामान कोठें येणार ? व एक फिरगी सामानानें काय होते ? ते भर देतील परतु भरवसा न मानावयाचा त्याचा पूर्व प्रकार कळलाच आहे हे विनति

---

ले ८६ [ ४ ] — श १६७३ आश्वीन शु ३ ता ११।९।१७५१

॥ श्री ॥

वेदमूर्ति राजश्री वासुदेव दीक्षित, स्वामीचे सेवेशीं

विद्यार्थि बाळाजी बाजीराव प्रधान साष्टाग नमस्कार विनति येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें विशेष आपण पत्र पाठविलें तें पावलें सविस्तर वर्तमान कळलें राजश्री जानबा निंबाळकर आले राजश्री रामदासपताचे स्नेहाचाच अर्थ सांगितला तेणें करून सतोष झाला आम्हींही स्नेहवादे च किती एक विचार मशारनिल्हेशीं बोललों आहों ते सविस्तर लिहितील व बोलतील त्याजवरून सविस्तर कळेल निरतर सविस्तर अर्थ लिहीत असलें पाहिजे बहुत काय लिहिणें हे विनति पै॥ आश्विन शुद्ध ३ बुधवार शके १६७३

---

ले ८७ [ ३३४ ] — श १६७३ आश्विन व ६ ता २९-९-१७५१

श्री

राजश्री* मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावी यांसि

छ अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद उपरि येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लिहीत जाणें विशेष सैद लष्करखान जानोजी निंबाळकर हे बहुत दिवस नवाब फेरोजजग याचें येणें इकडे व्हावें इच्छीत होते परतु नवाबाचें निघणें दिल्लीहून पेंचपाचामुळें न घडे यास्तव मात्र हिदायत

---

१ सय्यद लष्करखान २ फ्रेंचाचे ३ गाजुदीनखानाकडे ४ पाडेचरीस यावेळीं इग्रज फ्रेंचाचें युद्ध चालू होतें

* हें पत्र व खालचीं पत्रें श्री० रा० आबासाहेब दाभोळकर इनामदार अकोळनेर जि० नगर याजकडून अस्सल मिळालीं आबासाहेबांचे आम्ही आभारी आहों

मोहिदीखानाशी व रामदासपताशीं चार दिवस आपला रंग राखून होते सांप्रत सलाबत-जगाकडून मध्यस्ती निमित्य इकडे आले जर आताच नबाबास जाऊन भेटावें तर लौकिक सर्व प्रकारें वाईट होतो का मध्यस्तीस गेले, आणि तिकडेच जाऊन मिळाले यास्तव आजच यांस वेवळ भेटता येत नाहीं नबाब फेरोजङ्ग यांचे सेवेंत यांची एकनिष्ठता आहेच प्रस्तुत आम्हीही विशेषात्कारें या उभयतांस नबाबाचे ज ना बे त रुजू आणिलें आहे ऐशास हे उभयता मर्द, प्रामाणिक, मातबर, सर्वही अमीर याचे लगामी, दहा हजार फौज एकीकडे व हे दोघे बुद्धिवत एकीकडे, हें नबाबाशीं रुजू जाहलें असता कबू थोर अमीर नबाबाशीं हात बांधून सिद्ध आहेत असें जाणावें दुसरे आमचे वडिलातागाईत परम स्नेही, गतवर्षी मातबर पेच आम्हावर पडला तेव्हां बहुतां प्रकारें आमचे कार्यास आले तोही यांचा उपकार आम्हांवर आहे यास्तव तुम्हीं नबाबास या उभयताविशीं उत्तम रीतीनें सांगून, ज्यांत नबाब अकृत्रिम यांजवर कृपा करीत असें करावें व नबाबाचे खास




दस्तूरचीं पत्रें उभयतांचे नांवें आश्वासनपूर्वक कीं, तुमचे भरवसियावर येथें आलों, तुम्ही सर्व प्रकारें माझे आहां, असे विस्तारयुक्त पाठवणें त्यांत यांची खातरजमा होईल यांच्या जागिरा मनसबा जे जें आहे नबाबास बहाल करावें लागेल किंबहुना अधिकही कृपा करून देणें प्राप्त होईल हे उभयतां नबाबाचे स्वाधीन जहाले असता नबाबाचा बहुत नफा आहे शत्रुही आपोआप गर्वहत व पादाक्रांत होऊ[न] विशेष उपयोग होता + यास पूर्ण भरवसियाचें नबाबाचे हातचें पत्र जरूर पाठविणें छ १९ जिलकाद बहुत काय, लिहिणें पौ। छ २१ जिल्काद

लेखन सीमा

---

ले ८८ [ ३९२ ]

श १६७३ आश्विन व ३०
ता। ८-१०-१७५१

श्री

पुरवणी राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसांवी

उपरी खान अलम याची थैली दुसरी आली ते पाठविली आहे नबाब फेरोजंग यास पावती करावी कृपा उत्तर पाठवून यावें जाणिजे छ २८ जिलकाद लेखनसीमा

---

+ येथपासून खुद्द नानासाहेबाचें अक्षर

ले, ८९ }
[ ३६९ ]}

{श १६७३ आश्विन व ३०
{ता ८-१०-१७५१

॥ श्री ॥

राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावी यासि

छ अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नो बाळाजी बाजीराव प्रधान आशार्वाद उपरि येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें विशेष

३ रामचद्र जाधवराव यास नवाबाचे इजायतनामे सादर जहाले होते त्याचे जाब आले थैल्या

१ जानोजीराव निंबाळकर यांची थैली

१ खान अलम याची थैली

---

४

येकूण चार थैल्या पाठविल्या आहेत प्रविष्ट करून उत्तरें पाठवावयाचीं असलीं तर पाठवणें जाणिजे छ २८ जिलकाद बहुत काय लिहिणें

---

ले ९० }
[ ३०१ ]}

{श १६७३ आश्विन व ३०
{ता ८-१०-१७५१

श्री

पु॥ राजश्री मल्हारजी होळकर, जयाजी शिंदे गोसावी यांसि

आशीर्वाद उपरि नबाब लौकर आले तर गगे आलीकडे भेट होईल तूर्त नदीस पाणी आहे अथवा नबाबास तूर्त एकाएकीं जवळ नेतां येत नाहीं, सबब एव्हां नबाबाची भेट महकूब करून जलद तुम्ही आम्ही मिळोन कामास जावें ते नरम केलियावर नबाबांनीं जवळ यावें ते समयीं सावकाश भेट होईल परतु भेटीस गुतून काम नासावें ऐसें नाहीं सैद लष्करखान, जानबा कित्येक तजविजानीं आज पावेतों रहाविले इतक्यात नबाबाकडील जितके माणूस येऊन पावल्यास पुढेंही रहातील सेवटेंत भरवसा नाहीं कां कीं, सलाबतजंगाचे कुचाचे गरमीनें दुदील होतात नबाबानीं जप्ती न करावी एतद्विषयीं लिहिविलें त्यास जप्तीची तातड सहसा नव्हती नालबदीस तोटा तूर्त दहाचा आला, तुम्हीही [illegible] न पाठविला, यास्तव जरूर पोटाचे सकटासाठीं रसदा घेतल्या सर्वांपुढे इलाज आहे, पोटापुढें कर्जापुढें, इलाज नाहीं तो विचार पत्रीं काय लिहावा ? भेटी नतर समक्ष एक वेळ फारवाईट तुम्हाशीं बोलू यांत सशय नाहीं हणमतराव निंबाळकरास लौकर एखादा मान्य पुरुष पाठवून भेटीस न्यावें आम्हाशीं बोलले ते बेमान केलें तें खरें, लटकें हें परीक्षा जलद पहावी सारांश, तुमचे भेटीसाठीं व पुढील तोडजोडीसाठीं इतके दिवस मुक्काम केला या उपर जलद येणें सहसा विलब न करणें छ २९ जिलकाद बहुत काय लिहिणें लेखनसीमा

---

ले ९० पहा

ले ९१
[ २४ ]

श १६७? आश्विन
इ १७५१ सप्टेंबर

श्री

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेसी—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असले पाहिजे विशेष आलीकडे आपणांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी ऐसें नसावें सदैव आपणांकडील वर्तमान लिहीत जावें आपला व खानाचा स्नेह व राबता बराच आहे व जे ही [ ? ] मुत्सदी याचा स्नेह व राबता असेलच नबाब बाहेर निघाले पुढें मनसुबा काय करणार, तें अतर्बाह्य वर्तमान सर्वही आपणास कळतच असेल तर सर्वदा लिहीत जावें कळावे आमचें पत्र येईल तेव्हांच उत्तर पाठवावें, असा अर्थ चित्तांत आणिता, नतर वर्तमान लिहिता [ तर ] आळस न करावा बहुत दिवस पत्र येत नाहीं असें नसावें हे विनंती

---

ले ९२
[ ३३६ ]

श १६७३ पौष शु १०
ता १६ १० १७५१

श्री

राजश्री रामाजीपंत यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार जयापास जरूरी पत्र लिहिलें आहे हें एकांती देणें तुम्हाजवळून वाचून पाहिलीं तर उत्तम नाहीं तर ज्यापासून मनास येईल त्यापासून वाचून पहातील सविस्तर जाब मागून सत्वर पाठवणें सर्व प्रकार कर्जे फेडाव्याचा व आम्ही केलें तें शेवटास न्याववयाचा भरवसा आम्हास या समयीं जयापाचा आहे यांनीं तिळमात्र मल्हारबाचे बुद्धीस कोणी भेद करतील तो न होऊं देता ते आमचेच एकनिष्ठेत रहात तें करावें मागें मोठें मोठें कर्ते जहाले त्यांनीं कर्जे फेडलीं आता आम्हावर जयापावर कर्जे फेडाव जें केलें तें एकविचारें शेवटास न्यावें सा सुभे दक्षण सोडवावी या कामाची पाळी [ आली ] आहे श्री कृपा आहे तरी सर्वही मनावर घेऊन करतील छ ८ ×सफर

(लेखन सीमा)

---

१० रामाजीपंत दाभोळकर—हल्लींचे आबासाहेब ज्यांनीं हीं पत्रें आम्हांकडे प्रसिद्ध होण्याकरिता दिलीं, त्यांचे पूर्वज दाभोळकर मंडळी शिंद्याच्या पदरीं होता व ह्या पत्रव्यवहारात त्याचीं नावें जागोजाग आलीं आहेत, करितां त्याची वंशावळ थोडक्यांत येथें देऊं इनाम संपादन करणार रामाजी अनंत दाभोळकर हे पाणिपत येथें कामास आले शा० शके १६८२ यास पुत्र दोन आपाजीराव राम व व्यंकटराव राम आपाजीराम यांचे रामराव आपाजी ( म० श० १७४३ ) त्यांचे कृष्णराव व आपाजीराव कृष्णराव यांचे मोरोपत आबा ×हें सर्व पत्र खुद्द नानासाहेबांच्या हातचें आहे

ले ९३ }
[१४४] }

{ श १६७३
{ इ १७५१

श्री

राजेश्री पंत प्रधान गोसावी यांसि—

छ सकळ गुणाळकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य—स्नो उदाजी चव्हाण हिंमतबहादर ममलकतमदार दंडवत विनंती येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळलेखन करीत असले पाहिजे विशेष—आपण पत्र पाठविलें पावलें लेखनाभिप्राय कळोन समाधान जालें सातारियाकडील वर्तमान लिहिलें त्याजवरून साकल्य कळलें सांप्रत आपण कोठें अहा? विचार मनसुबा काय? आपण चित्तांत काय आणिलें आहे ते ल्याहावें पुढेंही कितेक विचार करणें आहेत तर राजश्री लिंगो आमाजी यास पाठवून द्यावें विचार सुचेल तो मशारनिलें समागमें सांगोन पाठवावा जाणोन लिहिले ऐशास आपण आम्हांस निरोप दिल्हा ते वेळेस सांगितलें कीं श्रावणमासीं मनसुब्याची रीत व फौज ठेवावयाचा विचार तुम्हांस सांगो तों-पावेतों दोन दिवस मनसुबा राखून राहणें असें बोलोन निरोप देऊन लावून दिल्हे त्याजवरून आम्ही आथणीस आलों ज्येष्ठ मासीं चिरंजिवाचें लग्न केलें, वरकड या मुलकांतील जागां जागा कागदीपत्रीं व नानाप्रकारचे फितूर पत्रीं काय लिहावे? सर्व अर्थ आपणास विदीत मसलतीचा विचार, आपणा शिवाय आमची मसलत नाहीं या फितुरांत आज पावेतों आम्ही मनसुब्याचा जीव मात्र रक्षून आहों इकडील कितेक अर्थ सांगणें तो सांगोन राजश्री लिंगोपंत रवाना केले आहेत, ते आपणा संनिध येऊन सविस्तर विनंती करतील तो अर्थ चित्तारूढ करून प्रत्युत्तर समर्पक पाठविलें पाहिजे प्रस्तुत या श्रावणमासी आम्ही कूच करून झेंडे डेरे बाहेर देऊन निघालों आहों सर्व भार आपणावर आहे, आपणाखेरीज दुसरा विचार जाणत नाहीं, हे मनोमन साक्ष असे पुनरुक्त पत्रीं विशदें ल्याहावें हा अर्थ नाहीं तपशील अर्थ मशारनिले निवेदन करतील त्याजवरून श्रुत होईल आपलें उत्तर येईल तदनुरूप वर्तणूक होईल विशेष काय लिहिणें कृपा वर्धमान करावी हे विनंती

श्री राजाराम छत्रपती स्वामी
चरणीं तत्पर उदाजी चव्हाण
हिंमत बहादर ममलकतम
दार निरंतर

शिक्का

---

ले ९४ }
[२३] }

{ श १६७३ पौष
{ इ १७५२ जानेवारी

श्री

वेदमूर्ती राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे शेवेशीं—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती आपलें पत्र बहूत दिवस येत

नाहीं मागे सरदारांस पत्रे गेलीं त्याचा जाब आला असला तर पाठवा, व तिकडील भाव कर्तव्य जरूर ल्याहावें मागे आपण लिहिले ते आम्ही संदिग्ध मानिलें अखेर आपण लिहिलें तें जाहालें या उपरही वर्तमान असलेले तें लिहीत असावें मंगळवार तिसरा प्रहर हे विनंती

फेरिस्त नंबर ५५६

---

ले ९७ ) [ १९ ]) — (श १६७३ पौष (इ १७५२ जानेवारी

श्री

वेदमूर्ती वासुदेव दीक्षित स्वामीचे सेवेशीं--

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती येथील वर्तमान नारायणभट सांगतील [१]राजाजी स्वभावानें कुटील बोलतात, तो भरवसा येत नाहीं भेट इमान सर्व विध जालें परंतु परिणाम कठीण दिसतो पांचा लक्षांची जागीर द्यावयाचा करार जाला देतील तेव्हां खरें त्याणीं जागीर दिली, दाभाडियांचा आभिमान सोडिला, तर आम्ही त्रिंबक देऊं साराश दैवी मानवी रीतीनें पाहता काल कठीण आहे सर्व स्वामीचें आशी र्वादें उत्तम होईल पत्र पाठवीत जावें जर जाला [ २ ] सलूख शेवटास गेला तर येथून कूच होईल आपण भेटीस यावें कृपा केली पाहिजे हे विनंती

फेरिस्त नंबर २४८

---

ले ९६ ) [ ३६३ ]) — (शके १६७३ फाल्गुन शु ९ (ता। १०-२-१७५२

श्री

पुरवणी राजश्री जयाजी शिंदे गोसावी यांसि

आशीर्वाद उपरि मल्हारबाचा शफतपूर्वक बेलभंडार पाठविला तो पावला आधींच भरवसा त्यांत येणेंप्रमाणें पाठविला तेणेंकरून संतोष जहाला जर मागें येणें झालें असतें तर महत्तर कार्य होतें तथापि ईश्वर इच्छा प्रमाण आता तों तह *चारा लाखांची जागीर त्यांनीं द्यावी, इकडून त्यांचें स्थल त्रिंबक कलहाचे दिवसात घेतला तो द्यावा, ऐसें ठरलें चिरंजीव दादाजवळ वीस पंचवीस हजार फौज देऊन गुजराथेस पोट भरावयास रवाना केलें गैरहंगाम, पोटास नाहीं, ठाणीं बळकट, जितकें होईल तितकें करतील ताराबाई हजार

---

१ राजाजी--रामदासपंत हा तारीख ७ एप्रिल १७५२ म्ह० श १६७४ वैशाख शु ४ रोजीं वारला याचे हयातींतील पत्र

२ सूर्याजीनें त्रिंबक किल्ला सन १७५१ च्या डिसेंबरांत घेतला त्यानंतरचें पत्र पहा खंड १ प्रस्तावना पृ ११५

* मूळांत ' राचा ' असें आहे

मनसबे राजकारणें घाटितात करवीरवासीस आणावें ऐसेंही म्हणतात आम्हावरही कृपा दाखवितात मळमळीत आहे तुम्ही हरप्रकारे तेथील निकाल काढून माळवें, बुंदेलखड, भदावरचा बदोबस्त करून ज्येष्ठ, आषाढमासीं जरूर निघोन यावें दिल्लीकडे गडबड पडली यामुळें इकडे कोणी तोड या दिवसांत करीत नाहीं तुम्हीं तों येणें येथें या कलहामुळें बाहेरील घरांतील फौज फार मिळाली देश लुटला पोटास नाहीं मिळालें तेंही कळतच आहे याउपर वसि पचवीस× वैशाख अखेर येऊन पावले तरच स्थीत राहील नाहीं तर रहात नाहीं कमाविसदारांनीं सवगाईचे निमित्यें पाय पसरले आहेत याचीही चौकशी जरूर करणें तिकडूनही ऐवज येईलसें करणें घरांत बाहेर सर्व भरवसा तुमचा आहे विस्तार काय लिहिणें छ ७ राबिलाखर बहुत काय-लिहिणें हे आशीर्वाद

---

ले ९७ }
[ ३९४ ]

{श १६७३ फाल्गुन शु ९
ता १२-२-१७५२

श्री

आशीर्वाद उपरि येथे घराऊ प्रकार फार कठीण आहेत याचा तपशील लिहितां येत नाहीं तुम्ही खामखा मल्हारबाचें इमान व आपला खासा निश्चय हाच करणें कीं, हजारों प्रकारें मातबरांनीं, ल्हानांनी लिहिले तर तें सर्व एकीकडे ठेवून, येथें आल्यावर जो आमचाच मनोदय असेल त्यास शफतपूर्वक अनकूल वर्तावें या पत्राचा भरवसापूर्वक उत्तर आलिया आम्हास सतोष आहे या पत्राचें उत्तर आलियावर तपशील लिहून पाठवू हे आशीर्वाद

---

ले ९८ }
[ ३५५ ]

{श १६७४ चै शु ३
ता ७-३-१७५२

श्री

राजश्री जयाजी शिंदे गोसावी यांसि

आशीर्वाद उपरि बिघाड झाल्या पूर्वी दोन तीन पत्रे पाठविलीं, बिघाड जाल्यावर पांच सात पत्रें पाठविलीं, परतु तिकडील मनसऱ्याची तोडमोड करून आलीकडे आल्याची खबर न आली, व पत्र तों येतच नाहीं असो तुमचे मनसब्यास बरें वाटेल तें करितां आम्हांस शिष्टाचारास मात्र लिहितां कीं, जे आज्ञा होईल त्या प्रमाणें वर्तणूक करू ऐसें दिसोन आलें याचा तपशील समक्ष एकांतीं याल तर बोलू येथील अर्थ अद्याप लिहितों जे ईश्वर तुम्हास बुद्धि देईल त करा मोगलाची चित्त शुद्धि नाहीं ताराबाईची चित्तशुद्धि नाहीं फार फौज मिळाली अबरू मात्र शेवटीं राहिली परतु देश अगदीं गेला रुपया एक

× वसि पचवास लक्ष हें सर्व पत्र नानासाहेबांच्या हातचें आहे या पत्रावरून नानावर त्यावेळीं प्रसग कसा गुदरला होता तें ध्यानीं येईल

१ पत्र नानासाहेबाचें जयापा शिंद्यास ले ९६ पहा

नाहीं पन्नास लाख कर्ज नवें जहाले गुजराथेस चिरंजीव दादा गेले, सर्व वसूल त्यानीं नेला रुपया एक मिळणार नाहीं लोकांस खानगी नाहीं घोडीं पडला, या विचारें लोक दारीं बसतील कर्जदाराचीं दिवाळीं निघत चाललीं या उपर पंचवीस तीस हजार ऐवज आला तर उत्तम नाहीं तर स्थित रहात नाहीं हरतजविजीनें कांहीं तोडमोड करून खामखा यावें येथे कोणाचा वसवस तिळमात्र न करावा तुम्हीं [ व ] मल्हारजी [ यांणीं ] एकच निश्चय करावा कीं एकांतीं सर्व आशय आम्हास पुसावे जें सांगू तें ध्यानात आणून तदनुरूप करावें ऐसें केलिया तिळमात्र गुंता सशय नाहीं हे पुर्ते जाणून खामखा यावें यदा तुम्ही ज्येष्ठमासीं न आलेस तर आम्ही फिरोन पत्र तुम्हास लिहिणार नाहीं छ १ जमादिलोवल हे आशीर्वाद×

---

ले ९९ } [ १६१ ] {श १६७४ चैत्र व ८ {ता। २७-३-१७५२

॥ श्री ॥

पु॥ राजश्री मल्हारजी होळकर व राजश्री जयाजी शिंदे गोसावी यासि—

आशीरवाद उपरि नासरजगास हिदायतमोहीदीखानाकडे १ पठाणानीं भेदून नासरजगास मारले हिदायतमोहीदीखान औरंगाबादेकडे येऊ लागला तेव्हा आम्ही जसी केली औरंगाबादेजवळून रुपये घेतले याजमुळें मोंगलानें विषम मानिलें तेव्हा तुम्हीं जयनगरापाशीं होतेस तेव्हा वारवार पत्रें पाठविलीं कीं, गाजुदीखान इकडे येतील तर उत्तम तुम्हीही यावें सा सुभे दक्षिण सोडवावी अथवा गाजुदीखानास आणावें त्यास स्थापावें त्यापासून एखादा तरी निदान सुभा घ्यावा कर्ज वारून घ्या [ वें ] येणेप्रमाणें करावें तेव्हां तुम्ही न आलेस, वजीराचे कामावर ३ गुतत चालल्म आम्ही खामखा आणावें तर तुम्ही २ कामास चाललेस श्री इच्छेनें हिदायतमोहिदीखान व पठाण भाडून हिदायतमोहिदीखान मेला आम्ही जवळ गेलों परतु मागें बापू ४ भिवराव मोडले याजमुळें शह पडला व आम्हाजवळ फौज थोडी सोबत्याचा भरवसा नाहीं उन्हाळा दिवस जानोजी निंबाळकर तेव्हा केवळ रामदासपताचे लेकें ५ त्यांनीं थोडया बहुतावर आम्हास समजाऊन त्याजवर उपकार करून मजकूर विल्हे लाविला आम्हांस गाईकवाडास जरब देण जरूर यास्तव आम्ही दरमजल साता-

---

× हें सर्व पत्र नानासाहेबाच्या हातचें आहे ह्याहि पत्रावरून पेशव्यांवर ह्या वेळीं कसा प्रसग आला होता ते चांगल कळतें

१ मुजफरजग

२ असा द्वितीयपुरुषीं अनेकवचनीं प्रयोग ह्या पत्रात बरेच जागा केलेला आहे

३ वजीराचें काम—अयोध्येचा सफदरजग याजला रोहिले लोकाचा सूड उगवावयाचा होता, तें काम

४ हे बापूजी भिवराव रेटरेकर पेशव्याचा सरदार गायकवाडाशीं लढला, तो काय ?

५ निंबाळकर फितूर झाल्यावरून त्यास असें म्हटलें आहे

रियाकडे आलों तुम्ही वजिराचे कामावर मोठी मेहनत, मोठें जोखींव केलें प्रांतही सुटला परंतु मनसब्याचा जवा बसवून काहीं पठाणास देऊन, काहीं आपण घेऊन, रंग भरून माळ-ब्यांत यावें, ते गोष्ट तेथील मुरवतामुळें न जाहाली एकदेशी मनसबा जहाला गायकवाडाचें पारपत्य केलें तुम्हास नाना प्रकारें लोकांनीं दर्शविलें कीं,यानीं बेइमानी, *दगाबाजी केली परंतु ईश्वर साक्ष आहे मोठे मोठे मराठे, मोठे कारभारी, यानीं त्याचे घर बुडविलें. नाहक चढीं लाविलें आम्हाशीं कबूल करून मागती चौथे दिवशी फिरावे यामुळें बदीखाने, गड सर्वही प्राप्त त्याचे कर्मानुरूप प्राप्त झालें असो, एतद्विषयीं विस्तार कशास ? परंतु आई-साहेबाशीं विरुद्ध वाढलें आईसाहेबाचे मतें सर्व प्रकारे आम्हांस मोडावें, रामदासपताचे पुतण्यास पेशवाई द्यावा त्यानीं आम्हास बुडवावें, दाभाडे याणीं त्यास मिळावें, प्रतिनि-धींनीं त्यांस मिळावें, रघोजीभावानीं त्यांस मिळावें, ऐसा पूर्ण भाव पावसाळा हीं राज-कारणें परस्परें शफथपूर्वक घाटलीं परंतु आईसाहेबांस गडावर एके दिवसाचे खावयास नाहींसें जाहलें, याजमुळें बाह्यात्कारें मात्र आम्हांशीं सलूख करून खालीं उतरलीं आम्ही विचार केला कीं, केवळ विरुद्धाचा लौकिक आहे तो वारावा मनात काहीं तरी त्यांचे असो जशी आमची क्रिया असेल तसें फळ आम्हास होईल जशीं तीं चालतील तसे आम्ही चालू. ऐसा सिद्धात करून सलूख केला प्रतिनिधीस प्रतिनिधी करार केली परंतु आंत सर्वांचे मन सबे घालून तयार जाले आम्ही पचवीस लक्ष कर्ज मात्र नवें करून फौज नवी पधरा व जुनी चाळीस येणेंप्रमाणें ठेविली त्या उपर रामदासपंत आले प्रथम आमची फौज जमा झाली

---

* ताराबाईच्या कारस्थानांत गायकवाड सामील झाले म्हणून त्यांस पेशव्यानीं विश्वासघात करून कैद केलें, हा जो आरोप पेशव्यावर आहे त्याचें निराकरण येथें त्यांनीं केलें आहे

६ कबूल काय केलें होतें व फिरलें कसें हें येथें स्पष्ट लिहिलें नाहीं दुसरे कोठेंही ही गोष्ट लिहिलेली आढळत नाहीं तथापि गायकवाडानें काहीं धरसोड केल्यावरून त्यास कैद करणे प्राप्त झालें असा ह्या पत्राचा आशय स्पष्ट दिसतो

७ ह्यावरून ताराबाई व दुसरी मडळी मिळून बाळाजी बाजीरावास पदच्युत कर-ण्याचें कारस्थान उभें केलें व त्यांत हैदराबादकरांचा दिवाण जो रामदासपत त्यासही सामील केलें होतें असें दिसतें रामदासपत ( राजा रघुनाथराव ) यानीं ताराबाईकडे बोलणें लाविलें होतें व त्याचें पत्र गोविंदराव चिटणीस यांचे हातीं पडलें यावरून हीं गुप्त मसलत पेशव्यांस कळली, इतकेंच ग्रां० ड० लिहितो पत्रांत आशय काय तें लिहीत नाहींत पताच्या पुत-ण्यास पेशवाई देण्याच्या बेताबद्दलही तो काहीं बोलत नाहीं

८ दाभाडे, गायकवाड, भोसले,प्रतिनिधि हे सर्व पेशव्याच्या घराण्याचें बाईट पहा-णारेच होते

९ येथें ' हजार ' ह्या शब्दाचा अध्याहार समजावयाचा

नव्हती छावणी घातला दुसरें जुझ उत्तम झालें त्याजवर सलाबत बसली इत्यादिक [मजकूर] जगविख्यात व इक्बाल पत्रावरून तुम्हास अवगत होत गेले वारवार लिहिलें कीं, "लक्षा प्रकारें यावें वजिराची अब्रू [११] राखिली व आमची गमावली हें कामाचे नाहीं तुम्ही दौलतेचे स्तंभ[१२], राज्यात खेळ फार झाले आहेत खामखा यावें जे मेहनत तुम्ही वजिराचे कामासाठीं केली ते मेहनत येथें येऊन जलदीनें कर्तेस तर बहुत लाभ होता परंतु तेथें कामामुळें व ईरेमुळें शह पडला तुमचें येणे, दोन महिने वाट पाहिली, न जहाले शेवटी जानबा[१३], सैद लष्करखान येवळ बजीद जहाले कीं, खामखा सलूख करावा तेव्हा सलूख केला त्रिंबक[१४] एका महिन्यानें यावा ऐसे कबूल केले का कीं, तुम्हांस पत्रे गेलीं आहेत तुम्ही यालच, तुम्ही आलियावर जे तुमचे विचारे होईल तें करावें व गुजराथचें काम अगदीं बुडत, खर्चास अगदीं नाहीं, मोगलांची आग भारी, सरदार कोणी मनापासून अगदीं मेहनत न करीत, एक चिरंजीव उभयतांना[१६] मात्र खटपट करावी ऐसे अनेक प्रकार घराबू जाणून सलूख केला परंतु अंतर शुद्ध नाहीं आम्हांजवळून रघोजी बाबा मोंगलाकडे गेले मोंगलांनीं त्यांस जाहागीर करार करून क्रिया घेऊन आपलेसें केले बापूजी[१७] नाईक याचें कर्नाटक काढून आम्ही घेतलें याजमुळें [ ते ] दु खी लटकें फटके बालून आशेस लावून दोन वर्षें आम्ही वोढिलें परंतु ते याउपर जाणार आईसाहेबाजवळून कर्नाटक करून घेणार रामदासपंताजवळून नालबदीस रुपये घेऊन तिकडे जाणार ते हे एकत्र होणार प्रतिनिधी ही वाढले गोविंदरायाचा[१८] सरजाम घेतला वरकडहा किरकोळ कामें केलीं शेर जहाले

---

१० या वेळीं बुसी फराशीस याचीं पलटणें रामदासपंताबरोबर होतीं

११ रोहिल्यास मोडून सफदरजग याचे हेतु सिद्धीस नेले व त्याचा आब राखिला त्यास उद्देशून हें लिहिणे आहे

१२ शिंदे होळकर पेशव्यांच्या उपयोगी कसे पडत व पेशवे त्यांस कसें जाणत हें यावरून स्पष्ट होईल "दौलतेचे स्तंभ हा गौरव योग्य असून सेवकाचे बाहू स्फुरविणारा होता यांत संशय नाहीं

१३ जानबा निंबाळकर सरलष्करखान हा औरंगाबादचा सुभा हा बाळाजीरावास व गाजुदीखानास प्रथम पासून अनुकूळ होता

१४ त्रिंबक येथील किल्ला पेशव्यांनीं घेतला होता तो परत नवाबास द्यावा

१५ बुसी मोंगलाकडे होता त्याचा तोफखाना फार जबर असल्यामुळें थोडक्या फौजेनें टिकाव लागेना हीं तह करण्याचीं कारणें लक्षात ठेवण्याजोगीं आहेत

१६ उभयतां चिरंजीव म्हणजे दादा व भाऊ

१७ बापूजी नाईक बारामतीकर याजकडे कर्नाटकाचा सुभा होता तो त्याजकडून बाहूनें काढून सदाशिवराव भाऊ यांस दिला होता यावरून नाईक हे पेशव्यांचे नातेवाईक असूनही त्याच्या वाइटावरच होते

१८ गोविंदराव चिटणीस असावे हे पेशव्यांच्या पक्षांत होते

त्यांचीं हीं राजकारणें कीं, नाईक आम्ही एकत्र होतों कर्नाटकास येतों रामदासपतानीं आणखी फिरंगी[१९] गाडदी ठेवावे खामखा आम्हावर मनसबा मागती करावा बाह्यात्कारें सलूख काहीं दिवस दाखवावा व मागें जानबा आमचे मित्रें[२०] पुणियात तीन महिने येऊन बसले नित्य आम्हास म्हणत कीं, " मोंगलाजवळ तुम्हा नवी जागीर मात्र न मागावी म्हणजे आम्ही त्याची तुमची पूर्ण निखाल [ स ] ता करून देतों " लहानसहानें[२१] आम्हास लिहीत कीं, " हें सर्व ल्टकें हे एकाएकीं येऊन तुमचीं घरें जाळतात " आम्हास वाटे कीं, ' लोक आफवेवर काय आहे ? व जानबा आमचे मित्र आहेत, सहसा आम्हास फसवणार नाहींत " शेवटीं जें जहाले तें दृष्टीस पडलें बहुत लोक म्हणतात कीं रामदासपतानें जानबा याच कामासाठीं पाठविलें कीं, तुम्हीं स्नेह मानून गाफील रहावें जानबा तों दाखवितात कीं, त्यानें लबाडी केली असो याचा अत ईश्वर जाणें एकदा मात्र तुम्हास लिहिलें होतें कीं, याउपर गाजुदीखानाचें येणें कामाचें नाहीं याचा आमचा स्नेह होत आहे परतु बिघाड झाल्यापासून निरतर हेंच लिहितों कीं " खामखा गाजुदीखानास आणावें वजीराचा लेक सुभा[२२] करून आणिला तर मागें कुचेदे दिल्लात करताल[२३] व येथें मोंगल, मराठे भेटणार[२४] नाहींत गाजुदीखान आलिया सहज पडेल मोंगल व मराठे मातबर सर्व बराणपुरावर येऊन भेटतील एक फिरंगी गाडदी नवी फौज मात्र रोहील[२५] पठाण[२६] कर्नाटकात बलावले आहेत महमद अलीखानें[२७] त्रिचनापल्लीस बळावला आहे सर्व गाजुदीखानास अनुकूल पडतील दुसरें, तुम्ही तिकडून, गाजुदीखान दहा पधरा [ हजार, ] आम्ही हिकडून, येणेंप्रमाणें मनसबा उभा रहाताच सर्व कामें होऊन जाताल साराश, रामदासपतानें अब्रू घेतली ही एकदा हरतजवाज करून त्यास पुर्ती जरब देणें घडल्यावाचून, तुम्हास कैलासवासी[२८] यानीं वाढविलें, व तुम्ही इराण तुराण पावेतों लौकिक केला तो सर्व व्यर्थ ! आम्ही हि रायाचे वशीं व्यर्थ जन्म घेतला[२९] या उपरि तुम्हीं खामखा

---

१९ येथें फिरंगी म्हणजे फ्रेंच

२० ' मित्र ' ही व्याजोक्ति आहे मित्र म्हणविणारे पण खरे शत्रु

२१ लहानसहान सरदार, जाहागिरदार

२२ वजीराचा लेक शुजाउद्दवला

२३ गाजुद्दीखान यांस आणिल्यास पाठीमागें ते दिल्लीस कारस्थान करताल असा भाव

२४ वजिराचा पुत्र शुजा यास दक्षिणचा सुभा करून आणिल्यास त्यास इकडील मुसलमान अगर मराठे अनुकूळ होणार नाहींत असा भाव

२५ फ्रेंच व दुसरी नवी फौज

२६ पठाण—हे कर्नोळ, कडपा व सावनूर येथील नबाब असावे

२७ महमदअली हा अर्काटचा नबाब

२८ बाजीराव बल्लाळ

२९ यावरून आपणास जो तह करावा लागला त्यानें व मराठेशाहींत रामदासपत जी ढवळाढवळ करीत तिनें बाळाजीरावास फारच सताप आला होता असे दिसतें

त्यांस[30] आणावें अथवा त्यानीं दसरा करून मागून यावें तुम्ही खामखा देशास यावें शपथपूर्वक हा मनसबा करावा तरच उत्तम आहे मागें यावें यावें हें लिहित गेलों, न आला आता त्याचा पुढील रग जाणून सर्व विस्तारें लिहिले आहे याउपर याल यांत सशय नाहीं या पत्राचें उत्तर यथार्थ सत्वर पाठवणें गुजराथचे कामास फौज गेली श्रीकृपेनें काम होत चाललें जेव्हा म्हटले तेव्हां जवळ आहे या उपर गाजुदीखानास पूर्ण भरवसा देऊन वजिराशीं लगीम[31] राखून शेवटीं न तोडिता दक्षणचे कामास उपयोगीं पडत ते करून यावें सर्वस्व वेचून एक्दा रामदासपत मोडावा ते आम्हावर मनसबा करितात यांत सशय नाहीं तुम्ही हलीं लिहिल्याप्रमाणें केलिया सहजच ते हतप्रभ होऊन मोठ यश तुम्हांस येतें या उपर तुम्हीं न आलिया मनसब्यास वाईट, मनास वाईट, यास्तव मनसबा सिद्ध करून यावें कदाचित् गाजुदीखान नामर्द, फौज न ठेवी, बाहेर न निघे, तर दुसरा कोणी पधरा हजारांचा धनी आणावा निदानीं तुम्हीं यावें येथेंही फौज फार आहे रामदासपतास तुम्ही आम्ही एकत्र जहाल्यास अगाध[32] नाहीं रघोजीबावाही येताल लाभही उत्तम होईल हें सर्व मनन करून उत्तर सत्वर पाठवावें येथेंही तरतू [ द ] करात आहों ऐवजाची मात्र मोठी वोढ आहे तुम्हा आलिया सर्व वारेल सांप्रत नवें वर्तमान कीं, त्रिंबक[33] आम्ही न दिला यासाठीं रामदासपत औरंगाबादेस येणार मग किल्लाही कदाचित् देणें पडेल जागिरीचा जाबसाल त्याकडूनही अद्याप जहाला नाहीं मोठा लबाड दगाबाज आहे साराश एकदा त्यास जरब द्यावी तरच सर्व सार्थक आहे छ २१ जमादिलावल लेखनसीमा पौ छ ३० जमादिलोवल[34]

---

ले १०० [ १०३ ] | श १६७४ वै शु ६ ता ८-४-१७५२

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बापूजी बाजीराव स्वामी गोसावी यासि

पो॥ बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनता उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें, विशेष तुम्ही पत्र छ २५ जमादिलोवलचें पाठविलें तें छ ३ जमादिलाखरीं प्रविष्ट जहालें आम्ही पलाशीहून कूच करून घाटावर आलों तों, सैद लष्कर-

---

३० गाजुदीखानास

३१ सफदरजगाशीं स्नेहभाव ठेवून

३२ रामदासपतास मोडण्यास कठीण नाहीं असा भाव

३३ कबूल केलें ( वर पहा ) पण देण्यास उशीर लाविला असा भाव

३४ हें पत्र मोठ्या कारस्थानाचें आहे पेशव्यांवर अनेक सकटें उत्पन्न झालीं असता त्यांतून साम दाम दड भेद यानीं ते त्यातून कसे पार पडले, वगैरे गोष्टी यावरून चांगल्या लक्षात येतील गाजुदीखानाच्या मसलतीचा हेतु हा होता कीं दक्षणचा सुभा आपले कब्जांत राहावा, किंबहुना पुढें मागें सर्व दक्षण आपले अमलांत यावी

खानेही रोजियांहून कूच करून पुढें आले बातमी राऊत घेऊन आले आम्ही तेच क्षणा कूच करून, सामाने बांधून खानासनिध आलों त्यास आम्हास अतर दो कोसाचें राहिलें तेव्हां खानानीं सांगून पाठविलें कीं, " आज तुम्हीं मुक्काम करणें, आम्हीही मुक्काम करतों तदो- त्तर तह झाला तर उत्तम नाहीं तरि दुतर्फा ही तयारीच आहे " म्हणोन त्याजवरून मुक्काम केला रा। बजाजी माधवराव व विठ्ठल सुदर सादतखानाचे दिवाण आम्हाकडे आले आम्ही आपले मुद्दे त्यास सांगितले ते त्यानीं खानास जाऊन सांगितले खान म्हणाले हे मुद्दे आम्हास मान्य होत नाहींत तेव्हां आम्ही तुटती गोष्ट सांगितली तुटतेंसे देखोन यानीं मुद्दे मान्य केले त्याच्या आमच्या भेटी जाहल्या परस्परें वस्त्रें घोडे दिल्हे म्हणोन लिहिलें तें कळलें ऐशास तुम्ही हिंमत धरून फार शिकस्त केली शाबास ! तुम्हीं केलें तें बहुत बहुत उत्तम केलें रगाच्या मोटा बहुत बाधाव्या ऐसें नाहीं अत पर तुम्हीं न वोढणें केलें तें सुरळीत करून तुम्हा येणें खान स्नेहावर, अतीं मुस्तकीम म्हणोनच हे गोष्ट रफे दफे जाहली अन्यथा अन्यत्रापासून होणें दूर नाहक कलहास कारण जाहलें होतें जुज मुकदमियावरून दीर्घ कलह प्राप्त होता वारापाणी जहालें व तुम्ही दम धरून केलें बहुत बरें केलें अत पर तुम्ही सुरळीत करून येणें मजकुराचे रजवदलीमध्यें खानाची मर्जी तोडून थोडक्या मुद्यासाठी नाखूश न करणें त्याची मर्यादा व स्नेहाची रीत बहुत सरक्षण करणें जाणिजे छ ४ जमादिलाखर बहुत काय लिहिणें हे विनती

---

ले १०१ } [ ३८४ ] } { श १६७४ ज्येष्ठ व ७ { ता २४-५-१७५२

श्रीशकर

पु॥ राजश्री जयाजी शिंदे गोसावी यासि

स्नो रघुनाथ बाजीराव आशीर्वाद उपरि तिकडील वर्तमान आठा पधरा दिवसां आड काशीदजोडी रवाना करीत जावी तें कांहींच लिहात नाहीं अपूर्व आहे दिल्लीकडील व पठाणाकडील काय वर्तमान, तुम्ही कोणत्या मनसुब्याचा डौल धरिला आहे, तो सविस्तर लिहिणे हिकडील विशेष वर्तमान तर ×रामदासपतास देवआज्ञा जहाली सलाबतजग पच-

---

१ सैदलष्करखान हैदराबादकर

२ रोजें—औरंगाबादेनजीक

३ रगाच्या मोटा बाधणे=आब राखणें, प्रतिष्ठा राखणें, ( सर्वकाळ ) वरावर गोष्ट घेणें हें पत्र वाचून बापूजी बाजीराव डोंगराएवढा झाला असेल ! सैदलष्करखान सन १७५२-५३ मध्यें कामावर असून सन १७५४ चे आरभी तो कारभारावरून निघाला सन १७५३ मध्यें त्याचें पेशव्याशीं वाकडें नव्हतें सन १७५३-५४ या दोनही सालीं जमादिलावलात पेशवा कर्नाटकात होता × ता ७ एप्रिल १७५२ रोजीं

महालात बंदराजवळ आहेत सैद लष्करखानास बलावणें आलें होतें ते शहराहून निघोन गेले सांप्रत याजवरच भार आहे आईसाहेबाची[1] अद्याप पुर्ती निखालसता जहाली नाहीं दरबारीं चार लुचे मिळोन आम्हाविशींचा संदेह घालितात दादोबा प्रतिनिधी सावनूरच्या मोगलापासून खंडणी घ्यावयास गेले होते त्याजवरून त्याचे मदतीस नारायणराव व्यंकटेश घोरपडे यास रवाना केलें प्रयोजन कीं, मोगलासहा चार गोष्टी सांगोन दादोबास तोंडघशीं पाडावें ऐसियाशीं सावनूरकर मोंगल त्याचा बक्षा बाहेर निघोन यास पिटोन घातलें तूर्त दादोबाचा आमचा थोडासा स्नेहही आहे आम्हाच सावनूरच्या मोंगलास सांगून व आपली फौज दुतर्फा डौल दाखवून फशीं पाडले, हें अद्याप दादोबास ठाऊक नाहीं वरकड किरकोळी वर्तमान विशेष नाह। आपलेकडील वर्तमान वरचेवर लिहीत जाणें, त्यासारखी अगोदर तर्तूद करून मनसबा करू कागद आमचे कोणास दाखवीत न जाणें छ २० रजब बहुत काय लिहिणे लेखनसीमा पै।। छ १८ साबान

---

ले १०२ [ ३९६ ]

श १६७४ ज्ये व १४
ता। ३१-५-१७५२

॥ श्री ॥

पुरवणी राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावी यासि

उपरि गाजुदीखान यास दक्षणेस यावयाचा हुकूम जहाला तयारी होणें ती होत आहे येविशाची सलाह पुष्टता देऊन येथून पत्रें पाठविलीं आहेत त्याजकडील हि संदर्भ आहे त्यास आम्ही पठाणाचे मसलतीस गुतलों अहों बहुतेक कामे आपले मतलब मवाफीक जहालीं अवशिष्ट राहिलीं तीं थोडकेच दिवसांत होतील येथील गुता उरकून गाजुदीखान याजकडील संदर्भ दढोत्तर करून त्याचें आगमन दक्षणेस होय तें करू म्हणोन लिहिलें तें कळले ऐशास एतद्विषयीं विस्तारें आलाहिदा लिहिलें आहे जेणेंकरून त्यांसि अथवा यांसि बेमानी पदरीं न येता कार्य होय तें करावें लागेल सलाबतजंग आमचें ऐकेनात तेव्हा तें जरूर केलें पाहिजे नाहीं तर ते आमचे भरंवाशियावर राहिलें, आम्ही गाजुदीखान तुम्हाकडून आणून त्याचें घर बुडविलें म्हणजे फिरोन आमचा भरवसा कोणी धरू नये, ऐसें होणार यास्तव आधीं यासि बोलावें, कार्य न होय तेव्हा बोलून चालूनच गाजुदीखानास आणावें. या डौलानें आपण करावें म्हणजे कार्यही आहे व लौकिकही उत्तम याखेरीज प्रकार जहाल्या युक्त नाहीं छ २७ रजब बहुत काय लिहिणें पै।। छ ४ रमजान लेखनसीमा

---

× हे पंचमहाल कोणते ?

१ आईसाहेब=ताराबाई साहेब

ले १०३ }
[ ३८३ ] }　　　　{ श १६७४ आषाढ व ३
　　　　　　　　{ ता १८-७-१७५२

॥ श्री ॥

राजश्री जयापा शिंदे गोसावी यांसि

आशीर्वाद उपरि आलिकडे तुमचें वेगळें पत्र येत नाहीं ऐसें नसावें तुम्ही गाजुदींखानासह ग्वालेरीस आलेस यास्तव बाहेर आषाढ शुद्ध त्रयोदशीस बाहेर निघालो फौज बलावू पाठवली पाऊस फार, नद्यास पाणी फार, याजमुळें कांहीं दिवस फौज जमा व्हावयास लागतील गाजुदाखानानीं पैक्याकडे न पहाता फौज ठेवावी हेच उत्तम आहे सलाबतजंगापाशीं फिरंगी यांनीं आव फार धरिला आहे पहावें किताक जमतात तुम्ही आपले कर्तव्याचें वर्तमान लिहिणें मल्हारबा तुम्ही निखालस राहून जो आमचा मनोदय आहे तो करावा याच गोष्टावर सिद्ध असावें येथाल वर्तमान तर ताराबाईकडील ठीक नाहीं दमाजी गाइकवाड बहुत सुरळीतपणें आहेत महादोबास समजावून आणिलें त्यांनीं आमचे मनास अनकूल चालावें, दुराग्रह तिलमात्र कोणेविशीं न करावा, आम्हा सर्व प्रकारें त्यावर कृपा करून त्याचे स्वरूपाप्रमाणें चाकरी घ्यावा गुा ही याच प्रकारें करार होऊन बराबर नेलें परतु नीट चाललें नाहीं यदा विचारावर आले आहेतसें दिसतें परिणाम ईश्वर उत्तम लावू वरकड अर्थ श्रीकृपेनें भेट सत्वरच होईल सविस्तर कळेल सर्व विशीं भरवसा तुमचा आहे विस्तार काय लिहिणें छ१७ रमजान हे आशीर्वाद पैा छ ३० रमजान

---

ले १०४ }
[ १६८ ] }　　　　{ श १६७४ आषाढ व ५
　　　　　　　　{ ता २०-७-१७५२

श्री

वेदशास्त्रसंपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामीचे सेवेशी

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान साष्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम तागाईत आषाढ वद्य पचमीपर्यंत यथास्थित असे विशेष आषाढ शुद्ध पौर्णिमा मंगळवारचें पत्र पाठविले तें वद्य चतुर्थीस पावलें लिहिलें वृत्त सायत कळलें दरगाह कुलीखान यास पत्र लिहून पाठविण्याचा मजकूर व याचेविशीं गाजुदीखान याचें पत्र दरगाह कुलीखान यास आण वावयाचा मजकूर लिहिला तो सायत कळला त्याजवरून दरगाह कुलीखान यास पत्र लिहून पाठविलें आहे हे त्यास प्रविष्ट करणे, व याचेविशीं राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे यांस पत्र लिहून पाठविलें आहे, व गाजुदीखान यास पत्र लिहून पाठविले आहे तेथूनही पत्र येईल साराश औरंगाबादेस खुदाबतखान व शेख अलीखान जुनदा [ ? ] व जमालबेगखान व अस्सलखान व हशमतुल्लाखान वगैरे आहेत, त्यांशीं सर्वांशीं राजकारणें करून गाजुदीखान बऱ्हाणपुरास येतांच साऱ्या शहरामध्यें गाजुदीखान याची द्वाही फिर-

वावी आणि सर्वांनीं गाजुदीखान याजकडे राजकारण लाऊन सामील व्हावें याप्रमाणें विचारणा होय तें करावें दरगाह कुलीखान तुम्हाशीं बोलले त्याप्रमाणें त्याचीं निष्ठेचीं पत्रें आमचे नाव व फेरोजजंगाचे नाव घेऊन पावून देणें परभारे हि पत्रे पाठवीत जाणें वरकड, प्रस्तुत बाहेर निघालो लोक जमा होत आहेत आठ दहा रोजात भीमा पार होऊ मराठियाशा जाबसाल आहेच पहिले पाहिलें लिहून पाठविलें त्याप्रमाणे खानास वरचेवर लिहून तेथून हरएक बाबानीं भोजन घेत व तेथेंहा सर्व सूत्रें गाजुदीखानाकडे अनुकूल पडत अशीं करावी याप्रमाणें लिहून उत्तर आणवावें ता। छ २० रजमान बहुत काय लिहणें लोभ असों दीजे हे विनति ×

---

ले १०५ } [ ८ ] }

{श १६७४ आषाढ व १० {ता २५-७-१७५२

॥ श्री ॥

पौ। आषाढ वद्य ३० बुधवार शके १६७४

× वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव दिक्षीत स्वामींचे सेवेशी

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम ता। छ २४ रमजान पावेतों यथास्थित असे विशेष आपण आषाढ व॥ ५ रविवारचीं पत्रें पाठविलीं तीं दशमीस शुक्रवारीं पावलीं वृत्त सायत कळलें सय्यद लष्करखान याचे कबिल्याचा मजकूर लिहिला तो कळला ऐसियास सय्यद लष्करखान सलाबतजंग याजपासून निरोप घेऊन आमचे भेटीस येत आहेत तरी शहराकडे न जाता आमचे भेटीस आले तर उत्तम आहे कदाचित् त्यांणीं आपले चित्तामध्ये आणिलें असेल कीं, मराठे सरदार आहेत, त्यास आपण समागमें घेऊन शहरास जाऊन शहरचा बंदोबस्त करू असें म्हणतील तरी आम्ही या प्रमाणें त्यास करू देणार नाहीं, व शहरास ही जाऊ देणार नाहीं ते परभारें उपद्याप करून शहरास गेले म्हणजे त्याचे कबिल्यास काय चिंता आहे ? सुखरूप शहरामध्यें असावें नाहीं तर त्याचें आमचें सौरस्य व घरोबा आहे त्या रीतानें म्हटलें तर त्यांचे कबिले ठेवावयास एखादें मातबर स्थल देऊन ठेऊ चिंता काय आहे ? गुदस्ता सैय्यद लष्करखान त्याचे चित्तामध्यें रामदासपताचे वर्तणुकेंकरून विपर्यास होताच परंतु यदा रामदासपत वारलियावर सलाबतजंग याचा पक्ष वरिला आहे, तरि तुम्ही सय्यद लष्करखान याजला बहुत प्रकारें लिहून पाठवून तो ग्याजुदीखान याजकडे संदर्भ लावीत, आमचे विचाराप्रमाणें वर्तत, ते गोष्ट करणें ये समयीं खानांनीं आमचे विचारें न वर्तल्यास तिलमात्र आमचा व खानाचा स्नेह राहत नाहीं, असा भाव तुम्ही दाखविणें खान हजारदां आम्हाशीं ग्याजुद्दी-

---

× गाजुद्दीखान ता। १६-१०-१७५२ रोजीं विषप्रयोगानें मरण पावला त्याच्या हयातींतील पत्र या पत्रावर पूर्वी पैवस्ती तारीख आषाढ शु ६ सोमवार शके १६७६ अशी होती ती चुकीची असल्यानें गाळली आहे

खानाचा प्रकार बोलले असता रामदासपंत मेले म्हणून आयते वेळेस फिरले, तर हें कसें कामास येईल ? याचा स्नेह परलोकीं कामाचा नाहीं हें विनति ×

ले १०६ [ ७ ] | श १६७४ आषाढ व १० ता २५-७-१७५२

श्री

पौ आषाढ वद्य ३० बुधवार शके १६७४

पुा वेदशास्त्रसपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामीचे सेवेशी

विनति गाजुदीखान छ ११ रमजानीं नर्मदा उतरून आलीकडे आले, म्हणून पत्रें आलीं, म्हणून लिहिलें तें कळलें पुढे वर्तमान आणखी येत जाईल तें वरचेवर लिहून पाठवीत जावें भागानगराकडील वर्तमान लिहिलें तें सायत कळले आपले विद्यमानें गाजुदीनखान याजला स्नेहाचा सदर्भ लावून भागानगर प्रात आपणाकडे करून घ्य वा मक्ता झाला तर करून देतील त्याप्रमाणें वर्षास देत जाऊ या प्रमाणें पत्रें आलीं म्हणून लिहिलें तें कळलें ऐसियास सय्यद लष्करखान आमचे भेटीस सलाबतजग याजपासून रुसक्त होऊन येत आहेत ते येथें आलियावरी त्यांची आमची भेटी जाहल्यावरी जो विचार होणें तो होईल दरगाहाकुलीखान याजविशीं आपणांस पत्र लिहिलें आहे त्याप्रमाणें पत्रें अगत्य पाठवून द्यावीं म्हणून लिहलें, तर येविशींचें उत्तर पूर्वींच आपल्यास लिहून पाठविलें आहे, त्याजवरून कळलेच असेल आपण लिहिला अर्थ तहकीक करून मागितल्याबद्दल मग सरदारांस लिहून याचा विचार करू आम्ही तो सर्वत्र ऐकतों कीं फिरगी[3] व खान मिळोन फार जुझावयाच्या गप्पा मारतात त्यास पुर्ता शोध करून जरूर लिहिणें जरूर गुप्त रितानें राजकारण शोध जरूर करून अली त्वरेने लिहीत असावें बहुत काय लिहिणें हे विनति

ले १०७ [ १३ ] | श १६७४ आषाढ व १३ ता २७-७-१७५२

॥ श्री ॥

वेदशास्त्र-सपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशी —

विद्यार्थी बाळाजी बाजीराऊ प्रधान कृतानेक साष्टांग नमस्कार विनती येथील क्षेम ताा आषाढ वद्य १३ पावेतों यथास्थित असे विशेष—आपण पत्र पाठविले तें पावलें दरगाह कुलीखान याजविशीं कित्येक प्रकार लिहिले व गाजुदीखान व राजश्री मल्हाराव होळकर व राजश्री जयाजी शिंदे यास पत्रे लिहून पाठवावीं म्हणून लिहिलें, तरि येविशीं पूर्वी

× पत्र या पत्राची पुरवणी आहे

१ भागानगर=हैदराबाद २ निरोप घेऊन, निरोपाचीं वस्त्रें मिळून ३ बुशी फराशीस

आपण पत्र लिहून पाठविलें होतें त्यावरून पूर्वींच पत्रें लेहून पाठविलीं आहेत तुम्हाही गुप्त प्रकारें सरदारास पत्र लिहिणें जे जे ये समयीं चाकरी करून दाखवितील त्यांचें बरेंच होईल यांत संशय × नाहीं आपण याचअन्वयें निशा करावी भागानगराकडील आपण वर्तमान लिहिलें पुढेंही जरूर तिकडील अंतर्बाह्य ठिकाणीं लावून त्वरेनें पावते करावें हे दिवस कामाचे फार आहेत व नर्मदा गाजुदीखान उतरले किंवा नाहीं, हेंही जलद लिहावें कोण इकडे तिकडे हें मनास आणून लिहीत असावें बहुत काय लिहिणें हे विनती

पौ श्रावण शुद्ध १ शके १६७४

---

ले १०८ [५] — श १६७४ श्रावण शु ९ ता २१-७-१७५२

॥ श्री ॥

श्रीमत राजश्री—भाऊसाहेब स्वामींचे सेवेशीं

विनती सेवक जयाजी शिंदे कृतानेक विज्ञापना येथील वर्तमान ता॥ छ १ सवाल पावेतों मुक्काम नजीक सिपाबरड स्वामींचे कृपावलोकनें कडून यथास्थित असे विशेष मजल दरमजल रेवापार आलियाचें वृत्त पूर्वीं विनतीपत्रीं सेवेशीं लिहिलें आहे, त्याजवरून विदीत जालेंच असेल स्वामींचे आज्ञेप्रो जलदानें येऊन पोहोचावें,परतु पर्जन्याचे अतिवृष्टीमुळें जागा जागा गुता होत गेला हल्लीं काहीशीं उघाडी जाल्यावर तिन्हीं लष्करें वार * उतरलों प्रस्तुत पर्जन्यही थोडका आहे याउपर जलदीनें चार पांच रोजीं ब्र्‍हाणपुरास दाखल होतों ब्र्‍हाणपुरचा बंदोबस्त होऊन येईल तदनुसार मागाहून सविस्तरें सेवेशीं लिहून पाठऊ वरकड निराळें पुरवणी पत्रीं सेवेशीं लिहिले आहे, त्याजवरून निवेदन होईल सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले १०९ [८५] — श १६७४ श्रावण शु ११ ता ९-८-१७५२

॥ श्री मोरया ॥

छ २६ सवाल

श्रीमत राजश्री भाऊसाहेब स्वामींचे सेवेसि—

विनती सेवक मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे कृतानेक विज्ञापना स्वामींचे कृपाव

---

× निजामउल्मुल्काचा ज्येष्ठ पुत्र जो ग्याजुद्दीखान यास हैदराबादची गादी मिळवून देण्याच्या मसलतीस अनुलक्षून हें पत्र आहे

* लष्करें=ग्याजुद्दीनखां, निजाम उल्मुल्काचा वडील मुलगा, यास हैदराबादचा सुभा बनविण्याकरितां शिंदे होळकर घेऊन दक्षिणेंत येत होते त्या वेळचें हें पत्र आहे तीन लष्करें शिंदे, होळकर व खुद्द ग्याजुद्दिन याचीं वार=पार असावें

लोकर्ने करून ता। छ १० शवाल रेवातीरी यथास्थित असे विशेष स्वामींकडून आज्ञा पत्रे सादर जाला त्याजवरून लेखनार्थ सविस्तर कळला उत्तरें निराळे पुरवणी पत्रीं सेवेशीं लिहिलीं आहेत त्याजवरून सविस्तर निवेदन होईल आम्ही व नबाब × निजाममुलक सहवर्तमान नर्मदातीरास येऊन पोंहोचलों या उपर सारे लष्कर लौकरच पार उतरोन येत असो स्वामींना तिकडून फौज जमा करवून पुण्याहून कूच करून आलीकडे अविलंबें आलें पाहिजे आम्ही बऱ्हाणपूरचा बदोबस्त करून येतों मग पुढील बदोबस्त होणे तो उत्तमच होऊन येईल स्वामीच्या विचारानुरूप साऱ्या गोष्टी होतील वरचेवर आज्ञापत्रें सादर केली पाहिजेत सेवेशीं श्रुत होय हे विज्ञप्ती

---

ले ११० [ ३८९ ]

श १६७४ भाद्रपद व १४
ता। ६-१०-१७५२

श्री

पु।। राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावी यासी

उपरि राजश्री रामचद्र जाधवराव यासमागमें सरदार मनसबदार आहेत त्यास नबाबाचे इजायेतनामे यावे म्हणोन मानिलेनीं लिहिले आहेत सरदार —

१ मालोजीराजे घोरपडे मुधोळकर
१ भालेराव पाढरे व गुरुबक्ष पाढरे
१ मनग्या नाईक व किलीच नाईक जमीदार देवदुर्ग
१ रायाजी भोंसले
१ आनदराव जमीदार पो। कमरनगर ऊर्फ कर्नोल
१ गिरजोजी हाके
१ शाकरमा जमीदार पो। अदोल
१ भूपाळराव निंबाळकर
१ कृष्णाजी नाईक निंबाळकर
१ मकरदसिंग नाईक निंबाळकर
१ पामनाईक बहिरी जमीदार पो। वागनगिरा वैगेरे
१ लक्षमकाजे व जेमकरंडी जमीदार पो। कानकूर्ती
१ रामराव जामीदार गदवाल
१ अगाजा सलगर
१ राजे अजेचद खदारकर
१ महापतराव निंबाळकर
१ येशवतराव निंबाळकर

येणेंप्रमाणें सरदारास इजायतनामे पाठविणें कीं, राजे रामचद्र जाधवराव यांस इजायेतनामा पाठविला आहे तरि तुम्ही त्याजपाशा येऊन त्याचे हमराहा मुलाजमत करणें म्हणोन इजायेतनामे नबाबाचे पाठवणें छ २७ जिलकाद बहुत काय लिहिणें लेखनसीमा

---

× हा निजामउल्मुल्क याचा वडील मुलगा ग्याजुद्दीन होय मागें ले १०८ पहा

ले १११ } { श १६७४ आश्विन शु ८
[ ३०५ ] } { ता १५-१०-१७५२

॥ श्रीशंकर ॥ ( गंगा )

राजश्री जयाजी शिंदे गोसावी यांसि

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—स्नो हणमंतराऊ निंबाळकर राम राम विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशळ लेखन करीत गेलें पाहिजे विशेष सांप्रत वर्तमान ऐकिलें कां + + + श्री उतरोन आलीकडे राक्षसभुवनापाशीं आले गावगन्ना चिठ्या, घासदाणियान्या जाल्या व तमाम जिराईत सजगुरे वगैरे कापून घोडियाशीं नेतात पलीकडे लष्कर होतें तेव्हांही अगदा थडीचे गाव लष्करचे मुक्कामाखालें उठले जिराईत गेलें सांप्रत आलीकडेही ऐसेंच होत आहे त्यासि बीड प्रगणा आमची जागीर,ते आपली आहे दुसरा अर्थ आहे ऐसें नाहीं गावचे गांव उठले व जिराईतही कापून नेतात ऐसें जालें तेव्हां सर्वस्वे नुक्सानी आहे याजकरिता हें पत्र आपणास लिहिलें आहे व राजश्री केदारजी लेहणे पाठविले आहेत, हे कितेक अर्थ सागतील, त्यावरोन कळों येईल तरि चित्तावर धरून गावगन्ना चिठ्या केल्या असतील त्या मना कराव्या व लष्करात ताकाद करून जिराईत, जोरी, बाजरी कोणी कापून न नेत ऐशी गोष्टी करून मुलकाचें संरक्षण होय, कोठें आजार न लागे तें केलें पाहिजे आपला आमचा स्नेह आहे म्हणून लिहिलें असे रा॥ छ ७ जिल्हेज बहुत काय लिहिणें × × × आमचा मुलूख खराब जालियानें आपणासही समाधान आहे ऐसें काहीं नाहा जागीर तुमचीच आहे आणि सर्वस्वें आपले स्नेहाची जोडी आहे तरि चित्तीं धरून मुलकाचें संरक्षण केलें पाहिजे कृपा असो दाजे हे विनंती मोर्तबसूद

| |
|---|
| श्री शिवचरणीं तत्पर बापूजा सुत हणमंतराव निंबाळकर |

---

ले ११२ } { श १६७४ आश्विन शु १४
[ ३६७ ] } { ता २२-१०-१७५२

पौ॥ छ २९ रबिलोवल रविवार ॥ श्री ॥

राजश्री दत्ताजी शिंदे गोसावी यांसि

छ सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्ये स्नो रघुनाथ बाजाराव आशीर्वाद उपरि येथील कुशळ जाणून स्वकीय लिहीत असलें पाहिजे विशेष अबदाली पठाण याची आमद[२] आमद गरम आहे त्यास तो आला नाही तों आपण भारी होऊन

२ आमद आमद गरम आहे=तो जलद चालणारा आहे

रहावे म्हणजे उत्तम तरि तुम्ही जलदीने येणे ऐशीं पत्रे पेशजीं लिहिलींच आहेत त्याज-वरून तुम्हीं यावयाची तर्तूद केलीच असेल व हल्लींही लिहिलें असे तरि याजउपरी तुम्ही जलदी करून लांब लाब मजली करून बहुतच त्वरेनें येणे रा। छ १४ जिल्हेज

---

ले ११३ }
[ १०२ ]}

{श १६७४ मार्गशीर्ष शु ४
{ता। १०-१२-१७५२

॥ श्री ॥

राजश्री बाळाजी पंडित प्रधान दाजी गोसावी यासि—

छ सकळगुणाळकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य-स्नो मानाजी आंगरे वजारतमाब रामराम विनती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे विशेष आपणाकडून राजश्री अंताजी बाबाजी पत्रे घेऊन आले आपले सांगितल्याचा अर्थ निवेदन केला स्वहस्ताक्षरें लेखनान्वय श्रवण करून घेतला नंतर विश्वास पूर्वक स्वस्थ असता रेवदंडे यांत येऊन कर्म आचरलें तो वृत्तांत व चिरंजीव राघोजी आंगरे आपले आश्वासेन व मागाहून राजश्री साबाजी प्रभु तदुत्तर अंताजी बाबाजी सपादोन आलि-याचे संतोषवृत्त लेहून पत्रें पाठविलीं तीं हुसेनखान मिरधे घेऊन आपणाजवळ जाऊन, पाव-लींच असतील आपले विश्वासवचनावरि सर्व खेद परिमार्जनांत आणोन, समजोन आपले कृपेची अभिवृद्धि निशापूर्वक करून घेत जावी, याच कृतसंकल्पावरि आपणाकडील सौख्याचे विभागाची संध्या प्रतिक्षा न करिता आजि समयीं मोंगलाचे शहाकरिता आपली स्वारी जहालियामुळे इकडील मामले याविशीं आम्हास कितेक प्रकारें सुचविलें ते स्वहितास उचितांत म्हणोन, अस्मतभागी शत्रुवर्ग प्रसिद्धपणांत आहेत त्यांत फिरंगीं याची आवाई दिवसेंदिवस येत चालली निमित्य अगोदर सावध असावें म्हणोन आरमारच्या तयारीनिशीं बातमीत राहिले याचें वृत्त साकल्य लेहून गेलेंच असे आम [ चे ] कडेस फिरंगी याचे वृत्त आलें, प्रमाण अप्रमाण असो म्हणून खासाच आरमारावरि चढोन बाहेर स्वारी केली अगोदर कळता रेव-दंडे यांत राजश्री नारायण खंडो कारकून इतबारी जाणून सुचनेस पाठविले खासा आम्हीच आरमारावरि गेलों फिरंगी कदाचित् आमचे [ ? ] तरि सर्व मामलेदारी आमचे युक्तीस मिळोन एकत्र विचारांत येऊन शत्रूस पराभवांत आणावें याच्याही युक्ति योजोन ठेविल्याच होत्या कीं, जलमार्ग आरमाराच्या जोऱ्यानें आगमन होतां त्यास प्रति मप्यता [ बध्यता ? ] न जहालियानें सर्व साहित्यानशी खुषकीस जाता त्यास गुंता पडणार नाहीं याजकरितां वसै, साष्टी, रेवदंडे देखील आरमार एकत्र करून फिरंगी आल्यानंतर कावे, दावे, खेळोन मुकाबल्यास प्रतिमल राहून आंगावरि ओढोन संपूर्ण दर्यातच वेध ओढोन घ्यावा समयीं फिरंगी तडीस लागो जातो आम्ही पाठीवरी जातांच क्षणीं तडीस उतरावयाचे अवसान सहजांतच खता पाऊन आमचे मुकाबलेयास येईल आलियावरि आम्ही बाहेर पडत आलि यावरि तोही येतच जाईल ऐसें ही असोन रेटाई करून तडीस सामान सुद्धा उतरावयासि

---

१ याचा संबध याच ओळींतील ' सपादोन ' ह्याकडे आहे २ मागील ले ३९ पहा

लागलाच तरि त्याचे आरमारात मुख्य जोरा थोरले तरांडियाचा, ती तराडी तडीस जाणेंच नाहींत ल्हाना तरांडियावरून तडीस जावयाचा सबब पडोन जाईल तेव्हा जुजारू लोक सामान देखलि तडीस उतरावायावरि तरांडी सहजातच खालीं पडो पहातील त्यांजवरि आपले आरमाराची नेहटबाजी, व खुषकीस उतरू लागतील त्याजवरि खुषकीचे लोकाची नेटबाजी, ऐसा एकावन्छेदेकरून येलगार करावाच करावा ऐसा व आणखीही विचार समयीं सुचेल त्याप्रो सर्व एकरूपतेनें व आरमार एकत्र होऊन कर्तव्यात आणावें याचे विचारें-करून बाहेर स्वारी केली ल्हान थोर मिळून साठ शिलशिला आरमाराचा फिरता ठेविला ऐसें केलें असतां राजश्री **रामाजी महादेव** पराक्रमी विश्वासघातकी निर्माण आहेत दुसरे **नारो त्रिंबक तळेकर, रामाजी महादेव** याचे साम्यतेस होउन किल्ले **सागरगडीं** कार्तिक वद्य द्वितीया गुरुवारीं पहाटेस बारा पथराशे लोकानिशीं शिड्या घेऊन **वजरटोक** म्हणोन दक्षणभागीं असे तेथें जाऊन शिड्या लाविल्या किल्याची चौकशी आहे तैशाच होती त्यांणीं शिड्या लोटिल्या दगडी घालिता अवसान खता होऊन श्यामवदन केलें मोड जाहला परकीयाकडाल *असते तरि मोडाचे पाइकावरि स्वारी गेलियास जाऊ पावते ऐसे नाहीं तत्राप आचरणाप्रमाणें पारिपत्य करावें तरि ते कर-णार, आचरणार लघुकर्म आचरोन गेले परतु मोड पाहून मारिले, धरिले तरि तोही लौकिक या समयात पराकियांत उत्तम नाहीं हेंचविशीं कळक अगोदर सर्वांस्र ताकीद आहेच कीं, सावध राहून रक्षावें बुद्धिपुर सर क्षितीस पाठीवरि न जावे तदनुरूपच वर्तणूक होऊन सात शिडिया सोडविल्या शिडिया लाविता बकरे मारिले तेही सांपडले तळेकर लोक फिरून जाता **रेवदडे** समीप पळा पाहून **रेवदडा** गेले तेथून **तळेंयास** गेले याप्रो मामलेदाराचें आचरण आणि आपले तो विश्वासपूर्वक आश्वासन आणि परिणाम या प्रकारें तेव्हा काय करावें ? आपले विश्वासवचनावरून आम्ही स्वस्थ, यामुळें कपाटियास भास होतो कीं, विश्वासास प्रवर्तले आहेत, यातच सध असे ऐसें समजोन **माणिकपुरास** दगा दिल्हा हल्लीं आपले कृपेची निखालसता सर्वत्रास कळल्याप्रमाणेंच किल्याचेही लोक विश्वास मानोन वर्तत असत तरि सध्या दगाबाजी जहालीच होती कीं नाहीं अनभवास येत गेल्याप्रमाणें साकल्य ल्याहावें लागतें लिहिता तपशील सुद्धा लाबतो, परतु लबायमान मजकूर पाहून समयीं श्रवण करून घ्यावयाचा अनादर केला तरि तोही खेदच म्हणावा असो, आमचा एक निश्चय कीं, आपले ऐसें म्हणून आहो त्यास अतर नाहीं अत पर आपले विचारास येईल तदनुरूप उपद्रव कर्त्यास जांजीत केलें तऱ्ही उत्तम, न केले तरी उत्तम, आपला अवलब समजोन मानानें आहोंच घडलें वर्तमान साकल्य कळावें म्हणून लिहिलें असे **फिरगी** याचे आगमनानतर युक्तिप्रयुक्तीची योजणूक आमची आम्हां जवळ राहिली असे लिहिला पाल्हाळ एव्हां वृथा असे समयीं घडेल तेव्हां खरें आवाइप्रमाणें आगमन जहालें आपले सामर्थ्या-वरून निरतर शोधांत आहोच वरकड दाजी आपले आम्ही म्हणवीत असतां आमचे पाठीं

* येथें शिक्का बाजूवर आहे

एसा विचार उपद्रव असावा, परकियात लौकिक आणिकासारिखा रुढीस यावा, हाच मात्र खेद वाटतो बरें, याचे निराकरण करणार आपण आहेत विस्तारें किती म्हणून ल्याहावे ? न ल्याहावें तर कोणास ल्याहावे ? यास्तव सविस्तर जाहलें वृत्त लिहिले असे बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे रा। छ ३ माहे सफर हे विनंती—( मोर्तबसूद )

---

ले ११४ } { श १६७४ पौष व ७
[ १४ ] } { ता। २५-१-१७५३

श्री

वेदशास्त्र-सपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशीं —

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान-साष्टाग नमस्कार विनती उपरी येथील कुशल तागाईत पौष बहुल पचमी गुरुवारपर्यंत स्वामींचे आशिर्वादें करून यथास्थित जाणोन स्वकीय लिहीत असलें पाहिजे विशेष-आपणाकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरि सविस्तर लिहीत जावें इकडील वर्तमान तर नबाबांनीं फिरंगी याच्या विद्यमानें आम्हांशीं सल्ला केला हे दु ख सर्वा अमिरांस होऊन बिघाड करावा हे इच्छा करितात परतु जीव कोणात आहे ? सर्वही निर्माल्य ? पदरचा पैका वेचावा जातीनें हिंमत धरून करावेंच करावें, हे गोष्ट कालेंकरून कोणातही राहिली नाहीं खान आदिकरून सर्व[३] * * बाबुजी नाईक सातारियास जाऊन आईसाहेबाचे विचारात मिळाले आमचा अपकर्ष इच्छितात, आमच्या सरदाराकडे येऊन, बुद्धिभेद करून त्यास सातारियास न्यावे, या विचारियास आले होते परतु सरदार गेले नाहींत नाईक माघारे गेले असो नाईकाचेविशीं आमचे चित्तात तो काहीं नवतें असो त्याही होऊन गडबड मांडिली आहे ते आपले कर्मानुरूप फळ पावतील वरकड आईसाहेबाचा विचार तरि आमचे न्यून पहातात सरदाराशीं भेदभाद करितात मोगलाईत राजकारणें करितात कोणे प्रकारें आमचें वाईट व्हावें, या विचारात आहेत ईश्वरच आमच्या बऱ्यावर असल्यास त्याणीं वाईट इच्छून होणें काय ? व वरकडानीं पाचपेंच करून होणें काय ? चिरजीव रा दादास फौजेनिशीं गुजराथेस रवाना

---

१ नबाब=सलाबतजग २ फ्रेंच सरदार बुसी

३ येथें मुळांत सुमारें दीड ओळ मजकुराची जागा कोरी टाकिलेली आहे

४ बारामतीकर हे पेशव्याचे नातलग असून वनकोहि होते बाजीराव मरण पावल्यावर बाबूजी नाइकास पेशवाई द्यावी अशी रघुजी भोसल्यानें शाहूच्या दरबारीं बरीच खटपट केली, परतु ती सिद्धीस गेली नाहीं तेव्हांपासून नाईक व भोसला हे दोघे हि बाळाजीचा द्वेष विशेष करू लागले

५ आईसाहेब=ताराबाई शाहू वारल्यानतर हिचा नातू रामराजा सातारच्या गादीवर बसला परतु बाई मोठी खबरदार बायको असल्यामुळें स्वत राज्यकारभार पहावा व पेशव्यांची सत्ता काढून टाकावी म्हणून तिनें बरीच ढवळाढवळ केली ह्या गोष्टीस उद्देशून वरील लेख आहे

केलें ते गंगातीरांनींच गेले असतील तिकडील मुलकाचा बंदोबस्त करून पुढें जातील· आम्ही हरपनहली समाप पावलों श्रीरंगपट्टण, सोंदे, बिदनूर [ हीं ] स्थळें पैकियाचीं आहेत एकाएकीं भलती गोष्ट आम्ही करीत नाहीं का कीं मागील पेंचपांच बहुत आहेत मागील अर्थ पाहून जसजसा विचार करणें तसा कारितो आपले आशीरवादें करून सर्व शत्रु शमता पावोन जो लाभ होणें तो होईल चिंता नाहीं स्वामींनीं तिकडील वर्तमान निरंतर लिहीत जावें यथार्थ वर्तमान व अति विशेष अनहितकारी जें असेल तें जरूर ल्याहावें व चिरंजीव दादासही ल्याहावें सर्व स्वामींचे आशीरवादें नीटच होईल आपणही तजविजीनें सभाळीत जावे छ० १९ रबिलावल हे विनंती

पौ माघ वद्य १३ शुक्रवार शके १६७४ अंगिरानामसंवत्सरे

---

ले ११५ [ ३८१ ] } {श १६७४ माघ शु ३ ता ६–२–१७५३

श्री

राजश्री जयाजी शिंदे गोसावी यासि

आशीर्वाद उपरि कित्येक बोलणें आहे त्यास तुम्ही भोजन करून लौकर येणे रा छ २ रविलाखर राजश्री रामाजी अनंत यासि आधीं पुढे पाठवून देणें मागाहून तुम्हीं बहुत लौकरीच येणें जाणीजे छे मजकूर लेखनसीमा

---

ले ११६ [ २८ ] } {श १६७४ फाल्गुन व ८ ता २७–३–१७५३

॥ श्री ॥

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशी—

विद्यार्थी रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती उपरिं येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे विशेष स्वामींनीं आशार्वाद पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहालें लिहिला अर्थ सर्व कळला तीर्थस्वरूप राजश्री नानासाहेबीं पत्रें आपणाकडे रवाना केलीं ते पण अजुरदार कासिदा हरी आम्हाकडे पाठविलीं तें पावोन लेखन अर्थ कळला त्याचीं प्रत्योत्तरें लेहून पाठविलीं आहेत तीर्थरूपांकडे रवाना करावीं आपल्याकडील वर्तमान वरचेवर लिहीत जावें छ २१ जमादिलावल बाबुजी नाइकाकडील वर्तमान लिहिलें तें कळलें सर्वदा वर्तमान लिहीत जावें येथील वर्तमान तर अहमदाबाद झुजत आहे आपल्या आशीर्वादें लौकरच येईल हे विनंती कासिदास कांहीं दिलें नाहीं हे विनंती

प्रौ छ १३ जमादिलाखर सन ११६२ चैत्र शु॥ १५ मंगळवार

---

१ हें सर्व पत्र नानासाहेब पेशव्यांचे हातचे आहे

ले ११७ }
[ ३४० ] }

{श १६७५ चैत्र व १०
{ता २८-४-१७५३

॥ श्री ॥ पै। छ २५ जमादिलाखर प्रहर दिवस

राजश्री रामाजीपत भाऊ गोसावी यासि

छ अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नो जयाजी शिंदे दडवत विनती उपरि येथील स्वकीय कुशल जाणोन कुशल लेखन करणें विशेष राजश्री कुसाजी शिंदे* शिलेदार हुजुरात याचे भाऊ गुणाजी शिंदे* व राजश्री वणगोजी निंबाळकर व आनदराव निंबाळकर शिलेदार निा तुकोजी शिंदे व बदुभाई व मोहदीन ऐसे समागमें आले आहेत यांचे हिशेब करून द्यावे लागतात तर सदर्हू असाम्यांचे हिशेब दफ्तरचे लेहून पाठवावे म्हणजे समजावीस करून वाटे लावून देऊ आम्ही आजच दोन प्रहरां श्रीगोंदेंयास आलों कळलें पाहिजे छ २३ जमादिलाखर बहुत काय लिहिणें हे विनती

श्री
ज्योतान्विरणी तत्पर
राणुजी सुत जयाजी
शिंदे निरतर

मोर्तब
सूद

---

ले ११८ }
[ ८९ ] }

{श १६७५आश्विन शु १०
{ता ६-१०-१७५३

॥ श्री राम ॥

राजश्री बाळाजी पडित प्रधान गोसावी यांसि—

छ सकल गुणालकरण अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य—स्ने॥ येशवतराऊ दाभाडे सेनापति दडवत विनती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करीत असलें पाहिजे विशेष खासगत कोठींचे बैल सर २०० दोनशे येसाजी गव्हाणा याचे स्वाधीन करून सातारा मिरज प्रातें पाठविले आहेत ये विशीं गोसावी यांनीं आपल्याकडील कमावीसदारास पत्रें देऊन सरसाल कोठीस हाशिलाचा उपसर्ग न होतां आमदरफ्त सुरळीत चाले ते गोष्टी केली पाहिजे जाणिजे र॥ छ ८ जिल्हेज बहुत काय लिहिणे लोभ असों दीजे हे विनती ×

श्री
श्री राजाशाहू स्वामी
छत्रपति येशवतराव दाभाडे
सेनापति

---

* कुसाजी व गुणाजी याचीं नांवें साष्टीच्या बखरींत आलीं आहेत

× यशवतराव दाभाडे तारीख १८-५-१७५४ रोजीं निवर्तला त्यापूर्वीचे पत्र

ले ११९ } [२७ ] }

{श १६७५ फाल्गुन वा १२ {ता ३-६-१७५४

श्री

वेदशास्त्रसपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशी —

विद्यार्थी रघुनाथ बाजीराव नमस्कार विनती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहित गेलें पाहिजे विशेष कलमें येणेप्रो—

कैलासवासी राव यानीं कैलासवासी तर्थिरूप नाना दीक्षित यास प्रात मथुरा सुटल्यावर दाहा गाव देऊ केले आहेत× ते हल्लीं देवावे ह्मणोन तुम्ही विदित केले ऐशास तर्थिरूपानीं थोरले दीक्षितास लेहून दिल्हे आहे त्याप्रो प्रा मथुरा हस्तगत जाल्यावर दाहा गाव नेमून देऊ

प्रा गुजराथ आपणाकडे जाली आहे थोरले दीक्षिताचे दैवत श्रीकृष्ण द्वारका क्षेत्र आपणाकडे जालें आहे तेथे शभर ब्राह्मण भोजन नित्य घालावे ऐसे चित्तांत आहे त्याचे खर्चास त्या प्रातीं गाव नेमून द्यावें ह्मणोन तुम्हीं विदित केले ऐशास आह्मीं पुणेंयास आलियावर पांच हाजारांचें गाव वसुली सरकारांतून नेमून देऊ

येणेंप्रमाणें दोन कलमें करार केलीं असत सदरहू प्रो होतील रा छ २५ जमादिलावल सुा अर्बा खमसेन मया व अल्लफ बहुत काय लिहिणें हे विनती

---

ले १२० } [१५] }

{श १६७६ ज्येष्ठ शु १३ {ता ३-६-१७५४

श्री

वो राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशी—

विद्यार्थी बाळाजी बाजीराऊ प्रधान नमस्कार विनती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असावें विशेष आह्मीं करनाटक कचेश्वरींहून ज्येष्ठ शुद्ध १३ पुणियास आलों आपण श्रीहून कधीं आला तें वर्तमान लिहिलें नाहीं चिरंजीव राजश्री दादाकडील शहरीं व आपली बातमी काय आली असेल ती व सलाबतजग कोठे आहेत, कोणीकडे जाणार व दिल्लीकडील वर्तमान, येणेंप्रमाणें सविस्तर लिहून पाठवावीं कृपा पत्र न आलें असें नसावें हे विनती

पौा ज्येष्ठ वद्य ७ बुधवार शके १६७६

---

ले १२१ } [३७] }

{श १६७६ श्रावण शु॥ ११ {ता ३०-७-१७५४

॥ श्री ॥

वेदशास्त्र सपन्न राजश्री वासुदेवबावा दीक्षित स्वामींचे सेवेशीं सेवक रघोजी भोंसले

---

× मागें पृ ४८ वर ले २५ पहा

सेनासाहेबसुभा दडवत विनती उपरी येथील कुशल तागाईत श्रावण शुद्ध ११ पर्यंत स्वामींचे आशीर्वादें करून यथास्थित असे विशेष स्वामींनीं राजश्री रामचद्र बल्लाळ यांजबराबारि आशीर्वादपत्र व प्रसादवस्त्र पाठविलें ते मस्तकीं वदून सनाथ जालों याचप्रकारें निरतर आशीर्वादपत्री सतोषवित जावें यानतर स्वामीचे सेवेशीं वस्त्रें पाठविलीं आहेत बि॥

चांदणी तिवट पैठणी चादणी पैठणी सक [ ला ? ]

येकूण सनगे दोन व ब्राह्मण सतर्पणाकरितां दुबत्या म्हशी उत्तम ४ चार पाठविल्या आहेत प्रविष्ट होतील विदित व्हावे याजकरिता विनती लिहिली असे सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले १२२ } [ ३२ ] } {श १६७६ श्रावण शु १३ {ता १-८-१७५४

श्री

पै० भाद्रपद शु० १३ शुक्रवार शके १६७६

वेदशास्त्रसपन्न राजश्री दीक्षित बाबा स्वामींचे सेवेशीं

विद्यार्थी गणेश कृष्ण सां नमस्कार विनती येथील कुशल ता श्रावण शु॥ त्रयोदशी मुक्काम दिल्ली स्वामीच्या आशीर्वादें सुखरूप असो विशेष स्वामींनीं पत्र पाठविलें तें पावून बहुत सतोष जाहला लिहिला मजकूर सविस्तर कळला याच प्रकारे सदैव पत्र [ पाठवून ] साभाळ केला पाहिजे आपण श्रीमतास पत्रे पाठविलीं तीं प्रविष्ट करून जाब घेऊन पा॥ आहेत दिल्लीचा पैका वसूल होत आहे आठ दिवस तेथें राहणें होईल तदनतर जिकडे जाणे ते जातील ×सार्वभौम नवे जुने जाहले, हें सर्व वर्तमान आपणास कळलेंच असेल कसबे सातारियाचे ताकीद-पत्रांविशीं लिहिले तें कळलें वेदशास्त्रसपन्न राजश्री बाळकृष्ण दीक्षित येथे आले आहेत श्रीमतांची भेट जाहली वरकड मडळींची भेट जाहली त्यांणीं आणखी कितीएक मजकुराच्या यादी लिहिल्या आहेत, त्यास हें कलम लि॥ आहे आपले आज्ञेप्रमाणे श्रीमतास विनती व राजश्री मल्हारबाबा, राजश्री गगोबा तात्या यास सागोन जें होईल तें करून घेऊन सेवेशीं लिहून पाठऊ छ १० रमजानीं[२] जयाजी शिंदे मारवाडांत गेले सरकारची फौज चार हजार बराबर दिली तेही मारवाडची कार्यसिद्धी करतील बहुत काय लिहिणें? कृपा केली पाहिजे हे विनती

---

१ रघोजी १४-२ १७५५ हा मरण पावला, त्यापूर्वींचें हें पत्र २ श १६७६ आषाढ शु॥ १३ ( २-७-१७५४ )

×सार्वभौम-दिल्लीचे बादशहा

ले १२३ } [ ३६० ] } {श १६७६ भाद्रपद शु १ {ता १९-८-१७५४

श्री

राजश्री जयाजी शिंदे गोसावी यांसि

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ रघुनाथ बाजाराव आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहिजे विशेष सुरजमल जाट याजकडील मामलतीचा रुपया पहिले हपतियाचा येणें त्याजपैकीं रुपराम कटारा याणे येथें काहा वसूल दिला बाकी बहुत राहिली आहे त्याचा तगादा करितो त्यास जयापाकडे कांहीं रुपाया आपण वसूल दिला आहे, ऐसें रूपराम सांगतो त्यास तुम्हीं जाटाचे मामलतीपैकीं रुपाया काय वसूल घेतला आहे हें लेहून पाठवणें जाणिजे छ २९ सवाल बहुत काय *लिहिणें

लेखन सीमा

---

ले १२४ } [ ३९८ ] } {श १६७६ भाद्रपद शु २ {ता २०-८-१७५४

श्री

राजश्री जयाजी शिंदे गोसावी यांसि

उपरि तुम्ही पत्रे कृष्णगड फत्ते करून पाठविलीं तीं पावोन सविस्तर अर्थ कळला. त्याजउपरि तुम्ही कोठें गेला, काय करितां, बिजेसिंगापाशीं जमियत काय आहे, पुढे जुजावयाचा प्रकार कैसा, सफेजंगी बाहेर निघोन करणार किंवा मेडत्यात राहोन जुजणार, हा अर्थ तपशिलें लिहिणें जाणिजे छ १ जिलकाद बहुत काय लिहिणें लेखनसीमा

---

ले १२५ } [ ३७६ ] } {श १६७६ भाद्रपद वद्य २ {ता ३-९-१७५४

श्री

पुरवणी राजश्री जयाजी शिंदे गोसावी यांसि

आशीर्वाद उपरि चिरंजीव राजश्री दादाजवळून तुम्ही निरोप घेऊन मारवाडप्रांतीं गेला या वर्तमानाचीं पत्रें मात्र तुमचीं आलीं त्या आलीकडे पुढें कोठ पावेतों गेलां, तिकडील मेडतेवाले वगैरे रजपूत यऊन तुम्हांस सामील किती जहाले, बिजेसिंगाजवळ फौज

---

*यथें बाजूवर बाळाजी बाजीराव याचा शिक्का आहे

१ मारवाडात २ मेडतें मारवाडात जोधपुराजवळ येथें मारवाडी रजपूत व मराठे यांचीं युद्धें पुन पुन झालीं आहेत

तोफखाना किती जमा जहाला, वरकड राजे रजपूत बहुत व चागले कोणीकडे सामील जहाले व होणार, फौज दोहींकडील किती आहे, दाणावैरण कशी मिळते, पर्जन्य कसा आहे, त्या प्रांतांत फौजेस मजलीनें पाणी मिळत नाहीं, सांप्रत पर्जन्यवृष्टि करून तों ओढे तळीं जहालीं असतील, हा सर्व विस्तारें अर्थ निरतर लिहीत जाणें मोठा मनसबा, मारवाडी रजपूत अद्याप गर्विष्ठ, इकडील फौजाच्या गांठी सावकाश पडून सग्रामी श्रमग्रस्त न जहाले त्यासि प्रसग एकाएका तुम्हांवर प्राप्त जहाला आहे त्यास तजविजीनें दमवून, युक्तीनें समय पाहून जरब देऊन स्वकार्यसिद्धी करावी श्रीकृपेनें सरदारा व शिपायगिरी व दाब उपाय जाणणें सर्व गुण तुम्हास आहेत तदनुरूप साध्य असाध्य विचार करून कार्य करणें जर जोधपूर निम्मे राज्य द्यावेसें विचार जहालिया उत्तम आहे दाटून अगदीं घ्यावयासाठीं कलहवृद्धि न करावी हा थोराचा सप्रदाय आहे जर युद्धावांचून साम न होयसेंच असलिया सावधतेनें आपले रीतीनें त्यास आयास आणून नम्र करून काय सपादावें सत्वर कार्यसिद्धीचे वर्तमानाचें पत्र पाठवणें व विलबावर पडलें तरि निरतर सविस्तर अर्थ लिहात जाणें रा॥ छ १५ जिलकाद बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद लेखनसामा

---

ले १२६ }
[ ३५७ }

{श १६७६ भाद्र व २
{ता॥ ३-९-१७५४

श्री

राजश्री जयाजी शिंदे गोसावी यांसि

छ अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नो बाळाजी बाजाराव प्रधान आशीर्वाद उपरि येथिल कुशल जाणून स्वकीय लिहिणें विशेष साप्रत पधरा दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं ऐसें निरतर सविस्तर कुशळार्थ लिहीत जाणे येथील अर्थ तरी फौजेची तयारी होत आहे विजयादशमी नतर स्वारी*साठीं बाहेर निघणें होईल जिकडे कार्य विशेष दिसेल तिकडे श्रीकृपेनें जाणें होईल जाणिजे छ १५ जिलकाद बहुत काय लिहिणें लेखनसीमा पो छ २५ जिल्हेज मुा नागोरा

---

ले १२७ }
[ ३८० ] }

} श १६७६ भाद्र व २
} ता॥ ३-९-१७५४

श्री

पुरवणी राजश्री जयाजी शिदे गोसावी यांसि

आशीर्वाद उपरि गुदस्तां तुम्ही निरोप घेऊन गेला तेव्हा कर्ज वारावयाचा निश्चय होता तुम्हीं ऐवज दिल्हा तो कर्जदारास दिल्हा परतु बाकी कर्ज बहुत होतें जाटाचा मनसबा भारा पडून शेवटीं पैका न मिळाला दिल्लींत मातबर ऐवज मिळावा ऐसें असतां घराऊ पेचापाचामुळें तेंही नीट न जहाले मनांत होतें कीं, हिंदुस्थानांतून एकदाच चाळीस

---

* येथें बाजूवर बाळाजीबाजीरावांचा शिक्का आहे

पन्नास लक्ष रुपये यावे येताच कर्ज वारावे परतु तो अर्थ न घडला तुम्हीही अगीकृत प्रतिज्ञेत पक्षासाठीं चिरजीवाजवळून गेलां या उपर सत्वर मातबर ऐवज कर्ज वारिसा बहुधा सत्वर तुमचें महत् कार्यसिद्धि जहालियावाचून येणार नाहींसें पूर्ण मानून रसदाचे ऐवजापैकी निम्मे कर्जदारांस यावा, व सर्व मुत्सदी सरदार, महालकरी, आप्त, सेवक, लहान मोठे याजवर पंचवीस लक्षांची बेरीज करून सर्वांस सांगितलें सर्वांनीं उच्छाहें खावदास अवश्यक कार्य व हे दौलत कर्जरोगानें निरतर ग्रस्त, येवढा क्षय रोगा समान कर्जरोग दूर जहालिया अतिउत्तमसेंच सर्वांनीं मानून जे ज्यास बेरीज सांगितली ते सेवांनीं कबूल केली हिंदुस्थानात जे मातबर आहेत त्याची याद बेरीज चिरजीवास लिहून पाठविली आहे जे सेवक स्वामींचे हितानें आपलें हितसें मानीत असतील ते तो सतोषें कबूल करून ऐवज कर्जदारांचे वरातेप्रमाणें प्रविष्ट करतील एक दोन कोणी या कार्यावर मन न घालीत तर त्याचा काय मजकूर आहे [२] बहुतांनीं अवलबिले स्वकार्य सहजांत सिद्धीस जाऊन न करी तोच मात्र दोषस्थान होईल तुम्ही कर्ज वारावयास रुपये दिल्हे सर्वांचे अगोदर यास्तव हल्लीं काहीं तुम्हावर बेरीज चिरजीवास लिहून पाठविली नाहीं तूर्त हेच इच्छा आहे कीं, तुम्ही सत्वर यश सपादावे तुम्हांस यश ये समया आलियात सर्व दौलतेस यश जेथे यश तेथें द्रव्यास काय वाण [३] सविस्तर अर्थ तुम्हास कळावा यास्तव लिहिला असे एतदर्थीं जें कांहीं उपयोगी दिसेल तें करावें विस्तार काय लिहिणें छ १५ जिलकाद हे आशीर्वाद लेखन समा

---

ले १२८ [३९९] — श १६७६ भाद्र व ३ ता ४-९-१७५४

श्री

पुा राजश्री जयाजी शिंदे गोसावी यांसि

उपरि काशीद तीन जोडी पत्रें देऊन तुम्हाकडे पाठविले असत तरि तुम्ही तिकडील मनसुबियाचा अर्थ आठां रोजाच्या अतरे एक एक जोडा काशीद सरकारच्या व आपल्या पाठवीत जाणें जाणिजे छ १६ जिलकाद लेखनसीमा

---

ले १२९ [३७०] — श १६७६ भाद्रपद व ४ ता ५ ९ १७५४

श्री

राजश्री जयाजी शिंदे गोसावी यासि

अखडीत लक्ष्मी अलकृत राजमान्य स्ने॥ सदाशिव चिमणाजी आशीर्वाद उपरि

---

१ प्रतिज्ञात पक्ष रामसिंग मारवाडी याचा पक्ष कुंभेरीस मराठ्यांनी वेढा दिला होता तेथून जयापा निघून मारवाडची मसलत साधण्यास गेले भाऊसाहेबाची बखर पृ ११ पहा

२ कर्जाची वर्गणी या मडळीवर घातली

३ चिरजीव दादा

येथाल कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणे विशेष पत्र साप्रत आपणाकडून येऊन वर्तमान अवगत होत नाहीं तर निरंतर पत्रें कुशलार्थ लेखन करीत जावें वरकड अर्थ तीर्थरूपांचें पत्रावरून सविस्तर अवगत होईल जाणिजे छ १७ जिलकाद बहुत काय लिहिणें

(लेखन सीमा)

---

ले १३० }
[ ३१ }

{श १६७६ कार्तिक व २
{ ता१२-११-१७५४

श्री

पौ मार्गशीर्ष शुद्ध १० रविवार शके १६७६

तीर्थस्वरूप राजश्री दादा स्वामी वडिलांचे सेवेशीं

अपत्य बाळकृष्ण दीक्षित साष्टांग नमस्कार विनती येथील क्षेम ता कार्तिक वद्य २ गुरुवार जाणून स्वकीय कुशल लेखन करावयासि आज्ञा केली पाहिजे विशेष काशींतून स्वार होऊन श्रीमत राजश्री रघुनाथपंत दादाचे भेटीस गेलों वडिलाचे आशीर्वादें सर्वांशीं ओळख भेटी जाहाल्या चाळीस दिवस दिल्लींत होतो श्रीमतानीं बहुत स्नेह कृपा केली काहीं मेळवावें म्हणून गेलों नाहीं उगेंच जावेसें चित्तांत आलें दिल्ली शहर पहावें निमित्य गेलों आपले आशीरवादें सुखरूप घरास आश्वीन शुद्ध १४ सोमवारीं आनंदरूप काशीत पावलो कळलें पाहिजे विशेष वडिलांनीं त्रिंबक नाईक वगैरे यास कसबे +सातारियाच्या पादशाही फर्मानाविशीं लिहिलें होतें त्यास वजिराचे अर्जीवरी दस्तक करून घेतलें त्यास वडिलानीं जमीनजुमला किती, तनखा काय, परगणा कोण, तें पत्र लिहून दिल्लीस रवाना करावें व आम्हांस पालखी रो रघुनाथपंत दादांनीं व मोत्याचा चौकडा एक दिल्हा व तीन हजार रुपयांचा गाव एक दिल्हा व पादशाहाकडून पधरा हजार रुपयांचे गांव काशी-शिव भु दा न वली [ ? ] चद्रोतीचे आलीकडे नेमून घेतले वडिलाचे अर्जीवरी दस्तक जाहाले परवाने तयार एका मासा आलीकडे करून देतो म्हणून निश्चय रो रघुनाथपंत दादानीं व होळकर यांणीं व वकिलानीं सर्वांनीं मान्य केलें आहे या कामासाठीं सिद्देश्वर महाशब्दे येथे ठेविला आहे कळलें पाहिजे विशेष हरिदास कृपाराम यांचें दुकान गडबडलें परतु वडिलाचे आशीर्वादें ठरलें आहे लोकाचे रुपये देतों दोन दिवस गडबड आम्ही आलों तों जाहाली आता आनदरूप आहे वडिलाच्या जागेची हुडया हजारिया बद्दल रुपये साहा हाजार व हरिदास कृपाराम याजबद्दल रुपये चवतीस हजार लादण्या [लाहन्या ?] पाठविल्या आहेत रुपये घेऊन पावलियाचा जाब पाठविला पाहिजे व मनसारामानें हुडीं अठरा हजाराची वडिलांकडे पाठविली आहे ते रुपये घेऊन अमानत ठेविले पाहिजेत, आणि त्यास पावलियाचा जाब पाठविला पाहिजे वरकड जें वर्तमान होईल तें मागाहून लेहून पाठवू परवाना आका अ ल त म गा करून घेतले आहेत त्यास तयार व्हावयासि एक वर्ष पाहिजे बहुत त्वरेनें जाहाला तरी या प्रांच सातारियाचा ही लाविला आहे वडील म्हणतील कीं काशीजवळ

---

+ सातारें दौलताबादेजवळ

घेतले गांव हे हस्तगत कसे होतील तरि राजाने आधी मान्य केले तेव्हां हे कार्य केलें. हरिदास कृपारामास वीस हजार रुपयेपर्यंत लागले तरी देतो चिंता नाहीं तो सांभाळून घेईल तों इतकियात त्याचा ही ऐवज चहूकडून येईल कळलें पाहिजे बहुत काय लिहिणे हे नमस्कार

चिरंजीव गोविंद दीक्षित व रामचंद्र दीक्षितां प्रति बाळकृष्ण दीक्षित [ याचे ] अनेक आशीर्वाद लोभ असों दाजे हे आशीर्वाद चरण बापुजी महादेव सा नमस्कार

राजश्री भिकाजीपंत स्वामींस सा नमस्कार विनंती ज्याचीं पत्रें त्यास पावती करावीं

---

ले १३१ }
[ ३९३ ] }

{श १६७६ मार्ग शु १
{ता १५-११-१७५४

श्री

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री रामाजी अनंत गोसावी यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार सुा खमस खमसैन मया व अलफ विजेसिंगाचा पराजय केल्याचे तुमचें पत्र आलें त्या अलीकडे तुमचे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरि सविस्तर लेहून पाठविणें बिजेसिंग आदिकरून मारवाडच्या रजपुताची तरवार महसूर फार करून तिकडील मर्द मनुष्य समशेरचें काम पडल्यास कोणेविशी चुकतील हें होणेंच नाहीं असें असता राजे रामसिंग याची स्थापना करून बिजेसिंगाचा पराजय करावाच करावा, येतद्विषयींचा उद्योग राजश्री जयापानी करून गेले मोठा अवघड मनसुबा होता. तथापि त्याचे सुकृतयोगें व धन्याचे कृपेनें त्याणीं यश संपादिले येणेंकरून अतिशयेशीं आनंद झाला जे धन्याशा परम एकनिष्ठेनें वर्ततात, धन्या × × × विना दुसरें दैवत नाहीं ऐसें समजतात, त्यास ऐशींच महत यशें येतात मूळ सेवकलोकास निष्ठाच कारण आहे त्याची फळें हीं आहेत प्रस्तुत सर्व प्रकारें भरोंसा जयापाचाच असे फार करून रामसिंगजीचे कार्य अभिमानपुरस्कर आपानीं करून दिलेंच अत पर त्याच मनसुबियांचे भरी भरोन गुतावें ऐसा अर्थ नाहीं चार रजपूत मातबराशीं व रामसिंगाशीं गाठ घालून देऊन आपण मोकळें व्हावें, केवळ बिजेसिंगाची जड उखडून टाकीन म्हटलें तर हा दीर्घ प्रयत्न, त्यास फार दिवस पाहिजेत व आपां कडे मनसुबे फार मनसूर अल्लीखान वारले तो मनसुबा मोठाच आहे, व फौज चिरंजिवापाशीं थोडी फौजेविशीं सर्व इमारत जयापावरच आहे, हे एक-उद्योगी नव्हेत, अनेक उद्योग यास चिरंजिवांसमीप राहून करणें लागतात यास्तव यांणीं त्या कामाचा उलगडा करावा पूर्वील बख्तसिंग व राजे अभेसिंग यांची वांटणी आहे, त्याचप्रमाणें बख्तसिंगाचा वांटा बिजेसिंगास द्यावा अभेसिंगाचा वाटा रामसिंगास द्यावा त्याचा त्याचा एक विचार परस्पर करून देऊन बिजेसिंगापासून आपलें स्वकार्य होईल तें करून घ्यावें व रामसिंगापासून जें कार्य कराराप्रमाणें करून घेणें तें मोकळें व्हावें गोहदकर राणा ग्वालेरीस आपले तालुकियात बळावला आहे, त्याचें पारपत्य जरूर करावें शत्रु लहान

आहेसा न म्हणावा × × × वी आणि अविलंबे जाऊन चिरंजिवांस सामील होऊन उमेदे मनसुबियांचा साहास करावा ( हें ) युक्त आहे येविशीं तुम्ही आपांस सागणें तें सागोन चिरंजिवांकडे जावयाची त्वरा करणें वरकड वृत्त आपास लिहिलें असे त्याजवरून कळेल तिकडील कार्य उरकून सत्वर ज्या कार्यास चिरंजीव जातील तिकडे यावें छ २९ मोहरम बहुत काय लिहिणे लेखनसीमा

---

ले १३२ }
[ ३३८ ] }

{ श १६७६ पौष
{ इ १७५५ जानेवारी

॥ श्रीमोरया ॥

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रामाजीपत भाऊ स्वामींचे सेवेशीं

सेवक गगाधर येशवत सा नमस्कार विनती उपर येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लिहीत असावें विशेष बहुत दिवस आपणाकडून पत्र येऊन वृत्तांत कळू येत नाहीं तर निरंतर पत्र पाठवून सतोषवृद्धि करावी या नतरे गगास्नानास श्रीमतांसुद्धां आम्ही आलों रोहिलियाची मामलत झाली वसूल आला त्याची वाटणी होऊन राजश्री आपा साहेबाचे वाटणीचा ऐवज श्रीमतांस विनती करून आपल्याकडे घेऊन दिल्लीहून हुडी बाळाजी साम राज यांजवर करून पाठविली आहे प्रविष्ट जालियाचें उत्तर पाठवावें वरकड वृत्त प्रस्तुत यमुना तीरास येऊन मुक्काम ग्वालेरीच्या कामाकरिता आहे सत्वरच श्रीमताचे कूच करोन तिकडे येत असों राजश्री सुभेदार सामरच्या सुमारें आले आहेत कागदपत्र येत जात असतील आपण प्रसगीं आहेत उत्तम तें करतील आम्ही सत्वरच राजश्री सुभेदारांपाशीं येत असों लोभाची वृद्धि करावी हे विनती

---

ले १३३ }
[ १६ ] }

{ श १६७६ फाल्गुन व १
{ ता २७-२-१७५५

श्री

वेदशास्त्रसपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशीं--

विद्यार्थी बाळाजी बाजाराव प्रधान कृतानेक नमस्कार विनती उपरि येथील कुशल लिहीत गेलें पाहिजे विशेष आपल्या भेटीस बहुत दिवस जाले भेटीची इच्छा आहे आम्ही टोंक्याचे रोहोकें येतों आपणही तेथें आलें पाहिजे येते समयीं सैद लष्करखान याचे दिवाण राजश्री मल्हारपत यासही समागमें घेऊन आलें पाहिजे बहुत काय लिहिणें हे विनंती

पौ फाल्गुन वद्य १ गुरुवार शके १६७६ भावनाम

---

१ दामोळकर-शिंद्यांचे कारभारी २ चद्रचूड-होळकराचे दिवाण ३ जयापा शिंदे ४ ख ३ ले ४५१ पहा

ले १३४ } { श १६७७ वैशाख शु ३
[ १३४ ] { ता १४-४-१७५५

॥ श्री ॥

राजश्री मुरारराव घोरपडे वजारतमाब गोसावी यासी—

छ सकळ गुणाळंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो महादाजी अबाजी आशीर्वाद विनति उपरि येथील कुशळ जाणोन स्वकीय लिहीत असले पाहिजे विशेष पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला स्नेहाचा अर्थ लिहिला व राजश्री पंतप्रधान यांनीं आम्हास बंधु म्हणविलें आहे ते गोष्ट लोकोत्तरांत उत्तम दिसे ते करावयास आपण साभिमानी आहोंत, म्हणोन कितेक लिहिलें व राजश्री नागोपंत यांनीं निवेदन केलें, त्याजवरून कळलें ऐशास, आपला व राजश्री पंतप्रधान यांचा स्नेह आजी कालचा नाहीं पूर्वापार चालत आला तो अभिवृद्धीस पावावा सर्व प्रकारें श्रीमंताचा तुम्हीं लोभ संपादून उमदे महत्कार्यास उपयोगी व्हावें हेंच आम्ही इच्छितों राजश्री श्रीनिवासराव यास बोलाविले असे तेहा एका दों रोजात येतील, त्याजशीं बोलोन आपणाकडे पाठउन देऊन वरकड अर्थ राजश्री नागोपंत याजशीं बोललों आहों हे लिहितील त्याजवरून कळेल राजश्री नरसिंगराव एक प्रकारचे मनुष्य यांस निरोप देऊन पाठविलें म्हणोन, तर आपण श्रीमंताचे बंधु म्हणवितात श्रीमंत उमदे अमीरांची तोर व रीत भात राखतात अनेक देशांतरीचे वकील सहवासीं राहून घेतात तोंच प्रकार आपणाजवळ असावा व आपण इच्छा धरतात त्यास मुख्यत्वें हींच कारणें आहेत प्रस्तुत राजश्री गोविंदराव शामराव यांस पाठविले असत हे सर्वही सांगतील त्याजवरून कळेल यांस आपणाजवळ राहू द्यावें रा छ १ रजब बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हे विनंती[1]

---

ले १३५ } { श १६७७ वैशाख व अ ज्येष्ठ
[ ३४३ ] { मे १७५५

॥ श्री ॥

राजश्री जयाजी शिंदे गोसावी यांसि

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो +सखाराम भगवत आशीर्वाद विनती उपरि येथील कुशळ जाणून स्वकीय लिहीत असलें पाहिजे विशेष आपण पत्र पाठविलें प्रविष्ट जालें लिहिलें वृत्त अवगत जालें अशास सांप्रत आपण कोठें आहेत ? ×विजेसिंगाचा इरादा काय आहे ? आपण मनसबा कैसा योजिला आहे ? हें वृत्त सविस्तर लिहिलें पाहिजे येथील वृत्त श्रीमंतीं लिहिलें आहे त्याजवरून कळेल ऽसारांश केवळ कुबेरप्रमाणें न

---

१ हा संताजींचा नातू गुती हें त्याचें संस्थान

+ सखारामबापू बोकील × जोधपुरकर, ज्यानें जयापास मारेकरी घालून पुढें मारिलें. ऽयेथपासून खुद्द खाशाचे हातचा मजकूर

गुतावें बहुतां दिवसांचे काम विचारें विचारें दमवून करावें उतावळीनें लोक जाया होऊन काय सुधें होणार नाहीं अह्मांस सुचलें तें लिहिलें तेथील प्रसगानुरूप आपण जें करणें तें करीतच असतील बहुत काय लिहिणें लोभ असों दिजे हे विनती

---

ले १३६ }
[ १७ [ }

{ श १६७७ ज्येष्ठ शु १४
{ ता २३।६।१७५५

श्री

वेदशास्त्रसपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामीचे सेवेशीं—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत गेलें पाहिजे विशेष जीवनराव केशव या समागमें खानानीं सांगून पाठविलें आहे मुसा बुस्सी आदिकरून सर्वही येथील अमीर आमची आरजों करितात कारभार करावा ह्मणोन इच्छितात एक आपली मर्जी असल्या हें कार्य करू त्यास हैदरजग व मुस्सा बुस्सी यांस पत्रें पाठवावीं कीं, खानास वकील किंवा कारभार सांगावा ऐसास जीवनराव, परशराम महादेव यांचे निसबतीचे शहाजवानखानाशीं केवळ ममतेंत त्याशीं खान या गोष्टी कशा बोलतील हा सदेह प्राप्त जहाला यास्तव आपणास लिहिलें असे तरि खानाशीं हा मजकूर तजविजीनें करून या गोष्टीचा शोध बारकाईनें घ्यावा, व लेहून पाठवावें तेणेंप्रमाणें येथें करणें तें केली जाईल तहकीक मसलत अर्थ जरूर लिहून पाठवावे बहुत काय लिहिणें हे विनती ×

पौ ज्येष्ठ शुद्ध १५, सोमवार शके १६७७

---

ले १३७ }
[३] }

{ श १६७७ आषा व ४
{ ता २७—७—१७५५

श्री

वेदशास्त्रसपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामीचे सेवेशीं

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक साष्टांग नमस्कार विनति येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत असलें पाहीजे विशेष आपण टोंक्याचे मुक्कामीं श्रावण मासाचे उत्साहास पुण्यास निश्चयें येतों म्हणोन मान्य केलेंच आहे त्यास सांप्रत उत्साहाचा प्रसग आहे तरि स्वामींनीं स्वार होऊन आलें पाहिजे अगत्य श्रावणचे उत्साहास यावें हे विनति

पौ आषाढ वद्य ४ रविवार शके १६७७ युवनाम सवत्सरे

---

× खड ३ ले ४५८ येथें हेंच पत्र आहे

ले १३८ }
[३८२] }

} श १६७७ आषाढ व ८
} ता ३१-७-१७५५

श्री

राजश्री जयापा गोसावी यांसि

आशीर्वाद उपरि तुम्हीं सविस्तर वृत्त राजश्री अताजी माणकेश्वर या समागमें सांगून पाठविल्या प्रमाणें सर्व एकनिष्ठेचा व आपले बदोबस्ताचा अर्थ विदित केला तेणेकरून बहुत संतोष जहाला सर्वांविशीं भरवसा तुमचा आहे हर प्रकारें मल्हारबास आपले मायेंत राखून तिकडील तहरह करून मोकळे होणे पूर्वी सविस्तर लिहून पाठविले आहेच दसरा जहालियावर सविस्तर अर्थ लिहिला जाईल तुमचे विशीं येथे तिळमात्र दुसरा अर्थ नाहीं सर्व प्रकारें समाधान असों देणे छ २१ सव्वाल बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद

---

ले १३९ }
[३५२] }

{श १६७७ श्रावण व ८
{ता ३०-८-१७५५

श्री

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री रामाजी अनंत गोसावी यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जाणें विशेष तुम्हीं पत्र छ १५ सवालचें पाठविलें तें छ १७ जिलकादीं पावले राजश्री जयाजी शिंदे यास दगा होऊन निधन पावलियाचा मजकूर लिहिला तो कळोन बहुत श्रम जाले ईश्वरें मोठी अनुचित गोष्ट केली ईश्वरी तंत्रास उपाय नाहीं जयापासारिखा उमदा सरदार या दग्यांनीं मृत्यु पावावा ऐसे नव्हतें होणारेस उपाय नाहीं असो दत्ताजी शिंदे मर्द खबरदार आहेत तुम्हीं व सर्व सरदार शाबूत आहा दत्तबाचे समाधान करून जयापांनीं उपस्थित मनसुबा केला तो सिद्धीस पावून शत्रूचे पारपत्य होय, तह रह उत्तम प्रकारें होय, तें करणें वरकड वृत्त दत्तबान्या पत्रीं लिहिलें असे त्याजवरून कळेल —दत्तबाचा स्वभाव शिपायगिरीचा आहे, यास्तव रागें करून असमयीं अस्थानीं निकडीस प्रवर्ततील त्यास समजावून गोड बोलूनच सांगत जाणे आपा असता बोलत होते त्याचप्रमाणें जहाले तर तह करणे परंतु ते सांप्रत चढीं लागले असतील यास्तव हर तजविजेनें संभाळून राहणें दोन चार मिळून पचवीस चाळीस हजार जमा होऊन आले तर गनीमी तऱ्हेने तीन महिने संभाळणे फौजा तिकडे आलियावर श्रीकृपेने उत्तमच होईल छ २१ जिलकाद तीळमात्र उदास नसतां सेवा करणें बहुत काय लिहिणें

---

— येथून खुद्द बाळाजी बाजीरावाचें हस्ताक्षर

ले १४०
[१८]

श १६७७ श्रावण व १०
ता १-९ १७५५

श्री

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशी—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत गेलें पाहिजे विशेष सैद लष्करखान याचे मजकुराचीं पत्रें नबाब सलाबतजंग मुस्सा बुस्सा व शाहानवाजखान यास पाठविला होता त्याचीं उत्तरें आलीं त्याच्या नक्ला पाठविल्या आहेत त्या पाहाव्या व खानास ही दाखवाव्या उत्तर कोणे प्रकारे पाठवावें हें पुसून लिहून पाठवावें, व खानास पत्र लिहिलें आहे, तें प्रविष्ट करावें खानाचे साहित्याविशीं मुस्सा बुस्मास पत्रें पाठवावीं तेथें सर्व यास अनकूल आहेत म्हणोन लिहिलें, ऐशियास खानाविशीं मनापासून अतस्थ सर्व प्रकारें साहित्यपत्रे व बोलणें होत आहे, परतु सांप्रत पत्रें आलीं तीं पाठविलीं पुढें ज्या प्रकारें तुम्हीं तजवीज योजून ल्याहाल त्या प्रकारें लिहून पाठऊ चित्त शुद्ध सत्य भाषण तेथें याविशी दिसतें परशरामपतही नीट नाहींत म्हणोन लिहिलें तेंही यथार्थच आहे परतु सांप्रत परशराम महादेव ही हुजूर येत आहेत सांप्रतचा फिरंगीयाचा भाव खराखुरा क्सा खानाविशीं आहे ? तें सर्व शोध करून लिहावें ×पौ श्रावण वद्य १० शके १६७७ युवनाम सवत्सरे

---

ले १४१
[३५१]

शके १६७७ भाद्रपद शु १३
ता १८ ९-१७५५

श्री

पु॥ राजश्री दत्ताजी शिंदे गोसावी यांसि

आशार्वाद उपरि बिजेसिंगास उत्तम प्रकारें तग केले आहे वरकड कोणाच्यानें काही त्याची कुमक करवत नाहा, स्वामींनी त्याचे वकिलास साफ सागून निरोप द्यावा कैलासवासी आपानीं जो अभिमान धरिला होता तो शेवटास नेल्यािनें लौकिक व स्वामी कार्य सर्वास जय म्हणोन लिहिलें त्यास आपानी जे अवलबिलें तें आम्हास सर्व प्रकारे करणे, परतु हा राजकार्य प्रसग आहे आपासही येथून बुद्धिवाद आपा असता चार महिने पाच महिने मागें लिहात गेलो तीं पत्रें तुम्हीं पाहिलींच असतील दूर पथ, दो वर्षांनीं हिंदुस्थानांतून फौज आली, एकाएकी येऊन तयार करतां उशीर लागतो हे लोकाची येथील रीत तुम्हास ठाऊकच आहे हगाम फौजसिद्ध ऐसा असता तर एक खावंद[1] आज वीस हजार फौजेनिशी तुम्हाजवळ प्रविष्ट झाला असता परतु नाईलाज गैर हगाम व दूर पथ याजमुळें विलब लागला श्रीकृपेनें दिढा महिन्यात पाच सहा हजार फौज येऊन पावेल मागाहून खासाही वीस हजार फौजेनिशीं येतच आहे तुम्ही अवलबिलें कार्य तें अगत्य आम्हांस करणे परतु

---

× खंड ३ ले ४६२ येथें हेंच पत्र आहे

१ खावद=खासा=धनी पेशव्याच्या घराण्यापैकीं कोणी तरी एक असा भाव

होणारानुरूप आपानीं हातेर वोढिलें शिपायगिरीची रीत केली सरदारागिरीचा प्रकार न केला जेम्हां प्रथम भारथी[२] लढाई मारली त्या उपरि नव्या दबावात तूट सोसून सलूख हर प्रकारें, पुढील संकट दूरदेशीनें जाणून, करून मोकळे जहाले असते तर आज प्रयाग अतर वेद व आलीकडील खचीचा मुलूक सोडविणें वगैरे कामें सर्व ही सरकारकिफायताचीं होऊन गेलीं असतीं परतु होणारास इलाज नाहीं तुम्हांही आज पावेतों शिपायगिरी केली आता सरदारीची रीत धरून तजविजीनेंच काहा कामें करावीं जरूर सक्ट पडेल तेथेंच नेटून *शिपायगिरी करावी तुमचा अभिमान ईश्वरास आहे, व मजवर ईश्वरी कृपा आहे, तो तुमचे साहित्यास कधीं चुकणार नाहीं तीं पिढयाचे एकनिष्ठ सेवक, कामाचे असता, तुमचा अभिमान नसावा हें कधींही या घरांत घडणार नाहीं सर्व प्रकारें समाधान चित्तांचें करून अष्टपैलूचे रीतीनें जसा जे समयीं प्रसग पहाल तसा मनसबा करीत जाणें सत्वरच येथून फौजही येऊन पोंचत आहे बिजेसिंगाचा वकील पन्नास लक्ष द्यावे, रामसिंगास थोडीशी जागा पोटापुर्ती द्यावी, ऐसें बोलत होता आम्हीं ते गोष्ट मान्य केलीच नव्हती. सांप्रत हा प्रसग जहाला याजमुळें आम्ही साफच त्यास जाब दिला कीं, या उपर आम्हांस तह कर्ता अनकूल पडत नाहीं, तुम्हीं जाणें ऐसें म्हणून निरोप दिल्हा तेथें ते आतां चढीं लागले असतील व मध्यस्थ मारले गेले, त्यामुळें मध्यस्तींतही कोणी शिरत नसेल अद्याप त्यानीं रामसिंगास पधरा विसांची जागा दिली व तुमचा शिबदीखर्च मसलतखर्च फिटोन दहा लाख जाजती दिल्हे, तर घेऊन सलूख करून त्या सकटातून सुटावें, हें राज्यभार अष्टपैलूपणास उचित आहे तेथील प्रसगानुरूप करणें फौज तो तुमचे साहित्यास रवाना करीत असों छ ११ जिल्हेज बहुत काय लिहिणे ×

लेखन सीमा

---

× दत्ताजीनें फौजेची कुमक मागितली होती त्यावर हें प्रत्युत्तर आहे दत्ताजी मारवाडांत जयापाचा सूड उगवण्यात गुतला होता हें पत्र नानासाहेबानीं त्यास लिहिलें आहे व तें सर्व खुद्द त्यांच्याच हातचें आहे

२ भारथी=जगी, आरतुरेची, भारती युद्धाच्या तोडीची ह्या लढाईचें वर्णन, भाऊसाहेबाची बखर पृष्ठ ११ ते २० यात पहावें

*शिपायगिरी व सरदारी या दोहोंत जो भेद येथें दाखविला आहे तो ध्यानांत ठेवण्याजोगा आहे त्याप्रमाणेंच शिंद्याची स्तुती करतां करतां व कैवार घेतां घेतां त्यास दोष दिला आहे, तोही प्रकार मोठा खुबीदार आहे म्हणून मुत्सद्दीपणा, लोकसग्राहकत्व, इ राज्यकर्तृत्वाचे गुण ह्या पत्रावरून कळून येतात

ले १४२ } { श १६७७ भा व ९
[ ३८६ ] } { ता २९-९-१७५५

श्री

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री रामाजी अनंत गोसावी यासि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार सु॥ सीत खमसैन मया व अल्फ तुम्हीं राजश्री जयाजी शिंदे निधनऽ पावलियावर पत्रे पाठविलीं त्याचीं उत्तरें मुजरद काशीदा बा। पाठविलीं तीं पावलींच असतील जयाजी शिंदे यांनीं मारवाडच्या मनसुबियाचा अगेज केला त्यास आयुष्य असतें तरी,काहीं चिंता नव्हती त्याचे तेच सिद्धीस नेते तथापि त्याच्या मागें राजश्री दत्ताजी शिंदे यांनीं हिंमत धरून मनसुबियास आव घातला तो प्रकार सिद्धीस पावावाच पावावा, यापेक्षां दुसरें अधिक न जाणतां रा। अंताजी माणकेश्वर ग्वालेरीहून रा। करविले चिरंजीव राजश्री समशेर बहादर व राजश्री येशवंतराव पवार ऐसे दहा हजार फौजेनिशीं रवाना केले अविलंबेंच येऊन पावतील खासास्वारीचीही तयारी होत आहे दसरा झालियावर चाळीस पन्नास हजार फौजेनिशीं येणें होईल, ये विशींचा विस्तार दत्ताजी शिंदे यांसि लिहिला असे त्याजवरून कळेल रजपुतामध्यें जाटाशीं राजकारण राखून एकाशीं स्नेह तर एकाशीं बिघाड, एकदांच सर्वांशीं कजिया करू नये तूर्त तोंडानें वरकडाशीं फारच गोड बोलून राजकारण राखावें, श्रीकृपेनें फौजही येत आहे मग जे समयोचित दिसेल तें करणें छ २२ जिल्हेज वरचेवर आठां दिवसाआड वर्तमान लिहीत जाणें छ २२ जिल्हेज बहुत काय लिहिणें पै॥ छ २७ मोहरम

---

ले १४३ } { श १६७७
[ ४५१ ] } { इ १७५६ जाने

श्री

[ ×श्रीमत राजमान्य राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेशीं पोष्य सेवक अंताजी माणकेश्वर ] मुक्काम किल्ले नागोर प्रांत मारवाड स्वामींचे कृपादृष्टि करून सेवकाचें वृत्त यथास्थित असें विशेष

---

ऽ इ १७५५ जून ३० (श १६७७ ज्येष्ठ वद्य ७) जयाजी शिंदे निधन

× हें प्रकरण त्रुटित मिळालें चौकटींतील मजकूर आम्हीं समग्र संदर्भ पाहून अनुमानानें घातला आहे

१ हें प्रकरण आमचे स्नेही रा० अंताजी रामचंद्र हरडीकर वास्तव्य महाड यांनी नक्कल करून पाठविलें हें महाड येथें गोखले यांच्या जुन्या दप्तरात मिळालें ह्याचे एके बाजूनें लिहिलेले २३ बंद आहेत पैकीं पहिल्या बंदाचा अर्धा भाग गहाळ झाला आहे अक्षर वळणदार व सुवाच्य आहे शेवटील मजकुरावरून ही प्रत लिहिल्यास सुमारें ८९ वर्षें होऊन गेलीं

कसबे नाशीक ऊर्फ गुलचनाबाद येथील मुक्कामीं वैशाखमासीं सेवकास आज्ञा केली जे, चिरंजीव राजश्री दादासाहेब याची स्वारी हिंदुस्थानांत दोन सालें राहून, अटक पावेतों मुलूख सर करून, तमाम खडण्या लाहूर[2] वगैरे सुभेयानीं घेऊन शहाजनाबाद ऊर्फ इंद्रप्रस्थ येथें आली अकबराबादे करून दरमजल देहिजे[5] यास्तव तुम्हीं आपले फौजेनिशीं चिरंजिवांकडे जाऊन तेथून आज्ञा होईल त्या अन्वयें वर्तन करणें म्हणोन त्यावरून आज्ञा शिरसा वंदोन विनंति केली [की] साल मजकुरीं फौजेस नालबंदी सरकारांतून पावली नाहीं यांचा ऐवज आदा नाहीं सावकारापासून वर्ज घेऊन नालबंदी रोजमुरा दिला येविशीं आज्ञा झाली पाहिजे बराय विनंती खातरेस आणून राजश्री गोविंद बल्लाळ बुंदेले याजवरि प्रांत अतरवेदपैकीं वरातीचा ऐवज बारा लक्ष रुपये देविले त्याप्रमाणें घेऊन, स्वामींची आज्ञा घेऊन, दर मजल हिंदुस्थानांत आलों दरमियान कसबे हाडिये प्रांत नेमाड रेवातीरीं मुक्काम जाहला इतक्यात मागाहून फौजेची गणती घ्यावयासि राजश्री चिटको सोयराजी व नारो गणेश कारकून व भालदार, जासूद व हुजुरे रवाना होऊन आले त्यानीं गणतीविशीं चौकशी बहुत करून गोट गणती घेऊन सात हजार गणती भरली ते हुजुर गेले सेवकानें कूच करून प्रांत माळवा येथें कसबा कालाबाग व शहाणेरा येथें आलों इतक्यात श्रीमंत राजश्री दादासाहेब याची स्वारी नरवरचे घाटानें दरकूच आली सेवकाची भेटी झाली दोन कोसाचे

---

१ हे सेवक अताजी माणकेश्वर गधे होत ह्याजविषयीं हकीकत भा इ स मं त्रै वर्ष ३ व ६ पहा अताजीपताहीं लिहिलेलीं दुसरीं काही पत्रें आम्हीं प्रसिद्ध केलीं त्यांच्या रचनेच्या शैलीवरून व त्यांनीं रचलेली एक पाणिपतची बखर आम्हांपाशीं आहे तिच्याही रचनेच्या शैलीवरून, हें प्रकरण विस्तीर्ण पत्ररूपानें त्यानींच लिहिलें असें मानण्यास बिलकुल हरकत नाहीं अताजीपत हे हिंदुस्थानात वागणाऱ्या पेशव्यांच्या सरदारांपैकीं मोठे प्रसिद्ध सरदार होते त्यांणीं हें पत्र नागूर प्रांत मारवाड येथून लिहिलें आहे मारवाडच्या मोहिमेंत हे अशात होतेंच, व पुढें त्या मोहिमेचा शेवट, म्ह बिजेसिंगाशीं तह, तोही त्याच्या मार्फत झाल्याचें त्याणीं लिहिलें आहे त्यावरून ही हकीकत विश्वसनीय आहे असें कळून येईल

२ ही दादांची मोहीम सन १७५३ ते १७५५ सालची होय परतु ह्या वेळी ते दिल्लीच्या पलीकडे फारसें गेल्याचें आढळांत येत नाहीं लाहोर अटकपर्यंत ते सन इ० १७५७ ते १७५८ च्या मोहिमेंत गेले ३ इंद्रप्रस्थ–दिल्ली

४ अकबराबाद=आग्रा ह्या खेड्यास नांवारूपास आणून अकबरानें आपलें नांव दिलें तेव्हांपासून तें मोठें शहर बनलें

५ हा शब्द दुर्बोध आहे

६ अताजीपतांवरतीं पेशवे ह्याचा विश्वास जरा कमती होता असें मागें त्यांच्या फौजेची गणती घेण्याविषयीं जीं पेशव्यांचीं दोन तीन पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत त्यांवरून अनुमान होतें

तफावतीनें मुक्काम केला दुसरे दिवशीं राजश्री रामचंद्र गणेश व कुकाजी शिवराम व आणखी पंचवीस कारकून मंडळी व मालदार, जासूद, स्वार, गारदी, सरकारांतून येऊन चौगिर्दा लष्करास घेर घालून एक स्वार क ट क जे हो ता खा लीं गणती घेतली तेव्हांही सदरहू प्रमाणे सात हजार स्वार गणती लागले श्रीमंतांनीं आज्ञा केली जे, राजश्री गोपाळराव गणेश बर्वे यास कु र रा जाहनाबाद, प्रांत अंतरवेद पावेतों, चवदा महालांचा चक्ला आहे त्याची मामलत सांगितली आहे प्रस्तुत सदरहूचें काम राजश्री गोविंद[1] बल्लाळ यांजकडे आहे सबब तुम्हीं यास घेऊन जाऊन अमल बसवून देणें, आणि हिंदुस्थान प्रांतीं दुसरी फौज नाहीं, जिकडे कामें पडतील तिकडे पुस्तपन्हा करून बंदोबस्त राखणें याजवरून मशारनिल्हे यास घेऊन ग्वाल्हेर प्रांतीं छावणी आषाढ मासीं केली श्रावणमासीं जगमपूर, प्रांत काल्पी, यमुनातीरास जाऊन राजश्री गोविंद बल्लाळ व राजश्री हरि विठ्ठल दिंमत मेघश्याम बापूजी यांस पत्र पाठवून आणविलें

पुढें राजश्री गोपाळराव बर्वे याच्या मामलतीचा बंदोबस्त करून द्यावा, इतकियांत राजश्री दत्ताजी शिंदे व राजश्री जनकोजी शिंदे यांचीं पत्रें भाद्रपद मासीं सांडणीस्वारा समागमें आलीं त्यांतील मजकूर जे, प्रांत मारवाड येथील राज्य राठोड यांचें आहे त्यास राजे ढोकळसिंग वडील, राजे बखतसिंग धाकटे बंधु असता, ढोकळसिंगाचे पुत्र राजे रामसिंग व बखतसिंगाचे पुत्र राजे बिजेसिंग होते त्या बिजेसिंगानें राज्य बळकावून रामसिंगास राज्याबाहेर लावून दिलें तेव्हा राजे रामसिंग मथुरेच्या मुक्कामीं येऊन, आपली हकीगत सांगून, भेटी घेतल्या आणि पग डाबदल भाईचारा केला कित्येक मनसबियाचा अर्थ समजाविला जे, *आपण वडील राज्यास अधिकारी असतां बिजेसिंगांनीं राज्य बळकावून आपणास बाहेर घातलें, याजकरिता तुम्हांकडे येऊन पगडीबदल भाई झालों याचा अभिमान धरून मजला राज्यासनीं बसविणें निंमे राज्य तुम्हास देऊन, दोन क्रोड खर्च देतों याप्रमाणें करारात आणिलें तेव्हां तीर्थस्वरूप राजश्री जयाजी आप्पा शिंदे यांनीं मान्य करून फौजबंदी केली आणि संवत्सर प्रतिपदेस कूच करून मारवाडांत चालिले हा मजकूर राजे बिजेसिंगास कळताच नागोराहून फौजबंदी करून, कसबे मेडतें प्रांत मजकूर येथें आले इकडून राजश्री सताजी वाबळे व राजश्री शेटियाजी खराडे व आणखी भोइटे व पागा मिळून पंधरा हजारांनिशीं पुढें रवाना केले त्यांचयांचा मोकाबिला झाला त्यास बिजेसिंगाची फौज पन्नास साठ हजार व तोफखाना व गजिफाचे गाडे शें दडिशें व बाणाच्या कैंच्या याप्रमाणें जंगी सामान भारी असता आम्हां कडील फौजेनें एक टक्कर दिली यास राठोडाची फौज,बहुत जंगी सामानाची मारागिरी झाली ते समयीं मोड इकडील होऊन निघाले पालख्या,नगारे,निशाणें,चवऱ्या,आबदागीर, झरझऱ्या

---

१ गोविंद बल्लाळ-गोविंदपंत बुंदेले सागरवाले

२ ह्या हिंदुस्थानी चाली बद्दलची माहिती भाऊसाहेबांची बखर पृष्ठ ८ येथें सविस्तर सांपडेल * आपण—रामसिंग हें रामसिंगाचें बोलणें

आदि करून त्यांणी नेले अवसान यांस होईना बेलाशक लष्करांत आले त्यावरि फौजेचें कूच करून दोन तीन मजली मेडतें याजकडे चालोन घेतलें दोन्ही फौजेचा मुकाबिला जाहाला राठोड श र बाजूस प ड ले त्यांणींही चालोन घेतलें आम्हांकडे जंगी सरंजाम नाहीं लढाईचें तोंड लागलें प्रात काळ पासून तृतीय प्रहर पावेतों ल्टाई जाली परंतु हत्यार लागेना गा जींचा मा र भारी जाहला तेव्हां सारी फौज तीा जयाजी आपा शिंदे याजजवळ ठेवून दोन हजार धारकरी निवडक घेऊन आपण श्रीमताचे चरणाचें ध्यान करून, नीट चालोन घेतलें त्यांणींहा मारागिरी फार केली फौजेत तोंड लोकाचें स ली स ब त च दुभाग फौज करून पार निघोन गेलों शें दोनशे खांसा ठार व घोडीं ठार बहुत जालीं जखमीही जाले हें पाहून जयाजी आपानीं सारे फौजेनिशीं हत्यार लावितांच राठोडाची फौज मोडून ताराज केली आम्हास तीन जखमा तिराच्या व सांगेच्या लागल्या श्रीमतांचे कृपेंकरून महत्तर यश आलें रात्रौ चौक्या दिल्या त्यासमयीं बिजे-सिंग शुत्तरस्वार होऊन एका दिवासांत एकाएकीं चाळीस कोस नागोरास पळोन गेला सलतनत सर्व हस्तगत झाली

मग कूच करून नागोरास मोरचे देऊन, शिकस्त केला त्याजवरि राजे माधोसिंग जयनगरवाले, राठोडाचे व्याही, यांजकडे त्यांनीं पैगाम लावून फौज आणविली जयनगर वाले यानीं फौज तयार कराविली ज्येष्ठमासीं बिजेसिंगानें तिघे मारेकरी घालून वद्य ७ मीस तीा राजश्री जयाजीआप्पा शिंदे यांस प्रात.काळच्या प्रहर दिवसास स्नानसमयीं दगा केला तीन जखमा भारी लागल्या मारेकरी धरले त्याणीं बिजेसिंगाचें नांव घेतलें लष्करांत गडबड झाली तसेंच उचलोन डेऱ्यांत आणिलें ते समयीं सांगितलें कीं, " अमित्राची फौज येत आहे, तुम्ही नगारा करून तयार होऊन नागोराकडे जाणे नाहीं तरी लष्कर मारिलें जाईल " म्हणतांच जीनबंदी करून, ढालेपुढें गेलों तों राठोडानी नीट चालोन घेतलें लढाई मोठी झाली दोन तीन हजार फौज मारून बिजेसिंगास विल्यांत घातलें इतक्यात जयाजी आप्पाचा काळ जाहला मग येऊन दहन केलें हें वर्तमान जयनगरवाले यास कळताच अनिरुद्धसिंग याज समागमें शक्वत, राजावत व कुपावत व रुके इत्यादि सस्थानिक देऊन पचवीस हजार फौज व जंगी सामान, तोफा व गजिफा वगैरे सरंजामसुद्धां आश्विन मासीं राठोडाचे कुमकेस रवाना केले म्हणून येथून राजश्री सताजी वाबळे व शेटियाजी खराडे, रामराव नीळकंठ वगैरे पधरा हजार फौजेनिशीं जयनगरकर यांचे फौजेवरी पाठविले आहेत हा सविस्तर मजकूर पुणियास* लिहिला आहे परंतु बरसातीचे

---

१ ह्या मेडत्याच्या लढाईचें वर्णन भाऊसाहेबाची बखर पृष्ठ १३–१५ येथें सांपडेल

२ हें जयापाचें प्रसगावधान मोठें लक्षांत ठेविण्याजोगें आहे

३ मेडत्याच्या लढाईंत व ह्या नागोच्या लढाईंत शिंद्यांनीं मोठा पराक्रम केला दत्ताजीस " भीमबहाद्दर " म्हणत असत

* पुण्यास पेशव्यांना हा सर्व शिंद्याचे पत्रांतील मजकुराचा उतारा ( अगर गोषवारा) अंताजीपत देत आहे

दिवस, पुण्याहून फौज लवकर येणार नाहीं, सबब तुम्हास इतिहास सर्व कळावा म्हणोन लिहिलें आहे तरि पत्रदर्शनीं भारा फौज घेऊन दुमजला मजला करून जलद येऊन सामील होणें येते समयीं बाणाच्या कैच्या जेजाला आणणें त्याप्रमाणें पत्रे मागें पत्रें आलीं कारकून शुतरस्वार जासूद जोडया आल्या व तुम्हांस इकडे येण्यावेशीं पुण्यासही पत्रें गेलीं आहेत तिकडून आज्ञापत्र येतच आहे जलदानें निघोन येणे म्हणोन मारवाडांतून पत्रें शिंदे याचीं आलीं

ऐशियास श्रीमत राजश्री दादासाहेब यांची आज्ञा, गोपाळराव गणेश बर्वे याचा मामलतीचा बदोबस्त करून देणें दुसरा मजकूर—शिंदे यांचीं निकडीनें पत्रें आलीं दुरोख शह पडून अदेश पडला इतक्यात पुण्याचे मुक्कामींहून शुत्तरस्वार समागमें आज्ञापत्र भाद्रपद मासाचे निकडीनें आले जे, गोपाळराव गणेश याचा बदोबस्त तोडजोड पाहून करणें शिंदे यांची फौज मारवाडात आहे, जयाजी शिंदे सरकारकार्यास आले, दत्ताजी शिंदे व जनकोजी शिंदे जाऊन फसले आहेत, मोहरा शहास पडिला तुमचा सर्फराजी सर्व प्रकारें करून वाढविलें आहे तरि मातबर सरजामानिशी जलद मारवाडांत जाऊन पुस्तपन्हा करून, लढाईस हमरहा होणें साम दाम दड भेद चहू प्रकारें युक्तीस पडेल तसें करून शिंदे यास काढून घेऊन येणें तरी तुमची तारीफ म्हणोन दोन चार आज्ञापत्रें स्वदस्तुरचीं सादर जाहलीं वरातांचा ऐवज राजश्री गोविंदराव बल्लाळ याजकडून घेतला पुढें मसलत भारी, जमाव पाक्त असावा, मारवाडांत महर्गता रुपयास चार शेर दाणे, खर्चाची बेगमी पाहिजे म्हणून रामराव रतनसिंग वि श ब ज दा स व आणखी सावकार झासी, काल्पी येथील याजपासून कर्ज वीस लाख रुपये घेतलें हमी, गोविंद बल्लाळ यांची दिली गोपाळराव बर्वे याचा गोविंदराव बल्लाळे यांचा तह निम्मेनीम महाल वाटून देऊन केला तो बदोबस्त राजश्री हरा विठ्ठल यास सागून विजया दशमाचे मुहूर्तें कूच करून ग्वालेरीकडे गेलों इ-ज य खान पठाण भुपाळवाले यास एक हजार स्वार पठाणसुद्धां चाकरीस ठेविले ग्वालेरीचे पठाण बाराशें ठेविले काहीं मराठे स्वार झाशापैकीं, एकूण तीन हजार फौज जास्ता ठेविली. शभर उट बाणाच्या कैच्या भरून घेतले पचवीस जेजालाचे उट घेतले मारवाडात महागाई, व मोहीम कठीण, सबब लोकांनी गवगवा केला, [ कीं, ] बक्षीस व जाजता तैनाता केल्याखेरीज आम्ही येत नाहीं तेव्हा लाचार जाणून जाजती तैनाता बक्षीस, हत्ती, घोडे, पालख्या, चौकडे, कडीं योग्यायोग्य पाहून कबूल केलें व चौथाई तूर्त नालबदी देऊन फौजेची समजाविशी करून दहा हजार फौजेनिशीं मारवाडचे रोखें चालिलों राठोड व कछवे जयनगरवाले एकत्र जाले, जमाव भारी पडला शिंदे याजकडील फौज दोन छावण्या व महागाई बाबद खराब आहे त्याअर्थी सरजाम चागला असावा म्हणोन केरोलीस आलों राजे गोपाळसिंग केरोलावाले व रामसिंग हाडे बुदाकोटकर यांचा व सेवकाचा स्नेह पूर्वीपासून आहे सबब उभयतास मोहिमेस चालणें म्हणोन सांगितलें त्यांणीं मान्य केलें परतु दर स्वारास दररोज खर्च दोन रुपये यावे व एक साल खडणी आम्हांस माफ करावी म्हणजे येतों, [ असें बोलले ] तेव्हां त्याप्रमाणें मान्य करून, उभयतां राजे मशार-

निल्हे यास दर पांच हजार फौजेची नेमणूक सांगोन, दोघाची दहा हजार फौज व मशार-निल्हेप्र घेऊन चालून नदीपार जालो हा मजकूर तपशीलवार शिंदे याजकडे नागोरास लिहून साडणीस्वार रवाना केला व वाबळे, खराडे यास पत्रें पाठविला कीं, दर मजल येतों, तुम्ही धैर्य धरणें, आणि फौजेस ताकीद करून कहीवाले यांस मुलूख लुटावयास जयनगर प्रांतात सांगितलें त्याणीं धूम करून, मुलूख लुटून, मराठी कावा करून, गांव जाळिले हें वर्तमान राजे माधोसिंग जयगगरवाले यांस कळलें चाळीस हजार फौजेची आवाई पडली माधोसिंग कछवे जयनगरवाले याजकडे कारकून पत्रें देऊन पाठविले कीं, श्रीमतांची कृपा तुम्हांवरी आहे सालाबाद खंडणी देऊन जाजती उपसर्ग तुम्हांस लागत नाहीं असें असोन तुम्हीं आपली फौज राठोड यांजकडे कुमकेस पाठविली आहे जयाजी शिंदे सरकारकार्यास आले शिंदे याचें अवश्यक श्रीमतांस आहे सबब आम्हास आज्ञा केली जे, भा ी सर-जामानिशीं जाऊन राठोड यास तबी पोंचवून राजे रामसिंग यास राज्यासनीं बसवून शिंदे फौजेसुद्धा [ घेऊन ] तुम्हीं हुजूर येणे त्यावरून आम्ही दर कूच आलों दरमियान तुम्हा-कडील फौज आहे तिचा मोकाबला घेऊन लढाई करून फौज गारत करून मग पुढें विजेसिंग राठोड याचे पारपत्य करू स्पष्ट समजोन वर्तणूक करणें असें सांगोन पाठविलें आणि लांब लांब मजली करून कसबे दिंडवणे प्रांत मजकूर येथें आलों जयनगरची फौज व शिंदे यांचे फौजेची लढाई होत होती अनिरुद्धसिंग याची फौज भारी याजमुळें रगडीत चालिले तीस कोसांची तफावत नागोरची राहिली इतक्यात सेवकानें फौजसुद्धां जाऊन शह दिला. परतु जयनगरची फौज हावभरी जाहली नगदी सामान भारी, यामुळें दोन कूच दाटी करून[1] त्यांणीं केली, आणि तोफा व गजिफांची मारागिरी केली हत्यार लागेना तेव्हां शिंदे याजकडील सरदार यास बोलावून आणून मसलत केली जे, नागोरा समीप उतरले, राठोड व कछवे, एकत्र जाहले, म्हणजे भारी पडेल यास्तव तुम्हीं एक बाजूस होऊन लढाई द्यावी, आम्हाकडील हाडे[2] व केरोलीकर उभयतां राजे एकीकडे लढाई करतील व आम्ही एकीकडे होऊन चौगीर्दा लढाई करावी यश देणें श्रीमताचें पुण्य आहे याप्रमाणें करारांत आणून तीन टोळ्या करून लढाई सुरू केली त्याणींही मारागिरी भारी केली लोक व घोडीं बहुत जायां झालीं मग श्रीमत स्वामींचे चरण दृष्टीस आणून घोडे घातले ज्याप्रमाणें श्रीमत राजश्री भाऊसाहेब यांणीं निजाम अलीखान याचे फौजेवरी हल्ला करून दुमदारी बुडवून मोंगल

---

१ ' करून ' हा शब्द काढून टाकिला तर सबध बरा जुळतो " कछवे हावभरी होऊन दोन कूच आमचे होत असतां त्यांणीं आम्हांभोंवता दाटी केली नगदी सामान आम्हाजवळ असल्यामुळें आमचा विशेष यत्न चालेना " असा अर्थ होईल नगदी सामान-रोकड पैका

२ हाडे बुंदीकोटेकर ह्यांच्या शौर्याविषयीं, अढळपणाविषयीं, फार लौकिक आहे ह्यांच्या राजानीं आपल्या कुटुंबाच्या ' शाका ' करून युद्धामध्यें शेवटीं आत्माहुति दिल्या-बद्दल इतिहासात प्रसिद्ध आहे

पस्त केली, त्याप्रमाणें येथें करून दुमदारी बुडाविली दोन कोस माघारे सारिले चौगीर्दा चौक्या बसवून कोंडिला

इतकियांत राजे माधोसिंग याणीं जयनगराहून पत्रें अनिरुद्धसिंग यास पाठविलीं जे, पूर्वी दिल्ली शाहाजाहानाबाद येथें हजरत पातशहानी ल सू भाजि याचे खिजमतास दक्षिणेहून राजे अताजी माणकेश्वर यास फौजसुद्धा पाठविलें ते समयीं नबाब मनसूर अल्लीखान जाफरजगबादकर वजीर याची व हजरत पातशहाची लढाई झाली ते समयीं राजे मशारनिल्हे याणीं लढाई बहुत करून नबाब मसूरअल्ली खान याचा पराजय केला ते हल्लीं शिंदे याचे कुमकेस आले आहेत चाळीस हजार फौजेची आवाई ऐक्तो यास्तव तुम्हा पुढें न जाणें कळेल तसें करून सल्ला करून निघोन येणें अगर मगरूरा करून पुढें गेलियास फौज गारद करून देतील स्पष्ट समजोन माघारे फिरणें याप्रमाणें पत्रें जयनगराची येतांच अनिरुद्धसिंग याणीं तह करावा याबद्दल वकील येलचीं पाठविले लढाईचीही जरब बसली चौगिर्दा चौकी दिली यामुळें दाणा वैरण बंद होऊन महर्गता पडली आम्ही सांगोन पाठविलें कीं, तहच करणें तरी तुम्हीं खासा व सस्थानिक आहेत त्यासुद्धां वोलीस येणें, फौज लावून देणें नागोरास गेल्यावर ज्याप्रमाणें राजश्री पाटीलबाबा आज्ञा करतील त्याप्रमाणें वर्तणूक होईल म्हणून. त्याजवरून त्यानीं मान्य करून शकावत, रजावत व कुपावत तनरुके इत्यादि सस्थानिकसुद्धा तीनशें राऊत घेऊन सेवकाचे लष्करात उतरले वरकड फौज जयनगरास गेली रामबाण व कृष्णबाण दोन तोफा नामीं पचरसी होत्या त्या घेतल्या आणि कूच करून नागोरास आलों उभयता शिंदे दोन कोस येऊन लोकांच्या भेटी घेतल्या व सेवकाची भेट जहाली उभयता राजे समागमें होते त्याच्या भेटी बहुमानानें साप्रदायाप्रमाणें जाहल्या लष्कराचा मुक्काम जाहला अनिरुद्धसिंग जयनगरवाले वगैरे सस्थानिकाच्या भेटी जाहल्या. दुसरे दिवशीं तयार होऊन नागोरावर लढाई केली राठोडाची शिपायागिरीची स्तुत काय लिहावी ? बिजेसिंग तयार होऊन आला लढाई सुरू झाली, आम्हाकडील उभयता राजे होते त्यांची यांची रजपुतांची लढाई लागली हाडे याची शिपायगिरी राठोडास ठावून आहे घोडे सोडून खेत केलें, ख ण ख ण ता त तर्वारेची लढाई जहाली दुतर्फा ही बळी रजपूत एकमेकांस हटेनात म्हणून बहुत [ माणसे ] दुतर्फा जाया जहालीं वोळखीची लढाई, यामुळें मागें पाय टाकीनात तेव्हां सेवकानें दुसरीकडे बाण व जेजालांचा मार राठोडावरी केला व लोकानीही घोडे बेशक घातले शिंदे उभयतां सरदार उभे राहून

---

१ यावरून अताजीपत हे भाऊबरोबर १७५२ च्या लढाईंत होते असें दिसतें.
२ जाफरजगाबाद–अयोध्या ? ३ हें लिहिणें आत्मप्रशसेचें आहे
४ एला ( वेलदोडे ) सामदर्शक होय
५ ' कळल्यावर ' किंवा ' गेल्यावर ' ?
६ ह्यांतील कांहीं मारवाडांतील असावे
७ घोडे सोडून घोडे टाकून, पायउतारा होऊन

तमाशा पाहिला दोन प्रहर लढाई जहाली तेव्हा आगीचे माराने विजेसिंग राठोड माघारे सरोन किल्याचे आश्रयास गेले आपली फौज व हाडे करोलाकर हेही मुक्कामास आले राजश्री दत्ताजी शिंदे व जनकोजी शिंदे यांणा उभयतां राजांस आलिंगन देऊन मर्दुमकीची स्तुती केला सेवकास सांगितले की, तुम्हा आला त्यासारखे कामकाज चांगलें जहालें

त्यावरा बिजेसिंग राठोड याणा येलचीं सेवकाकडे पाठवून तहाची बोली लाविली तुम्ही आला तुमचेच मारफतानें जें बोलणें असेल तें बोलोन तह करितों याउपरि लढाई राहिली म्हणून वकिलानें येऊन सांगितल त्यास सदरहू मजकूर राजश्री पाटीलबाबांस विदित केला परतु त्याचे मर्जीस तह करावयाचे येईना आज दोन तीन सालें या मसलतीस लागोन खर्चाखाली आलों शेवटीं वडीलही सरकार-कार्यावर आले, आणि राजे रामसिंग राठोड याचाही बंदोबस्त जहाला नाहीं यास्तव सल्लाही आपण करीत नाहीं आणखा वर्ष सहा महिने राहून बिजेसिंगाचें पारिपत्य करून रामसिंगास राज्यासनीं बसवून मग देशास जाऊ, तोंपर्यंत जात नाहीं याप्रमाणे वकिलास जाबसाल सांगितला त्यावरून वकिलानीं जाऊन बिजेसिंग यास सांगितलें त्यावरून त्याजला जरब भारी बसली तेव्हा सेवकाकडे पेगाम बहुत बजिदे होऊन लाविला कीं, तुम्ही श्रीमताकडून आला आहां व तुमची मर्दुमीहा पाहिली याउपरि कळेल तसें चार गोष्टी पाटील बाबास सागून विवेक करवावा ज्याप्रमाणें मर्जी असेल त्याप्रमाणें मी राजी आहें रामसिंग यास राज्यीं बसवून मला सागाल त्याप्रमाणें राहीन खर्च आजितागायत पडला आहे जीवनमाफक सागाल त्याप्रमाणें देईन तुमच्या वचनाशिवाय एकदर नाहीं असें बोलणें जाहले तेव्हा राजश्री पाटीलबाबांस त्या अन्वयें निवेदन केलें, आणि सरकारचीं आज्ञापत्रें सेवकास आलीं होतीं तीच बजिन्नस दाखविलीं, आणि सांगितलें जे, याउपरि फार ओढूं नये खर्च जाहला त्याची चिल्हे व रामसिंगास स्थानावर बसावयाचें व मुलूख वाटून घेऊन यश घेऊन श्रीमताचे दर्शनास जावें हें बरें आहे तेव्हां मान्य जाहलें राज्याच्या तीन वांटण्या केल्या एक सरकारची व एक बिजेसिंग एक रामसिंग याप्रमाणें तह झाला पांच कोड रुपये सरकारची नजर, दोन करोड दरबार खर्च व काहीं सेवकाचे मिळोन याप्रमाणें ऐवजाची निशा घेतली नागोर मुख्य स्थळ तेथें रामसिंग याणीं राहून राज्य करावें झालोर किल्ला तेथें बिजेसिंगानें असावें जोतपूर किल्ला सरकारात ठेवावा याप्रमाणें करारांत जाणून बिजेसिंग याची भेटी करविली परस्परें हत्ती, घोडे, वस्त्रें बहुमान जाला रामसिंग व बिजेसिंग यांची भेट होऊन किलाफ तोडिला राजे रामसिंग हाडे बुंदीकोटकर व राजे गोपाळसिंग करोलीकर याचा करार केला होता तो पाटीलबाबांस सागून, एक सालची खंडणी माफ करून हत्ती, घोडे, जवाहीर, वस्त्रें, मेजवानी इत्यादिक आदर त्याच्या योग्यतेप्रमाणें करून उभयतास निरोप दिला अनिरुद्धसिंग

१ याप्रमाणें तह कदाचित् ठरला असेल पण अमलांत आला किंवा नाहीं ह्याविषयीं संशय आहे अजमीर प्रांत मात्र जो सर्व रजपुतस्थानचें नाक-तो मराठ्यांस मिळाला

व आणिक सस्थानिक जयनगरचे होते त्याच्या भेटी करविल्या त्यांना फोज पाठवून कुमक केली त्याबद्दल गुन्हेगारी दोन करोड रुपये सावकारी निशा घेऊन त्यास जयनगरास पाठविले याउपरि मुहूर्त पाहून तेथून कूच करून रूपनगरवाले याजकडील खडणीचा फडशा करून शिंदे यांस फोजेसुद्धां घेऊन हुजूर येतों

ज्याप्रमाणे सरकारची आज्ञा होती त्याप्रमाणें चाकरी बजावून दिली या मसलतीस लाखों रुपये देणें सावकारी आहेत त्याचा परिहार होऊन पुढे आधिक ऊर्जित करणार स्वामी समर्थ आहेत साहेबनौबत माहीमरातिब झालरदार पालखी देऊन सरदारी वाढवून सर्फराजी केली त्याअन्वयें सेवा करून दाखविली मनविशीं [म्हणाविशी] लोकानी चाकरी केली आहे तो अर्थ राजश्री पाटील × बावा सेवेसीं विदित करतां घ्यानास येईल तपशील बहुत लिहिला आहे येविशा चिटणीसास आज्ञा होऊन श्रवण करावयास स्वामी समर्थ आहेत सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

* * * * *

ही बखर भिकाजी नारायण अभ्यकर वस्ती सुशेरा तालुके खेड तर्फ सुवर्णदुर्ग क्षेत्र परशुराम सूत्र हिरण्यकेशी गोत्र वासिष्ठ याची असे शके १७२१ सिद्धार्थीनाम सवत्सरे पौष वद्य १३ त्रयोदशी गुरुवार ते दिवशीं बखर समाप्त हस्ताक्षर गोपाळ गोविंद जोशी मुक्काम वेळणेश्वर हल्लीं वस्ती मौजे सुशेरी सन १२०० माहे सबान सुा मयातैन अल्फ श्रीभार्गवराम प्रसन्न

---

ले १४४ [ ३५० ] — श १६७८ श्रावण व ७ ता १७।८।१७५६

॥ श्री ॥

पुरवणी राजश्री जनकोजी शिंदे गोसावी यास

आशीर्वाद उपरि तुम्हीं पत्र पाठविलें ते पावलें लिहिला मजकूर सविस्तर कळला सा मा कोटे येथील चाळास लाख रुपये खडणा केलियाचा लिहिला त्यापैकीं सरकारचा नजराणा पधरा लक्ष रुपये करार केले, त्या पैकीं सालमजकुरीं दहा लक्ष रुपये द्यावे, बाकीं पांच लक्ष रुपये पेस्तरसालीं द्यावे, याप्रमाणें करार केला आहे म्हणोन लिहिलें तें कळलें ऐशास प्रस्तुत सरकारांत ऐवजाची निकड बहुतच आहे याजकरितां सदहू नजराण्यापैकीं दहा लक्ष रुपये सालमजकुरीं द्यावे ते त्वर तर्तूद करून पाठविल्यास फारच उपयोगी पडतील यास्तव पत्रें पावतांच दहा लक्ष रुपये सत्वर पाठवून देणें वरकड मारवाड प्रांतें वगैरे ऐवज स्वारीमुळें जमा जहाला असेल तो तुम्ही देशास याल ते समयीं समागमें घेऊन यालच यदा* पैकियाची ओढ फारच जहाली आहे याजकरितां निकड जाणून लिहिलें असे रवाना छ २० जिलकाद सुा सबा खमसेन मया व अल्फ

---

× दत्ताजी शिंदे अताजी माणकेश्वर पानिपतावर पडला त्यापूर्वीचा ही हकीक्त

* येथपासून खुद्द खाशांचें हस्ताक्षर हें पत्र सदाशिवराव भाऊ यांणीं लिहिलेलें दिसतें.

ले १४५ }
[ ३४९ ] }

{ श १६७८ भाद्रपद शु १४
{ ता ७–९–१७५६

राजश्री रामाजीपत भाऊ गोसावी यांसि

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो दत्ताजी शिंदे दंडवत विनंती उपरि येथील कुशळ जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेलें पाहिजे विशेष श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींनीं पूर्वी आज्ञा केली होती कीं, घरास आल्यावर शिल्लक किती व लोकांचें कर्ज काय जालें त्याचा खर्च कैसा केला, त्याचा ताळेबंद लेहून पाठवणें म्हणोन लिहिलें होतें त्यावरून ताळेबंद लिहून राजश्री रामराव नारायण याजबरोबर पाठविला + आहे तो श्रीमंतास दाखवून जाब घेऊन आज्ञा मागोन येणें येथील वर्तमान तर, आम्हीं करजीन्या घांटें तोंडास आलो पुढें गंगातीरास जातों फौज जमा झाल्यावर गंगापार होऊन जाऊ. कित्येक वर्तमान राजश्री रामरावजी सांगतां कळों येईल त्याप्रमाणें करावें रा छ १२ जिल्हेज बहुत काय लिहिणें हे विनंती

मोतब सूद

---

ले १४६ }
[ ३४७ ] }

{ श १६७८ भाद्र व ७
{ ता १५–९–१७५६

॥श्री॥

राजश्री रामाजीपंत भाऊ गोसावी यांसि

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ दत्ताजी शिंदे दंडवत विनंती उपरि येथलि कुशल ताा छ १९ जिल्हेज जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष तुम्हीं पत्र छ १५ जिल्हेजचें पत्र पाठविलें तें पावलें आज्ञेप्रमाणें श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींची आज्ञा घेऊन लष्करास यावें म्हणोन श्रीमंताकडे गेलों होतों आज्ञा आली कीं, राजश्री रामराव नारायण हिशेब घेऊन येतात ते आल्यानंतर तुम्हीं आण ते समागमेंच जाणें म्हणोन आज्ञा आली त्यावरून राहिलों रामराव आल्यावर सत्वरीच येतों म्हणोन लिहिलें तर बहुत उत्तम असे रामरावजी पावले असतील ताळेबंद सरकारांत दाखवून श्रीमंतांची आज्ञा × मागोन उभयतांहीं समागमेंच येणें आम्ही गुंजाळाचा घांट उतरोन गंगातीरास जातों कळलें पाहिजे बहुत काय लिहिणें हें विनंती

---

+ येथें शिक्का बाजूवर जनकोजींचा आहे

× येथें बाजूवर " श्री ज्योतिस्वरूपचरणीं तत्पर जयाजी सुत जनकोजी शिंदे निरंतर " असा शिक्का पिंपळपानाच्या आकृतीचा आहे,

ले १४७
[ ३७१ ]

श १६७८ भाद्रपद व १२
ता २१।९।१७५६

श्री

श्रीमत राजश्री पतप्रधान स्वामींचे सेवेशा

विनती सेवक दत्ताजी शिंदे कृतानेक विज्ञापना सेवकाचें वर्तमान ता। छ २५ जिल्हेज पर्यंत यथास्थित असे विशेष आज्ञापत्र छ १९ जिल्हेजचें पाठविलें त छ २२ मिनहूस पावलें हिशेबाची याद रामराव नारायण यांजबा। पाठविली ते पावली हिसेब ऐसा असत नाहीं, सात सालां वेगळी वेगळी झडती असावी, तर त्यासि हिसेब म्हणावा कारकून तैनात खावून हिशेब नीट तयार करीत नाहींत यास्तव परिच्छिन्न कारकुनास ताकीद करून सात साला वेगळया वेगळ्या झडत्या तयार करवणें, म्हणोन आज्ञा केली ऐसि-यासि श्रीगोंद्यात असतां एक दोन आज्ञापत्रें आलीं कीं, झडत्या पाठविणें कदाचित् झडत्या तयार नसल्या तर स्वारी करून घरास आल्यावर शिल्लक किती व लोकाचें कर्ज घेतलें किती त्याचा खर्च कसा केला तो तूर्त ताळेबद पाठविणें मागून झडत्याही तयार होऊन येतील त्यावरून कारकुनांस ताकीद करून सांगितले कीं, झडत्या तयार करणें सन इहिदे ता। सन सल्लास तीन सालां तर झडत्या तयार होत्याच सन आर्बा ता। सन सीत तीन सालच्या झडत्या नव्हत्या त्या करून देणें म्हणोन ताकीद केली तो स्वामीपासून रामराव आज्ञा मागोन श्रीगोंद्यास आले त्यानींही जे आज्ञा जाहली होती त्याप्रमाणेंच सागितलें, परतु तीन सालांच्या झडत्या तयार होत्या तान सालाच्या झडत्या नाहींत, कारण निमित्य कीं, आमची छावणी मारवाडप्रातें तीन सालें जाली तेथें महालाचे हिशेब आले नव्हते ते स्वारीहून माघारे घरास येते समयीं महालचे हिशेब तीन सालाचे गगा उतरून येऊ तों पावेतों होतच होते शिलेदार वगैरे लोकाची समजाविशीं तान सालाची होणें होती ती स्वामींची भेट सिद्धटेकावर झाली तों पावेतों होत होती त्यामुळें तीन सालाच्या झडत्या तयार नव्हत्या झडत्या करावयास आणखी सा सात महिने पाहिजेत या करिताच कारकून नेहमीं श्रीगोंद्यात ठेवून झडत्या तयार करविल्या आहेत ताळेबद तूर्त पाठवणें म्हणोन आज्ञा होती त्यावरून श्रीगोंद्यास आल्यावर जे शिल्लक होती व कर्जें लोकांचीं घेतलीं होतीं ते जमा धरून खर्च जाला तो अखेर सालपावेतों लिहून पाठविला तो काहीं हिशेब नव्हे यथार्थच आहे राजश्री रामराव येथून गेले, तेव्हां सागितलें कीं, झडत्या करून मागाहून पाठवून देऊं, याप्रमाणें विनती करणें त्यानीं हि विनती केली असेल वारवार ताकीद पत्रें येतात कीं, हिशेब सात साला पाठवणें, तर आम्ही चाकर लोक आहों वावगा वर्तणूक करू अगर न करू हें सर्व स्वामी जाणतच आहेत झडत्या सत्वर करावयानिमित्य दफ्तरदार रामाजीपतकडील श्रीगोंद्यात ठेविले आहेत झडत्या तयार जाहल्यावर सेवेशीं पाठवून देऊ कच्चे कागद पाठवावयाची आज्ञा जाली तर कच्चीं दफ्तरें पुण्यास पाठवून देऊ झडत्या

१ नगराजिल्ह्यात ता श्रीगोंदें

तयार असल्या तर मागेंच पाठविल्या असत्या कारकुनास बेमुलाहिजा ताकीद केली आहे सत्वरीच झडत्या तयार होतील राजश्री रामाजीपंत स्वामींची आज्ञा घेऊन येतील दफ्तरदार त्यांजकडीलच आहेत लष्करास आल्यावर त्यांसिहि ताकीद आज्ञाप्रमाणें केली जाईल तेही आपल्याकडून कारकुनास ताकीद करतील झडत्या तयार झाल्यावर सेवेशीं पाठवून देऊ सेवेशीं श्रुत होय हे विज्ञप्ति

---

ले १४८ [२४८]

श १६७८ आश्विन शु ७
ता ३०-९-१७५६

॥ श्री ॥

राजश्री रामाजीपंत भाऊ गोसावी यांसि

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे दंडवत विनंती उपरि येथील कुशल ता। छ ५ मोहरम जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेलें पाहिजे विशेष तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें हिशेब पाठविला तो श्रीमंतास दाखविला परंतु ह्या हिशेबानें समजावीस होत नाहीं साता वर्षांच्या झडत्या तपशीलवार ऐशा पाहिजेत म्हणोन लिहिलें तर साता वर्षांच्या झडत्या न द्याव्या, न दाखवाव्या, हें कांहीं आमच्या चित्तीं नाहीं झडत्या झाल्यावर दाखवाव्या हें आमच्या चित्तीं होतें झडत्या तयार नाहींत म्हणोन मात्र न दाखविल्या दुसरा गुंता काय आहे ? हें सर्व तुम्ही जाणतच आहा झडत्या तयार करून सरकारात द्याव्या म्हणून कारकून नेहमीं श्रीगोंद्यात ठेविले आहेत झडत्या तयार झाल्यावर पाठवून देऊ कदाचित तूर्तच आणवीत असतील तर झडत्या तयार नाहींत, परंतु कच्चेच कागद उटावर घालून पुणियास पाठवून देऊ याप्रमाणें श्रीमंतासि जाबसाल करणें आज्ञापत्र आल्यावर दफ्तर पाठवून देऊ म्हणजे त्याची तरी समजावीस होईल बाबती व सरदेशमुखीचा पैका तूर्त मागतात फाजील जालें तें हिंदुस्थानास गेल्यावर श्रीमंत राजश्री दादा साहेबापाशीं उगवून द्यावें म्हणोन आज्ञा जाली म्हणोन लिहिलें तर आमच्या घरांत शिल्लक आहे अथवा नाहीं हें तुम्ही पुर्तें जाणतच आहां समजाविशीस ऐवज लोकांचा घेणें लागला तो माळव्यांतून ऐवज आणविला, तो त्यांस दिला, तऱ्ही लोकांचीं देणीं तैशींच राहिलीं आहेत त्याशिवाय नित्य रोजमुरा लोकांस द्यावयास ऐवज पाहिजे त्यास तर रोजमुरा द्यावाच लागतो ऐशी चोहोंकडून अडचण आहे याप्रमाणें जाबसाल करून निरोप मागोन लष्करांत आलें पाहिजे श्रीमंतांस खर्चास मागितलें परंतु द्यावयाचा अनमान करितात म्हणोन लेखन केलें, तर येते समयीं मागोन पाहणें, दिल्हें तर फारच उत्तम जालें नच देत तर आम्ही चाकर लोक आहों खावंदाशीं बळ

---

१ होळकरांची कैफियत पृष्ठ २२ टीप ४१ पहावी हिशोबाचा नेट पेशव्याकडून होता पण शिंद्यांनी बेजबाब किंवा उडवाउडवीचें उत्तर दिलें नाहीं असें या पत्रावरून होतें

२ चौथाईचा वसूल येईल त्यातून सरकारात जो पैका जमा होणें तो ' बाबती '

कोठवर करावें ? कर्जवाम जालें तर ते गोष्टीची* चिंता खावदासच आहे कर्ज होईल तें तेच वारतील बहुत काय लिहिणे हे विनती




ले १४९ }
[ ३४६ ]}

{श १६७८ मार्गशीर्ष शु ३
{ता' २४-११-१७५६

॥ श्रीलक्ष्मीकांत ॥

पौ॥ छ २८ रबिलोवल

राजश्री बाळाजी पंडित प्रधान गोसावी यासि

छ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो जानोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनती उपरि येथाल कुशळ जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे विशेष गोसावी यांनीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें लिहिलें वर्तमान अक्षरशहा अवगत जालें राजश्री शिवाजी भिकाजी याजकडे बाबती सरदेशमुखी प्रमाणें वराड येथील सालगुदस्ताचा आषाढमासचा [ ऐवज ] साडेब्याण्णव हजार रुपये येणें, त्यास मुदत होउन गेली त्यास ताकाद करून ऐवज पाठवावा मशारनिलेचा बदोबस्त करून मामला यथास्थित चालविला नाहीं म्हणोन ऐवजास दिरग लागला शिवाजी भिकाजी आपले तर्फेचेच आहेत म्हणोन विस्तारें लिहिलें ऐशियास• गोसावी यानीं आमचे निसबतीस अमल दिला आहे त्याचा बदोबस्त न केल्यानें सरकारचा ऐवज सुटेल कीं काय ? मामलतीचा बदोबस्त करणें तो आम्ही केलाच आहे शिवाजी भिकाजी आमचे तर्फेनेंच आहेत सरकारचा ऐवज मुदतीस पाठवावा, [ हीं ] उचित गोष्ट, परंतु निजामअली आले यानीं वराडात दगा नजरेचा केला याजमुळें, महालो महाल बाकी राहिली आहे, म्हणोन मुदतीस • अतर जालें अत पर आम्ही वराडात येताच झाड्यानशीं ऐवज पाठवीत असो पेस्तरसालचा मजकूर लिहिला सरदेशमुखीचा अमल आम्हांकडे तहनामियात गोसावी यानीं लिहून दिल्हाच आहे. आहे, त्याप्रमाणें सालमजकुरच्या ऐवजाची ताकीद मामलेदारास केलीच आहे कराराप्रमाणें अतर होणार नाहीं × रा। छ १ माहे रबिलावल वराडात आलियावर ऐवजाचा निकाल मामलेदारांस सागून जलदीनें ऐवज यावे ऐसें होईल सुज्ञाप्रती विशेष काय लिहिणें ' कृपा लोभ असों दिला पाहिजे, हे विनती




---

* येथें बाजूवर " श्रीशाहू राजपदांभोज भ्रमरायितचेतसा बिंबात्मजस्य " असा शिक्का अष्टपैलू आकृतीचा आहे × येथपासून खुद्द खाशांचें हस्ताक्षर

ले १५० } { श १६७८ मार्गशीर्ष व १३
[ ७१ ] } { ता १९-१२-१७५६

॥ श्री शंकर ॥

राजश्री बाळाजी पंडित प्रधान गोसावी यांसि—

छ सकळगुणाळंकरण अखंडित लक्ष्मी अळंकृत राजमान्य स्नो हणमतराव निंबाळकर दंडवत विनंती उपरि येथील कुशळ जाणून स्वकाय कुशळ लेखन करीत गेलें पाहिजे विशेष आपणाकडून राजश्री काशीराऊ दिवाण व राजश्री राजजी जुझारराऊ घाटगे व रा। तुकोजी चव्हाण आले यांनीं आपणाकडील कितेक स्नेहाचें व उत्तर प्रत्योत्तर जाल्याचे वर्तमान सांगितलें त्यावरून कळोन आलें ऐशियासि आपणांशी जो निश्चय हे करून आले त्याप्रमाणें राजश्री फिरंगोजी निंबाळकर याजबा दोन हजार फौज देऊन रवानगी केली येविषयीं राजश्री दतबानींही गोसावी यांसि पत्र लिहिलें आहे त्यावरून विदित होईल उभय पक्षीं दुसरा विचार आहे ऐसे नाहीं रा छ २६ रोवल बहुत काय लिहिणें कृपा असो दीजे हें विनंती

(श्री
शिवचरणीं तत्पर
बापुजी सुत हणमत
राव निंबाळकर)

(मोर्तब
सूद)

ले १५१ } { श १६७८
[ ३६१ ] } { सन १७५६

॥ श्री ॥

आशीर्वाद उपरि विजेसिंगाचा वकील रुपयाची निशा करावयाचा मजकूर पुणियात बोलत होता आम्हीं साफ म्हटले कीं, दत्तोबाचे मनास आलें तर तुम्हीं येणें त्यास त्याची आर्जी व कृष्णराव पारसनिसाचें पत्र यावें न यावें याविशीं आले आहे त्यास जलद जाब सांडणीस्वारा समागमें पाहोंचला पाहिजे तर रामाजीपंत रामराव यासमागमें त्यास काय

१ गोविंदबावा बिन वासुदेवबावा दीक्षित पाटणकर सावकारी करीत त्याचें कर्ज दत्ताजीनें देणें त्याची फेड दत्ताजी, मारवाडच्या विजेसिंगाकडील पैसा जयाप्पाच्या मुंडकटाईबद्दल येणें होता, त्यातून करणार होता पैशाची तडजोड करण्यासाठीं मारवाडचा वकील पुण्यास आला पेशव्यानें त्यास दत्ताजीकडे हवाला देऊन पाठविलें मारवाडचा पैसा येईना व गोविंदबावाची फेड होईना म्हणून गोविंदबावा व इतर पैठणकर ब्राह्मण दत्ताजीचे दारात धरणें धरून उपास करू लागले तेव्हा ब्राह्मणास जोर करून गप्प बसविण्याविषयी दत्ताजीनें पेशव्यास लिहिलं, त्यावर पेशव्याचें हे उत्तर आहे ब्राह्मणावर जबरदस्ती करून प्रकरण मिटणार नाहीं, त्याची समजूत काढावी असें पेशवा दत्ताजीस सुचवितो [गो स स ] रामाजीपंत दाभोळकर सिंद्याचा कारभारी रामराव नारायण सिंद्याचा हिशेबी कारकुन

लिहावे, तें सांगून पाठविणे पैठणचे ब्राह्मण आमचे दारीं उपास करीत बसणार ऐशियास गोविंदबाबाचें अगत्य जसें तुम्हास तसेंच आम्हास परतु ब्राह्मणाचे बोभाटास इलाज नाहीं याची समजाविशी होय तें करावें तरच उत्तम समजाविशी न होतां जोरावारीवर गोष्ट आलिया ब्राह्मण आमचे दारा उपास करू लागतील, आम्हींही सहजच उपाशीं राहू, या थरास जाईल ब्राह्मणाचा बोभाट काय ? आपण खावद आहेत सर्व त्यास बोलावून पुसावें वाजवी असेल तें करावें ब्राह्मणापाशीं बळ चालणार नाहीं व करू नये गुंा आम्ही फार कल, शेवटीं नाइलाज जाणून याप्रों केलें आतां जें करणे ते समजाविशीं काढून करावें हे आशीर्वाद तुम्ही त्रिवर्गच हेच चिठ्ठी पहाणें फाडून टाकणे हे आशीर्वाद

---

ले १५२ } [३५१] } {सन १७५६

श्री

राजश्री दत्ताजी शिंदे गोसावी यांसि

छ अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नो। रघुनाथ बाजीराव आशीर्वाद उपरि येथलि कुशल जाणून स्वकीय लिहीत जाणे विशेष रा। विष्णु महादेव+ याजकडलि ऐवज तुम्हाकडे जमा करविला होता तो जमा जालाच [असेल] त्यास तुम्हास आम्हाकडे यावयाचें नसेल तरि जो कोणीं तुम्हा अगोदर आम्हाकडे येत असेल याजबराबरी मशारनिले बाबन पैका आधीं हुजूर पाठवून देणे ओझ्यास उटें त्या बराबर तुम्हाजवळ अधिक असली तरी देऊन पाठवणे विठ्ठल शिवदेव अथवा समशेर बहादूर अथवा हरकोणी मातबर पथक येईल त्या बराबर पाठविणें उटे नसलीं तरि त्याची[३] + + + +

---

ले १५३ } [३७४] } छ ८ जमादिलाखर रविवार { ता ७-२-१७५७

श्रीलक्ष्मीकांत

राजश्री बाळाजी पडित प्रधान गोसावी यांसि

छ सकळ गुणालकरण अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नो॥ जानोजी भोसले सेनासाहेब सुभा दडवत विनती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असले

१ गुदस्ता २ हें सर्व पत्र नानासाहेबाच्या हातचें दत्ताजी शिंदे यास लिहिलेलें आहे

+ विष्णु महादेव गद्रे, सावकार

३ पुढे एक दोन ओळी फाटून गेल्या आहेत

पाहिजे विशेष गोसावी याना पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जहाला ऐसीयास गोसावी याचे लक्षानरूपचा इकडील विचार आहे वरकड सविस्तर अथ वरचेवरि पत्रीं लिहिला आहे त्याजवरून श्रुत जहाला असेल वारवार ल्याहावे ऐसें नाहा फौज तयार आहे जिकडे बोलाविले तिकडे येत असो वोढगस्त सरदारी याजमुळे गवगवा येऊन पडतो या उपरि विलब न लाविता गोसावी याचें आज्ञेप्रमाणे मजल दर मजल फौजेसह गगातीराकडे येत असो गोसावी याचे आज्ञे खेरीज आम्हाकडील तीलतुल्य विचार नाहा रवाना छ १७ माहे जमादिलोवल +मुज्ञाप्रती विशेष काय लिहिणें




कृपा लोभ असू दिला पाहिजे हे विनती लेखन सीमा + येथपासून खुद जानोजीचे अक्षर

---

ले १५४ [३६] — श १६७९ चैत्र शु ८ ता। २८-३-१७५७

॥ श्री ॥

वेदशास्त्र सपन्न राजश्री वासुदेव बावा दीक्षित स्वामीचे सेवेशीं. सेवक जानोजी भोसले सेनासाहेब सुभा, दडवत विज्ञापना येथील कुशल ता। छ ७ माहे रज्जब मुक्काम मालडगावपर्यंत सेवकाचे वर्तमान यथास्थित असे यानतर स्वामींचे भेटीची बहुत अपेक्षा आहे यास्तव आपणाकडे पत्र लेहून जासुद जोडी पाठविली आहे ऐसीयास उदईक मगळवारीं आमचा मुक्काम दुधनातीरीं करडीवर आहे तेथून दर मजल सत्वरच वराडप्रातीं जाणें आहे येविशाचा अर्थ सेवेशीं लिहिला आहे तरि स्वामींहीं कृपा करून सत्वर भेटीस आलें पाहिजे येते समयीं राजश्री शामराव विश्वनाथ यास समागमें घेऊन यावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले १५५ [३५] — श १६७९ चैत्र शु १० ता ३०-२-१७५७

॥ श्री ॥

वेदशास्त्र सपन्न राजश्री वासुदेवबाबा दीक्षित स्वामीचे सेवेशीं सेवक जानोजी भोसले सेनासाहेबसुभा दडवत विज्ञापना येथील कुशल ता। छ ९ माहे रज्जब मु॥ नजीक जाफराबाद येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष - स्वामींनीं पत्र पाठविलें तें

प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाला भेटीचा मार लिहिला कीं पैठणावरि मुक्काम होत तरि येणे होतें लाब यावयासि योग्य घडत नाहा म्हणोन लिहिलें त्यास पैठणावरि मुक्काम करावे तरि तो विचार काहीं विस्तारयुक्त ल्याहावा असें नाहीं सकलित मजकूर पहिले पत्रा आपणास लिहिलेलाच आहे यास्तव उदरीवरि त्वरेनें जावें लागेल म्हणोन गगातीरीं मुक्काम नेमले उदरीवरि मुक्काम नेमले आहेत, तेथेच मागाहून म ह त ह स पढरी बावा व बाबुराव कोनेर येतलि त्यास स्वामींच्या भेटीची अपेक्षा फार आम्हास आहे कैलासवासी तर्थिरूपामागें स्वामी वडील आहेत तीर्थरूपापेक्षा आमचे ठायीं ममता विशेषात्कारें धरिली पाहिजे वर्षासनाचा मार लिहिला तरी कैलासवासी याणीं वर्षासन चालविलें आहेत त्यात तिलतुल्य अतराई होणार नाहीं तरी स्वामींनीं कृपा करून उदरीच्या मुक्कामीं येऊन भेटीचा लाभ दिला पाहिजे येते समयीं राजश्री शामराव विश्वनाथ यासही घेऊन यावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले १५६ [६६] — श १६७९ आषाढ व १ ता २ ७ १७५७

॥ श्री ॥

पु॥ राजश्री बळवतराव गणपत* स्वामी गोसावी यासि—

विनती उपरी श्रीरगपट्टणकराचा प्रकार कसा आहे, बुद्धि स्थीर राहून सरकारचा पैका टक्का हस्तेबदीचा देऊन दोन पट्ट्यातलि कोणती पट्टी सोडवितात किंवा पैका द्यावयास अभाव करून लबाडावर आहेत, वकील पाठविले याजशीं कसे वर्ततात, याचे त्याचे अतरबाह्य कसें, व सरकारी निष्ठेनें वर्तावयाचा या न वर्तावयाचा डौल कसा घातला आहे, ते बातमी तुम्हास येतच असेल तरि विस्तारयुक्त त्याजकडील वर्तमान लिहीत जावे आदवानीकरानीं हा कालवरी ऐवजाचा निकाल केला नाहीं मौलवी तेथें यख्त्यारी जाले आहेत, तरि तुम्हीं त्यास वरचेवरि ताकीद करून ऐवज राजश्री मल्हार नाईक+ यास देविला आहे, त्याचे पदरीं पडे तें करावें छ० १४ सवाल हे विनती

---

१५७ [ ३७८ ] — श १६७९ कार्तिक व ११ ता ७।१२।१७५७

श्री शकर

राजश्री दत्ताजी शिंदे गोसावी यासि

छ सकल गुणालकरण अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्ने॥ हणमतराऊ निबाळकर रामराम विनती उपरि येथील कुशाळ जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष

---

*मेहेंदळे यास नानासाहेबानें हें पत्र लिहिलें आहे + रास्ते

नबाब साहेबाचा× व आपला हर्षामष आजि तीन महिने राहिला आहे येणे करून दुतर्फा हा स्नेहास उत्तम नाहा त्यासि त्याच व आपले रहस्य व्हाव ऐसा मनोदय आमचा आहे त्याचे पदरीं तुम्हासारिखे मातबर सरदार आहेत, व इकडे याचे पदरा आम्हा आहो त्यास आपला आमचा स्नेह आणि जिव्हाळा, माया ममता आहे, म्हणून आपल्यास स्नेहाने पत्र लिहिले आहे तरि हे गोष्टी चित्तात आणून उत्तर पाठवावे म्हणजे कोणी कारकून पाठवून देऊ हे यश आपण घ्यावे, यात उत्तम आहे बहुत लिहिणे तरि आपण सुज्ञ आहेत रा।। छ २४ रा।।बल बहुत काय लिहिणे कृपा असो दीजे हे विनती मोर्तबसूद

---

ले १५८ } [ १३३ ] } {श १६७९ {सन १७५७

॥ श्री ॥

राजश्री सोमशेखर नाईक सस्थान हरपनहली गोसावा याशा—

छ सकळ गुणालंकरण अखडित लक्ष्मा अलंकृत राजमान्य स्ने॥ महादाजा अबाजी आशीर्वाद उपरि येथील कुशळ जाणोन स्वकीय लिहीत असले पाहिजे विशेष—तुमच्या सस्थानचा मामला चुकला पाहिजे तुम्हाकडून मातबर येऊन तह रह करावा ऐसा निमित्य रा॥ त्रिंबकराव गिरमाजी तुम्हाकडे पाठविले असता हा कालपर्यंत मातबर पाठविले नाहा अपूर्व असे। अत पर आम्ही मजल दरमजल ते प्राते येत असो तुमच्या चित्तात तह रह करावा, मुलकाचा बचाव करून घ्यावा, ऐसे असेल तर अविलबे मारनिले बरोबर मातबर पाठवून देणें

---

ले १५९ } [ ११० ] } {श १६७९ {सन १७५७

॥ श्री ॥

सेवेशीं विज्ञापना हिंदुपत बुंधेले याणा अमानसिंगास मारिले टिका जहाला नाहीं त्यांणी महदन्याय केला आहे त्याचें पारपत्य करणें जरूर आहे तुम्हीं त्याचे सन्निध जाग्याचे असोन काहाच वर्तमान लिहिलें नाहा तरी तुम्हाकडे राजकारण आले असेल त्यास सविस्तर वर्तमान लिहून पाठवणें म्हणोन आज्ञा त्यास येविशीचें एक वेळ विनतीपत्र लिहिलें होतें, परतु जोडा मारिली गेली दुसरें तो जिम्मा राजश्री गोविंद बल्लाळ याचा सेवकास स्वामाची आज्ञा नाहीं व त्याचे पुत्रास लिहून पाठविलें त्याणा पत्रातील मजकूरच समजला नाहीं म्हणोन दस्तऐवज न गोविता उत्तर लिहिले दुसरें गैरहगाम दिवस आणि सेवकाजवळ फौज थोडी

---

× निजाम सलाबतजग यानतर एक महिन्याने दत्ताजी शिंदे व विश्वासराव पेशवे याना रामचद्रराव जाधवास शिंदखेडच्या गढीत काढून निजामअलीस धुडकावून उत्तरेस साखरखेर्ड्याकडे पिटाळले व तेथें नानासाहेब पेशव्यानें पचवीस लक्षाचा मुलूख घेऊन तह केला

हिंदुपत माजोरा आहे त्याचा ल्हान भाऊ खेदासिंग त्यास काढून दिल्हे त्याचे वकील आले बोली चालीही लागली आहे त्याजकडाल सूत्र ठीक करून ठेविले आहे त्याचा हिस्सा निमेचा देविल्याने काहा नामजादा चार, पाच लक्ष रुपये मिळतील ऐसे आहे परतु फौज पाहिजे याजकरिता आलाहिदा पत्रा सविस्तर विनती लिहिली आहे त्याप्रमाणें दोन हजार फौज आल्याने चार महिने पोट बाहेर भरून सरकार किफायत होईल इतके दिवस इकडे जाहले या उपरि काल्पीस जाऊ, दसरा जाहला म्हणजे इकडे येतों स्वामींनी कृपा करून दोन हजार फौज दसरा आलीकडे येऊन पोहचे तें करणार स्वामी समर्थ आहेत स्वामीचे प्रतापे करून पारपत्य उत्तम प्रकारे करून होईल हल्ला एक पत्र हिंदुपतीस जे तुम्ही नाहाक अमानसिंगास मारून सरकारचा टिका[1] न होता राजे जाहला, व खेदसिंगास काढून दिल्हा हे गोष्ट कार्याची नाही हल्ला गोपाळराव बापूजी यास आज्ञा केली तरी मशारनिले सागतील त्याप्रमाणें खेदसिंगास हिस्सा देणे व याचे आज्ञे प्रमाणे वर्तणूक करणे म्हणोन उत्तम प्रकारें लिहून ताकीद, व एक पत्र राजे जगतराज यास जे गोपाळराव यास आज्ञा केली आहे तरी तुम्ही हे एक होऊन पारपत्य करणें [ व ] सवाई दिवाण गुमानसिंगास याचे समागमे देणे, याप्रमाण, व एक पत्र राजश्री गोविंदपत यास जे फितुर करून पा व तें स दिल्याने उत्तम प्रकारे पारपत्य स्वामाचे प्रतापें होऊन येईल सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना ×

---

ले १६० [ ४०३ ]

श १६८० चैत्र शुद्ध १०
ता १७ एप्रिल १७५८

श्री

खरेदीखत शके १६८० बहुधान्यनाम सवत्सरे चैत्र शु॥ १० सोमवार ते दिवशीं तिमाजी वा॥ कान्होजी व रामजी कान्होजी भोर मौजे भोरवाडी के॥ अकोलनेर प्रे॥ पाडेपेडगाव यासि विठोजी पाटील मोकदम व समस्त दाहीजन समाकुळ पाढरी मजरे मजकूर के॥ मजकूर सन हजार ११६७ कारणें खरेदीखत लिहून दिधले ऐसिजे सन हजार ११६१ एकसष्टीच्या सालात दोहीं राजाचा दगा झाला, तमाम मुलूख जाळून लुटून परागदा जाला, त्याजमुळें मौजे मजकूर परागदा होऊन मुलकावर गेले तों सन हजार ११६२ बासटी मध्ये मोंगलाई कडील जागीर निघोन स्वराज्यात श्रीमत रा॥ भाऊसाहेबास[2] जागीर झाली मग साहेबी रयत गोळा करून मौजे मजकुरास कौल दिल्हा, आणि गावची वसात

---

× नामजादा चालून जाण्याबद्दल दिलेला ऐवज ह्या अर्थी

१ टिका=टिळा—गादीवर बसण्याचे वेळीं वडील नातलगानें टिळा लावला म्हणजे सर्व विधि पूर्ण झाला असा रजपुताचा समज आहे येथें पेशव्याच्या मार्फत व्हावयास पाहिजे होता पत्र गोपाळराव बर्वे याचें पेशव्यास खड १ लें ७२ पहा

२ हे भाऊसाहेब पेशवे नव्हत अकोळनेरकर इनामदार रामाजी अनत दाभोळकर ते हे होत मारवाडात भाऊ साहेब पेशवे कधींही गेले नाहीत

केली, आणि साहेब मोहीम प्रात मारवाड देशास गेले तो मागें राजश्री गोपाळ शकर सरदेशमुख याणीं प्रगणे मजकुरावर दगा करून राजश्री कृष्णाजीपत शेखदार व राजश्री चादजी पाटील जाधव व विसाजी बाबाजी कुलकर्णी ऐशियास धरोन ठाणे पिंपळगावू गर्भा येथें नेऊन जबरदस्तीनें सन हजार ११६१ एकसष्टीचे खडणी सन ११६४ चौमष्टीमध्ये केली त्यास रुपये द्यावयास ऐवज नाहीं कोठे कांहीं नाइलाज जाहला मग तुमच्या गळा पडोन तुम्हास जागा पाढरी गावची बखळ पैकीं खरेदी दिधली तपशील गज सुमारी प्रें।। करार पूर्व पश्चिम गज सु।। ३३ उत्तर दक्षीण गज १९।। सु।

---

६२७
१९।।

---

६४३।।

सदर्हू प्रमाणे रुमाली गज ६४३।। किंमत रुपये ४५ पचेचाळीस घेऊन तुम्हास मिरास करून दिधली असे हद्द मोहताद पडेवळकरी पूर्वेस राणोजी जासुदेव, दक्षणेस गावची गल्ली, पलीकडे बाळोजी जासूद नवी खरेदी व पश्चिमेस गावची गल्ली, पलीकडे गावची गाव-कुसू व उत्तरेस तुमचे तुम्ही दरवाजा पूर्व मुखी लावावा, व मोरी दरवाजिया सेजारीं लावावी व पन्हेळ आपले अगणाम्यें लावावे येणें प्रें।। तुम्हास मिरास करून दिधली आहे या जागियावर इमारत बाधोन लेकराचे लेकरी करावा आणि नादावें यास कोणी हरकत करील त्यास आपण समजाऊ आपण आपले बेताळीस स्मरोन तुम्हास मिरास करून दिधली असे हें खरेदीखत लेहून दिधलें सही —

| | |
|---|---|
| निशाणी नागर | रामाजी व।। कान्होजी भोर हिसा ३ रुपये १५ |
| वि।। गोविंद नारायण बुळे जोशी कुळकर्णी मार | राणोजी व।। कान्होजी भोर वि।। भाऊ हिस्से २ रुपये ३० तीस |

गाही

विठोजी बिन जोमाजी पाटील मौजे भोर मल्हारजी बिन गगाजी को। मार

---

ले १६१ [३७७]

{श १६८० चै व १२
{ता ४-५-१७५८

श्री

राजश्री रघुनाथपत गोसावी यासि

छ सकल गुणालकरण अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्ने।। मुधोजी भोसले सेना-धुरधर दडवत विनती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित असलें पाहिजे.

विशेष आपण जासूद जोडी समागमे पत्र पाठविलें, सुसमया प्रविष्ट होऊन लेखनाभिप्राय अवगत झाला **लाहोर** फत्ते होऊन **जाहानखान** पळोन गेला, त्याजमागें फौजा गेल्या आहेत, म्हणोन लिहिले, त्याजवरून बहुत सतोष जहाला हरघडी येणार समागमें पत्रद्वारा साकल्य लिहित असावें रवाना छ २५ माहे साबान सुज्ञ प्रति विशेष काय लिहिणें. लोभ असो दीजे हे विनती मोर्तबसूद

---

१६२ [ ३४१ ]

चैत्र व० १३ श १६८० ता ५-५-१७५८

पौाा छ ५ रमजान

॥ श्री ॥

श्रीमत राजश्री **दादासाहेब** स्वामींचे सेवेशीं

विनती सेवक अताजी **माणकेश्वर** कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना सेवकाचें वर्तमान ताा चैत्र वद्य १३ शुक्रवार मुक्काम **दिल्ली** स्वामींचें कृपावलोकनें करून यथास्थित जाणोन स्वकीय लेखन करावयासि आज्ञा केली पाहिजे विशेष सेवकास स्वामींनीं कृपा करून पत्र छ ९ साबानचें पाठविलें ते पावलें वर्तमान **लाहोर**चें फत्तेचें व शत्रूचे पारिपत्याचें व तिकडील मुलूख काबीज केल्याचे लिहिलें ते सविस्तर वाचून परम आनद जाला तो पर्त्री कोठवरि ल्याहावा **हिंदुस्थानात** कीर्त, लौकिक मातबर जाली कुल राजे, उमराऊ, सुभे, यास दहशत पडली सारे **हिंदुस्थान**चा सूड **अबदाली** पासून एक स्वामींनीं घेतला तेणें-करून यशाचे पर्वत जाले ! स्वामी यशस्वीचे आहेत याचा विस्तार सेवकास लेखन करावयास सामर्थ्य कैचें ? हे वर्तमान वजिरानीं ऐकोन बहुतच हर्ष मानिला शत्रूनीं बहुत उन्मत्त करून **मथुरा** क्षेत्राचा कद्दा केला होता, त्याचें फल ईश्वरें लवकरीच दाखविलें ! स्वामींस यश आले याचा सतोष फारच वजीराना मानिला त्याचा परिवार कोठवरि लिहावा स्वामी अवतारी पुरुष आहेत त्याची स्तुत मनुष्यानीं काय करावी ? वरकड इकडील सविस्तर वर्तमान आलाहिदा पुरवणिया लिहिल्या आहेत त्या ध्यानास आणून याचीं उत्तरें वेगळालीं पाठवावयास स्वामी समर्थ आहेत साराश गोष्ट सेवकास आश्रा स्वामींचे पायाखेरीज दुसरा कोठें-ही नाहीं येविषया वारवार सेवकानीं लिहावेंसें नाहीं स्वामींच्या दृष्टीस थोडक्याच दिवसात पडेल जरि स्वामींची छावणी लाहोर प्रातीं जाली तरि वजीर पातशाहास घेऊन छावणीस आपल्या जवळ घेउन येतो जरि करिता आपण काहीं आपली दहा हजार फौज ठेवून इकडे येतील तरि हे दोघे सरदार आपल्या सरदाराजवळ ठेवितील आपण जेथें खासा छावणी करतील तेथेच हे खासा वजीर छावणी आपणाजवळ करतील, आपणा वेगळें कोठें खासा निराळें रहात नाहींत परतु वजीराने व लहान मोठे सर्वत्र म्हणतात, खासा छावणी न जाली तरि पठाण मागती **लाहोर** प्राती पावसाळा येताल उगेच लोक म्हणतात तें सेवेशीं लिहिलें,

---

येथून मुधोजीच हस्ताक्षर

करणें न करणे यख्त्यार खावदाचा वजाराच्या यावयाचा निश्चय कोणे प्रकारचा कोणे स्थळा ती आज्ञा निवडून सेवकास व वजीरास ल्याहावी त्याप्रमाण त्या स्थळा दाखल होउन राजश्री विठ्ठल शिवदेवही सत्वरच सेवेशा येतील त्याजही प्रमाण राजश्री कृष्णरावजी येतील सर्व विनती करतील सेवेशा श्रुत होय हे विज्ञापना +

---

ले १६३ [६१] — श १६८० वैशाख व १० ता १६ १७५८

॥ श्री ॥

राजश्री नाना पडित प्रधान गोसावी यासि—

छ सकळ गुणालकरण अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्ने॥ मानाजी आगरे वजारतमाब रामराम विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन आज्ञा करीत असलें पाहिजे विशेष–राजश्री महादाजी रघुनाथ यास मजमुचा धदा सागोन रेवदडियास पाठविल्यापासून कारभाराचा बदोबस्त व लोकाची समजावीस यथास्थित करून अमीनपणें येकनिष्ठेनें वर्ततात, ऐसं समीपवर्ती कुलाबियास श्रवणात येतच होतें एकनिष्ठतेविशीं आप लाही निशा जाहालाच आहे साप्रत जजिरेयाचे मोहिमेचे प्रसगात जमाव व साहित्य सहवर्तमान मशारनिले येथें आलियावर तरतुद व ततबीर पाहून बहुत सतोष जाहाला सेवक लोक निष्ठेने वर्ततात त्याची सर्फराजी बहुमान खावदाही करावा उचित जाणोन राजश्री रामाजीपताकडून तपशीलें विनति लेहविली आहे आम्ही लिहिल्याचे जरूर जाणोन या समयात मशारनिल्हेचे बहुमानास पालखिची आज्ञा करणार आपण समर्थ आहात मोर्चेबदीचे प्रसगास हरएक साहित्यास रेवदडासमीप अनुकूल आहे साहित्याचे तरतुदीस मशारनिल्हेस रवाना करविले असत साराश बहुमानायोग्य जाणून लिहिलें आहे येविशा उपेक्षा नसावी रा। छ० २४ माहे रमजान बहुत काय लिहिणे कृपा निरतर वर्धमान असावी हे विनती

(शिक्का *)

(मोर्तब सूद)

---

+ हें पत्र दादाच्या लाहोरच्या मोहिमेस अनुलक्षून आहे या पूर्वी अबदली हिंदुस्थानात येऊन दिल्ली, मथुरा, वगैरे शहराचा नाश करून गेला होता, त्याचा सूड दादानीं घेतला अशा भावा हे लिहिणें आहे

* शिक्यावरील अक्षरें लागत नाहात हा दीर्घवर्तुलाकृति आहे

ले १६४ }
[ ३४ ] }

{ श १६८० भाद्रपद शु ६
ता। ८ ९ १७५८

॥ श्री ॥

वेदशास्त्र सपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामीचे सेवेशी

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक नमस्कार विनति उपरा येथील कुशळ जाणून स्वकीय लिहित असले पाहिजे विशेष राजेश्री काशा बल्लाळ व अरवे रमण [ ? ] याजबरोबर खिजमतगार वगैरे माणसे देऊन हिंदुस्थान प्राते कामगिरीस रवाना केले आहेत मागाहून याजबरोबर आणिक सरजाम पाठवावा लागतो, त्यास आठ दहा दिवस * साता-रियास राहतील त्यास याचा समाचार घेत जावा जागा राहण्यास द्यावी रा छ ४ मोहोरम बहुत काय लिहिणे हे विनति

---

ले १६५ }
[ ३८८ ] }

{श १६८० मार्गशीर्ष व २
{ता १७ १२ १७५८

श्री

अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य राजश्री रामाजी अनत गोसावी यासि—

सेवक बाळाजी बाजाराव प्रधान नमस्कार उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणे विशेष राजश्री दत्ताजा शिंदे व जनकोजी शिंदे कोठे आहेत, काय मनसुबा करितात, ते वरच्यावर कळलें पाहिजे याजकरिता निरतर लिहीत जाणें वजीराचा अगत्यवाद चिरजिव राजश्री, दादास आहे त्याचा पक्ष धरून नजीबखानाचें पारपत्य करावें लाहोरचा नवा मुलूख सोडविला तेथे अदीनाबेग ठेविला होता तो मृत्यु पावला यास्तव तेथील बदोबस्त चागला जाला पाहिजे याजकरिता दत्ताजी शिंदे यांणीं तिकडे जाऊन यथास्थित बदोबस्त राहे ते अगत्य करावें बगाल्याकडील्हा काम मातबर आहे तेथें पैका मेळवावयाची जागा आहे लाहोराकडील बदोबस्त असिल्यास मनसूरअलीखानाचे लेका-सारिखा मातबर सोबती करून भारी फौजेनशा जावें जरब देऊन पैका मातबर मेळवावा पट्टण्याकडील व बगालियाचा मुलूख सोडवावा ठीक पडल्यास वजीरासही समागमें न्यावें परतु त्याचें येणें पेचपाचामुळें घडेल असें दिसत नाहीं दत्तबा चित्तावर धरतील तें करतील दुसरियाचे सोबतीचा भरोंसा कशास पाहिजे ? तसे मनसूरअलीचे लेकापासून काशी प्रयागची नजर व आणखी कित्येक बाबती त्याजकडे लावून पैका साधेल तरि साधावा एक लाहोरचा बदोबस्त असल्यास हें करावें साराश सरकारच्या कर्जास ऐवज मातबर मिळे असा मनसुबा करून पैका मेळवणें विस्तारें उभयतास लिहिले त्याजवरून कळेल जाणिजे छ १५ रबिलाखर बहुत काय लिहिणें लेखनसीमा

---

* सातारे हें औरगाबादेजवळ आहे हें दीक्षिताचें जहागिरातील एक गाव होय

ले १२६ } [ ३७३ ] }	{ श १६८० माघ व १२ { ता २८-१२ १७५९

॥ श्री ॥

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री रामाजी अनंत गोसावी यांसि सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणे विशेष तुम्हाकडून पत्र बहुत दिवस येऊन वर्तमान कळत नाही राजश्री दत्ताजी शिंदे याचा मारवाडचा मातबर पैका उगवणे त्याचा उगवा वयाचा विचार कसा केला तो लिहिणे व लाहूर, बंगाला व पाटणें हे तीन मनसुबे प्रस्तुत मशारनिलेस मातबर आहेत त्यास लाहोरास चिरंजीव राजश्री दादानीं अदीनाबेग सुभेदार करून ठेविला होता, तो मृत्यु पावला त्याचा नायब लाहोरास आहे तो तुमचे उपयोगी असला तर कोणी सरदार फौज देऊन तिकडे पाठवून बंदोबस्त करावा बंगाला, पाटणें यास स्वारी करावी मातबर पैका कर्जाबद्दल मेळवावा बंगाल्यास क्रोड दोन क्रोडी पैका मिळे अशी जागा आहे भारी पैका मेळवून कर्जाची परिहार करून फौज ताजी राखावी असा विचार झाला पाहिजे पाटणें हस्तगत करावें, तें स्थळ घ्यावयाचेंच आहे खासा दत्तबा व जनकोबांनी मातबर फौजेनिशी तिकडे जाऊन पाटणें घ्यावे, तेथे छावणी करून राहवें तेथून बंगाल्याचा मनसुबा करावा तो चिरंजीव राजश्री दादा बादज बरसात हिंदुस्थानास येतील तदोत्तर चिरंजीव मशारनिलेनी बंगाल्याची स्वारी करून मातबर पैका मेळवावा गुदस्ताप्रो बंगाल्याची मामलत चुकवावयास वकील तुम्हाकडे आला तर चुकवू नये बंगाल्याकडील मातबर पैका आल्याविना कर्जाचा परिहार होत नाहीं भारी फौज जाऊन क्रोड दोन क्रोडी पैका मेळविला पाहिजे जर फौज न जाता पन्नास साठ लक्षावर मामलत चुकवितील तरि चुकवावी असें न होय तरि चिरंजीव तिकडे आल्यावर मनसुबा करावा प्रस्तुत तुम्ही पाटणाकडे जाऊन पाटणें काबीज करावें व सुजात उद्दवला कडील दोन तीन कामें आहेत काशी, अयोध्या, प्रयाग, घ्यावें चिरंजीवाजवळ काशी, अयोध्या द्यावयाचा करार केला आहे प्रयागची+ रतबदल आहे तोही मनसुबा सोहलतीनें होईल तरि करावा साराश उमदे मनसुबे करून, पैका भारी मेळवून कर्जाची ओढ वारून, फौज ताजी राखावी मुरत्वें करून हेच मर्जी आहे गुदस्ता अवकाश नवता यास्तव बारावर मामलत र॥ विठ्ठल शिवदेव याणीं चुकविली यदा मोठें काम ऐवजाचें तेंच आहे जर दिल्लीस पन्नास लक्षावर एकसाला लागली तरीच विल्हे लावावी ते सुबे बोले देणार नाहीत, परतु जबरदस्तीनें मशारनिल्हेनी पठण्यापावेतो चालून जातील तेव्हा नरम होऊन मातबर ऐवज देतील दिल्ली प्रांतीं नारो शकर अथवा आणखी कोणी दोन तीन हजार फौज ठेवावी यदा लाहोराकडील ऐवज आणून जरूर हुजूर पावता करावा

---

+ काशी, प्रयाग, हीं ठिकाणें घेण्याविशीं पेशव्याच्या मनात फार होतें पण त्याप्रमाणें घडून आलें नाहीं हें पत्र व मागील मसलती फार मोठमोठ्या आहेत ह्या पार- पडल्या तर हिंदुस्थानाचें सपूर्ण सार्वभौमत्व पेशव्याकडे आलें असत ~ बारा लक्षावर

करावा अताजी माणकेश्वर यास परिच्छिन्न हुजूर यावयाविशा लिहिले आहे त्याचे हवा ल्याबाबद राहिली असेल तरि सक्त ताकीद करून उगवेसे करावें वजिराकडे त्याची फौज किती व चाकर किती महिने होती, मेरट वगैरे महालाचा ऐवज त्यास वसूल किती जहाला, हुजूरचे तैनातजाबत्याची फौज चार पाच हजार आहे, ऐसें ते लिहीत असतात परंतु वजीराकडलि फौज व हुजूरचे कराराची फौज दोन्ही मिळोन पाच सहा हजार असेल हे ते मिळोन घालमेल करीत असतील यात सशय नाहीं याचा शोध ते आले तरि करावा यात सरकारची मातबर किफायत आहे गणतीचे निकडीची साधि पाहून, महिनेमहाल फौज चाकर ठेवून, गणतीची भरती करून दाखवावी, मग दूर करावी, हा प्रकार त्याचा आहे येविशींचा शोध पूर्ता करणें भीड न धरणें जर भीड धरणें असेल तरि मोघम चौकशी करू नये येथें येतील मग जसें बनेल तसे केले जाईल जर चौकशी करणें तर फारच सख्तीने खावदगिरीने करावी सर्व माहीत मेळवून चौकशी करावी मागें जफतींत व फुरोइत+ त्याणा तफावत केली असेल तेही कलमवार ठिकाणीं लावणे साराश मळमळीत काहीं न करणें येथील मुख्य वर्तमान इतकेंच कीं, क्रोड रुपये कर्ज देणे त्यास अवघी फौज घरीं बसविली, वीस हजार जरूराती कामाबद्दल ठेविली, त्यास पैका देणें आला तीस लाख मात्र कर्जदा रास ऐवज पावला बाकी सतर लाख देणें आहे पन्नास लाख कर्ज तुम्हीं फेडावें एक दुसरें मातबर काम करावें वाटणी वगैरे अर्थ घ्यानात न आणिता खामखा कर्ज फेडावें जाते समयीं दृतबा बोलोन गेले त्या गोष्टीवर भरोसा आहे ये विशा उभयतासही पत्रें याच प्रकारें लिहिला आहेत तरी उमदें काम होऊन पैका भारी मिळे ते गोष्ट करणें जाणिजे छ २५ जमादिलाखर* आठा दिवसा आड मागील पुढील वर्तमान लिहीत जाणें यदा केदा रा स× जाणें जहालें होतें इमारत बहुत उत्तम जहाली पाण्याचें तळें बळकट रुद चुनेगची जरूर बाधावें ऐवढें राहिलें आहे तेही फावलमोनीं करावें वरचेवर स्वारीचें वर्तमान लिहीत जाणें वजीराचा लगाम जरूर राखणें बहुत काय लिहिणें हे विनती

+मामलेदार कायद्याविरुद्ध दड धेत असत ते




ले १६७ [ ३२३ ]

{श १६८० फाल्गुन व ७
ता २१-३-१७५९

श्री

पु॥ राजश्री दत्ताजी शिंदे व जनकोजी शिंदे गोसावी यासि

आशीर्वाद उपरि वजीराचा विचार सुधा नाहीं, यास्तव मनसूर अली खानाचे+लेकास

---

* येथून खुद्द नानासाहेबाचें हस्ताक्षर

× केदारवाडी किंवा लोहारें हा दक्षिणेंतला गाव असावा ( पहा स्थ सू )

+ मनसूर अली=सफदरजग याचा मुलगा शुजाउद्दौला

वजीरी दिल्हियाने पन्नास लक्ष रुपये देतो, परतु येथील मर्जी कशी असेल ते कळेना यास्तव न केले, पुनरपि करावयाविशा आना जालिया लाहोराहून येऊन कार्यसिद्धी करू, सरकारचे कर्ज फेडू, म्हणून लिहिले ते अक्षरशा अवगत जाले ऐशियास मातबर मनसबा करून कर्ज फेडावे हे आपणासच योग्य आहे परतु गाजुदीखानास ×येथूनच स्थापिले त्यापासून हरएक अतर करारात पडावें मग त्याचा मुलाहिजा काय आहे ? काशी तो पूर्वी मनसूरअलीच्या लेकाने चिरंजीव दादा दिल्लीजवळ असता आपण होऊन द्यावयास कबूल होता जर त्यास वजीरी देणे तरी काशी, प्रयाग हीं दोन्हा स्थळें घ्यावीं पन्नास लाख रुपये दिल्लीचे वजारत देणे हे काहीं फार नव्हे परतु बेरीज मात्र बोलावी, रुपये द्यावयास दोन तीन वर्षे लावावा, याप्रमाणे रुपये देऊ केले तरी काय कामाचे ? एका वर्षात रुपये रोख द्यावे, या तिही गोष्टी कबूल कराव्या तुमची पक्की निशा व्हावी वजीर ल्वाडॅस आला तरी सुजाउद्दवलानीं गगे आलीकडे सत्वर येऊन तुम्हास नेऊन आपले कार्य करून घ्यावे तुम्ही त्यानें मिळून वजीरी करार करून द्यावी, रुपये द्यावयास दोन तीन वर्षे लावावा, प्रयाग, काशी न द्यावी, ऐसे असाल्यास विशेष त्यास वजीरी द्यावी असें नाही का कीं, ते पैकेकरी जबरदस्त, फौज तोफखाना मोठा, जाटाशा त्याशी स्नेह याजमुळे सत्वरच भारी होतील मोगल लोक आहेत फावले माना आम्हाशा वाकडें वर्तावयास अतर करणार नाहीं यद्यपि इतके दोष आहेत, तथापि पन्नास लाख रोख हातास येतात, काशा प्रयाग येतो, असे लाभ होत असले तरी करावें कासी न दिल्हिया एक प्रयाग व पन्नास लाख रोख दिल्हे तरी वजीराकडे काही अतर ठेवून करावें परतु त्याची रीत सस्थानिकपणाची दिसते गगेपलीकडील सभाळून असावें दिल्लीचे खटपटींत जीव राहिला नाहीं निरतर तुमचे आज्ञेत चालावें अबदालीचाही शह हमेशा फावले माना दिल्लीवर आहेच पाहिला दिल्लीत ऐवज मातबर होता, मुलूखही फार होता, पादशहाचा दबाब होता यास्तव मनसूर अलीखान वजीरीसाठा झटत होता आता पादशाई बदवकेरीची, खजीना नाही, मुलूख नाहा, अशी जाली याची रीतही गर्भश्रीमतपणाची आहे यास्तव हें राजकारण खरे लटकें या गोष्टीचा पूर्ता शोध जाटाचे मार्फतीनें व गोविंद बल्लाळ याचे मार्फतीनें पूर्ता करून आपणाकडील इतबारी शहाणा सुजाउद्दवला पावेतों पाठवून सर्व रागरग पाहून जर पन्नास लाख रोख प्रयाग हातास येत असला तरी वजीरी द्यावी नजीबखानास बक्षागिरी दिल्हियास तीस लाख रुपये देतो म्हणोन लिहिलें ऐशियास नजीबखान पुरा हरामखोर बाट आहे गुदस्ता चिरंजीव दादाशीं त्याशीं काहा मजा राहिली नाही तो दिल्लात प्रविष्ट जालिया अबदालीचेंच दिल्लींत ठाणें बसलेंसें जाणावें बेमान हरामखोर आहे त्यास वाढवणें सर्पास दूध पाजण्याप्रमाणें आहे * फावले मानीं त्याचें पारपत्यच करावें मनसूरअलीचा लेंक प्रयाग न

× येथूनच स्थापिलें=इकडूनच वजीरीच्या कामावर नेमिलें १ दुर्वर्तनाची

* नजीबखानाचें खरें स्वरूप नानासाहेबास किती स्पष्ट कळत होतें तें ह्यावरून दिसतें

देई, बेरीज मात्र बोलावी, रुपये द्यावयास तीन वर्षे लावावीं, असे करू लागला, तरी गाजुदीखानाशीं जे जे करार चिरंजीवानीं केले आहेत ते कायम करून, ते आपण एक होऊन असावे बाजद बरसात वजार पातशाहास घेऊन नाट बगाल्याच्या सुमारे गेलिया भारी वजन पडेल रोहिले जमीदार बहुत करून सामाल होतील वजीर तुम्ही एकदील होऊन बगाल्याचा रोख धरावा इकडून चिरजाव सत्वरच बुंदेलखडाचे मार्गें प्रयागाजवळ येतील तुम्हीं वजीरास घेऊन अतरवेदींतून यावे भारी दबाब पडून प्रयाग हातास हरतरेने येईल आणि खामखा घ्यावा चिरजीव इकडून व तुम्ही वजीर मिळून तिकडून असा भारी शह पडल्यास मनसूरअल्लाखानाचे लोकासहा मातबर नजर द्यावी जर त्याणे येणे प्रमाणे शह पडताच तुम्हास काशी प्रयाग दिल्हा, नजर भारी दिल्ही, तरी बादशाह वजीरास समजून हर प्रकारें सागून त्यास बक्षीगिरी द्यावी, हा दुसरा प्रकार तिसरा प्रकार वजीर बाहेर न येई तरी तुम्हीच जाऊन सुजाउद्दवल्यास मेळवून घेऊन काशी, प्रयाग मात्र त्या जवळून घ्यावीं रुपये न मागता त्यास पट्टणे बगाला हाता निंमे देऊ करून तो तुम्ही मिळून जाऊन बगाला सोडवावा, व ऐवजही मातबर मेळवावा या तिन्ही मनसब्यात जो पक्का बनेल तो करावा दिल्लीत ल्हान वकील लबाड फार बोलत असतात एकाचे पक्के पाचाचे राजकारण आणिले, तरि एकाने दहाचे अतर ठेऊन उगीच गोष्ट फुगवून राजकारण अडकवून पाडावे निशेस थाक नाहा तुमचा सरळ कारभार यास्तव हरएक राजकारण पक्के निशेचे कोणते हा शोध आपला इतबारी ज्याकडील राजकारण येईल त्याजकडे पाठवून पक्के करून तो मनसबा करावा तूर्त तुम्ही लाहोर प्रातीं गेला तिकडेही काम फार,आहे याजमुळे उशीर लागेल छावणीही तेच प्रातीं होईल तेव्हा हा मनसबा बाजत बरसातेवर जाईलसें वाटतें तथापि सत्वर लाहोराकडील बदोबस्त होऊन छावणास तुम्ही दिल्ली आसपास आला तरि हा कारणें रुबकार पडून येतील तेव्हा नीट शोध करून ज्यात मातबर पैका पन्नास लाख पाउण करोड कर्ज वारावयास हातास येतातसें दिसेल [ तें ] तीळमात्र सशय न धरिता करावे छ २१ रजब बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद पै॥ छ २४ साबान मु॥ सतलजनदी +

---

ले १६८ }
[ ३३७ ] }

{श १६८० फा व ७
{ता २१-३-१७५९

श्री

पु॥ राजश्री दत्ताजी शिंदे व जनकोजी शिंदे गोसावी यासि

आशीर्वाद उपरि अताजी माणकेश्वरास हुजूर परिच्छिन्न दादानीं मनापासून येथील आज्ञेप्रमाणें बोलाविलें असे असता हरप्रकारे उशीर लावून राहतात आम्हास लिहितात का, दत्तबाना राहाविले यास्तव महिनाभर राहिलो वजीराची दत्तयाची भेट होताच दरमजल

---

+ दत्ताजी व जनकोजी पजाबात दादाच्या मागून तेथील बदोबस्ताकरिता गेले होते

येतो साप्रत तुमच्या लिहिल्यावरून दिसोन आले, कीं लबाडी करून रहातात हरप्रकारें ऐवेज हाताखाली घालून हात उगवणार अबरूचा, प्रमाणिकतेचा दरकार त्याना टाकिलासे दिसते यास्तव पत्रदर्शना तिळमात्र मुलाहिजा न धरिता हुजूर यावयाविशा सख्त ताकीद करावी न येत तरि परिछिन्न बोलावून आणून कैद करून त्यास हुजूर पाठवावें तीळमात्र मुलाहिजा करू नयें मागे त्यानीं जितक्या ऐवजाचे हवाले घेतले होते तो मात्र ऐवज ताकीद करून उगवावा या सालचे वजीराकडील अथवा कोणीही ऐवज अताजीपताचे हातीं न जाय तें करावे तो ऐवज जमा करून हुजूर करून जरूर पाठवावा अताजीपतास पत्रदर्शनीं न येत तरि कैद करून पाठवावें + छ २१ रजब हे आशीर्वाद

---

ले १६९ [७६]

श १६८१ चैत्र व १०
ता २२-४-१७५९

श्री

राजश्री नाना पडित प्रधान गोसावी यासि—

छ सकळ गुणाळकरण अखडित लक्ष्मी अळकृत राजमान्य स्ने॥ राघोजी आगरे बजा रतमाब राम राम विनती येथील कुशल जाणोन स्वकीय लेखन आज्ञा करीत असले पाहिजे विशेष —छ ५ शाबनचें पत्र पाठविलें तें छ २२ मिनहूस उदेरीचे मोंचेबदीस थळचे मुक्कामा येऊन पावलें मुख्यार्थ कीं, उदेरींत पाण्याची अनुपत्य जहाली आहे वैशाखात तरि भारीच होईल सुरतेकडील बळ तुटलें यामुळे शामल अर्वसान खाता जाला असता चोरपाईकी अवसान धरून करितो राजपुरीची गलबते गेली उंदेरीस साज सामान घेऊन येतो उलटी सलाबत त्याचीच पडोन आली आहे त्याचें पारिपत्य होत नाहीं हें अपूर्व असे किरकोळ उपद्रव मुलकात होतात ते केवळ जजिरे याहूनच होतात ऐसे नाहा उदेरीहून होतात ऐसें निदर्शनास येतें याउपरि सारीं आरमारें येकत्र होऊन या समयात सर्वांना एकदिलीनें लगट केलियास स्थळ हस्तगत होऊन यावयास अगाध नाहीं येविशीं विस्तारें राजश्री रामाजीपतास लिहिलें आहे म्हणोन नशीहतपूर्वक आज्ञा केली ऐशास उदेरकराचें व जजीरकराचे पारिपत्याची योजना होऊन राजश्री शकराजीपतास व राजश्री नागोपतास व राजश्री रामाजीपतास पत्रें सादर जालियाची आज्ञा छ १४ मिनहूचें पत्र खास दस्तुराचे मुजरद जासुदा समागमें आलें तें छ १८ तारखेस माहे मजकुरी पावलें आज्ञेचे निकडी प्रमाणें वसैपैकी व राजश्री नारोपतीं आरमार सुद्धा येऊन पावावें सारे येकत्र होताच जीवाभ्य श्रमेंकडून श्रम साहसास अतर न करावें हाच वस्त धरून आरमाराची प्रतीक्षा आज पावेतों करीत आहों तथापि अद्याप येऊन पावलें नाहीं पत्राची विनती लेहून

---

+ अताजी माणकेश्वराकडून ऐवज बरोबर येत नव्हता असें या पत्रावरून स्पष्ट होतें ह्या प्रकरणीं होळकराची कैफियत पृष्ठ २१ टीप ४१ पहावी

पाठविली आहे त्यावरून सेवेशीं निवेदन जहालेंच असेल अखेरीचे दिवस अवकाश बहुतसा राहिला नाहा आज्ञेचा अर्थ निकडीचा जाणोन येथून मुजरद महागिरी मशारनिल्हे शकराजीपताकडेस व नारोपताकडे पाठविली आहे त्वरेने यावे म्हणोन लिहिलें असे वरकड किरकोळ उपद्रव चोरी छपीनें उंदेरीहूनच होतात जजिराहून होत नाहा म्हणोन तरि उंदेरीचे मोर्चेबदास चौक्या कुलाबापासून थळ नवगावचे खाडी पावेतो आम्हाकडील नवगावापासून केहाम, आव्हास, सातवेन, माडवें, रेवस पावेतों राजश्री महादाजी रघुनाथ याहीं रेवदडकर रायगड भोरपकर लोक जागा येउन बदोबस्त केला आहे उरण खाडीची खबरदारी उरणाहून होत असता उंदेरकराची महागिरी तडीस लागावी ऐसे नाहीं एक दुसरा होडीवर काळोखे रात्रीस येत जात असेल तरीच कोठे आग लावावी, धोंडे मारावे हे उपद्रव होतात याजवरून नित्य चौकीदाराचें पारिपत्य करणे तें करीत असो, व राउताचा छबीनाही होतो खबरदारीस आम्हाकडून व महादाजीपताकडून अतर पडत नाहीं बिरवाडी, माडल्तपा, अष्टमीकडून चोर येउन तुमचे टापियात रयतेस मारामार

उपद्रव केला जजीरकर प द म (पद्म ?) दुर्गकरी ऐसे रयतीजवळ सागत गेले त्याचे शोधास आम्हाकडील व मशारनिल्हे महादाजीपताकडील लोक मुलखात घालून रात्रदिवस शोधास लागलोंच आहों जजीरकरास व प द म दुर्गकरी यास बदरें अनकुल व राना जगलाचा आश्रय

(शिक्का)

बहुत रानात दबा देउन, काळोखे रात्रीचे सध्यातून चोरी कर्म आचरतात तिकडील मामलेदार खबरदारी करीतच आहेत साराश योजिले मनसबेयाप्रमाणें येखादे जागा निकडीचा प्रकार या समयास व्हावा हेंच कार्याचें आहे श्री कृपेने व आपले तपोबलें कार्य सिद्धि होऊन आलियास सारेच उपद्रव दूर होतील जळमार्गें उंदेरीस सामान चोरी छपीनें नेतो त्याचे बदोबस्तास आम्हाकडील गुराबा गलबते महागिरिया दक्षिणभागीं मार्ग अवरोधोन ठेविल्या आहेत याचप्रमाणे उत्तरभागीं महागेरिया व गलबते मा।निल्हे महादजीपताकडील येऊन रात्रदिवस छबिना होत असता उंदेरीस मुंबैसमीप काळोखे रात्रीस चोरीछपीनें महागिरी येते जाते, त्यांचे पैरवीस आरमारकरी लाविलेच आहेत गाठ पडता जीवाभ्य श्रम करून दस्त करायास चुकणार नाहा फाल्गुनमासीं रात्रौ महागेरी येता आम्हाकडील आरमारकरी यानीं पिच्छा केला तडीस येता रेवदडकराहीं मर्दुमी करून कोंडून दस्त केली या प्रकारचें वर्तमान आहे दर्या अफाट चौगीर्द आरमार परीघ असावा सारें आरमार येकत्र जडाव जालियावर चित्तानरूप सेवा घडोन येईल व यावी, हाच कस्त व उमेद असे स्वामी सेवेचे ठायीं आम्हापासून कसूर कोताई हा काल पर्यंत जाली नाहीं व पुढेंही होणार नाहीं हेंच निष्ठा मनोमानसा असेच अतरसाक्ष आपण समर्थ आहात राजश्री रामाजीपतही लौकरीच येणार, येतील त्याचे अनुमतें श्रम साहसास दुसरा विचार

घडणार नाहीं र॥ छ १८ माहे शाबान बहुत काय लिहिणे कृपा वर्धमान असावी हे विनंती [ मानाजी आंगरे सप्टेंबर १७५८ त मरण पावल्यावर रघुजी गादीवर आला त्याचें पत्र

मोर्तब
सूद

---

ले १७० [ ८३ ]

श १६८१ चैत्र व ७
ता॥ १९-४-१७५९

॥ श्री ॥

राजश्री भाऊ गोसावा यासि—

छ सकळ गुणाळंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—स्ने॥ राघोजी आंगरे वजारत माब रामराम विनंति उपरि येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लेखन आज्ञा करीत असलें पाहिजे विशेष छ १४ शाबानचे स्वहस्ताक्षर पत्र आलें तें छ १८ मिनहूस मौ॥ थळ उंदेरीचे मोर्चेबंदाम प्रविष्ट जाहालें सारखाभिवृद्धीस पावलों श्रवणेकडून संतोष जाला सुरतेकडील आरमार राजश्री नारोपंत सहवर्तमान आठा दहा रोजांत येईल सर्व एकत्र होऊन उंदेरांत पाणी नाहींसे जालें आहे या समयांत मारागिरा करून लगट करावा म्हणोन आज्ञा केली आज्ञेचे अन्वयात सविस्तर विनंती श्रीमंत पंतप्रधान यांचे सेवेशीं लिहिली आहे, त्यावरून निवेदन होईल आम्हांस आपली आज्ञा होईल, त्याप्रमाणे वर्तणूक करावी श्रम साहासास अंतर न करावें, हेंच निश्चय दुसरा विचार नाहीं म॥ निल्हे नारोपंतास व वसैस आज्ञापत्रें जाऊन पावलींच असतील त्याप्रमाणें आरमार व महागेरिया अविलंबें येऊन पावलियास शत्रूवरी निकर्ष होऊन येई मुख्य गोष्ट सारा आरमाराचा जडाव व महागेरिया मारागिरीचें पोंचतें सामान अल्प अवकाशेकडून आलें पाहिजे विलंबावर गेलिया अखेर मुसुब आली आहे वारा, तुफान जालें म्हणजे आरमाराचा टिकाव होणार नाहीं येविशीं राजश्री महादाजी रघुनाथ याहीं लिहिलें आहे, त्यावरून सविस्तर श्रुत होईल राजश्री साबाजी प्रभु जाऊन पावलियावरि हलाखीचें सायत वर्तमान निवेदन केलें असेल व करितील अनुकुलतेविशीं सर्व प्रकारें भरवसा आपले कृपेचा आहे विस्तारें विनंती ल्याहावी तर सर्वजाण आपण समर्थ आहेत र॥ छ २१ माहे शाबान बहुत काय लिहिणे कृपा लोभ असों यावा हे विनंती

शिक्का

मोर्तब
सूद

---

ले १७१ [३८७]

श १६८१ वैशाख शु ६ ता २ ५-१७५९

॥ श्री ॥

अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य राजश्री रामाजी अनत गोसावी यासि सेवक बाळाजी बाजीराव प्र ान नमस्कार उपरि येथेलि कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणे विशेष सुजायतदौलाजवळून पन्नास लाख रुपये घेऊन वजीरी द्यावी, अताजी माणकेश्वर यास दिल्लीच्या कारभारातून काढावें, हा मनसुबा, दुसरा, नजीबखानाजवळून तीस लाख घ्यावे त्याहून तिसरा आपणच पातशाहातेचा बदोबस्त करावा याचें सेवटवर कसे ते व्याहावें, तोपर्यंत लाहोराहून येऊं म्हणोन लाहुराचे पत्रीं मजकूर त्यास वजीर दादानीं सर्व प्रकारे आपले करून ठेविले [ ते ] निर्बल आहेत याजपासून केल्या करारात अतरही कांहीं नाहीं ऐसें असोन सुजाअतदौलाचा मनसुबा करणे योग्य नाहीं तत्रापि करणें तेव्हा जर पक्की निशा पन्नास लाखाची सहा महिन्यात होती असें दिसल्यास, वजीरा+ जवळून केल्या कारभारात अतर मातबर पडल्यास, वजीरावर जाटानीं व सुजाअतदौलाना एक होऊन यावें तुम्हा सुजातदौलाचा पक्ष न करावा जर सुजातदौलाचें पक्कें राजकारण नाहा तर वजीर पातशा बाहेर काढून सुजातदौलाचे पारपत्य करून मातबर पैका मेळवावा जर हे गोष्ट वजीरा जवळून न होय, बाहेर न निघे, तेव्हा दिल्लींतील कारभार वजीरावर सोंपून सुजातदौला व आपण एक होऊन काशी प्रयागचे काम करून घेऊन, पूर्वेस जावयास सुजातदौला सामील करून घेऊन, त्यास निम्मे बगाला देऊं करून मातबर पैका मेळवावा लाहोर प्रांतींचा बदोबस्त उत्तम प्रकार करावा चिरजीव दादानीं अबदाली ठेविला होता, त्याचाच कोणी मातबर इतबारी ठेवून तो कारभार नीट करून सारा पैका हुजूर येई तें करावें इतकें करून दिल्लींतील बदोबस्त होऊन पूर्वेस जावयास बाजद बरसात ठीक पडेल यदा छावणी दिल्लीची कराल तेव्हा सोई पडेलसे दिसते अताजी माणकेश्वर यास वारवार हुजूर बोलाविले असता येत नाहीं वजीराकडे पन्नास लाखाचे हिसेब काढून तेथेंच गुतले कित्येक लबाड्या करितात त्या तुमचे प्रत्ययास येऊन त्यास ठेऊं घेता, मेरट वगैरे परगणे मधींच खातात, वजीराजवळ हजेरी बारा हजार फौजेची लटकीच देतात, ही चौकशी करीत नाहीं, अपूर्व आहे याउपर त्यास पत्र पावताच हुजूर पाठावणे सुप्रयुक्त आले तर बरें,न आले तर धरावे, लुटावे, माल सर्व सरकारात लावावा मेरट वगैरे सर्व महाल सरकारात लावावे वजीरावर पाच लाख रुपयाची वरात चिरजीवानीं दिली आहे ती सरकारात वसूल घ्यावी त्यास याउपरि एक पैसा न द्यावा जर ही गोष्ट जबरदस्तीने न करता अताजी हुजूर आला तर त्याचा एक लेक हजार राऊतानिशीं ठेवावा बाकी फौज वजीराजवळ चाकरीस पाहिजे ते दुसरी नेमून द्यावी परतु अताजीस ठेऊं नये याउपरी त्याचा कांहीं एक मुलाहिजा न करिता कैद करून पाठवणें तुम्हीं,कारभारी भिडेस न पडणें जाणिजे

+ वजीर=ग्याजुद्दीनखान हा मराठ्याचा हस्तक रोहिले यांच्या विरुद्ध होता

नजीबखान वाट, अथवा अबदाली त्याचे राजकारण न करावें सुजातन्याला न जाट एक जहाल्यास भारी उपयोगी नाहीत यापेक्षा आहेत वजीर ते फारच उपयोगी परंतु सुजातदौला साहा महिन्यांत पन्नास लाख रुपये खुरेखुरे देतात, या वजीराजवळून एक दोन मातबर, अतरें याची तगेरी करावयाजोगी जहाल्यास सुजातदौलाचे काम जरूर करावे मातबर लाभ सोडू नये याचा विस्तार उभयता सरदारास लिहिला असे तो मनात आणून उत्तम दूरदर्शीने सरकारात मातबर लाभ होऊन,येथील लक्ष्याने वर्त [ न ] १मे प्रकारे जे तुमचे तेथील माहितगारीस बनेल ते करणे वरचेवरी कच वर्तमान लिहीत जाणे जाणिजे छ ४ रमजान बहुत काय लिहिणे अताजीपतास जरूर हुजूर पाठविणे सहसा रजबन्ल ऐकू न देणें लक्षा प्रकारे वजीरासच राखावे कदाचित तो करारात वाकडा वर्तत असला तर मात्र मातबर लाभ पुर्ता दृष्टीस पडला तरच सुजातउद्दवलास हाती धरावे परतु काशी, प्रयाग हरतजविजेने साधावा विशेष काय लिहिणे वजीराची चिता दमनवास असेलच जाणिजे लेखनसीमा

---

ले १७२ ) छ ४ जिल्काद सातन {श १६८१ ज्येष्ठ व ७
[ ३६७ ] ) {ना १९-६-१७५९

श्री

राजश्री रघुनाथ रावजी गोसावी यासि

श्रीमत प्रताप गुणवत ऐश्वर्य कुसुमविलसितैकवतस श्रेष्ठप्रभाव स्ने॥ महाराव जसवत निंबाळकर दडवत विनती उपरि येथील क्षेम तागा० छ १६ सवाल जाणोन निजानद लिहिणे विशेष लाला ब्रिजनाथ यानीं श्रीमताचे प्रातापासून व आमचेही तालुकिया पासून रुपये घेतले सरकारचे ऐवजाचा निकाल करून घेऊ तेव्हा तुमचेही तालुकिया पासून लालानीं घेतला पैका त्याचाही त्याजपासून निर्गम करून घेउन पावता करू, ऐसे राजश्री आबाजीराव याना आम्हास वचन केले ऐसे असता प्रस्तुत वचनाप्रमाणे घडोन येत नाही सदहू मजकुराचे राजश्री रामचद्रपतही वाकीफ आहे विस्तरें येविषयी विनती करतील साराश राजश्री आबाजीराव यासि सरकारचे पत्र सादर व्हावें की, वचन केले आहे त्या प्रमाणें निर्वाह करावा हे विनती

---

१७३ ) {श १६८१ आषाढ
[ ३९० ] ) {जुलई १७५९

श्री

राजश्री नानासाहेब गोसावी यासि

छ श्रीमत महदैश्वर्यनिधान श्रेष्ठाभिधान महेश्वरानुसधान स्नेहांकित आनदराव निंबाळकर कृतीनेक दडवत विनती येथील कुशल जाणून स्वानद लेखने सदैव आनद दिल्हा पाहिजे विशेष कृपा करून पत्र व राजश्री माधवराव रघुनाथ पाठविले, पत्री व मानिल्हेच्या जबानी आज्ञा जे, अजनडोह येथील बाजारास अटकाव केला आहे, तो तूर्त न करावा राजश्री साबाजी नाईक व महादाजी नाईक स्वारीस गेले आहेत, ते आलियावर त्यास सागोन दिल्हे

विले जाईल ऐसियास आम्हास आज्ञा प्रमाण येविषया राजश्री मल्हारपत खिजमतरावजी नीं पूर्वीं सेवेत विनती केली असेल व प्रस्तुतही करतील साप्रत पूर्ववत प्रमाणे बाजार मार्ग चाली लागला, हे वृत्त राजश्री माधवराव सविस्तरे निवेदन करतील त्याजवरून श्रुत ईल हे विज्ञप्ति ×

---

ले १७४ } {श १६८१ आषाढ शु १०
[३६६ } {ताा ८-७-१७५९

श्री

राजश्री पत प्रधान गोसावा यासि

श्रीमत सद्गुणनिधान कृपाविधान प्रतापवरिष्ठाभिधान निरतर भगवदनुसधान साव-न स्ने॥ महाराव जसवत निंबाळकर दडवत विनती उपरि येथील क्षेम ताा छ १० ल्काद जाणोन निजानंदलेखन करावें विशेष कृपापत्र उत्तमावसरीं पावोन सतोष झाला राजश्री विठ्ठलराव व गोविंद खिजमतराव याचे जरूर आहे मशारनिलेपाशा काहीं जकूर सागोन आपलियासि कळो द्यावा लागतो तर उभयतास सत्वर पाठवणें म्हणोन ा आज्ञा ऐशियासि उभयताच शरीर भावनेचे वर्तमान याजपूर्वी तपशिलें सास लिहिले हे निवेदन जहालें असेल गोविंद खिजमतराव याजकडे पत्र पाठविले होते उत्तर आलें ं, श्री कृपेकरून काहींसा आराम आहे थोडियाच दिवसात येतो ऐसें लिहिलें असे खजमतरायाचे दोघे धाकटे बधूही आहेत त्याजपाशीं मजकूर आज्ञा करावया स्य असलिया आज्ञा जहालिया त्या एकास सेवेशीं पाठविले जाईल हे विनती

---

ले १७५ } {श १६८१ भाद्रपद व १३
[१४५ } {ताा २८-८-१७५९

श्री

सेवेशी नारायण भास्कर साष्टाग दडवत विज्ञापना ऐसिजे गोवेकर फिरगी याकडे जपुरींतून पेगाम लागल्याचा मजकूर निराळे विनतीपत्रीं लिहिला आहे याजवरून सेवेशीं वेदन होईल फिरगी यदा पुर्तकालाहून जाहाजें आल्यानतर वळवळ करिता राहात हीं या गोष्टीस स्वामींच्या प्रतापाचा दबाव असिल्यानें उत्तम आहे दबाव हाच कीं, कड टोपीकर वगैरे यास राजपुरीचे मसलतीमुळें पत्र सादर जालीं असतील त्या प्रमाणें वेकरासही पत्र सादर व्हावें कीं, जजिरे दडा राजपुरी याजवर सरकारची मसलत आहे, रे तुम्हीं आपलीं जाहाजे सजुता करून सामान सरजाम सुद्धा तयार होऊन जलमार्गें रून सामील होणें कदाचित् राजपुरीवाले तुम्हास लाभ लोभ दाखवून आपले कुमकेस लावतील व तुम्ही ममतेस गुतोन त्याचें साहित्य कराल तरि आधीं तुमचें पारपत्य होईल जपुरीवाल्यास तबी करून जजीरा सरकारात घेणें हें तों जरूर आहे त्या प्रॊा थोड

---

× ले ३६६ पहा

क्याच दिवसात सिद्धीस जाईल परत तुम्हां तु र द रा ज पाहोन वर्तणूक करणें म्हणोन पत्र व त्यातच मजकूर ल्याहावयाचा सेवकास सुचला लिहिला जातो जे तुळाजी आंगरे याजवर सरकारची मसलत पशजी जाहाली होती तेसमयीं तुम्हीं त्याची कुमक उपराळा करावयाची कबुलात करून आडीच लक्ष रुपये आगऱ्याकडून तुम्ही नेले आहेत त्यास आगऱ्याचा मुलुख व कोट किल्ले दरोबस्त सरकारात घेतले मालीयत व खजाना जेथें जेथें त्याचा सापडला तो सरकारात आणिला तुम्हा त्याजकडून रुपये नेले आहेत ते सरकारचे आहेत तरि सदरहू ऐवज पाठवून देणे म्हणोन पेशजी तुम्हास लिहिले असता अद्यापवर पाठवीत नाहीं हे गोष्ट कार्यास येणार नाहीं हल्लीं देखत पत्र सदरहू रुपये सेवकाचे पदरीं घालून हुजूर पाठविणे तसेंच सोंधेकराचा मुलूख आहे तो सरकारचे स्वराज्य आहे ऐसे असता कूर्मगट व सदाशिवगड हे दोन्ही किल्ले तुम्हीं घेऊन ठाणीं ठेविला आहेत म्हणोन कळलें, तरि हरदू किल्ल्यावरील तुम्हा आपला ठाणीं उठवून, किल्ले खालीं करून, सेवकाचे स्वाधीन करणें व याचा पावती घेऊन हुजूर पाठवणे आणि तुम्ही भाद्रपद शुद्ध चतुर्थी होता आपले सामान सुद्धा येऊन राजपुरी जवळ सरकारच्या फौजास सामील होणें येणें प्रो। तुम्ही केल्यास तुमचे सस्थानचें व तुमचें कल्याण आहे, न केल्यास तुम्हास नतीजा पोंचेल स्पष्ट समजोन वर्तणूक करणे, म्हणोन पत्र व गोवरनदोर राजा व सकटतार दिवाण यास वस्त्रें साबाक [ ला ? ] दस्तुर येऊन सेवकास आज्ञा जालिया गोमातकास जाईन हे गोष्ट जालियानें फिरंगी दबाव खाऊन आपले ठिकाणी रहातील वळवळ करूं शकणार नाहीं महाराजाचे ध्यानास आलिया येणें प्रो। पत्रे वस्त्रें पाठवावयाची आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत व येथून सेवकाची खानगी उत्तम प्रकारें करून द्यावयाविशीं जिनुबा सबनीस यास आज्ञा असावी सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना

---

ले १७६ )
[ १४७ ]

{ श १६८१ भाद्रपद शु ६
( ता। २९-८- १७५९

श्री

सेवेशीं नारायण भास्कर साष्टांग दंडवत विज्ञापना गोंवेकर फिरंगी याकडील बातमीचा मजकूर तरि, राजपुरींहून ज्येष्ठ अखेर मार्शी गलबतावरून वकील येऊन नेहमीं गोंव्यास येऊन राहिला आहे त्याजकडून गलबत राजपुरीस जाऊन मागती सांप्रत आलें जंजिऱ्यावर मसलत श्रीमंताची जाली आहे, जंजीरा घेणार, त्यास या समयास तुम्हा आपली कुमक उपराळा जळमार्गें करावा, सामान सरंजाम आपणास पोहोंचवावा, आपली शरम यां वख्तीं तुह्मीं राखावी तैसेंच मर्दनगडास तुमचा मुख्य राजा मारला गेला असता तुम्ही आजि पावेतों काहीं प्रतिकार दाखविलें नाहीं, तरि मर्दनगडाचा सूड घ्यावा, येविषयीं दू मु त व जे करतात परतु आजवर फिरंगी याजवळ जमात किंवा लढाईचा पोख्ता सरंजाम नाहीं दरसाल जहाज एक येतें, व तीन वर्षांनीं चार पाच

गल्या व मोठा जाहाजें तारकती सु ब रा चीं यावीं त्यास हे तिसरे साल आहे यदा भाद्रपद माशीं गणेश चतुर्थी माजी पाच जहाजे घेऊन नवा राजा येणार तीं जाहाजें पूर्तकालाहून आल्या उपरातीक आधा मर्दनगडचे गळीं पडावें, हा त्याचा मनसबा आहे बादज शाम* लाचा याचा करार मदार होऊन वर्तमान आढळेल त सेवेशी लेहून पाठवान सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले १७७ }
[ १४८] }

{ श १६८१ भाद्रपद शु ६
{ ता २९-८-१७५९

श्री

सेवेशीं नारायण भास्कर साष्टाग दडवत विज्ञापना सावताचा व गोवेकर फिरगी याचा हर्षामर्ष गतवर्षापासून लागला आहे त्यास गोमातकचे खाडी आलीकडील मुलूख याणीं घेऊन सारे मुलकाची जप्ती केली रहाता तीन ठाणीं राहिली येक हलर्ण, दुसरी डिचोली, तिसरें तेरेखोल. या तीन ठाण्यात फिरगी याचे लोक आहेत ठाण्याबाहेर नाक्या नाक्यावर चौक्या याच्या बसल्या आहेत सामान बाहेरून जाऊ पावत नाहीं दोन तीन जुझें याचा त्याची जालीं त्यात फिरगी याचे सामान बहुत बराच, दारू गोळीची मोठी मार तथापि एक दोन वेळां याचा जोरा होऊन फिरगी मोडून माघारे घातले वीस बावीस फिरगी याजकडे सापडला त्यास आणून कैदेंत ठेविले आहेत साप्रत फिरगी याजकडून बोली चाली लागली आहे त्याजकरिता बाडीस फिरगी होते त्यापैकीं एक दोघे गोव्यास गेले आहेत परस्पर याचा त्याचा तहरह व्हावा, खाडी ठाणीं याचे स्वाधीन करावीं, पुढें याणीं बारदेशात न उतरावे, फिरगी याणी आलीकडे उपसर्ग न द्यावा, असा कारभार त्याचा घाटत आहे होता होईल ते सेवेशीं लेहून पाठवीन सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले १७८ }
[ ८४ ] }

{ श १६८१ आश्विन व ५
{ ता १०-१०-१७५९

श्री

श्रीमत राजश्री पतप्रधान साहेबाचे सेवेशी —

आज्ञाधारक दमाजी गायकवाड समशेरबहादर कृतानेक दडवत विज्ञापना येथील

---

*तुळाजी आगऱ्यावर पेशजी मसलत झाल्याचा उल्लेख या पत्रात आहे ही मसलत सन १७५६ मध्यें झाली तसेच दडाराजपुरच्या मसलतीचा उल्लेख आहे ती सन १७५९ मध्यें होती 'भाद्रपद शुा ४ नतर तुम्ही मामाल व्हावें' या मजकुरावरून सन १७५९ च्या भाद्र-पद शुा ४ चे पूर्वी ८।४ दिवसात हें पत्र लिहिलें असावें पो भाद्रपद शुा ६।७ आहे

क्षेम तागाईत आश्वीन कृष्ण पचमा पावतो साहेबाचे कृपाकटाक्ष करून यथास्थित असें विशेष साहेबाकडून आज्ञापत्र सादर जाहाले ते उत्तम समया प्रविष्ट होऊन अक्षरशहा विलोकनें परम प्रमोद जाहला पत्रा आज्ञा का, ' चाचवे व जाफराबादकर एकत्र होऊन, लोक जमा करून, जाहजावर चढवून राजपुरीस कुमक पोहचवावी, मन माने तैसा उपद्रव करावा, ऐशी तरतूद करितात त्याजला उत्तम प्रकारे ताकिदीचा पत्रे लिहावीं आणि बदोबस्त करावा " ऐशी आज्ञा सादर होताच जाफराबादवाले व चाचवे याशि ताकीद पत्रें लिहून पाठविला आहेत का, " तुम्हा कुमक जजिरीयाशा परिच्छिन्न न पाठविणे यद्यपि न ऐकिले तर पारपत्य यथास्थितपणे होईल " त्या प्रांतीं कमाविसदार नाहींत जोरतलबी मुलख तेथील भुमे आहेत त्यास पत्रे लिहिलीं आहेत व घोगे वगैरे बदराचे कमाविसदारास एतद्विषयीं लिहिले आहे, व फोजही त्याचे बन्दोबस्तानिमित्य रवाना जाहाली आहे सेवेशा श्रुत होय हे विनांति।

ले १७९ [९६] — श १६८१ कार्तिक व ? ता ७-११-१७५९

श्री

चिरजीव राजश्री नानां यासि—बाळाजी बाजाराव प्रधान आशिर्वाद उपरि येथील कुशळ जाणून स्वकाय कुशळ लिहीत जाणे विशेष मिया आछनचे मजकुराविशा मुजफरखान यास पत्र लेहून तुम्हाकडे पाठविले आहे त पावले असेल त्यास मिया आछनचा व हबशाचा जोरा होऊन अली नवाजखान याचा तह जाला आपण लोक सुद्धा बाहेर निघालों म्हणून रा। महादाजी केशव याच पत्र छ १० रबिलावर शनवारीं आलें त्यास याप्रमाणे मजकुर जाला, तेव्हा महादाजी केशव व कृष्णाजी अनत मागे फिरलेच असतील कृष्णाजी अनत येऊन कोळ्याचे पारपत्य करावयाचे तरतुदास लागतील मुजफरखान यास पत्र पाठविलें आहे, ते त्यास द्यावे ऐसे नाहीं याजकरिता पत्र न देणे व जासूदाबरोबर पत्रे महादाजी केशव व अलीनवाजखान यास वगैरे पाठविलीं आहेत ता पत्रे पाठवावयाचे प्रयोजन नाहीं जासूद तुम्हाजवळ जाऊन पावलेच असताल त्यास माघारे फिरवावयास जासूद पाठविले असत, तरि ती पत्रें पावलीं असतील तर [ परत ] पाठवणें जाणिजे छ १३ रबिलोवर बहुत काय लिहिणे— मुजफरखानानीं जाऊन जवार घेतली, गभीरगड घेतला याची सलाबत त्यांजवर पडली कोळी मैदानचे जुझणार नव्हत दोन हजार मुजफरखान, सटवोजी जाधव, कृष्णाजीपत तुम्हा जलदीनें जावें उशीर न करावा सत्वर काम उरकेल उत्तम प्रकारे पारपत्य करावे घरातील चोर मळमळित जाहालिया परतेल लबाडी करतील हे आशिरवाद पो। १६ रबिलावर्

* हें पत्र जजिऱ्याच्या हबशाबरोबर जें युद्ध चाललें होते त्यास अनुलक्षून आहे मागील पत्रें पहा

१ नाना पुरंदरे असावेत २ सुरतकर ? ३ कोळी—जव्हारचे वगैरे ४ नानासाहेब रोजनिशी भाग १ ले ९८ पहा

ले १८० } पौ॥ छ ९ जमादिलाखर सोमवार { श १६८१ माघ शु ३
[ ३६८ ] } { ता २१-१-१७ ०

॥ श्री ॥

चिरजीव राजमान्य राजश्री भाऊ या प्रति

बाळाजी बाजाराऊ प्रधान आशीर्वाद उपरि येथील कुशळ जाणोन स्वकीये लिहीत जावे विशेष राजश्री बापूजी बल्लाळ दफतरदार याचे गुजारतेने काहा काम होतें त्याचे काहीं कागदपत्र शहरींहून आणायाचे होते ते आणिले त्यातील दोन तीन असाम्या सगमनेरीं होत्या त्यास आणावयाबद्दल हुजूरून बुधा चोपदार व दहा राऊत नागो राम याचे देऊन जेजोरीचे मुक्कामाहून रवाना केला होता त्यास चोपदार मजकूर आपणाकडे आला आहे म्हणोन ऐकिले अशास ते कोण्हीं घेऊन आपणाकडे गेला, काय मजकूर तो लेहून पाठविणें तेथे कोणी आलें असेल तर त्याची चौकशी करून त्याचा काय प्रकार तो लेहून पाठवावा रवाना छ २ जमादिलावर सुरू सन सितैन मया व अल्लफ हे आशीर्वाद

---

ले १८१ } पौ॥ छ २४ जमादिलाखर { श १६८१ माघ व ७
[ १७० ] } { ता ८-२-१७६०

॥ श्री ॥

चिरजीव राजमान्य राजश्री महीपतराव त्रिंबक यासि बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करणे विशेष मोगलाशीं छ १५ जमादिलाखर रविवार लढाई भारी होऊन दहा हत्तीवाले त्याजकडील मारले पाडाव हत्ती दहा व चार पाच तोफा जाल्या याप्रमाणें मातबर लढाई झाली तुम्हास कळावे म्हणोन लिहिले आहे चिरजीव राजश्री नाना सुखरूप आहेत कळावे जाणिजे छ २० जमादिलाखर सुर सन सितैन मय्या व अल्लफ बहुत काय लिहिणे हे आशीर्वाद

---

ले १८२ } पौ॥ छ १२ रजब माघ सितैन { श १६८१ फाल्गुन शु ६
[ ३७९ ] } { ता २२-२-१७६०

॥ श्री ॥

चिरजीव राजश्री भाऊ यासि बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद उपरि येथील कुशळ जाणून स्वकीय लिहित जाणें विशेष उदेरीचें काम राजश्री रामाजी महादेव व नारो त्रिंबक यानीं जेवतेव करून केलें उदेरीच्या कार्यामुळें दोघात कुरुषता लटकीच वाढली पाहत्या अर्थे त्यात काहींच जाव नाहीं प्रस्तुत काशास गेले तें कार्य एकरूपतेने॰करावें तो अर्थ होत नाहीं कोणी मातबर पाठवून उभयतासच ठीक हमवार करून कार्यावर पडत तें करावें असा कोणी योजक नाहीं उभयता पुण्यास असता पेच वाढला होता तो रा॰

---

नाना पुरदरे बरोबर होता असें दिसते

रामाजी विश्वनाथ बरवे याचे मध्यस्तीनें बोलोन चालोन दोघेही निखालसा होऊन एकरूपतेने कार्य करून दाखवू म्हणोन दोघाना करार करून पायावर हात ठेवून गेले असें असता फिरोन कुरुषता वाढविली यास्तव मध्यस्त रामाजी बरवे यासच राजपुरीस उभयताकडे पाठविले आहेत उभयतास बरे रीतीने कडकावून हमवार करावें काशीचें× काय एकमतें खामखा करावेच करावे या विचारें पाठविले आहेत पाहवे काय करून येतात छ ४ रजब हे आशिर्वाद

---

ले १८३ [१७१] पौ छ २२ रमजान (श १६८२ वैशाख शु ४ (ता १९-४-१७६०

॥ श्री ॥

चिरजीव राजमान्य राजश्री बज्याबा याशि प्रति सदाशिव चिमणाजी आशीर्वाद उपरी येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणे विशेष—तुम्हाकडील पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरि वरचेवर सविस्तर वर्तमान लिहीत जाणे आम्ही मजल दरमजल नर्मदापार झालो पुढे ही दरकूच जात असों घोड्यावर बसणे व लिहिणे पढण चागलें करणें तीर्थरूप बोलावतील तेव्हा पुण्यास जात जाणें फार खेळत न जाणे घरा अबई मायेनें रागें भरणार नाहीं लाडके व्हाल ते कामाचें नाहीं चागले लिहिणे, पढणें, घोड्यावर बसणें करणें छ २ रमजान हे आशिर्वाद *

---

ले १८४ [९८] (श १६८२ वैशाख वद्य १३ (ता १३-५-१७६०

॥ श्री ॥

अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य राजश्री विसाजी कृष्ण व हरी गोपाळ गोसावी यासि —

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार सु॥ सितेन मया व अलफ तुम्ही शिरहट्टी घेतली याचीं पत्रें पाठविलीं तीं पावोन सतोष जाहाला, उत्तरे आलाहिदा पुरवण्यात लिहिलीं असत त्याजवरून शिरहट्टीचा बदोबस्त करून तुम्ही पुढें गेलाच असाल कोठें गेला काय वर्तमान तें आठा रोजाच्या अतरानें लिहीत जाणे वरकडही त्या प्रातीचें वर्तमान लिहीत जाणें जाणिजे छ २६ रमजान बहुत काय लिहिणें

---

× कासें नावाचें बेट.

* यावरून महिपत त्रिंबक ऊ० बजाबा पुरदरे या वेळीं ल्हान असून त्याचे शिक्षणावर पेशव्याची नजर होती असें दिसतें शिक्षण कोणत्या प्रकारचें होतें तेंही या पत्रावरून व्यक्त होतें

ले १८५ } [ १३५ ]

{श १६८२ माघ शु १२ (ता १६-२-१७६१

॥ श्री ॥

राजश्री बाबुराव रामरामी गोसावी यांसीं-

विनती उपरि तुम्हीं पत्र पाठविलें तें पावले सुमेरसिंग याजकडाल गारदी याची वाटणी केली याची याद पाठविली ती पावली पुण्यात लोक हजर नव्हते व मयत जाले व रजेस गेले त्याचे वा णीचा ऐवज रुपये ११३२ अकराशें बत्तीस चिमणाजी × पडवळ खासबारदार दि॥ रुमाजी विंचरेकर याजबराबर पाठविले ते पावले त्याची वाटणी लष्करात जाली असे रा॥ छ १० रजब सु॥ इहीदे सितेन मया व अलफ बहुत काय लिहिणे हे विनती

---

१८६ } [ २१ ]

{श १६८२ माघ व १ (ता २०-२-१७६१

॥ श्री ॥

वेदशास्त्र सपन्न राजश्री गोविंद दीक्षित स्वामींचे सेवेशीं—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान साष्टांग नमस्कार विनती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जावें विशेष तुम्हापासून सरकारात कर्ज घेतले मुद्दल रुपये ५०००० पन्नास हजार याचें व्याज दरमहा दरसदे रुपया १ एकोत्रा बिनसूट प्रमाणें करार केलें असे जाले मुदतीचें व्याज व मुद्दल हिशेब करून देऊं मिती माघ वद्य १ प्रतिपदा शके १६८२ विक्रम नाम सवत्सरे रा छ २६ जमादिलाखर सु॥ इहिदे सीतैन मया व अल्फ बहुत काय लिहिणें हे विनती

---

ले १८७ } [ १७५ ]

{श १६८२ फा शु १ (ता ७-३-१७६१

श्री

चिरजीव राजश्री नाना यासि बाळाजी बाजीराव प्रधान आशिर्वाद उपरि तुमचे सविस्तर पत्राचीं उत्तरें अलाहिदा लिहिलीं आहेत त्याजवरून सर्व कळेल चिरजीव भाऊसाहेब आल्याखेरीज तुम्ही हरगिज न यावें त्या फौजेत अवघा मदार तुमचाच आहे तुम्ही आल्यानें ठीक पडणार नाहीं राजश्री बापूजी नाइकास अजमेर पावेतों भाऊसाहेबाचे खबरीसाठीं रवाना करणें ते फलाणे ठिकाणीं आहेत अशी खबर आल्यावर यास पाठवावयाची काय मजा ? यास्तव अगोदरच यास पाठवावें हें उत्तम + छ २९ रजब हे आशिर्वाद महिपतराव पाड्या यास पत्रदर्शनीं पाठविणें हे आशिर्वाद

---

× पडवळ हे महालुंगें पडवळाचें, ता खेड, येथील पाटीलकीचे तक्षीमदार आहेत

+ येथपासून खुद्दाचें अक्षर

ले १८८ ) [ २७५ ) {श १६८३ वैशाख शु ४ {ता ८-५-१७६१

श्री लक्ष्मीकांत

राजश्री बाळाजी पंडित प्रधान गोसावी यांसि

छ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ जानोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असले पाहिजे विशेष गोसावी यांनीं पत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन लिहिला मजकूर अवगत जाहला माघारे जाता मुलखाची पायमाली न करावी वराड प्रांतीं गेल्या नंतर मोंगलाई अमलाची जफ्ती करावी, म्हणोन लिहिलें ऐसियास गोसावी याना आम्हास व राजश्री गोपाळराव यासि खेचिवाडियाचे पारिपत्यापबदल ठेविले होते त्यास तेथील गुंता उरकून दरकूच सुरजेस आलो तेथून मंडले प्रांताचे बंदोबस्ता बद्दल सागराचे सुमारें आलों तों राजश्री विसाजी गोविंद कमावीसदार दिम्मत राजश्री बाळाजी गोविंद हे भेटीस येऊन निवेदन केले की, बुंदेल खंडात बुंदेले यांनीं जमाव करून तमाम ठाणीं घेतला एक सागर व हाटे राहिले त्याजमध्ये हाट्यास मोर्चे लाविले आहेत ते घेतल्यानें तर सागरास लागतील म्हणजे बुंदेलखंडाचा अमलच उठतो याची साहित्य केलिया मुलूक राहतो नाहीं तर नाहा यास्तव या प्रांतां येऊन हाल्याचे मोर्चे कापून काढिले वरकड ठाणीं घेऊन मशारनिलेचे स्वाधीन केला याचा मजकूर सविस्तर पेशजी लिहिलाच आहे सांप्रत राजश्री हिंदुपतराजे यांचा वकील सोरस्या निमित्य आला आहे त्यास कमावीसदार मशारनिलेचा व त्याचा तहरह करून देऊन सत्वरच आपले प्रांतास जावयाचे होईल जाते समयीं उत्तम प्रकारे फौजेंत ताकीद करून गोसावी यांचे मुलखात पायमाली सर्वथैव होऊन येणार नाहीं वरकड वराड प्रांतींचे जफ्तीचा मजकूर तर प्रस्तुत इस्तमालतीचे दिवस आहेत या दिवसात जफ्ती जहालिया इस्तमालतीत खा रा ख ना होती यास्तव हे दिवस जहालिया नंतर गोसावी यांचे आज्ञे प्रमाणेंच वर्तणूक होऊन येईल र॥ छ २ माहे शवाल सुज्ञ प्रति विशेष काय लिहिणे कृपालोभ असू दिला पाहिजे हे विनंती मोर्तबसूद

---

ले १८९ ) [ २० ) {श १६८३ वैशाख शु ६ {ता १२-५-१७६१

श्री

वेदशास्त्र संपन्न राजश्री गोविंद दीक्षित स्वामीचे सेवेसी—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे विशेष तुम्हापासून कर्ज घेतले मुद्दल रुपये २५००० पंचवीस हजार यास व्याज दरमहा दरसदे रुपया १ बिनसूट प्रमाणें करार केला असे जाहाले मुदतीचें व्याज व मुद्दल हिशेब करून एका महिन्याने ऐवज पावता करू जाणिजे छ ६

सवाल वैशाख शुद्ध ८ अष्टमी शके १६८३ वृषानाम सवत्सरे सु॥ इहिदे सीतेन मया व अल्फ हे विनंती

---

ले १९०
[१०७]

श १६८३ वैशाख व. ९
ता ८-५-१७६१

॥ श्री ॥

सेवेशी रघुनाथ हरी सा॥ नमस्कार विनंता येथील कुशळ छ २२ सवाल मु॥ मौजे जेरोण पे॥ जतारा प्रांत बोडसे स्वामीचे कृपें करून यथास्थित असो विशेष छ १३ साबानचें पत्र सादर जाहले ते छ १२ रमजानी झांशीच्या मुक्कामा पावोन बहुत संतोष जाहला पत्रीं आज्ञा का, राजे हटेसिंग याची स्थापना बोडशात करावी दुतीयेकराचे समत नसावे राणी व कारभारी एक विचारें करून बदोबस्त करावा त्यास राणीचें वैमनस्य राजाशा जाहलें तेव्हा राणीनेंच कुचोद्य करून राजास काढून दिल्हा त्याचें साहित्य दुतियेकराना केलें ते एकच आहेत परंतु येथील प्रसग पाहून होईल तितका स्वामींच्या आज्ञेनुरूप बदोबस्त करून सेवेशी लिहून पाठवितो सालगुदस्ताची पक्की वहिवाट व सालमजकुरचा आजमास पाठवणें म्हणून आज्ञा त्यावरून सालमजकूरचा आजमास सेवेशीं पाठविला आहे स्वदेशाप्रमाणें येथील प्रकार नाहीं रयत मवाशी वैशाख अखेर पावेतो वसूल येईल तितकाच अम्मल सुरळीत रीतीनें चालावें हा अर्थ रयतीस ठाऊकच नाहीं अखेर साल पावेतो पक्की वहिवाट होईल ती घेऊन सेवेशीं येतो गु॥ वहिवाट पाठवावी त्यास माहितगार कारकून आहेत ते प्रस्तुत जमाबदी वगैरे कामेकाजें हगामाचे दिवस आहेत याजकरिता येथे जरूर पाहिजेत सालासही चारपाच महिने याची अवध राहिली सालगु॥ व सालमजकुरची वहिवाट घेऊन आम्हीच स्वामीपाशीं येतो हिशेब पाठवावयासि विलब लागला म्हणून राग न भरावें एक दोन कारकून माहितगार आहेत त्यास येथील काम मोठे आहे येथील माहितगीरी त्याचीच याजमुळे पाठविले नाहींत त्यात बोडशामुळे, बोडसेकर बुधेले याणी या प्रांतात दुडी केला याजमुळे, स्वारीस निघालो याजकरिता कारकून समागमे आणिले आहेत बोडशाच्या बदोबस्तास आणीक मासपक्ष पाहिजे राजश्री विश्वासराव लक्ष्मण याजकडे सालगु॥ वसूल पडिला, व मशारनिल्हे याच्या विद्यमानाची शिबदीची हिसेरसीद बेहड्याच्या अजमासें निवडून पाठविली आहे एक दोन वेळ स्वामींची आज्ञा आली त्यावरून पाठविली मर्जी असेल त्याप्रमाणें फडशा करावा त्याचा खच सरदारीचा आहे आम्ही नेमणुकेच्या आधार लिहून पाठविलें आहे कमजास्त जें करावयाचें असेल ते करावें साल गुदस्ता मवासापासून गढ्या घेतल्या, त्यातून पाडून टाकल्या व ठाणीं ठेविला व मवासेच्या दस्यापासून गाव निर्वेध केले त्याची तनखा निराळी यादीवर लिहून पाठविली आहे त्यावरून श्रुत होईल मवासापासून मुलूख सोडविला आहे परंतु जागा उजाड लावणी केली आहे चवसाला तनखा भरेल मवासाचा उपद्रव जाहालियासि किल्ले करेरा व झांशी येथें

जकीरा पाहिजे सबब आजमासीं रुपये खर्चा लिहिले आहेत मर्जी असल्यास जकीरा घेऊं पागेस खर्च लागतो पागेवाचून जुजाचें काम जमत नाहीं पागेमुळे सामान चांगलें राहतें परंतु खर्च भारी याची विनती पूर्वी सेवेशीं लि॥ च आहे आज्ञा कर्तव्य ते करावी येथें घोडीं ठेवण्याचा असिल्यास खर्च दहा हजार रुपये नेमणुकेहून जाजती लागतील श्रुत असावें जाटांच्या दम्यामुळें सुलाकरी [ सुकलारी ? ] येथाल ठाण्याचा बंदोबस्त करावा लागला याजमुळें जाजती खर्च रुपये सुलाकरीस जहाले आहेत खर्च न करावे तर मुलकास उपद्रव लागतो काय करावे ? खर्च थोडका करून जमा जाजती साधावी यात धन्याची मर्जी प्रसन्न राहते परंतु येथील प्रकार सारा शिबंदीचाच आहे यास काय करावे ? श्रम सायास करून फळ नाहीं न करितां अम्मल राहत नाहीं या रीतीचे वर्तमान आहे निर्वाह करणार स्वामी समर्थ आहेत वोडसेकर बुंधेले यांणीं दुंडी केली हे वर्तमान दिल्लीस राजश्री विसाजीपंतास लिहून पाठविलें त्यावरून राजश्री आनंदराव गणेश दिपे, राजश्री नारो शंकर राजेबहादर यास पथक सुद्धा पाठविले आहेत येथें येऊन पंधरा दिवस जाहले सेवेशी श्रुत व्हावें म्हणून लिहिले असे बहुत काय लिहिणे कृपा लोभ कीजे हे विनंती

---

| | | |
|---|---|---|
| ले १९१ [ ३३५ ] | वार पै॥ छ ११ जिल्काद सन इसन्ने सतैन जेष्ठमास | श १६८३ जेष्ठ शु ७ ता॥ ९-६-१७६१ |

श्री

राजश्री बाळाजी पंडित प्रधान यासि

श्रीमंत महाराज मातोश्री जिजाबाई साहेब उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय लेखन केले पाहिजे यानंतर आपण पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ कळला तेथे लिहिलें जे, साहेबाचा पडदा सेवकाशीं नव्हता, म्हणून लिहिलें तें खरे आपल्याशीं पडदा स्वप्नीही नाहीं कैलासवासी महाराज स्वामींची अकृत्रिम ममता असता साहेबा वियोग केला, उचित नाहीं, म्हणोन लिहिलें, तें प्रमाणच आहे आपण बंधुच आहेत परंतु राजश्रींच्या आज्ञेनुरूप चारी गोष्टी तुम्हाप्रति बोलावेसें होतें आपण दूर राहिला समेटी साहेबापासून घडेल न घडेल, हें आपण जाणतात प्रत्ययासही येईल येथील अर्थ आपल्या शिवाय नसल्यास आपण इतका संदेह घेऊन ल्याहावें, सर्व प्रकारें करून आपल्या ममतेची आहों राजश्री शेषो नारायण यासही मागाहून पाठवून देत आहों पुण्यशील अनुबाईसही येणें विशीं पत्र गेलेंच होतीं कळलें पाहिजे जाणिजे रवाना छ ५ माहे जिल्काद बहुत लिहिणें तरी सुज्ञ आहां

( लेखन सीमा )

जिजाबाई कोल्हापुरकर संभाजीची बायको

---

ले १९२ }
[ ५३ ] }

{ श १६८३ आषाढ वद्य ३
{ ता २०-७-१७६१नतरचें

श्रीकृष्ण प्रसन्न

श्रीसाबसदाशिवायनम जो साबसदाशिव कसा आहे कीं, सत्स्वरूप म्हणजे असें चित्स्वरूप प्रकाश अवस्था-त्रय साक्षी जागृत कालीं त्यास विश्व स्वप्रकाशीं तैजस सुषुप्ती-कालीं प्राज्ञ असें ज्यास म्हणतात, जो एकच आत्मा उपाधि भेदें करून नाना प्रकारें भासतो पाय नसता चालतो डोळे नसता पाहतो हात नसता घेतो कान नसता ऐकतो सर्वांतर्यामी व्यापक हें कशावरून ? व आत्मा आहे हे कशावरून ? तर, दूर कोणी इंगितज्ञ बसला असतो त्याचा याचे आत्म्यात [ आरशात ? ] प्रतिबिंबित होऊन तीच गोष्ट घेतो व्यापकते व्यतिरिक्त कसें घडेल असा आत्मा त्यासच आपणात विसरून आनद-स्वरूप सोडून दु खातील सुख भोगावयाची इच्छा धरितो हेच त्या आत्म्याची माया सत्य ह्मणता नये, असत्य ह्मणता नये जिचे स्वरूप अनिर्वचनीय सत्त्व, रज, तमोगुणी तिजपासून अहकार, आकाश, वायु, तेज, उदक, पृथ्वी पचमहाभूतें महत्तत्व ह्मणजे अत करण तदवच्छिन्न जें चैतन्य जो जीव अपची-कृत पच महाभूतें करून तदशरूपे लिंगशरीरद्वारा जीवास सुख दु खादि प्राप्ती ' भोगायतन शरीर ' भोगाच स्थान शरीर होय त्या शरीराची उत्पत्ती तर जे निंद्यस्थान योनी, व पुस स्थानापासून रेत ज्याचे स्खलनें करून व स्पर्शे करून स्नान करावे लागतें, अशा निंद्य पदार्थापासून शरीर वृद्धीतें पावतें गर्भीच लयातें पावले तर गेलें, वाचलें तर आत अनेक जतूचे उपद्रव व जठरस्थ अग्नीने दाह इत्यादि क्षुधा-तृषा समयीं परिमार्जन न होणें असे क्लेश भोगिता प्रसव वायूकडून कष्टें करून जन्म जाहालें म्हणजे जाताशौच प्राप्त तदनतर रोगादिक वेदना आपणच मुक्यानी सोसाव्या षड्भाव विकार अस्ति, जायते, वर्धते, विपरीणमते, अपक्षियते, नश्यति हे षड्भावन्त् विकार असा देही जो मी [१] त्याला लाहनपणीं अज्ञानें करून आवृत परतु पूर्व सस्कारें करून देवाची पूजा करावी हा छद फार याजकरिता [२] * मातोश्रींनीं मारही दिला परतु सस्कार दृढ, विद्याभ्यासा करिता मातापितर जे याची शिक्षा तेणेंकरून लहानपणीं अज्ञानाकरिता चित्तास फार वाईट वाटून त्यानेंही अनिष्ट चिंतीत असें दहावे वर्षी विवाह झाला विघ्नें पडलीं असता निर्विघ्न केले पुढें अका बारा वर्षा नतर कामाविर्भाग शरीरीं होऊं लागला तेणेंकरून व असत्समागम किंचित झाला तेणेंकरून पापप्रवृत्ती होऊं लागली रेतस्खलनही व्यर्थ करू लागलों मध्यें घोड्यावरून पडलों अति अवस्था कठीण, दोन दिवस शरीर भान नाहीं या प्रमाणें जाल असता गोविंद जो त्याचे कृपेनें बरें केलें पुढें पधरावे वर्षी पित्याचा काळ झाला त्याचें और्ध्वदेहिक ईश्वरें करविलें

---

१ हें बाळाजी जनार्दन ऊर्फ नाना फडणीस याचे स्वलिखित आत्मवृत्त आहे हें कसें प्राप्त झालें या विषयीं या लेखाच्या अती हकीकत लिहिली आहे हे ता २०-७-१७६१ रोजीं पहिले माधवरावास पेशवाईची वस्त्रें मिळाली तों पर्यंत आहे याचे इग्रजी अवतरण मॅकडोनल्ड कृत ना फ चरित्रात छापलें आहे

[१] जन्म-ज्येष्ठ शके १६६३ [२] पिता-जनार्दन बल्लाळ भानु

त्यात पापदृष्ट एक समया जहाला हा अपराध झाला व्यथ रेतस्खलन करून पाप व नारार-नाश समजू लागलें तेव्हा मोडून देऊन निश्चय केला परतु कामाविर्भाव विशेष, येणं करून पापबुद्धी होत असे पुढं परपरा सेवाधर्म चालात्रा या योग व श्रीमताची कृपा पुत्र वत् असे जाणून कर्नाटक प्राता श्रीरगपट्टर्ण पर्यंत गेलों परतु प्रत्यहा स्वप्नावस्था होऊ लागली पुढें घरीं आलियावर रमणीयोग मात्र अज्ञानच तेणेंकरून जाहला परतु पापबुद्धी नि शेष सुटेना तेव्हा चित्तात विचार केला का, पितामहें याची बुद्धि धर्मशील अमता व सत्य वचनी एकनिष्ठ देव-ब्राह्मणाचे ठाया परम भक्ती, सात्विक आणि निषिद्ध कर्म करणेंच नाहा असें असता माझ चित्त पापाकडे थोडस का जात ? याचा विचार करिता मातामह पक्ष× अति व्यभिचारी तो सस्कार आहे बुद्धीचा निश्चय करावा तत्रापि स्थिरता राहू नये तेव्हां सस्कार बलवत्तर पुढे टोंक्यास अतिरुद्र करावयास गेला तेथ देवतार्चन-नेम धरिला परतु शरीरां पीडा तेणकरून वैराग्य असे का, पर-स्त्री मनातहीं येऊ देऊ नय मग पाहूण कोठील ? मातोश्री व कुटुब सहवर्तमान भाऊ बरोबर हिंदुस्थानात जाऊन स्वर्गगा त्रिपथ भागीरथीचें स्नान त्रिस्थली यात्रा करावी, अत करण शुद्धा होईल, या भावने करून गेलो त्या काला चित्तास अति वैराग्य याचे कारण शरीरा किचित् पीडा तेणकरून चित्त अति वैराग्यशील जहालें, का, भगवताची पूजा व ध्यान मात्र करावें उष्ण शीत याचीही पीडा परतु चित्तास नाहा मातेच्या ठायी भक्ती होत्साता चाललों ते नर्मदा महागगेमध्यें स्नान करून एका वृत्तीन ध्यान केलें त्या दिवसा पासून उत्तरोत्तर वैराग्य अत करण शुद्धीच होत चालला भाऊची ममता विशेष व आवेची व्यथा बहुत जाहाली, उठावयास शक्ता नाहा, रेचन बहुत, ग्लानी फार तेव्हा कूच जहाले असता मुक्काम श्रीमताना करवावा त्या कालीं ईश्वरें आरोग्य केलें पुढें दर मजल चरमन्वतीतीरागेलो तेथे ग्रहण पडल स्नान-दानादिकें करून आत्मा पवित्र होत्सता ध्यानें करून कालक्षेप चालत असे पुढं सूर्यतनया यमुना इचे तीरा गौ-घाटा जवळ गेलों तेथें स्नान-सध्या करून दोहा दिवसा नतर मुक्ति-पुरीं श्रीमथुराक्षेत्रीं[६] गेलों तेथ क्षौर प्रायश्चित्त श्राद्धादिक करून तदनतर पुढ भगवान् पूर्णब्रह्म राधाकृष्ण याण सकल लीला केल्या असे जें वृदावन त्या स्थळास गेलो तेथें कालिया डोहीं कदबवृक्ष ज्याजवर भगवान् बसून वस्त्रहरण करिता जहाला, त्याच्या शाखा अद्यापि यमुनेंत गेल्या आहेत, त्या खालीं जाऊन स्नान तर्पण करून तदनतर

---

३ परपरेनें कसा चालत आला तें वशावळ पाहिली असता समजेल खेरीज भानूचा व पेशव्याचा घरोबा किती होता हेही पे० ब० पाहिली असता ध्यानात येईल

४ ही स्वारी १७५५।५८ त झाली

५ पितामह-बाळाजी महादेव भानु × मातामह पक्ष मेहेदळे

६ ह्या सप्त मुक्तिपुऱ्या प्रसिद्ध आहेत अयोध्या मथुरा माया काशी काची अवतिका पुरी द्वारवती चैव सप्तैता मोक्षदायका ॥ १॥

गोपीचदनाचे टिळे व तुळसीच्या माळा घालून भगवताचें ध्यान करीत होत्साता वृदावनात अटलबिहारी व कुजबिहारी व बालबिहारी, राधाकिशोर, गोविंदजी या भगवताच्या मूर्ती यांचीं दर्शने घेतला त्यात कुजविहारी मध्यानकालीं चोंपाळ्यावर निद्रिस्थ, कपाट लागलेलें, परतु चोपाळ्याची दोरी बाहेर ओढीत असत ती आपले हातीं ओढून भगवान् जो यास आदोलन लीला केली तेथोन शृगारवट जेथें भगवत राधेस शृगार केले तेथें जाऊन वट दर्शन घेऊन पुढें बशीवटी म्हणजे जेथे भगवतें मुरलीवादन केलें, तेथें जाऊन वटाचे दर्शन केलें तेथून सेवाबन, कुजबन हीं स्थळें, कुज कसे की भगवान् लीला करितो असाच भास होत असावा सर्वही वृक्ष छत्राकार ठेंगणे भूमिस्थ पल्लव कटक वृक्षासही परतु [?] कटक नाहीं हे पाहून आनदमय होत्साता यमुनातीरीं रेतींत भगवान् जो याणे बाळरूपी लीला केली पादारविंद सबधीं रेणु रज कण त्याची प्राप्ती मस्तका वदावया करिता ब्रह्मादिक देव इच्छितात तेथें जाऊन लोळून ती रेता मस्तकावर घेतली तेथोन ज्ञानगुदडीस [ ? ] गेलो तेथे थोर थोर सत, महत, बैरागी भगवत्पर होत्साते, सायकाळचे साहा घटिका दिवसास येऊन बसून पुराण श्रवण करीत आहेत भगवताच्या कथा नामें गाताहेत त्यचें दर्शन घेऊन चार घटका पाहून चित्त बहुत शात जहाल तदनतर वीरसमीर जे या प्रति कालिदी तीरीं जाऊन सायकाल सध्या करून भगवान् साबसदाशिव जो याचें एकाग्र मनें करून ध्यान करून येता जहालो याप्रमाणें तीन चार दिवस क्रमिले अनेक जन्माचे पुण्य कीं, असे वृदावन दृष्टीस पडलें तेणें करून भगवताच्या मूर्ता व भगवद्भक्त त्याचे दर्शनें करून नेत्र पवित्र जाले पादे करून चालत गेलों तेणे करून पायाचे सार्थक जाहालें हस्तें करून नमस्कार करिता जाहालो तेणेंकरून हस्त पवित्र झाले मुखेकरून नामस्मरण केले तेणेंकरून मुख पवित्र झालें कर्णें करून भगवत्कथा श्रवण केलें तेणेंकरून श्रोत्र पवित्रता पावले स्नानें करून सर्व देह पवित्र झाला ज्या वृदावनात बैरागी एकाग्र वृत्ती करून ध्यानस्त होत्साते कुजाखालीं जागा जागा बसले आहेत, कोणी पर्णेच भक्षून, कोणी जल प्राशन मात्र करून, कोणी दुग्ध सेवन करून, कोणी सिद्धान्न आणून घालील तेंच खाऊन राहिले आहेत, अशाचें दर्शन घेऊन सत्समागमाचे माहात्म्य किंचित् आनदातें पावला त्यात एका बैराग्याने कृपा करून एक मत्र भगवताचे नामाचा सागितला, कीं याचा जप करीत जावा तो भगवतेंच सागितला असा मानून, सर्वास यथाशक्ति देणें देऊन सतोषातें पावलों पुढें दिल्लीस गेलों तेथें पृथ्वीपतीचें दर्शन श्रीमताचे आज्ञेवरून घेतलें त्याणीं बहुत कृपायुक्त भाषण करून आशीर्वाद देऊन आपले जवळील वस्त्रें दिलीं तीं घेतलीं किंचित् सतोष जाहला कीं, भगवताचे कृपेचे अतर्वर्ती ही कृपा आहे तदनंतर श्रीमताचे लष्करात श्रीमताजवळ आलों बसलों असता भूमीकप जाहला परतु भगवताचें ध्यान चित्तात आणिता जालों दिल्लींतील चित्रें वगैरे विषय ज्यात पाप नाहीं असेही घेतले

---

पृथ्वीपति=बादशहा जवानबख्त म्हणून एक लहान शहाजादा भाऊनींच गादीवर बसविला होता

पाहिले पुढे उत्तरेकडाल यवनें शत्रुत्वें करून यमुना पैलतीरा पाऊण लक्ष सेनेसहवर्तमान येऊन उतरला परंतु यमुना भरपूर चालली तेणेंकरून उभयपक्षीं स्तब्धताच जाहली पुढें कुंजपुरा श्रीमंतानीं शौर्यें करून घेतला मीही युद्धांत होतों ईश्वरें रक्षिलें तों इतकियांत यवन आलीकडे आला श्रीमंत सैन्यासहवर्तमान त्याचे समोर गेले गाठ पडली तेव्हा मी तर लहान श्रीमंताचे बुद्धीस महानबुद्धी [ १ ] परंतु भावी अर्थ तेणेंकरून विपर्यास पडला आप्त होते बळवंतरावें[२] मातुल व नाना पुरधरे वगैरे ते अनाप्त झाले जे अनाप्त शाहनवाज[३] खानी, भवानी शंकर वगैरे ते आप्त जाहले त्याचे वाक्याचे ठायीं विश्वास, तेणेंकरून आपली रीत युद्धाची सोडून यवनाची रीतें[४] धरिली परस्परें युद्ध होत असे गोळे प्रत्यही शत्रूचे राहुटीवरून जात मातोश्री व स्त्री भयभीत होत कीं कसे होईल? ते ते समयीं मातोश्रीस विनती करीत गेलों, कीं मी विनती करितों एक ईश्वरीं लक्ष असावें त्यांत मातुल[५] युद्धांत होते ते पडले ते दिवशाच सर्व सैन्य नाशास पावावें परंतु रात्र जाहली यामुळें राहिलें त्या दोन महिन्यांत मनुष्यें, पशु बहुत मेले अन्नाची महर्गता दुर्गंधी एकेच ठिकाणीं असे श्रम पाहिले पुढे मातुळाची स्त्री समागमें गेली मातोश्रीस श्रम फार जाहले होणार अवश्यक होते यदर्थीं संदेह धरूच नये हा माझा निश्चय पुढें थोरलें युद्ध उदयीक होणार तों पूर्व दिवशीं संकेत कीं, पराजय आपला जाहला तरी शत्रूचे हातीं श्रीमंताचें कुटुंब व आपलें हातीं लागू नये आपणच नाश करवावा आपण तर वाचत नाहीं असा सिद्धांत करून श्रीमंतानीं याची ही योजना केली दुसरे दिवशीं तयार होऊन प्रातःकाळचे दोन घटिका दिवसास युद्धास गोळागोळीचा प्रारंभ जाहला श्रीमंत अति बुद्धिवान्, धैर्यवान्, शूर, कृतकर्में गर्व मात्र विशिष्ट, परंतु तर्तुद फारच सैन्याची वगैरे केली शेवटी निशाणा जवळील तर्तुद एकीकडे जाऊन शत्रूची मुख्य स्थानींच गाठ पडली मी श्रीमंता सन्निध ईश्वरस्मरण किंचित् करून असें तों विश्वासराव यास गोळी लागली पडले ते हत्तीवर श्रीमंतानीं घालून उभेच राहिले तो पठाण पाय उतारा आत येऊन मिसळले तोंडातोंडी होऊं लागली आणि डावे बाजूचे मातबर सरदार, चौघड्याचे धनी देखील, पूर्वींच पळाले

१ यवन अहमदशहा अबदाली हा या काळीं २४ दस्ते फौजेसह आला होता सुमारे १२ शें लोकांचा एक दस्ता

२ बळवंतराव मातुल–हे बळवंतराव गणेश मेहेंदळे नाना म्हणतात मातुळ अनाप्त झाले परंतु दुसरे लेखांत बळवंतरावाच्या मसलतीनेंच भाऊसाहेब चालत असत असे म्हटलेलें असतें

३ हे दिल्लींतील पादशाही मुत्सद्दी–

४ एक जागा खदक करून राहणें ही रीती–ही यवनी रीत इब्राइमखा गारदी याचे मसलतीवर व बळावर पतकरली

५ मातुळ–बळवंतराव मेहेंदळे

* थोरलें युद्ध–पौष शुद्ध ८ शके १६८२

उजवे बाजूचेही होळकर शिंदे निघोन निशाण निघालें दोन तीन शत पायदळ होतें श्रीमत दिसेनातसे जहाले तेव्हा ईश्वरें बुद्धी दिली माघारे फिरलों पूर्वी युद्धात बापूजी+ पती बोध केला, माघारे फिरावें त्यास उत्तर केलें कीं, अशा समया श्रीमतास सोडणें ठीक नाहीं परतु पुढें या प्रमाणे जहाले लक्ष सैन्य त्यात मोठे मोठे सरदार असता एकही त्या समयीं श्रीमतास आप्त न जहाला बहुत दिवस अन्न भक्षिले, कृपा पुत्रवत् केली तितकें चागला काळ होता तेव्हा केशास ढका लागल्यास प्राण देऊ अशा प्रातिज्ञा परतु ईश्वर घटित विपरीत काळ त्यात सोबती कोण होतो ? सर्व सुखाचे सोबती भोजन आदरें करून करावें वस्त्रें, जवाहीर, जागिरा द्याव्या निदानीं इतके असून ज्याचे देहाचें ठिकाण कोणास ठाऊक नाहीं सर्व वाताहत जहाले मी सायकालचे दोन घटका दिवसास घोड्या वर पाणिपतात आलों त्या देशाचा मार्ग अगदीं ठाऊक नाहीं तेथें परमेश्वरें वाट दाखवा- वया पुरते रामाजीपत उभे होते सागू लागले घोडें वस्त्रें टाकून द्यावीं त्या वरून सर्व टाकून शुद्ध लगोटी लावून बसलों रात्र जहाल्यावर चाललो तो एका कोसात तीन वार वेळ शरीरास हात लावून टोपीवाल्यानीं झाडा घेतला दर खेपेस समागमेचे दहावीस तोडून टाकीत त्यात मी राहिलों, हे सत्ता ईश्वराची परतु बापूजीपत, रामाजीपत, राहतच गेले असे जाता दाहा बारा कोश पश्चिमेकडे गेलों तों तेच शत्रु येऊन रामाजीपत बापूजीपत वगैरे यास जखमी भारी केलें पडले मी एकटा राहिलो तो गवतात गेलों ईश्वरें तृणें करून माझें रक्षण केलें त्यास मोहनी घातली सर्वांस मारिले असता मी जवळ असता न मारिलें, व गवत लाब असता जाऊ दिलें पुढें ते गेल्यावर जाऊ लागलों तों पुढें दोन कोशावर दुसरे मागती दृष्टीस पडले तेव्हा मागती तृणात जाऊन बसलो तो जवळ येऊन काढू लागले ते समयीं ईश्वर त्यातीलच एका वृद्धाचे मनात सचार करिता जहाला, का कशास मारिता ? मग गेले तदनतर माझी शक्ति पाणिपतावर बहुत क्षीण, आमविकारादिक विकारयुक्त, अन्न चालेना, असा मी त्याजवर दयासमुद्र साबसदा शिव जो याणें कृपा करून, शरीर अशक्त, ऊन पाहिलेच नाहीं, व पादचारी अभ्यास नसता सोळा सत्रा कोश अन्न उदका व्यक्तिरिक्त आलों क्षुधा तिसरे प्रहरीं लागली तेव्हा बोरीचा माला सापडला तो खाऊन पाहिला तो तोडात जाईना तसाच सायकाळीं एका ग्रामाबाहेर आलों,तों एका बैराग्यानें पीठ आणून दिलें त्याची भाकर खादली ती अमृत-समान लागली नतर निद्रा केली प्रात काळीं गगा सहस्रनाम म्हणत ईश्वर-स्मरण करीत चाललो तों एका गावामध्यें गेलों तेथें एक साहुकार होता, त्यानें घरी नेलें भोजन एक ब्राह्मण होता, व यशवतराव चाबुकस्वाराकडील भेटला, त्याजकडून स्वयपाक करवून भोजन केलें तों शत्रूचे स्वार गातात आले, हे वर्तमान कळलें, तेव्हा साहुकार म्हणाला कीं आम्ही गाडी करून जयनगरा कडे पावते करितो गाडींत बसून चाललों तों पाहिलें कीं हा फसवितो असें बुद्धीस येऊन गाडी टाकून पाय उतराच होऊन चाललों बरोबर दोन तीन ब्राह्मण, दोन मराठी

+ बापूजीपत-कोण ? हिंगणे ?

माणसें, याप्रमाणे दहा बारा कोश गेलो असे सात दिवस पायीं चाललों नित्य भोजनाचें साहित्य ईश्वर देववी तेणे करून समागमचे मंडळी सुद्धा भक्षून रेवडी पावेतो आलों तों लष्करचे पळे त्या वाटेनें गेले त्यांस गावात बालोराव म्हणून चौघे भाऊ असत ते माझें नाव ऐकून पुसत, कसे आहेत ? चेहरा कसा! खुणा खाणा सर्व त्याणीं पुसून घेतलें मागाहून हे येतात हें जाणून मार्गावर नेहेमीं पहात बसत आम्ही आलों तों त्याणीं रेवडी बाहेर ओळखिलें, पुसू लागले नाव न सांगावें हा निश्चय, परंतु तो आगींच नाव लावू लागला त्याचे बोलण्यात वाकडी गोष्ट नाहीं, आम्हास साहित्य करून द्यावें, उपकार करावा हें पाहिलें, तेव्हा नाव सांगितल्यावर आपले घरास मंडळी सुद्धा नेऊन उत्तम प्रकारें भोजनाचें साहित्य करून दिलें भोजन केल्यावर वस्त्रें दिलीं तदनंतर रामजी दास जोशी मातबर रेवडींत असे, त्यास वर्तमान कळल्यावर त्याणें आपले घरीं नेऊन ठेविले सात दिवस भोजनास व उत्तम वस्त्रें दिलीं पुढें आमचें मानस दीग भरतपुरास जावयाचें परंतु तो म्हणे सोबत चांगली लावून गाडी करून देऊन पावते करीन त्यावर एक लग्न निघालें, त्या बराबर गाडी करून देऊन बराबर पेढे साहित्य करून दिलें आम्ही निघालों तों वाटेंत कृष्णभट वैद्य आले त्याणीं सांगितलें कीं, स्त्री विरोजी बारावेकर याणीं संभाळून आणिली ती ाजि ग नी स नारोपंत गोखले याचे घरीं आहे तेथें त्या गृहस्थानें साहित्य वस्त्र पात्राचें केलें आम्ही तेथें गेल्यावर भोजन क्षिरीचें घातलें तेव्हा आनंद झाला मग स्त्रीस एक गाडी दुसरी करून तेथून निघालो तों दिगेस आलों तेथें पुरुषोत्तम महादेव पाणिपताहून आले होते, ते वानवळे याचे गुमस्त्याचे बिऱ्हाडास राहिले होते त्यास कळताच त्याणीं आपले बिऱ्हाडास नेलें तेथें कुटुंब सुद्धा कमकसर महिनाभर होतों क्षुधा फार लागत असे, त्याणीं वस्त्रें वगैरे साहित्य भोजनाचें चांगलें केलें तेथून मातोश्रीचा शोध फार केला, परंतु घरचा खिजमतगार बराबर होता त्याणें सांगितलें कीं, घोड्यावरून पडून जखम लागून मेली[१६] हेंच ठिकाण लागलें पुढें पालखी व घोडीं घेऊन ढवळपुरावरून ग्वाल्हेरीस सारें लष्कर पळून पार्वतीबाई, नाना पुरंधरे, मल्हारजी होळकर सारे होते तेथें आलो अंत करणापासून होतें कीं, श्रीकाशीस जाऊन नेहमीं वास करावा प्रपंचातील विषय-मात्रीं दुःख हें पुरतें समजलें परंतु देहप्रारब्ध बळवंत तेथें आलियावर सर्वांनीं निषेध केला एकदा देशीं जावें मातोश्रींचा विधी करावा वगैरे कित्येक प्रकार काशींत गेल्यावर कसें होईल पाणिपत जालें तेव्हां काशीही कसी होते असें चित्तात येऊन लष्करा बरोबर येऊ लागलों पाणिपताचें वर्तमान श्रीमंत नाना साहेबानीं ऐकून माझें स्मरण फार गुरुजी[१७] जवळ केलें कीं, त्यांचें शरीर अशक्त, कसा निभाव होईल ? परंतु ईश्वरकृपेनें व त्यांचें आशिर्वादें महत्स-

---

१५ बारावकर—हा पार्वतीबाईस आपल्या घोड्यावर घेऊन तिचें प्राणरक्षण करणारा। ' बारवेकर ' नानाची आई व कुटुंब युद्धारभीं पार्वतीबाई जवळच होतीं

१६ ' गिलचे याजकडे सापडली ' असें भा० सा० ब० येथें लिहिलें आहे

१७ हे गुरुजी कोण ? महादाजी बल्लाल करकरे ?

कटांतून पार पडलो पुढे श्रीमत नानासाहेब यांचें दर्शन बराणपुरावर जालें पाहतो तों शरीर फार क्षीण जहालें आहे मर्जी बेतऱ्हा जाली आहे बहुताच्या अश्रू क्षणक्षणा जातात परंतु मजवर सदयतेनें लोभेंकरून भाषण करून वर्तमान पुशिलें सांगितलें तीन चार दिवस बरोबर राहिलो श्रीमत गोपिकाबाई व नारायणराव यास देवी आल्या करिता त्या सहवर्तमान नर्मदातीरीं राहिलीं परस्परे*उभयताचें चित्तही ठीक नाहीं हें कळलें काल-वैपरित्यें करून न घडावयाचें तें ही घडलें तदनतर या मर्जींत कसे होईल जाणून निरोप घेतला कीं टोंक्यास पुढें जातों जावें म्हणून आज्ञा दिली टोंक्यास येऊन राहिलो तां श्रीमतही मागाहून तेथेच आले पुन्हा दर्शन घेतलें मर्जी बिकट असता एक शालिग्राम मागितला तो बहुत कृपेंकरून आज्ञा झाली की, क्षेत्रातून पाहिजे तो घेणे सीतारामचद्र मूर्ती घेतली एक दिवस प्रदोष तेथे पडला ते दिवशीं श्रीमत थोरले राव याचें श्राद्ध म्हणून मला भोजनास बोलाविलें मी विनती सागून पाठविली कीं, प्रदोष आहे तत्रापि यावें म्हणूनच उत्तर जाहलें यावरून स्वारी देवास जातेसमयीं गुरुजाकडून विचारविलें तेंव्हा आज्ञा जाली कीं, रावसाहेब याचें श्राद्ध आहे याजकरिता जरूर जरूर यावें त्या वरून गेलों श्राद्धाचे ब्राह्मण [ याची ] भोजनें जाहलियावर खासा भोजनास बसले एकीकडे श्रीमत माधवराव [ व ] एकीकडे मला बसविले, आणि दुसरें स्त्रीकडून वाढविलें तिला शिक्षा वाढावयाची दाखविली अर्थात् मातोश्रीकडून लेकरास वाढविले नतर श्रीमतास विनती केली का, काहीं दिवस गगातीरी राहून मन स्वस्थ करावें असें आहे त्यावरून आज्ञा जहाली का, काहा दिवस राहावे श्रीमत कूच करून पुण्यास गेले, तो शरीर क्षीणच होते, शेवटील समय लवकर यावे म्हणून पत्रें आली त्याचे अन्नाचें शरीर, समयीं जवळ असावे, याकरिता पुण्यास येऊ लागलों तो पारनेरा आलीकडे वर्तमान ऐकिले का, कैलासवास केला श्रीमत दादासाहेब याचीं पत्रें आलीं कीं, जरूर यावें पुढे पुण्यास आलों श्रीमतास देवदेवेश्वर+सन्निव कैलासवास जाहला हें ऐकून श्रम जहाले नतर दादाही कृपायुक्त ममता केली पुढें श्रीमत राजश्री माधवराव साहेब यास साताऱ्यास पेशवाईचीं वस्त्रे द्यावयाकरिता घेऊन गेलें समागमे मलाच घेऊन गेले राजद्वारीं वस्त्रें घ्यावयास समागमे येणें म्हणून बहुत आग्रह केला विनती केली कीं, आम्हास गरज काय ? आमचे खावद आपण म्हणोन गेलों नाहीं त्यावर श्रीमतीं राजआज्ञा घेऊन [ ते ] पुण्यास यावयास निघाले समागमेंच होतों वाटेंत चालता एक गाडदी शेतातील कुणब्याचे बायकोवर बलात्कारे सर्वा देखता जाऊन पडला तो एका राउतानें भाल्यानें मारिला तेंव्हा कामाची दशा पाहिली नतर श्रीमत निरा उतरोन पलीकडे गेले

---

* नानासाहेबाचे व गोपिकाबाई याचें [१८] त्याच वर्षी नूतन सपत्नी झाल्यामुळें बाईचें मन रुष्ट झालें असावें

१९ थोरले राव-बाजीराव बल्लाळ

२० ही नारोबानाईक बाखरे, पैठणकर, याची कन्या लग्न १७८२ मध्यें मार्गशीर्षांत झालें नाव राधाबाई ठेविलें + देवदेवेश्वर-पर्वतीवराल महादेव

आम्ही उद्या उतरोन जाऊं म्हणोन शिरोळ गावात राहिलों नदीस पूर आला याकरितां नावेंत बसलो मध्य धारेत नाव आला ती प्रवाही पडली नावाड्यानीं सांगितलें कीं, आमचा उपाय नाही तेव्हा पुढे खडक जवळ आला, फुटली, म्हणजे शेवटीलच पक्ष तेव्हा ईश्वर-स्मरण केले तो दोन मनुष्यानीं उड्या टाकून नाव ओढून काढिली हे रक्षण क्षीराब्धि-शयन महाविष्णु याणे केलें पुढे पुण्यास आलो तों श्रीमतानीं कृपा करून या समयीं कार्यांत मन घालावें हे आज्ञा केली ×

---

ले १९३ } [५० ] }　　　　{श १६८३ श्रावण व ६ {ता २१-८-१७६१

श्री

राजश्रिया विराजित राजयान्य राजश्री **विश्वास रावजी** स्वामींचे सेवेसीं पो। **गोपा-राव गणेश** सा। नमस्कार विनती उपरि येथील कुशल ता। छ २० माहे मोहरम मु॥ नजीक बुढा डोंगर जाणून स्वकीय कुशल लिहीत असले पाहिजे विशेष, पूर्वीं आपण पत्र पाठविलें ते पावले तेथे लिहिले कीं, पुढे आपले जाणियाचा विचार कोणिकडे हें लिहावें ऐशास आम्हास श्रीमत राजश्री दादासाहेब यानीं आज्ञा देऊन हे प्राते रवाना केलें त्यावरून येथपर्यंत दरमजल येऊन पोंहोचलो तों साप्रत श्रीमताचीं पत्रें पातशाहा व सुजातद्दौले यास आलीं आहेत आणि आम्हास लिहिलें आहे जे तुम्ही त्याजकडे व पुढें

---

× हे पुण्यश्लोकाचे स्वानुभूत निजहस्ते लिखित प्रकरण चतुर पुरुषानीं संगृहित परम यत्नेंकरून संपादिले त्याची प्रति श्रीमत राजश्री मोरोपत तात्या १००० सहस्रबुद्धे याचे इतिास्तव केली मित्ती आषाढ शुद्ध ५ मित्रवासर शके १७७१ सौम्यनाम संवत्सरे " **शिवकिंकर गोपाळ महादेव भोगले मुकाम पुणें**

" ह्या अस्सल लेख श्रीमत बाळाजी जनार्दन ऊर्फ नाना फडनवीस याचे जाती बद्दल त्यानीं स्वदस्तुरचा लिहिलेला आपले जन्मापासून तों श्रीमत बाळाजी बाजीराव पेशवे कैलासवासी होऊन त्याचे चिरंजीव श्री माधवराव बल्लाळ यास पेशवाईचीं वस्त्रें मिळून त्याना यास कारभार करण्यास सांगितला तों पावेतों लिहिला आहे यात त्यानीं आपला दोषास्पद कृत्येंही लिहिलीं आहेत सबब या लेखास फारच योग्यता आहे असो ह्या लेख अस्सल कोठें असेल तो असो, परंतु नक्कल मोरोपत तात्या सहस्रबुद्धे याचे संग्रहीं होती तिची नक्कल श्री कृपासागर राजश्री गोपाळ महादेव भोगले पुणेकर वास्तव्य टोकें याणीं शके १७७१ साली केलीं ती अस्सल प्रत राजमान्य राजश्री माधवराव सखाराम कुळकर्णी सोलेगावकर याणा प्रत घेण्याकारिता आणिली ती त्याचे बरोबर भागानगरास आली ती संभाळून ठेवणेविषयीं भोगले याचें पत्र सोलेगावकरास आलेवरून प्रत पाहिली वाचिली संग्रहा योग्य दिसल्यावरून संग्रह केला असे मि० आश्विन शुद्ध १ भृगुवासर शके १८०० बहुधान्यनाम संवत्सरे " **वामन बाळकृष्ण दीक्षित** "　　२

कित्येक तेथून मनसबे करावयाचे आहेत याजमुळें दरमजल त्याजकडे जाणार, त्यास आपलेकडील वर्तमान अलीकडे काहींच कळत नाही आपले प्राताचा बदोबस्त कोणे प्रकारे आहे, कोणी लबाडी करीत असिल्यास आम्ही तेच मार्गे येत असो तुम्ही सागाल त्याचें पारपत्य करून पुढे जाऊ प्रस्तुत नवीन वर्तमान ऐकिल्यात आले की, जाटाची फौज भदावर प्रातात येऊन अटेर घेतली आणि भिंडेस लागले आहेत,तेथोन पुढे सरकारच्या प्रातात येऊन सपसर्ग करणार याचा प्रकार काय आहे हे सविस्तर ल्याहावें श्रीमत राजश्री दादासाहेब फौज सुद्धा स्वार होऊन चादवडास आले तेथोन हे प्राते यावयाचा विचार आहे म्हणून पत्रेंच आली असत वरकड सविस्तर अर्थ भेटी अतीं परस्परे कळो येतील आपलेकडील व जाटाचे फौजेचें वगैरे ते प्राताचे वर्तमान सविस्तर ल्याहावे बहुत काय लिहिणे कृपा कीजे हे विनती

---

ले १९४ } { श १६८३ श्रावण व ८
[१०६] } { ता २३-८-१७६१

छ २५ मोहरम ॥ श्री ॥

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री विश्वास रावजी स्वामाचे सेवेशीं-

पो गोपाळराव गणेश सा। नमस्कार विनती उपरि येथील कुशळ ता॥ छ २२ माहे मोहरम मु॥ नजीक पचावल जाणून स्वकीय कुशळ लिहीत असले पाहिजे विशेष-आपण पत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहले जाटाची फौज येऊन भदावर प्रातात गडबड केली आहे पुढें सरकारच्या प्रातात येणार त्यामुळें इकडे कित्येक हरामखोरानी दुडी आरभिली आहे म्हणोन कित्येक विस्तारें लिहिलें ते कळलें ऐशास ये विशीं आपली खातरजमा होऊन स्वस्थता असो द्यावी आम्ही आपले पाशा येऊन पोहोचलो ऐसेच जाणावें येथोन पेशजी आपणाकडे मुजरद जोडी रा। केली आहे तीं पत्रें पावलींच असतील त्यास आम्ही दरमजल येत असों आम्ही आपण एकत्र जाहल्यास ईश्वर इच्छा आहे तरि खावदाचे पुण्य प्रतापें करून सर्व शत्रु हरामखोर असतील त्याचे पारपत्य होईल चिंता नाहीं देशाचे वर्तमान तर श्रीमत राजश्री दादा साहेब फौज सुद्धा स्वार होऊन बऱ्हाणपुरा आल्याचीं पत्रें आम्हास आला आहेत पुढें दरमजल हे प्राते येणार आपणास कळावें बहुत काय लिहिणे कृपा कीजे हे विनती

---

ले १९५ } { श १६८३ मार्गशीर्ष शु॥ १
[३८] } { ता २७ ११ १७६१

॥ श्री ॥

वेदशास्त्र सपन्न राजश्री गोविंद दीक्षित पाटणकर स्वामाचे सेवेशी--

विद्यार्थी माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय

---

* विश्वासराव लक्ष्मण-नारोशकराचा पुतण्या

कुशल लिहीत जावें विशेष तुह्मापासून कर्ज घेतले मुद्दल रुपये ४०००० दिंमत बाबूराव सदाशिव यास राजमरे [ ? ] यास ५००० हुडी पुण्याची बाबूराव दीक्षित पटवर्धन यांजवर एकूण पंचेचाळीस हजार रुपये घेतले यास व्याज दरमहा दर सदे रुपये १। सवोवा बिनसूट प्रो करार केलें असे जाले मुदतींचें व्याज मुद्दल हिशेब करून देऊ मिती मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा शके १६८३ वृषनाम सवत्सरे जाणिजे छ ५, जमादिलावल, सु॥ इसन्ने-सितैन मया व अल्फ बहुत काय लिहिणे हे विनती

---

ले १९६ [१०१] } { श १६८३ माघ व ४ ता १२ २ १७६२

श्री

श्रियासह चिरजीव राजमान्य राजश्री विश्वासराव यासि प्रती नारो शकर आशिर्वाद उपरि येथील कुशल ता छ १७ रज्जब मुक्काम नजीक नासिक यथास्थित असे विशेष तुह्मी छ २ माहे मिनहूचे पत्र पाठविलें व आणखा दोन तीन पत्रे पाठविली ता पावलीं राजश्री सुभेदार[1] देशास आले व रा॥ बाळाजी गोविंद[2] फौजेसुद्धा झाशी प्रातें न राहता शिरोंजेस येऊन सागराकडे गेले येणेंकडून चहूकडचा बदोबस्त नीट राहिला आहे झाशीचे किल्यास मोर्चे लागले आहेत इत्यादिक तिकडील मजकूर विस्तारें लिहिले ते अवगत जाहाले ऐशास आम्ही दरबारचा उलगडा करून श्रीमत स्वामींची आज्ञा घेऊन फौजसुद्धा पुणताब्यानजीक आलों तेथून फौज कासारबारीनें नसरतपुरास पाठविली आम्ही सडे जनस्थानास येऊन श्री त्र्यबकेश्वराची यात्रा करून जनस्थानाहून काल प्रस्थानें डेरा दाखल जालों राजश्री मल्हारराव सुभेदार चादवडा [स] आले आहेत भेटीस यावयाविशीं त्यांचें पत्र आलियास त्याजकडून चालते मजलीनें फौजेस मिळोन रा॥ विठ्ठल शिवदेव व अताजी माणकेश्वर व येशवतराव पवार ही तिन्ही पथकासहवर्तमान मजल दरमजल त्या प्रातास येतीं पुढें पाच सात हजार फौज तुम्हाकडे लाब लाब मजलांनीं पाठविली असे या फौजेबरोबरि रा॥ चिमाजी वामन व माधवराव याजला देऊन पुढें शिरोंजेकडून झाशीकडे रवाना करणें फौजेचे अवाईनेंच वेढा उठोन जाईल अथवा मातबर फौजेचेंच काम असलिया आम्हो तों मजल दर मजल येतच आहों तिकडेस आलियास तिकडील कामें सहजात घडोन येतील तुम्हीं उज्जयनीस राहोन तिकडील बदोबस्त राखावा आम्हीही येऊन पोंह्रचतों तिकडील वर्तमान वरचेवर लिहीत जाणें हे +आशीर्वाद

राजश्री खडोपत व राजश्री चिमणाजीपत स्वामींचे सेवेशीं-नमस्कार विनती उपरि, तुम्हीं हिम्मत धरून चिरजिवास उज्जनीस ठेवून पुढें फौज घेऊन जावें तिकडील रग पाहावा तैसें करावें तों इकडील फौजाचा उपराळा सत्वरच होईल चिंता

---

१ सुभेदार=मल्हारराव होळकर २ बाळाजी गोविंद बुंदेले

+ पत्र नारोशकरानें पुतण्या विश्वासराव लक्ष्मण यास लिहिलेलें आहे

न करणें तिकडील वर्तमान वरचेवर लिहीत जाणें बहुत काय लिहिणें हे विनती पै॥ छ १ साबान मु॥ बेगदा पे॥ उज्जन शुक्रवार सायकाळ

---

ले १९७ } श १६८४ मार्गशीर्ष शु १०
[ १८५ ] } ता २६-११ १७६२

॥ श्री ॥

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ८९ चित्रभानुनामसवत्सरे मार्गशीर्ष शुद्ध १० भृगुवासरे क्षत्रिय-कुलावतस श्रीराजा शिव छत्रपति स्वामी यानीं राजमान्य राजश्री त्रिंबक सदाशिव यासि आज्ञा केली ऐसीजे विजयादशमीचे सुमुहूर्ते स्वामी सिहासनारूढ जहाले, हें सतोष वर्तमान तुम्हास कळावें म्हणून आज्ञापत्र सादर केले असे व राजश्री माधवराव प्रधान व वरकडास आज्ञापत्रें सादर झालीं आहेत तुम्ही राज्यातील एकनिष्ठ सेवक आहा तरि आपणा कडून साविस्तर वर्तमान लेहून विनती पत्र पाठवून स्वामींस सतोष पाववणे तीर्थरूप श्रीमन्महाराज मातुश्री आईसाहेब यांचें आज्ञापत्र सादर आहे त्यावरून कळेल राजश्री महादजी राव [ ? ] मोरे व मल्हार महादेव पे॥ आहेत जाणिजे

---

ले १९८ } श १६८५ वशाख व ६
[ १७८ ] } ता ३-५-१७६३

॥ श्री ॥

चिरजीव राजश्री महिपतराव त्रिंबक यासि माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद उपरि येथिल कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणें विशेष-राजश्री स्वामींस किल्यावर नेऊन ठेवणें आणि तुम्हीं निघोन पुण्यास येणें हे आशिरवाद रवाना छ १९ सवाल हे आशिरवाद (भारतवर्ष शकावली पृ ४६ पहा )

---

ले १९९ } श १६८५ अधिक ज्ये शु ६
[१८१ ] } ता १९-५ १७६३

श्री

चिरजीव राजश्री बज्याबा यासि प्रती माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें विशेष तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें राजश्रींस वर न्यावयाचा मजकूर लिहिला तो कळला त्यास आमचें येणें तिकडे होईल असा निश्चय नाहीं यास्तव पहिलें लिहिलें आहे त्याप्रमाणें सत्वर करणें का कीं प्रस्तुत काळ खालीं राखावयाचा नाहीं यास्तव लिहिल्याप्रमाणें करणें वरकड चाकरी करून दाखवावी म्हणून लिहिलें त्यास तुमच्या स्वरूपास हेंच योग्य आहे कीं आपल्या मातबरी सारखी चाकरी करून दाखवावी, यातच सर्व आहे कोणी म्हणतात कीं चाकरी करतों हेंच मोठें काम आहे, असेहि कित्येक आहेत आपलें स्वरूप काय आणि सरकारची तैनात काय

खातों हें मनातच येऊ नये आणि जी चाकरी करतों हे फार मानून कित्येक आहेत तुमचा उमेद आहे याचप्रमाणे काम तुम्हापासून घ्यावे हेच मनातून येथूनही आहे, समयानसार व प्रसगानसार घडेल तुमचा मातबरी अशी आहे का सर्वापेक्षा चाकरी अधिक करावा यातच स्वरूप आहे बापापासूनहि असेच आहे पत्र फाडून टाकणे दीक्षितासी बोलून निरोप दिल्हा आहे येतील तुम्हीं त्याचें स्वरूप राखात जाणे बाहेर वाकडे न पडे ते करणे, आधिक उणे आढळेल तें निराळे पत्र पाठवीत जाणे पत्र दुसऱ्यास नच कळावे येथून माझ्या आतचे+ जाईल, ते अथवा तुमचे दोन्ही पत्रे नच कळावा, महिनाभर राहणे कन्यागताचे स्नान करून येणे रवाना छ ५ जिल्काद हे आशिर्वाद

---

ले २०० } {श १६८५ अधिक जेष्ठ शु ८
[ १७९ ] } {ता २० ५ १७६३

श्री

चिरंजीव राजमान्य राजश्री महिपतराव त्रिंबक यासि माधवराव बल्लाळ प्रधान आशिर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्ही विनती पत्र पाठविलें तें प्रविष्ट झाले राजश्रींस किल्यावर न्यावे त्यास ते किल्यावर जात नाहीं या अन्वयें राजश्रीचे जाबसाल कित्येक तपशीलवार लिहिले ते सविस्तर कळले ऐशीयास राजश्रीस आरोग्य झालेच आहे तरि हर तजवीज करून किल्यावर घेऊन जाणें तुम्ही आपला मजकूर हुजूर येण्याविषयी लेखन केला त्यास तुम्ही तूर्त न येणे रवाना छ ६ जिल्काद बहुत काय लिहिणें हे आशिर्वाद

---

ले २०१ } {श १६८५ श्रावण व ११
[ ३३] } {ता ३–९—१७६३

श्री

पौ श्रावण वद्य १४ मगळवार सवा प्रहर दिवसास

वेदशास्त्र सपन्न राजश्री बाळकृष्ण दीक्षित स्वामीचे सेवेशी

विद्यार्थी रघुनाथ बाजीराव नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष आपण पत्र पाठविलें तें पावून बहुत सतोष झाला याचप्रकारें निरतरी पत्रीं सविस्तर लिहित जावें यवनाची फौज बुडवितों आपणास कळेलच हल्लीं शहरास जातों असो निजामअल्ली खान बाकी राहिले त्याचे पारपत्य श्रीकृपें करून होईल र॥ छ २४ सफर आपली दया पूर्ण असावी सर्व देव ब्राह्मणाचे आशीर्वादें करूनच उत्तम फळ प्राप्त जहालें बाकी राहिलें तें होईल बहुत काय लिहिणें हे विनती

---

+ माधवरावास ह्र अक्षर येत नसे त्याचें हें उदाहरण

ले २०२ } {श १६८५ फाल्गुन शु १
[ ११६ ] } {ता ३-३-१७६४

श्री

श्रीमत राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवेशीं—

विनती सेवक महादजी शिंदे साष्टाग दडवत विज्ञापना ता॥ छ २९ साबान पावेतों सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष आम्हाबराबर पाच तोफा पाहिजेते स्वारींत कोठें गावगढी लागते त्यास तोफा विना जेर होत नाहा यास्तव स्वामी कृपाळू होऊन नगरास तोफखाना आला आहे यापैका स्वाराच्या तोफा पाच धावयाची आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत सेवेशा श्रुत होय हे विज्ञापना +

---

ले २०३ } {श १६८६ ज्येष्ठ व १४
[ १४१ ] } {ता २८-६-१७६४

श्री

राजश्री त्रिंबकराव मामा स्वामीचे सेवेशीं—

विनति उपरि आपण पत्र पाठविलें तें प्रविष्ट जहाले आम्हीं येथे येऊन पिरेपट्टणास चौफेर मोर्चे बसविले तेव्हां दुसरे दिवशा किल्केरी कौलास येउन कौल मागू लागले त्याजवरून त्यास कौल देऊन बाहेर काढिले, आणि छ २५ जिल्हेजीं किल्यावर सरकारचे निशाण चढलें ठाण्यातील पाच हत्ती व पधरा घोडीं पाडाव आलीं व कोडग [कुर्ग]-वाल्याकडे रा॥ अप्पाजी गोविंद रवाना केले आहेत त्याचाही मजकूर कसा तो एका दो रोजात कळेल म्हणोन लिहिले ते कळले ऐशास आपण जाऊन किल्यास मोर्चे देऊन किल्ला जोरबजोर घेतला, व ठाण्यातील पाच हत्ती व पधरा घोडा पाडाव आली, हे मोठी गोष्ट जहाली या दर्दे करून दुसरीं ठाणीं अवसान धरणार नाहींत राजश्री आप्पाजी राम छ २५ जिल्हेजीं मगळवारा येथें येऊन दाखल जाहाले त्याचे बोलण्याचा अर्थ सविस्तर दुसरे दिवशीं हैदरखानाकडील साडणीस्वार व राजश्री राव सेनापती ऽ याजकडील दोघे स्वार याबराबर लेहून पाठविलें आहे, त्याजवरून सविस्तर कळेल रा॥ तुळाजी पवार व कुडचीकर व बाडे प॥ गी र पा डी र येथे होते त्यास शत्रूचा जोरा तिकडे फार जाहाला याची पाळथ राखोन दगा करावा असे त्याचे चित्तात होतें परतु तुळाजी पवार व कुडचीकर व बाडे मोठे निकडीने शत्रूवर आपला दाब राखून साभाळून आले बाडे तो होसकोटयास राहिले तुळाजी पवार व कुडचीकर लष्करात येऊन दाखल जहाले रात्रदिवस मेहनत फार याजकरिता त्याचे घोड्यात काहीं ताकत राहिली नाहीं रवाना छ २७ माहे जिल्हेज बहुत काय लिहिणें कृपा लोभ असो दिल्हा पाहिजे हे विनती.

---

+ या वेळी माधराव कर्नाटकात असून रघुनाथराव पुण्यास होता त्यास महादजीनें उत्तरेंतून हें पत्र लिहिलेले आहे ( पहा के या पृ १३० व खरे ले ३२५ )

ऽ उमराव घोरपडे

ले २०४ }
[ ११२ ] }

{श १६८६ आषाढ
{ता १५-७—१७६४

श्री

वैा छ २४ मोहरम सनखमस

श्रीमत गुणसागर लोकपालक विश्वभूषण औदार्यवत श्रीक्षीराब्धिशायीवरप्रताप रमासानकुल गोब्राह्मणप्रतिपालक महा राजेश्री दादा साहेबाचे सेवेशीं-आज्ञाधारक देवजी बयाजी किले सेंधवें दिम्मत मल्हारजी होळकर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञाप्ति येथील क्षेम ता। छ १५ मोहरम पर्यंत महाराजाचे कृपेदृष्टी करून आनदरूप जाणोन विशेष साहेबीं आज्ञापत्र पाठविलें तें छ ९ रोजी प्रविष्ट जाहलें शिरीं वदून परम सतोषावाप्ति जाली पत्रीं आज्ञा सादर केली कीं रा। महादजी शिंदे याची सरदारी दूर करून राजश्री मानाजी शिंदे यास सागितली, याजकरिता महादजी शिंदे आज्ञेशिवाय उठोन ते प्रातें गेले असत सेंधवे प्रातात आले म्हणजे आटकाव करून पुढें जाऊं न देणें त्यास साहेबाचें पत्र प्रविष्ट जाले ते दिवशीं घाटाखालीं मौजे सागवी प्रं।। आबे येथें मशारनिल्हेचा मुक्काम होता आज्ञाप्रमाणे किले मजकूराचा घाट पाच सातशें भिल्ल वगैरे जमा करून बद केला त्यास मशारनिलेस बातमी जाली तदनतर किले मजकूराचा घाट सोडून चाचरे पटी घ्रा मार्गे घाट चढून पचवीसा कोसाची मजल करून निघोन गेले साहेबाचे सेवेशीं हे विज्ञापना *

---

ले २०५ }
[१८०] }

{ श १६८६ माघ शु १५
{ ता ५-२-१७६५

॥ श्री ॥

चिरजीव नाना यासि प्रती माधवराव बल्लाळ प्रधान आशिर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें विशेष सरकारचा जामदारखाना पुरधरीं पेशजी होता तो प्रस्तुत कोठें आहे, जिन्नस व दागिने काय काय आहेत, ते सर्व तुम्हास ठाऊक आहेत हल्लीं तो जामदारखाना कोठें आहे तो लिहून पाठविणें जामदारखानियात दागिने व जिन्नस जो असेल त्याची कुल याद लिहून पाठविणें तुमचे समजाविशीचा प्रकार कसा झाला हें लिहिणें तुम्ही याल कधीं हें कळलें नाहीं तरि सत्वर लिहिणें रवाना छ १४ साबान बहुत काय लिहिणें हे आशिर्वाद

---

*मानाजी फांकडे याजवर दादाचें फार प्रेम असून महादजी रक्षापुत्र म्हणून शिंद्यांची सरदारी मानाजीकडे त्यांनीं दिली, परतु महादजीनें आपले अगी पाणी आहे असें दाखविल्या-वरून माधवराव बल्लाळ यांणीं पुढें त्याजकडेच सरदारी कायम केली

ले २०६
[१४३]

श १६८७ वैशाख व १३
ता १७-५-१७६५

श्री

सेवेशीं महादाजी बल्लाळ व हरी बल्लाळ +कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ता। छ २६ जिल्काद मुा। नजीक कपिला संगम कृष्णा उत्तर तीर स्वामीचे कृपावलोकनें करून वर्तमान यथास्थित असे विशेष स्वामींनीं सांडणीस्वाराबरोबर व जासुदा बो। पत्रें पाठविलीं तीं पावलीं सरकारचे कागदपत्र प्रविष्ट केले उत्तरें घेऊन पाठवितो इकडील वर्तमान तर राजश्री मुराराव सावनूरकर यास निरोप जाला छावणीस राजश्री गोपाळराव रहाणार, त्यास निश्चय नाहीं श्रीमंत कृष्णा उतरोन उत्तर तीरास आले फौजेचे नालबदांचे काम चालीस लागलें दोनी स्वाऱ्या मिळोन नालबदीचा ऐवज ठरेल त्यापैकीं निमे तूर्त द्यावा त्याचे भरतीस सात आठ लक्ष पाहिजेत याजकरिता ऐवजाचे तरतुदीविशीं श्रीमंतानीं आपणास पत्र लिहिलें आहे आता इकडे काहा गुंता नाहीं दरमजल येणार आज आठ कोसाचें कूच आहे रामतीर्थावरून, म्हसवडवरून येणार पाऊस पडो लागला एक मुहूर्त ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी, दुसरा वद्य चतुर्दशीपर्यंत इतकियात येऊन पोचणार वरकड नवल काय? विशेष वर्तमान तर बकापुरचा किल्ला खालीं करून घ्यावयास राजश्री राजेबहादर गेले होते छ १९ जिलकादीं किल्ला हस्तगत जाला आत काहा जकीरा दारूगोळी तोफ नाहीं दाणा मात्र होता तो विक्त घेतला किल्ल्यात शंकराजी राम ठेविले आहेत याउपरी गोपाळराव यास देतील अथवा सरकारातून बदोबस्त करितील दोनी प्रकार घाटतात कळलें पाहिजे स्वामाचे चरण दृष्टीस पडत तो सुदिन असे बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विज्ञापना

---

ले २०७
[१०५]

श १६८७ माघ व ८
ता ३-२-१७६६

॥ श्री ॥

सेवेशीं विज्ञापना ता। छ २२ साबान पर्यंत वडिलाचे आशिर्वादें करून यथास्थित असे विशेष –वडिलीं आशिर्वाद पत्र पाठविलें तें प्रविष्ट जहालें नबाब निजाम अल्लीखान याची तुमची भेट जाहलीच असेल बोलणें चालणें काय जहालें, तुम्ही कोणीकडे जाणार, काय मनसुबा केला, नबाब कोणीकडे जाणार, तुम्ही व नबाब वराडातून जाल तों आमचे दोन चार मुक्काम आशेरी बरानपुरासमीप होतील नबाब कोणीकडे जाणार तें लिहिणें, म्हणोन आज्ञा ऐशास वडिलीं आज्ञा केली ते उचित वडील दीर्घ दर्शीवें चारी मनसुबियाचे प्रकार ध्यानात आणून कर्तव्य तें करितात त्यास नबाबाची आमची भेट कुरुमखेडानजीक छ २१ साबानीं जाहाली बोलणें चालणें एक दोन रोजात होईल नबाबाचा आग्रह आपले डेरियास आम्हीं यावें त्यानीं आमच्या डेरियास यावें असा आमचा आग्रह आहे तोंही प्रकार दोन

---

+ फडके बघू

तीन रोजात उरकून नबाब आम्ही घाट चढोन जातो लष्करात ताकीत निक्षून करणे ते केली आहे लूट फाट काहा होत नाहा हा मुलुक नबाबाचा व भोसल्याचा नबाबानीं कित्येक महालच्या कबुलातीचे कतबे सरकारात होते ते मागून घेतले भरवस्ती गावास इकडील ताकीददार व नबाबाचे ठाणेदार बैसले आहेत कोठें उपद्रव नाहा, व आमचा व नबाबाचा मुक्काम [ असे ] ओसाड रानातच पडले खुलासा उद्याचे परवाचे दिवसात कामकाज उरकून घाट चढून जाऊ वडीलही योजिल्या मनसुबियास कूच करून जातील व घाट चढून वरते गेलियावर कोणीकडे जावयाचा ठहराव होईल तो सेवेशीं लिहून पाठवू * सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना

---

ले २०८ }
[ १०८ ]

{ श १७६५ माघ व १४
{ ता ८-२ १७६६

॥ श्री ॥

तीर्थरूप राजश्री दादासाहेब स्वामींचे सेवेशीं-अपत्ये माधवराव साष्टांग नमस्कार विनती येथील कुशळ ता॥ छ २७ साबान मुक्काम कुरुमखेड पयत वडिलाचे आशिर्वादे करून यथास्थित असे विशेष -कराडे यास सोडावयाचा करार राजश्री जानोजी भोसले सेनासाहेब सुभा याजकडून जाला असता अद्याप त्याचा सुटका जाली नाहीं तरी वडिलीं मारनिल्हेचें कारभारी यास आज्ञा करून कराडियाची सुटका होय ते केले पाहिजे सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना

---

ले २०९ }
[ ११४ ]

{ श १६८७ फाल्गुन व १३
{ ता ९-३-१७६६

॥ श्री ॥

राजश्री माधवराव रामचद्र गोसावी-

सु॥ सीत सीतेन मया [ व ] अलफ तुम्हीं विनती पत्र छ २७ रमजानचें पाठविले छ म॥रीं अस्तमाना पावले र॥ बाबूराव सदाशिव+ न पुसत गेले त्याचे मागे राजश्री रामचद्र गणेश फौज घेऊन गेले धारूरच्या वाटेनें नाईक गेले त्या मागें रामचद्रपत पाठलाग करीत गेले नाइकाचे पागेचीं घोडीं व जामदारखाना वगैरेची मोजदाद करून गोठात आणून ठेविले, म्हणोन लिहिले तें कळलें ऐशास बाबूजी नाईक याचा घोडी पागा हत्ती दोन, जामदारखाना वगैरे मोजदाद केले ते आणावयास हुजूरून राऊत पाठविले असते, याजबराबर पाठऊन देण उदईक कूच करून जावें तर तोफखाना व जामदारखाना व दारकोजी निंबाळकर व सठवोजी गावडे वगैरे लोक अद्यापि आले नाहींत त्यास ताकीद करून पाठवावे म्हणोन तर तोफखाना, जामदारखाना व दारकोजी निंबाळकर व सठवोजी गावडे

---

* हें पत्र थोरले माधवरावाच रघुनाथरावास असावें

+ हे बारामतीकर नाईक,-याचें व पेशव्याचें नातें असून या प्रसगा वाकडें होतें

वगैरेस ताकीद केली असे येऊन पावतील तुम्हीं उद्याचा दिवस मुक्काम करणें तुम्हाजवळ पथकें कोण कोण आला व कोण न आलीं तें सविस्तर लेहून पाठविणें जे राहिले असतील ते ताकीद करून पाठविले जातील नाइकाकडील सिलेदाराची सोय काय करावी तें ल्याहावें म्हणोन तर मा।रनिलेकडील शिलेदार हुजूर पाठऊन देणें

साडणीस्वार २ दोन येथें नेहमीं पाठवावे म्हणून तर दोन साडणी स्वार पाठविले असत

नाना जोशी याचे घरीं बाबूरायाची वस्तभाव आली आहे, त्यावरून त्याचे घरीं गाडदी याची चौकी बसविली असे आज्ञा होईल त्याप्रमाणे वर्तणूक करून कारकून हुजुरून पाठविला असे, तहकीक करतील जे त्याजकडे वस्तभाव असेल ते हुजूर घेऊन येतील

रामचद्र गणेश याजबराबर लोक गेले ते सडे गेले यास्तव त्याचे मागें जावयाची आज्ञा जालियास जाऊ, म्हणोन तर त्याजबराबर काहीं गेले नाहीं याजकरिता तुम्हीं हळू हळु जाणें जाणिजे छ २७ रमजान लेखनसीमा ×

---

ले २१० } {श १६८८ चैत्र शु १५
[ १२३ ] } {ता २४—४—१७६६

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रामचद्रपत तात्या स्वामींचे सेवेशीं—

पोष्य बाळाजी कृष्ण व हरी बल्लाळ कृतानेक साष्टाग नमस्कार विनती उपरि येथील कुशल ता। छ १४ जिलकाद मु। पुणताबें जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष—फार दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहा लिहून पाठवावें आपली लढाई फत्ते जाली म्हणोन ऐकिले सविस्तर ल्याहावे श्रीमत राजश्री राऊसाहेब टोक्याचे[१] मुक्कामास आले तेथून सडे होऊन पुढे गगापुरास गेले आम्हा उभयतास मागें ठेविलें बुनगे साभाळून घेऊन येणें म्हणोन आज्ञा केली, त्यावरून एक मुक्काम केला छ १२ रोजीं राजश्री भवानराव चट्ट राऊता।निशीं लष्करात आले आम्हास वर्तमान कळताच गेलों भेट जाली त्याचें मानस श्रीमताकडे जावयाचें असेच ओता [ ? ] म्हणोन बोलिले आम्ही सागितलें कीं, “ तुम्ही येथें आला आम्हास वर्तमान कळले आता तुम्हास एकटें जाऊ देणार नाहीं पालखींत बसवून आम्ही जातों [ तेव्हा ] तुम्हास समागमेच नेऊ ” त्यावरून आढे वेढे घेतले शेवटीं पालखींत घालून घेऊन जात असो काही खात नाहा श्रीमताचे दर्शन जाल्या खेरीज अन्न उदक देखाल घेत नाहीं आम्ही चौकी पहाऱ्याचा बदोबस्त केला असे भवानराव आता निखालसतेच्या गोष्टी फार सागतात कीं, “ श्रीमताजवळ

---

× खरे लेखाक ५८५ पहा १ थोरले माधवराव २ हे प्रतिनिधी

आईन, जे करतील ते करूत " साराश गोष्ट, भगवते आपल्यास यश दिल्हें भवानराव अनायासे करून सापडले, मोठी गोष्ट जाली तिकडील वर्तमान लिहीत जावें. साप्रत आपला मुक्काम कोठे आहे ? पुढे कोणीकडे जावयाचा विचार आहे, तें सविस्तर ल्याहावें युद्धाचें वृत्त तपशिलें लिहावें बहुत काय लिहिणें कृपा लोभ कीजे हे विनती—

राजश्री बगाजीपत स्वामींस सा॥ नमस्कार तिकडील वृत्त तपशिलें लिहून पाठवणें हे विनती

ले २११ }
[ १४२ }

{श १६८८ वैशाख व १२
{ता ४-६ १७६६

श्री

पैा छ १७ मोहरम ज्येष्ठ सन सबा मुा ग्वालेर

तीर्थरूप राजश्री दादासाहेब वडिलाचे सेवेशी—

अपत्यें माधवराव साष्टाग नमस्कार बिनती येथील कुशळ ताा छ २५ जिल्हेज पर्यंत वाडिलाचे आशीर्वादे करून यथास्थित असें विशेष —शहर बरानपूर येथील अमलात मामलेदाराना कमपेश केली याचा अर्थ अवगत जाला, तें वृत्त वाडिलाचे सेवेशीं विनती केली स्वामीनीं आज्ञा केली कीं, शहरास कमावीसदार पाठवून तहकिकात करावी म्हणोन रा। त्रिंबक नारायण यास कमावीस सागितली सरसुभेदारी राजश्री नारो कृष्ण याजकडे आहे तैशी त्याजकडे करार ठेविली, ऐसें असता नारो, कृष्ण यास पत्र सादर केलें कीं, त्रिंबक नारायण याजकडे अम्मल सुरळीत देणें तें त्यानीं न मानता जाबसाल केले त्याजवरि खिजमतगाराबराबर पत्र सादर केलें त्याशींही मनस्वी भाषण केलें तदोत्तरही पत्रें माणसें पाठविलीं त्यास शहरात घेतलें नाहीं बेबदल गोष्टी अमर्यादेच्या सागितल्या माणसें फिरोन आलीं रा। गोपाळराव गणेश यानीं बदामामलीची गोष्ट सागितली, त्याचप्रमाणें नारो कृष्णासही उमेद जाली एवच हाच मार्ग पडतो यात खावदाचा बोज काय ? यास्तव अशा गोष्टींस पारपत्य असावेंच काम थोडें दरगुदर* करावी तर शहर बेबदल जहालें हें लौकिकात तेव्हा खावदगिरीस उचीत तें झालेंच पाहिजे हें सविस्तर वर्तमान वडिलास कळावें यास्तव लिहिलें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

२१२ }
[६५] }

{ श १६८८ जेष्ठ शु ६
{ ता १३-६-१७१६

॥ श्री ॥

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळाजी गोविंद स्वामी गोसावी यासि—

* उपेक्षा

पौ। रघुनाथ बाजीराव नमस्कार विनती उपरा येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जाणें विशेष-राजश्री पुरुषोत्तम महादेव हिंगणे यास जातीस सरजाम रुपये १५००० पधरा हजार याव याचा करार करून हे सनद तुम्हास सादर केली असे तरि सदर्हू पधरा हजार रुपयाचें तबख्याचे गाव पा। कोंच पौ। अव्वलसाल सन समान सितेना पासून नेमून देणें आणि आकार होईल तो साल दरसाल बा। मु॥ खर्च लिहीत जाणें जाणिजे छ ५ मोहरम सु॥ सबासीतेन मया व अलफ बहुत काय लिहिणें हे विनती

---

ले २१३
[ १४० ]

श १६८८ ज्येष्ठ व ३
ता २५-६-१७६६

॥ श्री ॥

पौ॥ छ ३ रबिलोबल सब्बा श्रावण गोहदचा मुक्काम

तीर्थरूप राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवेशीं अपत्यें माधवराव साष्टांग नमस्कार विनती येथील कुशळ ता। छ १७ मोहरम पर्यंत वडिलाचे आशीर्वादें करून यथास्थित असे विशेष वाडिलाचे पत्र आलें त्यात आज्ञा कीं, बराणपूरची मामलत रा॥ नारो कृष्ण याजकडेच करार राखणें इजारियानीं दुसरियास न देणें दुसऱ्यास दिल्याबा शहर खराब करतील नारो कृष्ण बरा आहे, याचें चालवणें, म्हणोन आज्ञा त्यास नारो कृष्णाचें वर्तमान राजश्री चिंतो विठ्ठल व आबाजी महादेव यास ठावकें आहें नारो कृष्णाची मामलत दूर न करिता त्याचाच कारकून त्रिंबक नारायण यास कमावीस सागितली, सरसुभेदारी त्याची त्याजकडेसच करार राखिली त्यास हुजूर यावयाविशा पत्र पाठविले असता न आले मनस्वी भाषण केलें जासूद उठोन आले तदोत्तर खिजमतगार पाठविले पत्र सादर केलें त्याजशीं मन माने तें बोलले खिजमतगारानीं पाघरुणें जाळलीं, तथापि हुजूर न आले त्यावर गाडदी दहा पाच पाठविले येणें म्हणोन लिहिलें असता त्यास शहरात न घेतलें बदलोन गोष्ट सागितली यास्तव रा॥ मलबा पानसी याजबराबर स्वार हशम देऊन आणावयास पाठविले कैद वडिलाची अमर्यादा नसावी सेवकलोकीं मर्यादेनें वर्तावें हे शिक्षा पण आज्ञा वडिलाचीच आहे, व प्रस्तुत काळीं राजश्री गोपाळराव गणेश याणीं बदलोन गोष्ट सागितली तोच अन्वय नारो कृष्ण याणीं चित्तात आणोन बेबदल गोष्ट सागितली आणि आढीनें आट सदर्हूप्रमाणें पडत पडत आली. येरवीं नारो कृष्ण याजवर आणिक सारखा प्रकार व्हावा ऐसा अर्थ नाहीं जालें वर्तमान दोन तीन पत्रीं सेवेशीं लिहून पाठविलेंच आहे,, व हल्लींही जाला प्रकार विनती पत्रीं लिहिला असे सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले २१४ }
१७७ }

{श १६८८ कार्तिक व ६
{ता २२-११-१७६६

श्री

चिरंजीव राजश्री नाना यासि माधवराव बल्लाळ प्रधान आशिर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणें विशेष तुम्हास जाऊन बहुत दिवस जाहले खासा स्वारी कार्तीक बहुळ पचमीस डेरे दाखल जाहले आजि कुच होऊन येवतावर मुक्काम होईल फौज जमा होत चालली, परतु मुकाम होत नाहा दरमजल कृष्णातीरास जातों तुम्ही मुक्काम होतील, सावकाश जाऊ, म्हणोन चित्तात आणाल, तर न आणिता सत्वरें येऊन स्वारीचे मुहूर्ते करून लष्करात येऊन पोहचणे विलब न लावणें चाकरीचे[2] दिवसात नेहमीं याजे समक्षीन राहणें पत्र पावताच सत्वर येणे रवाना चद्र १९ जमादिलाखर बहुत काय लिहिणे हे आशीर्वाद

---

ले २१५ }
[११७ }

{श १६८८ पौष व ७
{ता २२ १- १७६७

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यासि– पौ। माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जाणें विशेष बदल देणें तसलमात दादो उद्धव वरघाटचे किल्याचे बेगमीस ऐवज सालमजकुरीं द्यावयाचा त्यापैकीं तूर्त—

३५००० माघ शुद्ध पौर्णिमा रुपये
३५००० फाल्गुन शुद्ध पौर्णिमा रुपये
३०००० चैत्र शुद्ध पौर्णिमा शके १६८९ चित्रभानु सवत्सर
१०००००

एकूण एक लक्ष रुपये सदर्हू मुदतीप्रमाणें देविले असत मारानिलेकडील कारकून पुण्यास येईल त्यास ऐवज पावता करणें पुण्याचे एकदर ऐवजात लाख रुपयाची नेमणूक करून दिल्ही आहे त्यास तुम्हा ऐवजाची नेमणूक करते समया तेथून मुदती लिहिल्या आहेत याप्रमाणें ऐवज नेमिला असला तर उत्तमच जाहलें या मुदतीहून जाजती मुदत असली तर त्या ऐवजीं सावकारापासून कर्ज घेऊन यास मुदतीचा मुदतीस पावता करणें मुबदला ऐवज राहील तो सावकारास रदकर्जास देणें साराश गोष्ट, याचें देणें फार निघालें, पैकीं तूर्त सदर्हू लाख रुपये देविले यास हिसका पडल्यानें मग याची स्थित रहाणार नाहीं याजकरिता तुम्हास लि॥ असे तरी मुदतीप्रमाणें ऐवज क्षेपनिक्षेप पावता करणें र॥ छ २१ साबान सु॥ सबासितेन मया व अलफ, बहुत काय लिहिणे हे विनती पौ। छ ६ सव्वाल

---

२ येथपासून खुद्दाचें अक्षर यावरून माधवरावाची तडफ व शिपायगिरी व्यक्त होते

ले २१६
[१८३]

श १६८८ फाल्गुन शु १२
ता १२-३ १७६७

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बजाबा स्वामी गोसावी यासि पोष्य नारायण राव बल्लाळ नमस्कार विनती उपरि येथील जाणून स्वकीय कुशल लिहिणें, विशेष-तुम्ही पत्र पाठविलें ते पावले तीर्थरूपानी चव्ह्या घोड्यानिशा शिरें घेतल्याचे सविस्तर वर्तमान व तीर्थरूपाची शरीरप्रकृत सदोदित लिहीत जाणे आम्ही लष्करातून निघालों ते फाल्गुन शुद्ध दशमीस गंगापुरी पावला रवाना छ ११ माहे सवाल सुरु सन सबा सितैन मया [व] अलफ बहुत काय लिहिणे हे विनती

---

ले २१७
[८७]

श १६९०
सन १७६८ पूर्वीचे

श्री

तीर्थरूप राजश्री दादासाहेब वडिलाचे सेवेशा—

अपत्य माधवराव साष्टाग नमस्कार विनती येथील कुशल ता॥ छ १३ सफर पावेतों वडिलाचे आशिर्वादें यथास्थित असें विशेष वडिला आशीर्वादपत्रे त्रिंबकजी मुढा खिजमतगार याजबरोबर पाठविला तीं पावोन त्याचा उत्तरे विस्तारे लिहून हरजी चव्हाण खिजमतगार याजबरोबर पाठविली आहेत येऊन पावतील, त्याजवरून सविस्तर सेवेशीं निवेदन होईल सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले २१८
[१८२]

श १६८९ ज्येष्ठ व ४
ता १५-३-१७६८

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री त्रिंबक सदाशीव स्वामी गोसावा यासि पोष्य नारायणराव बल्लाळ नमस्कार विनति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशळ लिहिणे विशेष तुम्हाकडून पत्र येऊन शरीरप्रकृतीचें वर्तमान कळत नाहीं तर तुमची शरीरप्रकृति कशी आहे ते सविस्तर लिहून पाठविणे तार्थरुपाकडाल वर्तमान तर जुज होऊन दादासाहेबाची फौज लुटली दादासाहेब किल्यावर गेले एक दिवस मध्यें जाऊन दुसरे दिवशीं भेटीं झाल्या दादासाहेबाना तार्थरूप रावसाहेबाचे स्वाधीन किल्ले, कोट, मुलूख वगैरे सर्व कारभार केला हें सविस्तर वर्तमान राजश्री बजाबाना लिहिलेच असेल रवानां छ ३० मोहरम गुरुवार सध्याकाळ बाकी दिवस प्रहर बहुत काय लिहिणे हे विनता

ले २१९ }
[१७६ ] }

{श १६९१
{फेब्रुवारी १७६९

॥ श्रीगणेशायनम ॥ श्री श्री श्री श्रा श्री ॥

महाराजाधिराज श्रीराजराजेश्वर गुणगुणालकृत परमपवित्र श्री राजेसाहेब पडित प्रधान श्रीमत माधोराव साहेबजी जोग्य लिखित–मुरली जोतश रायके अनेक आशीर्वाद वॉचणे महाराजके गृह विचार करकै माघमास विषे पत्र भेजाथा सो महाराजने देषा होगा जानोजी घोसले× को ऐसे लिया जैसे सिंव्हके आगे मृग मैने विचार लिषाथा महाराज पर मालूम है या नाहीं हमारा लिषा जो कागद है उस्से अमानत् राषिएगा देष लेना जद् लटाई फते करा करोगे तद् देष लेना अब् और विचाराश लिया है बडि बडी मुहीम और लढाईयॉ फते करोगे जे तुमसे रजू नही ते हाथ बाधके मिलेंगे दुशमन भाग जावें, मारे जावे, पक्डे जावे जो मनसुबा बिगड गया हो सो श्रीमतके हातसो सोरै पातशाह वजीर चववशी सों दोस्ती होवे जश तमाम शहरोमें होवे जो दुष्ट हैं सो दब् जावें राजतेजकी वृद्धी होवे जन्म पत्रकी नक्ल उतारकै भेज देवो मुझे अपने इष्टकी शपथ है किसी को दिषावनेका नही मै तुम्है आसीर्वाद देता हों छोटे* नानाने तुमारी कृपा हमपर कराई अब ह उमेदवार है हमपर मेहेरबानी करनी हमारे नामपर जो षिजमत फरमावो तिसकी सनद कर भेजों पातशाहका और उमरावोका जबाब सवाल इस ब्राह्मण कों फरमाया मैं निहाल भया मेरी फरदपर दसषत स्व हस्ताक्षरोंसे कर भेजों जो षातरजमा सौं षबर सार जबाब सवाल भेजा करो पै॥ छ १५ सदरसला

---

ले २२० }
[ ११३ }

{श १६९० फाल्गुन व १४
{ता ५–४–१७६९

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रामचद्रपत स्वामीचे सेवेशी—

पो बाळाजी ‡गोविंद कृतानेक साष्टाग नमस्कार विनती उपरि येथील कुशल ता॥ छ २७ जिल्काद मु॥ सागर जाणून स्वकीय कुशल लिहीत असले पाहिजे विशेष आपण पत्र पाठविलें तें पावले संक्रमणाची तिलशर्करा पाठविली ती पावली कितेक श्रीमताचें व भोंसल्याचे बिघाडाचें वर्तमान लिहिलें तें सविस्तर कळलें या प्रातींचे वर्तमानाविशीं लिहिलें त्यास दोन तीन पत्रीं पेशजी आपणास लिहिले आहे त्यावरून कळलेंच असेल साप्रत वर्तमान तरि अबदाली लाहुरापलीकडे दोन मजलीवर आला आहे त्याची इतराजी नजीबखान रोहिल्यावर आहे त्याजमुळें नजीबखानानीं आपले जाग्याचा बदोबस्त करून रतनसिंग जाटाशी सूत्र करून आणशपथ होऊन करार मदार जाला आहे पुढें उभयतानीं

---

× घोसले— भोसले या पत्रात सर्वत्र " ख " बद्दल " ष " वापरला आहे

* छोटे नाना—नाना पुरदरे

‡ बाळाजी गोविंद हे गोविंदपत बुदेल याचे चिरजीव

फौज सुद्धा जाऊन शाहास मैदानात गाठोन जुज घ्यावें याप्रमाणे मनसबा करीत आहेत मग पहावें सुजाद्दौला आपले जाग्यात आहेत अली गौर बादशा व फिरगी प्रयागास आहेत पुढे काय मनसबा करतील पहावे वरकड प्राताचे वर्तमान तरि चिरजीव राजश्री गगाधरपत बाबा कोचकनार प्राती आहेत तिकडे गडबिद जमीदार याणा सरकारी जागा दाबिली आहे, त्याचे पारपत्य करीत आहेत फौजा हा कालवर न आल्या याजमुळे राजे रजवाडे वगैरे *** याची नजर ठिकाणा राहिली नाहीं विना मातबर फौज आल्या खेरीज बदोबस्त यथास्थित होत नाहीं इकडे धामोणी प्राते तेजगडवाले लोधी [ ? ] वगैरे याणीं सरकारी जागा दाबिली त्याचेंही पारपत्य फौजा आल्या शिवाय होत नाहीं असे आहे जर आपलें येणें लौकर होईल तरि सहजाखालीं बदोबस्त होऊन येतो सविस्तर आपणास कळावें तिकडील वर्तमान सर्वदा पत्री लिहीत असले पाहिजे राजश्री जानोजी बावा भोसले याजकडून आनदरूप वकील बादशाकडे प्रयागीं आला आहे त्याचा उत्तरें गेलीं मग काय मजकुरावर आला आहे हें कळत नाहीं आपणास कळावें बहुत काय लिहिणें लोभ असो दिजे हे विनती

---

ले २२१ } पौ छ ५ रा॥खर श्रावण {श १६९१ आषाढ शु ११
[ ९४ ] {ता॥ १४-७-१७६९

श्री

पु॥ राजश्री त्रिबकराव विश्वनाथ† स्वामी गोसावी यासि—

विनती उपरि राजश्री हिंदुराव सेनापति[२] थोर मनुष्य, बोलण्यात, मर्यादेंत, तिलमात्र अतर दाखवीत नाहींत आम्ही त्याचे बहुमानास त्याचे विचारें मातबर प्रकार करणें प्राप्त झाल्यास त्याचे मसलतीखेरीज करणार नाहीं तेही आमच्या डेरियास आले होते कोणे रोखें जावें, कसें करावें, इत्यादि त्याच्या विचारें करीत असों तेही राहिल्या सारखें होईल तित [के] करून दाखववावे याच प्रकारें चित्तापासून बोलतात फौजेचा प्रकार पहाता स्वामींनीं नेमणूक केली त्यापैकीं हजार बारासें तर आलेच नाहीं आली फौज तिची गणती घेतल्यास चौथाई तर कमी होईलच तेव्हा फौजही कमी मातबर भरण्यात समजत नाहीं निवडक प्रकार तेव्हाच उघडा दिसतो सरदार छावणीस राहिले त्यासही छावणीचें सकट त्यापक्षीं जितके फौजेस ठेवावें तितका खर्च भारी यामुळ भागले थकले, सबर निबर कोणाचे देण्या घेण्यामुळे बनते न बनतें, यामुळें येकुण माणूस कमी होतें तेव्हा भरणार कमी गाडदी तरि चहूकडे गुतले महमद इसफ तरि जरूरीस सिन्यास पाठविले आणखी लोक भरणा स्वामीकडून आल्यास त्यास बोलवून घेऊ येकाद्या असाम्या, घोडे चागले माणोस आढळाचे थोडे थोडे ज्यास आढळतें तो घेऊन येतो तूर्त त्याच्या स्वरूपाप्रमाणें रोजमरा करार करून पुढें सर्वांप्रमाणे नालबदी वगैरे पावेल ऐसें लेहून ठेऊन चाळीस पन्नास तरि ठेविले शें दोनशें पर्यंत उपयोगी आढळल्यासारिखे वरचेवरि पाहून ठेऊ चार पथकें

---

† हे त्रिंबकराव मामा  २ हे घोरपडे मुरारराव गुतीकर हें पत्र माधवराव पेशव्याचें आहे

निवडून ऐखादे कामास हुजुराचा पाठवान म्हटल्यास नेमणुके प्रमाण हजाराचे पाचशे जाताना जातात या प्रकारे अवस्था दाणा चाऱ्यामुळे जाली आहे राजश्री गोपाळराव गोविंद आमच्या डेरियास येत असतात राजश्री आनंदराव रास्ते बोलाविल्यास येत असतात, म्हणोन लिहिलें तें कळल ऐशास विचार आचार कर्तव्याकर्तव्य राजश्री मुरारराव घारपडे याचे विचारे करिता बहुत उत्तम आहे ते मागतलि ते नेकसल्हाच सागतील फौजेच्या कमतीचा व भरण्याचा अर्थ लिहिला तर तो खराच छावणीचा प्रकार यास्तव कमती असेल येकाडे माणोस घोडें पाहून चाळीस पन्नास ठेविले ते ठेविले आणखी येतील तसे पाहून शे दोनशे ठेऊ म्हणोन [लिहिलें] तर चाळीस पन्नास ठेविले या उपरि नवे लोक येकाडे ऐकंदर न ठवण वर गोपाळराव व आनंदराव बोलाविल्यास येत असतात म्हणोन तर विचारआचारास उभयतास बोलावितात, व तेही येतील गुता नाही विचार करण्यास सवाऱ्या विचारे केल्यास गुता काय ? जाणिजे छ १० रविलोवल बहुत काये लिहिणें हे विनता

---

ले २२२ ) [२९ ] }

{श १६९१ मार्गशीर्ष शु ९ {ता ४-१२ १७६९

श्री

श्रीमत वेदशास्त्र राजश्री बाबा दीक्षित स्वामीचे सेवेशीं—

आज्ञाधारक खडोजी अरगडे दंडवत विनंती विज्ञापना ऐशीजे येथील कुशळ तागाईत छ ५ माहे शाबान मुक्काम बुंदी कोट जाणोन लेखनाज्ञा केली पाहिजे याजवर इकडील वर्तमान तर खिचीचे निम्मे मुलूख घेऊन व बुंदी कोटियाचे* अद्याप चुकले नाहीं एका दोन रोजात चुकणार दहा बारा लक्ष पर्यंत चुकणार आहे बुंदीवर मुक्काम आहे पुढें जाटाचे मुलूखात जाणें आहे जाट हि स ल पुरावर याजवर गोपाळराव बर्वे आहेत पुढे बिनीस याचचि फौज आहे पुढे जयनगराचे सुमारें आमची फौज जाणार आहे जयनागर [ व ] हे एकत्र होऊन जाणार आहे जाटाचें पारिपत्य करू ऐसें म्हणतात रा तुकोजी होळकर हे समागमेच आहेत याची त्याची भेटी कु र ई वर झाली शिंदे तो उदेपुरास होते इकडे येणार आहेत आठा पधरा दिवसा एक होतील प्रागकर अली गोवर पथाऱ्याचा [ ? ] पत्रें आला आहेत ते व उमरावगीर गोसावा याचीं पत्रे आलीं आहेत कीं, " तुम्हीं आम्हा मिळून जाटाचे पारपत्य करून घेऊ " त्यास माधो सिंगाचा पुत्र म्हणतो का, " तुम्ही जाटाचे पारपत्य करावे तुम्हास पन्नास लक्ष रुपये देऊ तुम्ही व शिंदे होळकर मिळून वाटून घेणें " उदेपुराची मामलत चुकली आहे पुढे जाटाचे तोंडावर राजश्री शिवाजी विठ्ठल व गगाधर गोविंद आहेत बाळाजी गोविंद याची मामलत चुकला राजश्री विश्वासराव आशीकर पुण्यास आले आहेत त्याची मा ब क [ ? ] फसली आहे रा० गोविंद शामराव गोरे निकट आहेत कळले पाहिजे या

---

* बिमनपुरावर ?

प्रांतीचे वर्तमान तर स्वामीस विदितच असेल चंबेल उतरून पार झालों आहों आठा पधरा रोजात जाटाची गाठ पडेल जयनगरास जात आहों इकडे मागाहून शिंदे येणार आहेत एकत्र होऊन जाटावर जाणार स्वामींस कळले पाहिजे आमची मुले याणसे स्वामींच्या आज्ञेत नेल्या आहेत बहुत काय लिहिणे हे विज्ञापना

---

ले २२३ } {श १६९१ मार्गशीर्ष शु ८
[ ३० } {ता। ६ १२-१७६९

श्री

श्रीमत वेदशास्त्र संपन्न बाबा दीक्षित मोजे कायगाव प्रांत गाडापूर स्वामींचे सेवेशीं—

अपत्य समान चरणरज आज्ञाधारक खंडोजी अरगडे मुक्काम चामिली प्रांत बुंदी कोट जाणोन स्वामींचे आशिर्वादें करून छ ७ माहे शाबान ऊर्फ माहे मार्गश्वर पर्यंत शरीरकडून सुखरूप असों विशेष येथील वर्तमान तर हिंदुस्थानची फौज येथें स्थित आहे खेचिवाडा यात छावणी करून दोन महिने राघोडा वगैरे किल्ले खेचीचे अर्धे घेऊन राजा आपले दस्तात आणिला त्याजपासून काहीं खंडणी गुदस्तापैकीं घ्यावी, त्यास राजा [ करून ] रा तुकोजी होळकर याचे विद्यमाने काही थोडी खंडणी चुक्ली त्यात हल्ला घोडे व हत्ती दोन असे भरणा करून दिला बाकी नक्त द्यावे त्यास समागमेच तुकोजी बरोबरच आहे पुढें झाडून खंडणी आल्यियासि तो आपले मुलखास जाईल बाकी अरूण किल्ला मोतीबार दिला त्याजखालें दो लक्षाचीं जमाबदी आहे, आणि काहा तुकोजीकडे किल्ले ठाणें दोन तीन बसले आहेत वर्षासण खंडणीपैकीं मुलख दिला आहे कळावे दुसरें, भुपाळची खंडणी घेतली पुढे बुंदीकोट येथीलही माम लियत रा तुकोजी होळकर याचे विद्यमानें चुकली आहे शिंदाही आठ पधरा दिवसात येऊन पोंचतो उदेपूरची त्याणें खंडणी साठ लक्ष रुपये घेऊन छावणी केली होती त्यास श्रीमतास दहा वीस लक्ष रुपये हुंडी करून परभारें पाठविली आपणही लोकास नालबंदी देऊन आम्हाकडेस येणार आहे पुढे जाटाचे मुलखात तीन फौजा शिंदे व होळकर व पेशव्याची फौज पाऊण लाख स्वार मिळोन जाटावर मोहीम करून, त्याजला जेर करून पैसा मिळवावा ऐसे आहे आणिक अली गोवर दिल्लीकडील याचे पत्र आलें कीं, " जाटाचें पारिपत्य करून रुपये पन्नास लक्षपर्यंत मिळवून देईन, " असें आहे पुढें पहावें जाट हातीं आल्यियासि फार उत्तम आहे रा गोपाळराव बर्वे याजकडे सबनीशी आहे त्याजला दो चौ लक्षाची जहागीर देऊन फौजा नेमल्या आहेत दहा वीस हजार फौज व पायदळ दहा वीस हजार ऐसें आमचे तोंडावर जाटानें पाठविलें आहे सुरजमल जाट तो मेला परंतु त्याचे कारभारी व मूल आहे दोघे भाऊ एकच होऊन जबर लढाईस उभे राहिले आहेत काहा वकील देखील येत नाहीं माहे शिमग्यात फार लढाईचा प्रसंग पडणार आहे पहावें ईश्वर कोणास यश

अवेश देणार हे न कळे जयनगरवाला आम्हास मदत दहा हजार फौजेनिशीं येणार आहे विठ्ठल शिवदेव त्याचा लेक बापु दहा पाच हजारानिशा आहे तिकडे भागिरथी कडून सीख जाटास मदत येणार म्हणोन ऐकण्यात आले आहे, पुढे पहावे इतक्यावर जालियासि अधिक उत्तर वर्तमान लिहून पाठवू परतु तुम्ही तिकडील वस्थेवर आल्या मनुष्याबरोबर पत्रद्वारें तोषवीत गेले पाहिजे आमचे ससार सर्व प्रकारे चालविण तुमचे स्वाधीनच आहे फार काय लिहावे, तों तुम्हास आमचेविषया सूचना मात्र लिहिली आहे बहुत काय लिहिणे हे विनती

---

ले २२४ }
[ ७५ ] }

{श १६९१ मार्ग शु ११
{ता ९-१२-१७६९

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री रामचद्रपत तात्या व ता। राजश्री विसाजी पत दादा स्वामीचे सेवेशीं—

पो विष्णु महादेव+ साष्टाग नमस्कार विनति उपरि येथलि कुशल ताा छ १० साबान मु।। नजिक महेश्वर, वर्तमान यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहीत असले पाहिजे विशेष —आम्ही करवादचे मुक्कामीं होळकराजवळ दाखल झालो आपला पत्रें त्याच मुक्कामीं आला त्यात लिहिले आम्ही शिवणी हुसगाबादेवरून भूपाळावरून खेचिवाड्यात येतों, ऐशास आपला पहिला करार जे बढव्याचे घाटे यावें, आणि शिंदे, होळकर सर्व इक डेच आहेत हे, आपण येकत्र होउन मनसबा पुढें करणें तो करावा, हा उत्तम विचार, आणि तुम्ही त्या मार्गे जावयाचा मनसबा केला म्हणजे हे उभयता इकडे मनसबे कर- तील शिंदे यानी तों उदेपुरचे मुलाचा पक्ष धरून त्याजला घेउन सस्थानाकडे* चालले ते मुलाची स्थापना करून सस्थानचा पैका घेणार हा त्याचा मनसबा होळकर महेश्वराहून निघाल्यावर मनसबा काय करतील तो करोत आम्हास श्रीमतानीं इकडे पाठविलें व आपला आग्रह जाणोन आलों श्रीमताची आज्ञा आपणास व हे उभयता सरदार एकत्र करून सरकारी काम करावे आपण त्या मार्गे गेले तेव्हा तिघाचे तीन मनसबे जाले म्हणजे आम्ही मग राहून उपयोग नाहीं त्यास सविस्तर वर्तमान र।। दादोपत दादानी लिहिले आहे, त्यावरून कळों येईल तदनुसार आपण याच मार्गे यावयाचा मनसबा क्षेपनिक्षेप करावा त्या मार्गे जाऊन साा चुकतील त्याहून या मार्गे मोठ्या मनसब्याचा बदोबस्त करून उदे पुरचाही बदोबस्त केल्यानें सरकार काम आहे आपल्यासही तूर्त उपयोग पडेल यास्तव याच मार्गे यावें हें उत्तम आहे याउपर आपली मर्जी त्याचमार्गे जावयाची असल्यास मग आम्हीं या समागमें कशास रहावें ? रा दादा व आम्ही देशास जाऊ आम्हास सर्व प्रकारें

---

+ गद्रे सावकार

* मूळात ' सा।।नाकडे ' ' सा।।चा ' असें आहे

लक्ष आपलें यास्तव आम्हा येथपर्यंत आलों पुढें आपले पत्र जसें येईल त्याप्रमाणे तजवीज करू बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती

---

ले २२५ [ १५८ ]

श १६९२ आषाढ शु ७
ता २९-६-१७७०

श्री

राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी—

विनंती उपरि सालमजकुरीं स्वारी पुण्यात असता कोण कोणते महालाच्या रसदा करार जाहाल्या, व स्वारी निघाल्यावर कोणते महाल विल्हेस लागले, त्या पैकीं तूर्त याव-याचा ऐवज कीती व मुदतीचा ऐवज कीती, त्यापैकीं पोता ऐवजजमाकीती जाहला व बाकी काय तें लिहून पाठवणें, व पोत्यास ऐवज येऊन बाकी ऐवज तूर्तचा व मुदतीचा राहिला तो झाडून पोत्यास जमा करणे व ज्या महालाच्या रसदा घेणे असतील तेही महाल विल्हेस लाऊन ऐवज घेणें लिहिले प्रमाणें आधा करणें रा। छ ५ रा।वर साराश ऐवज रसदेचा पोत्यास जमा करणे मुदतीचा ऐवज रसदेपैकीं किती त्यास या ऐवजापैकीं पोत्यास आणि-ल्यास ब्याज किती पडतें हें सविस्तर लिहून पाो रा। छ ४ बहुत काय लिहिणें हे विनंती

---

ले २२६ [ १३९ ]

श १६९४
सन १७७२

श्री

राजश्री सखारामपत गोसावी यासि--

छ अखडित लक्ष्मी अळकृत राजमान्य स्नेो। जानोजी भोसले सेनासाहेब सुभा दड-वत विनंती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे विशेष –आम्हा-कडील प्रात कडेवळीत येथील देशमुखीचे कामावरि पागा पाठविली त्यास आम्हाकडील ठाणेदार व पागा निंबगावीं वोस गावात जागा विछिन्न केली, तेथें बसोन आहेत ऐसें असता भगवतराव राम याचे लोक नित्य उठोन हर्षामर्शानिमित्य भोंवते उभे राहोन कजिया करितात आम्हाकडील पागेचें कुरण कापून नेतात गावकुसाचा गढीचा आसरा नाहीं ऐसें जाणोन उपद्रव करितात याजकरिता भगवतराव राम यासि उपसर्ग न करीत ऐसें ताकीदपत्र देववावें दुसरें, नगरकर किल्लेदार देशमुखीचे रुसुमास* खलेल करितात वतन दारीच्या शेऱ्या व आब्याचीं झाडें, मौजे मेहकरीस पागेचे कुरण आहे तें चालू देत नाहीं यास्तव किल्लेदारास ताकीदपत्र आपले सरकारचें दिलें असता दुसरे पत्राचा उजूर¹ करितात

---

*रुसुम-जमिनीच्या उत्पन्नातील देशमुख देशपाडे याचा विभाग शेरी=१ मणीं दोन शेर याप्रमाणें एकदर उत्पन्नावर कमावीसदाराचा हक्क २ शेरी जमीन म्हणजे गावसि-वेच्या बाहेर असणारी बागाईत जमीन १ उजूर=सबब बयाद

त्यास ताकीद देववून वतनबाब सुरळीत चाले ते करावे राजश्री महाराव निंबाळकर व राम राव निंबाळकर व शिंद्याकडील मामलेदारही रसुमास खलेल करितात, त्यासही ताकीदपत्रें देववावे कीं, त्याचेही तालुक्यानील रसुम अविछिन्न पावते करावे निंबगावचें गावकुसू व गढी विछिन्न केली आहे त्याचे मरामतीची परवानगा नगरच्या किल्लेदारास यावी कीं, भगवत गोपाळ गुमस्ते देशमुख गढी घालतील ते घालू देणे ऐसे पत्र यावे रा॥ छ २८ माहे जमादिलावल बहुत काय लिहिणें हे विनती मोर्तबसुद

---

ले २२७ [११८] — श १६९३ माघ शु १५ ता १८-२-१७७२

श्री

श्रीमत राजश्री रावसाहेब स्वामाचे सेवेशीं—

विनती सेवक सदाशिव मल्हार कृतानेक साष्टाग नमस्कार विनती येथील कुशल तागाईत छ १३ जिल्काद मु॥ अनेकल नजीक होसूर येथे यथास्थित असे विशेष स्वामींनीं कृपा करून सेवकास पत्र पाठविले ते पावोन परम हर्ष जाला तो पत्रीं लेखन करावयास सेवक समर्थ नाहा इकडाल वर्तमान तरि सविस्तर राजश्री मामानीं[1] सेवेशा विनती पत्रे लिहिलीं आहेत त्यावरून सर्व विदीत जालेंच असेल महमद अलीखान याजकडील दिवाण व राजश्री माधवराव सदाशिव इग्रजाचे मजकुराविशीं आले कुमकेस न जावें, इतर नाइकाकडे व आपल्याकडे ही न यावें हा तह जाला इग्रजानीं विलायतेस लिहून पाठविलें आहे स्वामीचे फौजेसि कुमक करावी म्हणून तेथून आज्ञा आल्यानतर यावें हाही अर्थ आहे सेवेशीं सर्व विदित जालेंच आहेत परतु सेवकाने ऐकिले वर्तमान सेवेशीं ल्याहावें या उपरि मसलतीचा डौल बिदनूर प्रातीं जावें हा आहे दिवस तों गेले परतु तिकडे गेल्यास हैदर नाईक सल्याची पैरवी करील आग्रहच नदीगड बालापूरचा आहे त्यात कदाचित् हे नेट जाल्यास सला केला तर न कळे असे मजकुराचें वर्तमान ऐकिलें त्यावरून सेवेशीं विनति लिहिली आहे हे विज्ञाप्ति +

---

ले २२८ [४२३] — श १६९५ कार्तिक व ६ ता ५-११-१७७३

सन ११९७ फसली — फोरिस्त नबर ५ तालीक

नबाब हैदर अलीखान बहादर शादकाम व मकजीयुलमराम बाशद

छ आमारत व अयालत मर्तबत शौकत व हशमत मजीलत खान

---

*जानोजी भोसले ता १६-५-१७७२ रोजीं मृत्यु पावला, त्यापूर्वींचें पत्र. कनकापुरचा तह २३-३-१७६९ रोजीं झाला, त्यानतरचें

१ मामा=त्र्यबकराव विश्वनाथ पेठे

+सदाशिव मल्हार पुरदरे यांचें पत्र माधवराव पेशव्यास

आजी मुशान बाज ईषियार फिरावा मशहूद आके येथील खैर आफीयत जाणून आ आमारत पन्हाह कडील खैरयत कल्मी करून शादमानी रुयदाद होय ते केले पाहिजे दरिविला आ आमारत पन्हाहा कडून अज्जम परशराम बल्लाळ व आनदराव व्यंकटेश व राघो विठ्ठल व बाळाजी विठ्ठल या हमराह रात खुषनमत बमय एक जजिर फिल व जवाहीर व खीलअत पारचे बरहुकूम याद दास्तपईर साल केल ते इजार समयीं पोंहचून कल्मी केला मतालिब मुफशील जाहिरीस पोहचला, व जबानी रुबरू मशारूनइले याणीराज कारणाचा मजमून मुफाशिल पोशिदा अर्ज केल्यावरून बिसयार खुषवक्ती हाशील जहाली इनशा अलाहुता आला दसरा होताच आ अमारत पन्हाहा बमये भारी फौजेनिशी त्या जिल्यास येत असों हस्बदील खवाह मतालीब हासील होतील म्हणून बयानवार कल्मी केलें तें मालूम जहालें पेशजी आअमारत पन्हाहाचें येणें बमै तोफखाना भारी फौजेनिशा तुगभद्रा पार होताच मजल दरमजल कूच करून दरपेश आलों असता म्हणजे दिलखवाह मतालिब कार सुरत पिजीर होऊन उप्रदा काज कामें हाशील जहाला असता बरसादचे बार शच्या जोरामुळ माघारी कूच करून गेलो फिलहाल मसलहातीचे रोज आनकरीब येऊन पोंहचतलि दरीनजकी आअमारत पन्हाहानीं दसरियाच्या मुहुर्तानें कूच करून दरमजल तुगभद्रा पार होऊन जल्दीने या जिल्ह्यास येऊन पोंहचावे हच इतिजारी आजहाद आफजूल जाणून फद अमदनकाफिस्त अज्जम +रघुनाथराव पडित याची स्थापना स्वस्थळास करावी हा इरादा हरदू तर्फेने बस्तर आहे बई सबब आअमारत पन्हाहाचे येणें यातर्फेस भारी फौज तोफखाना सुद्धा जहालियाने महाराजाचा व आ अमारत पन्हाहाचा इतिफाक होताच बारभाईस तबीह पोंहचून पडित मशारुनइले याची स्थापना केली जाईल व बस्तर मसलहातचीं काजकामें घडून येतील ये बाबेचा कित्येक मुफाशिल हुकूम फरमावणें तो कयकूल मराहमत यशवतराव शिंदे सर सुभेदार यास फरमाविला आहे माताबिक हुकूम कल्मी करतील त्याजवरून मालूम होईल त्या मवाफिककार सुरत पिजीर होऊन आअमारत पन्हाहाचे आमदन या जिल्ह्यास जलदीनें होय तें करावें जियादचे निगाआदय आयाम बकाम शादमानी मुद्दामबाद

सदरहू खत रवाना छ १९ माहे शाबान सन आर्बा सब्बैन मय्या व अल्फ (सन ११८३ फसली) मुकाम करवीर नवाब बहादर याजकडून हत्ती आला त्याचें नाव हुजरून सैदबक्ष म्हणून ठेविलें होतें

---

ले २२९ } [ १२०

{श १६९५ माघ व १० {ता ६-२-१७७४

श्री

राजश्री पतप्रधान साहेबाचे सेवेशीं—

छ सकळ गुणालकरण अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्ने॥ गोविंदराव गायकवाड

---

+रघुनाथ बाजीराव यास गादीवर बसविण्याविषयीं हें पत्र आहे

सेनाखासखेल समशेर बहादर दंडवत विनंती ऐशीजे येथील कुशल जाणून स्वकुशललेखनाज्ञा करीत असले पाहिजे विशेष साहेबाची आज्ञा घेऊन निघालो तुळजापुरच्या मुक्कामास पोहोचलो तेथून फौज नगरच्या मार्गानें रवाना करून आम्ही श्री जेजोरीनाथाचे दर्शन घेऊन दावडीस एक दिवस राहून दुसरे दिवशी कूच करून दरमजल गंगातीरास पोचलो मार्गी शिवराम अनंत व हैबतराव बाणराव व कृष्णाजी चव्हाण पागादार पागासुद्धा गुजराथेहून आले ते भेटले बरोबर आहेत फौज गंगेच्या मुक्कामीं येऊन मिळाली नंतर दरकूच चांदवडच्या मार्गे जात असतां अंताजी नागेश कुटुंब सुद्धां पळत फिरत होते त्यास भेटीस बोलाविले होते ते येईनात धटाई करू लागले नंतर दहा वीस स्वार पाठवून आणून ठेविले तेथून पुढे ऽ साल्हेरच्या नजीक आलो किल्ल्याचा बंदोबस्त करून दोन मुक्काम राजश्री दौलतराव याजकरितां करून त्यास मिळवून घेतलें नंतर कूच करून सोनगडच्या मुक्कामास आलो किल्ले मजकूरची बंदोबस्ती होताच परंतु साहेबाचे पुण्यप्रतापें करून किल्ला खालीं जाला निशाण चढऊन आपले लोक ठेऊन बंदोबस्त करून व्यारेच्या मुक्कामास आलों व्यारे वर त्याजकडील पागेदार अण्णाजी अनंत वगैरे पाचशे होते त्यास आमचे पांच सातशे पुढे आगाऊ गेले होते त्यांना चार घोडीं पाड़न व चार भले माणूस पाड़न घेतलीं व्यारेत ठाणें घालून पुढे दरमजल सुरत अठ्ठाविशींत आलो मांडवीकर दोनशें स्वार व चारशें माणूस सुद्धां भेटीस आले तिकडून राजश्री त्रिंबकराव गायकवाड आणखी एक दोघे येऊन भेटले साहेबाचे पुण्यप्रतापेंकरून दर-मजल जात आहों राजश्री फत्तेसिंग गायकवाड याचा रेवा तीरीं मुक्काम आहे तीन हजार स्वार पायदळ मिळोन आहे अशी बातमी वरचेवर येती साहेब कृपे सर्व यथास्थित होईल साहेबीं कृपाळू होऊन राजश्री दौलतराव यासमवेत फौज घोडा माणूस सामान यथास्थित पाठविलें परम समाधान जालें आम्हाजवळही फौज पेशजी व हल्लीं देशीं आणखी जमा जाली आहे माणूस उत्तम आहे कामकाज पडल्यास उपयोगी पडतील दिनचर्या बातमी येत असते त्यात अंतर नाहीं एका दो दिवसा त्याची आमची गांठ पडेल त्याच्या मनात भेटावें असे आल्यास आम्हाकडून अंतर होणार नाहीं विरुद्धास प्रवर्तल्यास तसेंच प्राप्त कोणताही प्रकार मांडल्यास साहेबाचे कृपें यथास्थित होईल कोणत्याही गोष्टीस प्रारंभ करते समयीं साहेबाचे चरणाचे चिंतन अंतःकरणीं करून पुढे उद्योग करीतो तेव्हां

---

* दावडी ता० खेड हा गाव गायकवाडास इनाम होता तो आलीकडे त्याणीं आपले पदरचे 'ढवळे' नावाच्या सरदारास देऊन टाकिला येथे खंदक, गावकूस, गढी व वाडा आहे सदरेच्या पुढे कारंजे आहे जवळच एका डोंगरावर खंडोबाचे स्थान आहे ते प्रसिद्ध आहे गोविंदराव गायकवाड येथे देवाचे सेवेकरिता बरेच दिवस राहिले होते देवाकडे गाय-कवाडाकडून चौघडा, पोषाख व खेरीज सुमारे ३०० दरमहा नेमणूक चालू आहे येथे टाकी नेहमी सुरू असते (का स कर्ते)

ऽ साल्हेर व मुल्हेर हे दोन किल्ले बागलाणच्या पश्चिम भागीं आहेत

त्या चरणास आमच्या करण्याचा साभिमान आहे आमची निष्ठा चरणापाशा ते सर्व पार पाडून यथास्थित होऊ ऐवज माल व ज्याचा [ ? ] म॥ व अवातर कित्येक अर्थ राजश्री सखाराम हरि¶ व रावजी अप्पाजा यासि लिहिले आहेत, ते विनती करिता ध्यानास येईल सर्व प्रकारे आधार आश्रय एक साहेबाचे चरणाचा साहेबीं साभिमानानें कृपा केली त्या मार्गे येथपर्यंत निभावीत आलों एक दोन स्थळे मजबुदीचा होता, तीं हस्तगत जालीं पुढे त्याची भेट होऊन त्याचा बदोबस्त करणें, तोही अर्थ साहेबाचे कृपे घडेल त्याची आमची गाठ लौकर पडेल होईल मजकूर तो वरचेवर सेवेशा लिहून पाठऊ परतु साहेबाचे पुण्ये करून सर्वही उलगडा पडेल साहेबा चिता सेवकाची न करावी, आणि माझा अभिमान साहेबान्या चरणा आहे तर साहेब माझे मायबाप आहे, तर हे ब्रीदाची लज्जा मातापित्यास आहे बहुत काय लिहिणे हे विज्ञापना र॥ छ २४ माहे जिल्काद कृपा कीजे हे विज्ञापना

---

ले २३० }
[ ४४७ [ }

{श १६९५ फा० व २
{ता २८-२-१७७४

श्री

यादी छ १५ जिल्हेज सु॥ आर्बा सबैन किल्ले सातारा सन ११८३ फसली शके १६९५ फाल्गुन वद्य २ सोमवार विजय सवत्सरे, ता० १ मार्च १७७४ इसवी,

| | राजमान्य | रा॥ | बा॥ ली॥ | सुदन | छ |
|---|---|---|---|---|---|
| १ भवानराव प्रतिनिधी • | १ | ० | १ | ० | ० |
| १ राघो बापूजी ( पागे ) | ० | १ | ० | ० | १ |
| १ बाळाजी पलाडे ( पागा ) | ० | १ | ० | ० | १ |
| १ नागोजी राऊत | ० | १ | ० | ० | १ |
| १ येसाजी देवकाते ( पागा ) | ० | १ | ० | ० | १ |
| १ भगवतराव कडेकर | ० | १ | १ | ० | ० |
| १ मल्हार जगजीवन ( पानशे ) | ० | १ | १ | ० | ० |
| १ सठवोजी गावडे ( पागा | ० | १ | १ | ० | ० |
| १ आनदराव निंबाळकर नाईक | ० | १ | १ | ० | ० |
| १ महिपतराव घोरपडे | ० | १ | १ | ० | ० |
| १ आपाजीराव पाटणकर | ० | १ | १ | ० | ० |
| १ रामचद्र दामोदर ( अबकिर ) | ० | १ | १ | ० | ० |
| १ माधवराव तुकदेव | ० | १ | १ | ०• | ० |

---

¶ हे दोन प्रभु गृहस्थ होत सखाराम हरी हे रघुनाथरावाचे परम स्नेही रावजी आपाजी पुढें गायकवाडींत दिवाण झाले

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १ बाबुराव पाटणकर | ० | १ | १ | | ० | ० |
| १ जानराव पाटणकर | ० | १ | १ | | ० | ० |
| १ मुरारराव हिंदुराव घोरपडे ममलकतमदार सेनापति | १ | ० | १ | | १ | ० |
| १ राणोजी नाईक निंबाळकर | ० | १ | १ | | ० | ० |
| १ वणगोजी नाईक निंबाळकर | ० | १ | १ | | ० | ० |
| १ मुरारराव जाधव ( भुइजकर ) | ० | १ | १ | | ० | ० |
| १ नरसिंगराव धायगुडे | ० | १ | १ | | ० | ० |
| १ त्रिंबकराव विश्वनाथ | ० | १ | १ | | ० | ० |
| १ वामनराव गोविंद | ० | १ | १ | | ० | ० |
| १ सुभानराव पाटणकर | ० | १ | १ | | ० | ० |
| १ शाबाजी भोंसले | ० | १ | १ | | ० | ० |
| १ लक्ष्मणराव गोविंद चिटणवीस | ० | १ | १ | | ० | ० |
| १ खंडेराव बापूजी चिटणवीस | ० | १ | १ | | ० | ० |
| १ आनंदराव गोपाळ | ० | १ | १ | | ० | ० |
| १ वासुदेव अनंत ( मुतालिक ) | १ | ० | १ | | ० | ० |
| १ खंडेराव दरेकर | १ | ० | १ | | ० | ० |
| १ आनंदराव बाजी | ० | १ | १ | | ० | ० |
| १ समस्त सेनाधुरधर साबाजी भोंसले | १ | ० | १ | | १ | ० |
| १ भीमराव यशवंत ( पानसे ) | ० | १ | १ | | ० | ० |
| | | | आशीर्वाद | | | |
| १ चिरंजीव मालोजी नाईक निंबाळकर | ० | १ | १ | १ | ० | ० |
| १ सोईराजी नाईक निंबाळकर | ० | १ | १ | ० | ० | ० |
| १ आनंदराव भिकाजी रास्ते | ० | १ | १ | ० | ० | ० |
| १ दारकोजी निंबाळकर ( पागा ) | ० | १ | १ | ० | ० | ० |
| १ कृष्णराव बळवंत ( मेहेंदळे ) | ० | १ | १ | | ० | ० |
| १ हणमंतराव जाधव ( भुईंजकर ) | ० | १ | ० | | १ | ० |

एकूण अडतीस असामी यास आज्ञा केली कीं राजश्री रघुनाथ बाजीराव याणी पुण्यात नारायणराव पंडित प्रधान याजवर कसाला केला [ तो ] तुम्ही पाहिलाच आहे हें धर्मराज्य [ यात ] अयोग्य गोष्ट जहाली, पुढें मशारनिलेनीं पेशवाईचीं वस्त्रें मागितलीं सकट जाणोन पाठविलीं परंतु पेशवाईची जी मर्यादा ती अगदींच राहिली नाहीं शिक्का मनस्वी केला यास्तव त्याजकडील पेशवाई दूर केली असे तरी तुम्ही राज्यातील चहूं पिढ्यांचे सेवक, राज्यास अपाय होऊं लागल्यास कल्याणदायक तें करावें, हेच सेवक-

पणाची रीत तरि राजश्री भवानराव पडित प्रतिनिधी व त्रिबकराव विश्वनाथ¶ व साबाजी भोसले सेनासाहेब सुभा व वामनराव गोविंद+ हे स्वामाच्या लक्षात आहेत, तरि तुम्हीं याच्या लक्षात राहून स्वामासेवा करून ज्यात स्वामीस सतोष ते गोष्ट करणे§

दादाचे स्वारी बरोबर असोन गगाबाईच्या पक्षाचे होउन कारभारी मडळीस मिळाले†

छ४ सफर खमस सबैन मया व अलफ ११८४ फसला चैत्र शुद्ध ६ गुरुवार शके १६९७ मन्मथ नाम सवत्सरे ता० ७ अप्रेल सन १७७५ इसवी शिवाजी भोसले सरदार कामास आले सबब सेनासाहेब सुभा सागोन वस्त्रे देउन सरदारीस उभें केले त्या सवयीं हातरोखे पो

नावचे मुसलमान सरदार शभरखा॰वर त्यास मुलीमाना शुजा आतशाआर

१ हस्तखान मस्तखान
१ महमद अमीनखान
१ हैदर अगा
१ जोरावरखान
१ कादर दादखान
१ रसुलखान
१ जैतवारखान
१ बिलदरखान
१ रोशनखान
१ तेजेखान

१०

**मराठे सरदार**, राजश्री

१ गोविंदराव मुकुटराव
१ काशीराव व मुकुदराव व रामचद्रराव पाटणकर
१ बहिरराव पाटणकर
१ जोगोजी यादव
१ सुभानराव पाटणकर
१ बाळकृष्णराव पाटणकर
१ केशरसिंग व बहिरसिग
१ राणोजी कराडे
१ हैबतराव बाबर
१ लक्ष्मणराव पाटणकर
१ गगाराम जाधव
१ गगाजी शिर्के
१ भवानजी आटोळे
१ निंबाजी भोसले
१ येशवतराव यादव

१५

जाणिजे छ ४ सफर खमस बहुत काय लिहिणें

---

¶ त्रिंबकरावमामा + हे पटवर्धन § हा मसुदा असून वर निर्दिष्ट केलेल्या मडळीस आज्ञापत्रे पाठविण्याचीं असे ठरलेलें दिसते

† हीं वाक्यें मागाहून लिहिलेलीं दिसतात, पण त्याचा मागील मजकुराशीं सबध अर्थात् नाहा ह्याच कागदावर पुढील मसुदाही लिहिलेला आहे पण तोही मागाहून लिहिलेला दिसतो

दकारी कागद लिखितवार लेहून राजमान्य उपरि तेरीख साल बहुत काय [1] लिहिणे शिवाजी भोसले यासि सेनासाहेब सुभा सागितला असे तरी तुम्हा त्याजवळ राहून स्वामींचे लक्ष धरून सेवा एक निष्ठेने करून बजावून दाखविणे

| | |
|---|---|
| १ रामचद्र नाईक निंबाळकर | १ जोत्याजी घाटगे वगैरे मडळी |
| १ जगदेवराव नाईक निंबाळकर गोसावी यासि | |

---

ले २३१ } [१३१ }

{श १६९६ अधिक वैशाख शु ४ {ता १५-४ १७७४

श्री

राजश्री पतप्रधान साहेब साहेबाचे सेवेशीं

छ सकळ गुणाळकरण अखडित लक्ष्मी अळकृत राजमान्य स्नो गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बहादर दडवत विनती ऐसीजे येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशळ लेखन आज्ञा करीत असल पाहिजे विशेष आपलें पत्र छ १४ जिल्हेजचें आलें ते छ १२ मोहरमी मुक्काम बडोदें अदकोशा पावलें लेखनार्थ ध्यानास आला आम्हाकडील पत्रे येत नाहींत याकरिता विस्मय करून लेखन केले ऐशियास सोनगड ब्यारे हस्तगत करून आपणाकडे पत्रें पाठविली नतर तेथून कूच करून पुढें आलों रेवातीरीं माघ वद्य १४ त्याची आमची लढाई जाली त्याचा मोड जाला निशाणें, जरीपटका, नौबती, सुत्रनाळा, जेजाला, तोफा, उटें, डेरे, ढाला, वगैरे लुटण्यात आलें ते खासे पचवीस स्वारानिशीं पळोन बडोद्यास आले दुसरे दिवशीं आपणाकडे पत्रें रवाना केलीं नतर कूच करून रेवा उतरलों दरमजल चौथे दिवशीं बडोदियाच्या पश्चमेकडे अदकोशीं उदकाची नदीवर मुक्काम केला येथून मुजरद कासीद जोडी पत्र लिहून आपणाकडे पाठविली याप्रमाणें पत्र पाठविण्यास अनमान अथवा उपेक्षा किमपि नाहीं परतु मागन्या अडचणीमुळें कासीद जोड्या कोठें अडकून ठेविल्या किंवा कैसें जाले हे न कळे साहेबास पत्र न ल्याहावें ऐसें नाहीं सर्वकाल आपल्याकडील निजध्यास अस्तु बडोदियासि जाऊन बसले आहेत आम्हीं भोंवतीं बदी केली आहे पेटलाद ढवलके वगैरे या स्थळीं त्याजकडील लोक व सरजाम थोडा बहुत होता तेथें अमल बसवावयाकरिता कारकून व फौज पाठविली त्या खटपटास मास पक्ष लागला बेकार ग्रामाची जप्ती चहू दरवाजियाची केली आहे किल्या बाहेर त्याचे सिबदी व स्वार होते त्यास आपल्याकडील लोक जाऊन मारामार करून गावात नऊन घातले तीर्थस्वरूप राजश्री खडेराव गायकवाड हिम्मत बहादर फौज सुद्धा येथे आम्हापाशाच आहेत राजश्री दौलतराव फौजसुद्धा आहेत या उभयताकडे बडोदियातून सलूखाचे बोलणें एक दोन दिवस आलें या उभयताची

---

१ मुसलमानास कसें लिहावें व मराठ्यास कसें लिहावें हें सागितलें आहे दकारी कागद म्हणजे छ ह्या चिन्हें करून युक्त

भेटही त्याणीं येऊन घेतली सर्व सोडून नेमणुके प्रमाणे घेऊन स्वस्थ असावे त्याप्रमाण बोलणे निश्चयात आले होतें परतु पुण्याहून पत्रे खिजमतगारासमवेत व कासीदा समवेत वगैरे गुप्त प्रघट दररोज येऊन त्यास पोचलीं त्यावरून पुन्हा उमेद, बेकार, ग्राम न द्यावे, आपल्या दैवयोगे हा उपाय निर्माण जाला, इत पर होईल तेथवर बळ धरावे, ऐसा निश्चय होऊन पुण्याकडे पत्रे जातात येतात या उभयताकडे सलूखाचें बोलणें लाविले होतें त्यास सागून पाठविले जे, आपल्या दैवे हा उपाय निर्माण जाला इत - पर माध्यस्थ काय म्हणोन सागून पाठविलें तिकडील पत्रें बजिन्नस आला तीं यासि दाखविलीं याणा ही प्रत्योत्तर करणें ते केलें तें त्याच्या प्रत्ययास न आलें आतील बळ म्हणावें तर, मोठा आश्रय मिळोन किल्ला, हिंमत म्हणावी तर पुण्याकडील पत्रावर, हें आपणास कळावें चहूकडून किल्याची बदी केली आहे या घटकेपर्यंत कुमक त्याजकडे कोठून आली नाहीं आमदाबादेची सिबदी आम्हाकडेस आली चाकरीस ठेविलें पाहिले देशची फौज व इकडील सिबदी व स्वार मिळोन पचवीस तीस हजार फौज आहे चहूकडून त्यास अडचण केली आहे,‡ साहेबाचे पुण्यें करून कार्यभाग सत्वरीच होईल या मागेंच हल्ला करून घेतो परतु गायकवाडाचीं कुटुबे झाडून आत, प्रजा बहुता दिवसांची वस्तीची वस्ती, याजकरिता सबूरीने आजि पर्यंत करणें तें केलें तोफाही किल्यावरील आम्हाकडील चालू आहेत किल्या भोंवते आपले लोक जबरदस्तीनें जाप्यात गुता नाहीं ते आतून तोफा व गोळ्या मारितात प्रयत्नास चुक्त नाहीं मनसब्याची उमेद पुणे कडील कागदपत्रावरून विशेष तिकडे त्याचे येणें होईल हा बहुतास सदेह परतु येथीलच उलगडा होणें कठीण त्यापक्षीं तिकडे येण्याचा अर्थ कोठील ? साहेबा येविशीं स्वस्थ चित्त असों द्यावें येथील गुता स्वल्प दिवसात उरकेल दिनावधी लागणार नाहीं सदैव कृपावत होऊन आज्ञा पत्रीं साभाळ करणार साहेब समर्थ र॥ छ १९ माहे मोहरम बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनती*

---

| | | |
|---|---|---|
| ले २३२ [ ५२ ] | पो॥ छ १२ रबिलाखर सन खमस सबैन ज्येष्ठमास | श १६९६ जेष्ठ शु २ ता ११–६–१७७४ |

॥ श्री ॥

श्रीमत राजश्री **नाना** स्वामींचे सेवेशी पो **नारो शकर** सा नमस्कार विनती उपरी येथील कुशल ता छ १ रबिलाखर जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असले पाहिजे विशेष साप्रत आपल्याकडील पत्र येऊन परामर्ष होत नाहीं तर ऐसे नसावें निरतर पत्रीं साभाळ करीत गेलें पाहिजे या नतर पो जबुसर येथें राजश्री दौलत बाबूराव फौजसह जाऊन

---

‡ येथें बाजूवर आहे * दमाजीच्या मागें त्याच्या मुलापैकीं सयाजी याणें शिका बखेडा माडला तेव्हा गोविंदराव यास बदोबस्ताकरिता पेशव्याना पाठविलें होतें. तेव्हाचें हें त्याचें पत्र आहे

ठाणे हस्तगत केले त्यास्तव उपराळा करून अमल बसवावा या अर्थी येथून कारकून व अरब पाठविले, त्याजला वर्तमान कळताच निघोन गेले ते समयीं सावकाराचा गल्ला व ठाण्यातील वस्तभाव व पागेचा घोडा वगैरे जिन्नस रु म प श पन्नास पचावन हजार रुपयाचा नेला म्हणोन कारकुनाचा पत्र आला त्यास यदा पर्जन्याचे कमतीमुळे माहाल दरोबस्त खराबी खाल आला दरम्यान अरिष्ट उत्पन्न होऊन बहुत नाश केला याजमुळे सावकार व इतर लोकास नाउमेद जाली पेस्तर आबादी होता दिसत नाही वस्तभाव ज्याचा त्यास प्राप्त जाल्याने पुढे उमेदवार होऊन माहालची आबादी होईल यास्तव आपल्यास लिहिले असे तरि राजश्री दौलत बाबूराव याजला सरकारचे ताकीदपत्र यावे की, वस्तभाव व घोडा, गल्ला वगैरे जिन्नस दरोबस्त माघारा देणे याप्रमाणे पत्र येऊन सावकाराचा वस्तभाव ज्याचा त्यास प्राप्त जाली म्हणजे सवगाचा खातरजमा होऊन माहालच्या उस्तवारी होईल बहुत काय लिहिणे हे विनती

---

ले ० ३ [ १ ४ ]

श १६९६ आषाढ व १०
ता १-८-१७७४

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री नारोपंतनाना स्वामीचे सेवेशी—

पोष्य हरी बल्लाळ सा। नमस्कार विनंती उपरी येथिल कुशल ता। छ २२ जमादि लोवर जाणोन स्वकीय कुशल लिहीत असले पाहिजे विशेष—आपणाकडून बहुत [ दिवस ] पत्र येऊन काहीच वर्तमान कळत नाहीं तरि ऐसे नसावें सदैव पत्र पाठवून साभाळ करावा इकडील वर्तमान तरि श्रीमंत राजश्री दादासाहेब धुळकोटापलीकडे सहा कोसावर मुक्काम करून राहिले आहेत श्रावण मासचे खर्चास दोन लाख रुपये द्यावे लागताल तेव्हा कूच होऊन पुढ येतील त्यास ऐवजाविशीं राजश्री विष्णुपंत बाबा यास लिहिले आहे, ते तरतूद करतील परंतु त्यास ऐवज लौकर द्यावा लागेल राजश्री नारो गणेश होळकराकडील व राजश्री बाळाराव शिंदे याजकडील व विष्णुपंत बाबा सरदारापासून रोख घेऊन बराणपुरास आले पुरंदरास जाव * त्यास महमद इसफ वगैरे गारदी यास तेथून निरोप दिल्हा ते येऊन बराणपुराजवळ राहिले आहेत त्यास पुढे घालून नापी उतरोन आलीकडे आणावें, नाही तरि मागती श्रीमंत बराणपुरच्या मार्गे येतात, तेव्हा त्यास मिळतील याजकरिता कारभारी यास चार दिवस अधिक लागले परंतु आता लवकर निघोन येताल आमची भेट घेऊन पुढे जावें असे त्याचें मानस आहे मग पहावें स्वारी बरोबर समया नाहीत येथ द्याव्या तरि लष्करात मिळत नाहीत * . ता आता समया वगैरेची यादी आलाहिदा लेहून पाठविली आहे त्याप्रमाणें साडणी स्वारा बरोबर पाठवून द्याव्या श्रीमंतास वर्तमान दानचर्येचे लिहितों, आपणास

---

* पत्र नाना फडणिसास दौलत बाबूराव हा सखाराम हरींचा पुतण्या

कळतच असेल अधिकोत्तर लिहिणेस नाहीं श्रीमताचे येण्याचाच मजकूर पडला आहे पैका पुष्कळ पावला सेवट काय करितात कळत नाहीं श्रावणमासचे खर्चाचा पैका द्यावा, पुढे चादवड पर्यंत देऊ नये, असें बोलण्यात आहे परिणाम लागेल तो खरा खर्चास नाहा पावले तर तापीवर आल्यावर पोटास नाहीं, म्हणोन मुलुखास तसदी देतील एकूण दोन्हीकडून नुक्सानी जाणून राजश्री विष्णुपत यास बहुत प्रकारे लहून तर्तुद करविली आहे त्याचे पहिले तान लक्ष गुरुजीजवळ भरणा जाला आम्ही दोन लक्ष श्रावणमासाचे श्रीमंताचे खर्चास मागतों हा ऐवज त्यास प्रविष्ट होयसें करावें पैक्याचे मोठें सकट पडलें सरदारानीं मसलत लाबवली असो एक वेळ चादवड दाखल जाले म्हणजे सारे गोष्टीं भ्राति फिटेल होईल ते लिहून पाठवू दोन चार पत्रें आपणास पाठविलीं, परतु उत्तर येत नाहीं, तस्मात् आम्ही मसलत लाबविली, मेहनत करीत नाहीं, असें घ्यानात आलें असेल, तर येथें काय करितो तें काय ल्याहावें ? दर्शनातीं विदित करू आपले ममतेंत अतर नसावें बहुत काय लिहिणें कृपा करावी हे विनती

---

ले २३४ [१२८]

श १६९६ कार्तीक व १
ता १९-११-१७७४

श्री

स्वस्ती श्री राज्याभिषेक शके १०१ जय नास सवत्सरे कार्तिक बहुल प्रतिपदा मद-वासरे क्षत्रियकुलावतस श्री राजा शिवछत्रपति स्वामी यांणीं राजमान्य राजश्री बाळाजी जनार्दन यास आज्ञा केली जे, राजश्री येसाजी राम व रामचद्र नारायण व दादाजी त्रिंबक याजकडील गावें हुजूर सरकारात यावयाचा करार पेशजी नारायणराव पडित याचे वेळेस जाहला असता अद्यापि सरकारात येत नाहा येविशीं वेदशास्त्र सपन्न राजश्री महादेव शास्त्री फोंडेकर व अप्पाजी शामजी यासि आज्ञा जाहली आहे यासि त्रिवर्ग रेटाईचा जाबसाल करितात हुजूर जाऊन अर्ज करू ऐसें बोलतात म्हणोन हुजूर विदित जाहालें तुमचे विद्यमानें करार असता अद्यापि सरकारचे करारापैकीं त्रिवर्गाकडील व पुण्यशील आवुबाई कडील गावें येत नाहींत याचा अर्थ काय ? राजश्री नागो शामजी हुजूर विनती करितात जे, राजश्री रामचद्र महादेव याच्या कर्जाचा फडशा जाहला पाहिजे त्यास रामचद्र महादेव याचा फडशाचा मात्र गुता सरकारातून राहिला आहे रामचद्र महादेव यांणीं सरकारचे तालुके अडथळून ठेऊन तालुकेंतील त्याजकडील व आऊबाईच्या वगैरे याचे मतलबात शिरोन बखेडा करावयाचें कारण काय ? सावकारी जो जाबसाल वाजवी असेल तो तुमचे विद्यमानें होत असता बखेडा करणें हें उत्तम नसे याचे बदोबस्ताविशीं ताकीद करून आऊबाईकडे अथवा हर कोणाकडे सरकार तालुकेंतील कुमक न जावशी करावी मिरजकर यांणीं व वडेकर व सेनापति व शेषो नारायण व रामचद्र भगवत सर्वत्र कुमक पाठवणार, त्यास सर्वत्रास ताकीद करावी जे, आऊबाईकडे कुमकी लोक परिछिन्न पाठऊ नये ये विशीं

व शेषो नारायण व रामचद्र भगवत याजकडून कुमक गेल्यास याचे पारपत्य होईल व येमाजी राम व रामचद्र नारायण याजकडलि ही कुमक जाऊ नये ये विशींची ताकीद तुम्हा केलीच आहे इतके उपरि पाठवितलि तरि जिकडून उपराळा होईल तिकडे त्याची खराबी होईल येविशा तुम्हास अनेक प्रकारे समजावितलि तन्मूलें तुमची विनती पत्रें येताल, यास्तव स्वामींनीं अगोदर आज्ञा केली असे सर्वत्रास ताकीद करावी त्रिवर्गाक डाल वगैरा करारापैकीं गावाविशीं उभयता मशारनिले यासि आज्ञापत्रे सादर जाहलीं आहेत त्याप्रमाणें निकड करितील ते सरकारात हुजूर अर्ज करू ऐसे बोलतील तरि त्याचा रदबदली चालणार नाहीं आज्ञेप्रमाणें गावे व वसूल करारा तागाईत देवावी येविशीं तुम्हीं ताकीद निक्षूण केली पाहिजे करारात लढा राहू नये निभावणी जाहाली न जाहाली हे तुम्हास न समजेसे काय आहे ? वारवार ये विशीं सरकारची आज्ञापत्रें सादर असता करारापैकीं गावें व हारामखोर येत नाहींत हें उत्तम नसे जाणिजे बहुत काय लिहिणे हे विनती

मर्यादेयं विराजते

पै।। छ २८ सव्वाल मार्गशीर्ष मास

---

ले २३५ }
[ ४६१ ] }

{श १६९७
{ता मे १७७५

श्री

नर्मदा तीराहून गुजराथप्रातें फौजासहवर्तमान तुम्ही गेल्यास किती दिवस जाले ? मनसबा लांबणीस न पडावा या अर्थें जलदी करून त्याचे प्रेत्न करण्याची हद्द पोंहचवून आपलें करणें शेवटास लौकरीच न्याल हें घडावेंच असें दृष्टोत्पत्तींत येत गेलें असता निष्कारण दिवसगतीवर मनसुबा पडत चालला, त्वरा करून मसलत शेवटास लावण्याविशीं वरचेवर लिहिण्यात येत गेलें परतु निदर्शनास न ये यावरून सर्वांचा एक विचार होऊन कजाखी होत नाहीं असें दिसोन येतें परतु असें नसावें ज्या कामात तुम्हासारिखे कृतकर्मे त्या कार्यास हे दिवस प्राप्त व्हावेसे नाहींत या मागें या राज्यात प्रसंग मोठे मोठे प्राप्त जाले तेथें तुम्हीं लोकींच जिवाभ्य श्रमें करून यशच सपादिलेंत त्या पेक्षा साप्रतची मसलत अधिक आहे ऐसा प्रकार नाही इग्रजाचें सहाय करून ते मनसुबा करू इच्छितात, येविशीचा परिणाम कळतच आहे परतु अत पर तुम्ही सर्वांनीं एक विचार करून हे मसलत लांबणीस पडल्यास सर्व प्रकारें हिंदुस्थान वगैरे जागाच्या बदोबस्तास अतर पडून जागां जागा ल्हानसहान शत्रु अमर्याद वर्तूं लागतील, त्याचें पारपत्य करणें तेंही सकटच पडेल, या अर्थें या मागें शत्रूच्या पराभवार्थ तुम्हीं लोकीं कजाख्या व मेहनती केल्या आहेत त्याप्रमाणें या समयींही कराव्या, आणि मनसुबा अविलबें शेवटास न्यावा अखेरीचे दिवस, त्या प्रांतें छावणी न पडावी, मसलत

लौकर निर्गमात होऊन सर्वांचें येणे देशीं घडावे, असें जालें पाहिजे याजकरिता रात्र दिवस न म्हणता जेणें करून त्याजवर आपली जरब पडोन यश प्राप्त होय ते गोष्टी करावी *

---

ले २३६ } ( मुबईवाल्यास पत्र पाठविले त्याचा मसुदा ) { श १६९७ श्रावण शु ५
[ ४८० ] } ( छ १० जमादिलाखर श्रावण सतिसबैन ) { ता ८-८-१७७५

श्री

दरीविला रफआत व अवाली, मजल्त येतीजाद दोस्ता मेस्तर होष्टैन यमादु दौले जलादत जग बहादूर याचा दोन पत्रे एक छ ७ रविलाखर व दुसरें छ ९ रविलाखरची अमारत व अयालत मरतबत मदारूल मोहाम सखाराम पडित याचे नावें बगालियाहून आलीं, त्याची नक्कल दोन्ही खताची मजमून एकच आहे, त्याप्रमाणें नक्कल करून पाठविली असे अलबतामा ई ज इ बालेले याचा नविस्ता आ अवाली पनाहास ही आलाच असेल त्याच्या नविस्त्या वरोन आम्ही आपल्या सरदारास तुम्ही आपले फौजेचा बंदोबस्त केलाच असेल य तु तें पाठविलें कीं, तुम्ही होऊन इग्रजाशीं लढाईचा मुकदमा दरपेश न आणणें व बगालियाचे पत्राचे उत्तर पाठविलें असे या मजकुराचा इतला आ अवालीपनाहास व्हावा म्हणून कलमी केले असे आमचे सरदार गुजराथ प्रातें वगैरे सरकार अमली अमल मात्र बसवितील लढाईचा मजकूर आपल्याकडून हरगीज करणार नाहींत पुढें इरादा आ अवालीपन्हाचा काय असेल तो लिहून पाठवावा त्या प्रमाणें इकडूनही अमलात येईल

---

ले २३७ } { श १६९८ माघ व १२
[ ४२५ } { ता ६-३-१७७७

श्री

राव अज्जम यशवतराव शिंदे सर सुभेदार दाम मोहबतहू

मोहबत व मुबदत पन्हाह खुल्त व मालात दस्तगाह बाद आअज इस्तियाक फिरावा मसहूद आके येथील खुषी जाणून आपली शादमानी हमेशा क्लमी करीत आला पाहिजे दरिविला खत पाठविलें तें पावलें मजमून मालूम जाहला अज्जम बाहिरजी नाईक गाईकवाड व बाळाजी विठ्ठल यास पाठविले आहेत फौजेच्या खर्चाबद्दल ऐवज पाठवावा व आम्हीही कूच करून त्या जिल्ह्यास यावें असें क्लमी केलें होतें तरी पेशजी एथून भारी फौज बकापूर त्या जिल्ह्यास रवाना करून पाठविलें असता बाराभाई याजकडील पाडुरग थकी वगैरे फौजेसुद्धा साळसी वरी येऊन नमूद जहाले याकरिता लढाई होऊन बाराभाई याच्या फौजा तमाम गारद होऊन पाडुरग† थकी वगैरे नासरदार पाडाव जहाल्याचा

* हा महादजी शिंदे व तुकोजी होळकर यास लिहावयाच्या पत्राचा मसूदा असावा असें वाटतें

† पाडुरग गोविंद पटवर्धन हे हैदराकडे पाडाव सापडले होते पत्र मुबईकर इग्रजाचें कोल्हापूरचे कारभाऱ्यास

मजकूर आपणासही मालूम जहाला असेल हल्लींही येथून भारी फौज रवाना करून पाठविली असे आम्हींही निघावयाची तयारी करविली होती मोहरमचा अषुरा नजदिक पोंहचला याकरिता तहकुब जहालों इनशाह आल्ला हुता आदबा आदज अषुरा कूच करून अनकरीब त्या जिल्ह्यास येत असों आपणाकडून आलेले बहीरजी गायवाड व बाळाजी विठ्ठल बकापुरास बाजीराव बर्वे कडेस येऊन पोंचले एथून ऐवज पाठवावा तरी ऐवज घेऊन जावयास तेथून इतबारी मजाम रहाबाट जाणणारे दोनश सवारास बकापुरास पाठवून यावें म्हणजे त्याच सवाराबराबर ऐवज देऊन आपणाकडे पाठवीत असों आपण तेथे भारी फौजेचा जमाव करून तिकडे बाराभाई याच्या फौजेस खुब तबीह करीत जावें आणि तिकडील मुलूकही मारून खडण्याही करीत असावे इतक्यात आम्हीहा भारी फौजेसुद्धा अनकरीब येत असों हमेषा आपली षादमानी कलमी करीत यावें ज्यादा लिहिणें काय हा—

पैवस्ती छ २५ माहे मोहरम सुरुसन सब्बा सब्बैन मऱ्या व अल्फ सन ११८६ फसली ( सन १७७६ इसवी ) मुक्काम करवीर

---

ले २३८ [४२४]

श १६९८ माघ व १२
ता ६–३–१७७७

श्री

महाराज बुलद दरजे शिवाजी राजे छत्रपती हमखैखुरषवक्त व कामयाबाबषद उब्बहत व शौकत पन्हाह एकवल व इजलाल दस्तगाह कुंद वैराजहाय समूळ अलमकाज बाआदज इजदर इस्तियाक फिरावामषौध आकी येथील खुषी जाणून आपलीषादमानी हमेषा कलमी करीत यावें दरिविला खत मसतर नमन पाठविलें तें पोंहचून मजमून मालूम जहाला अज्जम बहीरजी नाईक गायकवाड व बाळाजी विठ्ठल यास पाठविले आहेत फौजेच्या खर्चाबद्दल ऐवज पाठवावा आम्हीही कूच करून त्या जिल्ह्यास यावें असें कलम असता बाराभाई याजकडील पाडुरग षकी वगैरे फौज सुद्धा साळसीवरी येऊन नमूद जाहले याजकरिता लढाई होऊन बाराभाई याची फौज गारत होऊन पाडुरग षकी वगैरे नासरदार पाडाव आलेला मजकूर आपणासही मालूम जहाला असेल हल्लींही येथून भारी फौज रवाना करून पाठविली असे आम्हीही निघावयाची तयारी करविली होती मोहरमचा अषुरा नजदीक पोंहचला याजकरिता तहकूब जहाली इनशा अल्ला हुता आकब आदाज अषुरा कूच करून अनकरीब त्या जिल्ह्यास येत असों आपणाकडून आले बहिरजी गायकवाड व बाळाजी विठ्ठल बकापुरास बाजीराव बरवे कडेस येऊन पोंहचले एथून ऐवज आपणाकडे पाठवावा तरी ऐवज घेऊन जाण्याबद्दल तेथून इतबारी मजाम रहावाट जाणणार दोन तीनशें स्वारास बकापुरास पाठवून यावें म्हणजे त्याच सवाराबराबर ऐवज देऊन आपणाकडेस पाठवील असों आपण तेथें भारी फौजेचा जमाव करून बाराभाई याच्या फौजस खुब तबीह करीत जावें आणि तिकडीलही मारून खडण्याही करीत जावें इतक्यात आम्हीही

भारी फौज व भारी तोफखाना सुद्धा अनक़रीब येत असों हमेषा आपली शादमानी कलमीं करीत यावें ज्यादा लिहिणे काय असे हे क़िताबत

पैनस्ती छ २५ माहे मोहरम सुरुसन सब्बा सब्बैन मया व अलफ ( सन ११८६ फसली इसवी सन १७७६ मुक़ाम पन्हाळा

---

ले २३९ }
[ ४७७ ] }

{श १६९८ माघ ३०
{ता ९ ३ १७७७

( पौा छ ५ सफर सुासन सबा )

श्री

पुा राजश्री महादाजी प्रभू गोसावी यासि—

उपरि मुबैकडलि बातमी वर्तमान पेशजी लेहून गेलें आहे याजवरून कळलेंच असेल साप्रत राजश्री आबाजी महादेव दवणेहून मुबईस येऊन गडबड फारच माडली आहे फिरगी तराडी काहा मुबईचे बदरात आलीं आणखी चार पाच हजार गाडदी व इग्रज तराडियावर सामान सरजाम मबलग चढवायास लागला आहे म्हणोन सावकारी बातमी आहे येथोन कोण्ही तथ्य बातमीस पाठवून बातमी आणावी त्यास इकडील माणूस एकदर बदरात घेत नाहीं आणि परस्पर वर्तमान याप्रमाणें येतें तेव्हा कोण्हे समयी कोठें तोंड टाकील हें न कळे टोपीकराचा विश्वास नाहीं त्यात त्याचे चित्तातील गुबार फुटत नाहा यास्तव आपले जागा फार सावध असलें पाहिजे याजकरिता राजश्री बापूराव व राजश्री नाना फडणवीस याचे कर्णारूढ करून उभयता × × × — पत्र राजश्रीं भींवराम पानसी व राजश्री विसाजीपत बाबा यांस घेऊन पाठवावीं त्यात मजकूर इग्रजाने काहीं दुर्बुद्धि धरून कुलाबा तर्फेस गडबड गेली तरि तुम्ही फौज सुद्धा बिलाशक जाऊन सरखेलीस सामील होणें तुम्हास बातमी न लागली आणि सरखेल कडून तुम्हास सूचना जहाली तरि येक घडीचा अवकाश न धरिता स्वार होऊन जाऊन कुमक करणे व धुळपास पत्र कीं, जजिरे खादेरीस इग्रज जाणार म्हणोन बातमी आहे त्यास तुम्हास बातमी लागताच जंजिरे मजकुरीं आरमार सुद्धा जाऊन सामील व्हावें अथवा सरखेलचें पत्र जाऊन पावताच निघोन जावें कदाचित वारें बादळाचे सबबेने आरमार जाऊन न पोंहचे तरि आरमार विजयदुर्गाचे खाडींत रवाना करून तुम्हीं खुषकीनें फौज सुद्धा जजिरे कुलाबा जाऊन कुमक करणें याजप्रमाणें पत्रें जलद घेऊन पाठवावीं व अवातर तालुके तालुक्यास सदहू अन्वयें पत्रें घेऊन रवाना करावीं व पेशजीचे लिहिले प्रमाणे पत्रें आलीं म्हणजे इग्रजाचे बोलीचें तोंड पडोन त्याच्या चित्तातील भावगर्भ समजेल याजकरिता पेशजीचे व हल्लींचे लिहिले प्रमाणें पत्रें घेऊन पाठवावीं हे कामास दिसगतीवर घालविता नये अवातर तालुकियास पत्रें न घ्यावा पानसी व विसाजीपत बाबा व धुळप यास पत्रें असावीं व राजश्री बाळाजीराम ओक याजबराबर बातमी पत्र लिहिलें आहे त्याप्रमाणें मुरबियास

निवेदन करून उत्तर घेऊन पाठवावें रवाना छ २८ मोहरम सु॥ सन सबा सबैन बहुत काय लिहिणे मोर्तब सूद्र

---

ले २४० } { श १६९९ चैत्र शु १५
[ १०६ ] } { ता २२-४-१७७७

श्री

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री गणेश विश्वनाथ गोसावी यासि-

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार सु॥ सबासबैन मयावअलफ-तुम्ही विनतीपत्र पाठविलें तें पावलें राजश्री फत्तेसिंग गाईक्वाड आमदाबादेस मोर्चे लाऊन शहरावर गोळे टाकितात व सरकारचे महालात उपद्रव करितात त्यास येविशा त्यास सांगोन पाठविलें असता ऐकत नाहा तेव्हा आम्ही आमदाबादेस येऊन मग तुमचे आमचे विचारें करणें तें करू, म्हणून त्यास लेहून पाठऊन फौज सुद्धा बडोद्यानजीक[1] गेला तों त्याणीं उत्तर पाठविले कीं, मही उतरून आलीकडे आल्यास तुमची आमची कटकट होईल म्हणून लिहिले व आमदाबादेस जाण्याविशीं आज्ञा आली यावरून त्याणीं दोन तीन घाटाची बदोबस्ती केली परतु मार्ग फुटेल तिकडून आज्ञेप्रमाणे जातच आहो तेयें गेल्यावर आप्पाजी गणेश व आम्ही मिळोन त्यास दोन गोष्टी विचाराच्या सागू आयकिलियास उत्तम, न आयकत तरि बनेल तसें करू परतु त्याची नजर आमदाबाद घ्यावी अशी आहे त्याजकरिता धारेकडील फौज पवार वगैरे यासि आमदाबादेस जाण्याविशीं आज्ञा व्हावी व सुरत अठ्ठाविशीचे महाल जप्त करावे लागतील तिकडे सीनगडास दीड हजार फौज आहे आणखी राजश्री भिवराव येशवत याणीं फौज सुद्धा येऊन त्याणी व याणीं एकत्र होऊन काम करावें म्हणजे फत्तेसिंग ताळ्यावर येतील फार भरीं भरले आहेत याजकरिता तरतूद लौकर जाल्यानें बदोबस्त होईल म्हणून तुम्हा लिहिलें तें सविस्तर कळले ऐशियासि तुम्हास आमदाबादेस जाण्याविशीं आज्ञा जाली आहे त्याप्रमाण जाऊन दाखल होणें त्याणीं दोन तीन घाट बद केले तरी जाण्यास बाटा बहुत आहेत चिंता नाहीं तुम्हीं अमदाबादेस पोहोचल्यावर फत्तेसिंग आयक्तील न च आयक्त तरि तुम्ही व अप्पाजी गणेश व राजश्री गोविंदराव खंडेराव सर्व एकत्र जाल्यावर दुसरी फौज नलगे इतके येकत्र असता आमदाबादेचें त्याच्यानें काय व्हावयाचें कळतच आहे दुसरा मजकूर सुरत अठ्ठाविशींत फौज या दिवशीं पाठवावयाची सोय नाहीं लावणीचे दिवस पुढें श्रावणमासापासून पाठवावयाची तजवीज केल्यानें पोटास मिळेल व शहही बसेल या करिता तूर्त तिकडे फौज जाण्याचा उपयोग नाहीं राजश्री अताजी नागेश येथें आले आहेत जाबसालात येईल तसे तुम्हास लिहिलें जाईल तुम्ही लिहिल्याप्रमाणें आमदाबादेस जाऊन दाखल होणें राजश्री रघुपतराव नारायण याजकडील फौज तुम्हाकडे आहे त्याचे खर्चाची बेगमी त्याजकडून होत नाहीं

---

[1] बेहेरे

म्हणून तुम्हां लिहिलें, त्याजवरून येविशी त्यास आलाहिदा पत्र सादर केलें आहे ते आपले फौजेचे खर्चाची बेगमी वरचेवर करीत जातील तुम्हीं आमदाबादेहून खर्चास द्यावयाविशी रा। आप्पाजी गणेश यास ल्याहावें म्हणोन लि॥ त्याजवरून खर्चास फौजेस द्यावयाविशी म॥रनिलेस लिहिले आहे, त्या प्र॥ खर्चास देतील व सस्थान माडवी येथील भगवतसिंग दिवगत जाहाले याजकरिता राणानें सस्थानावर गुमानसिग दत्त पुत्र घेऊन बसविले त्याप्रमाणें त्याची स्थापना सरकारातून करार करून त्याजकडे नजरेचा ऐवज करार केला त्याप्रमाणें तूर्त पधरा हजार रुपये तुम्हाकडे देवविले असत घ्यावे जाणिजे छ १३ र॥वर बहुत काय लिहिणे

पौ। छ २४ रबीलावर मु॥ डभही

मोर्तबसूद

---

ले २४१ [९१]

श १६९९ वैशाख व १०
ता १-६-१७७७

श्री

राजश्री त्रिंबकराव दाभाडे* सेनापती गोसावी यासि —

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ गोविंदराव नारायण आशीरवाद छ २८ र॥खर पावेतों आपले कृपावलोकनें करून क्षेम असें विशेष इकडील मजकूर त॥ वैशाख व॥ ३ पावेतों यथास्थित असो विशेष राजश्री फत्तेसिंगराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बहाद्दर याणीं सरकारची ताकीद पत्रें गकाराविशीं व शहरचे दखलीविशीं आणलीं त्याचा म॥र पेशजी लि। आहे हल्लीं पत्राच्या नकला करून पा। आहेत यासि उत्तर केलें कीं, गकारास बहाद्दर येथील अधिकारी याणीं प्रथम देऊन शहरात घेतलें होतें येविशींचीं पत्रें पूर्वीं सरकारात गेलीं होतीं तें तुम्ही जाणतच आहा त्या अन्वयावरून कार्तिक मासीं तुमचा आमचा तह ठरला तेसमयी यादींत कलम लिहिलें आहे कीं, शहरात राहतील तों पावेतों बाहेर उपसर्ग होऊ न द्यावा बाहेर गेले तर शहरात न घ्यावें त्याप्रमाणें घडलें असता शब्द लावावा ऐसें नाहीं शहरचे आमलाचे दखल म॥र काठेवाड व बरमगावचे मामलतीचे इजारी याचे बाकीचा ऐवज सवा लक्ष राहिला आहे तो घ्यावा आणि येथें कारकून राहील त्याणें सीबदीचा दरमहाचा ऐवज सहा हजार देत जावा शहरात बखेडा हरएकाविशीं न

---

+ त्रिंबकराव दाभाडे दमाजी गायकवाडाच्या हयातींत वारला, तेव्हा फत्तेसिंगास सेनाखासखेली नव्हती या पत्राचा लेखक कोण ? उलगडा झाला पाहिजे पहा दाभाडे बखर गकार कोण ?

करावा सुदामतप्रमाणे चालावे येविशींचा खातरी करावी म्हणजे सरकार आज्ञेप्रों दखल देऊ गुता नाहीं परतु त्यास काठेवाडचा ऐवज देणें नाहीं आणि दखल घेणें त्यावरून राजश्री गोविंदराव फौजसुद्धा वाडेकमाडेस मुक्कामास आले आहेत दस्तूरचीं गावें सहजात फौजेचे मुक्कामानें खराब होत आहेत उपाय काय येविशाची विनती सरकारात करून उत्तर लौकर पाठवावें त्याप्रों वर्तणूक करू सरकारातून निक्षून ताकीद याचे वकील तेथें आहेत त्यास करवावी कीं, काठेवाड झालेवाडचा ऐवज याची व शहरीं राहील त्याणें दर माहा द्यावा, सुरळात चालावें याची निशा करून दखल घ्यावा म्हणजे वकीलाचीं पत्रें पर भारें येतील व येथ सरकारचा पाठवावीं म्हणजे देऊन जाबसाल करू त्यासही समजलें आहे कीं, ऐवजाची निशा जाल्याखेरीज दखल होणार नाहा परतु पत्रे पाठवून खुलासा पहातात आज पत्रें आली का, रा॥ चितो रणसोड बोधनी याजकडे शहरची मामलत सागितली शहर व दस्तुरचा दखल द्यावा, कारकून मा॥र निल्हे कडील पत्र घेऊन आला त्याशीं बोलणें याच अन्वयें जालें आज उत्तरें घेऊन लष्करात जाईल लष्कर कासिंद्रे पालडाजवळ आहे याउपरि घडे ते लिहून पाठवू येथें कोणी मामलेदार असतात सर्वांशीं वाईट बरें कशास बोलावें लागते मामलेदार येणार तो ज्येष्ठ मास पावेतों यावा आश्वीन मासीं आल्यास पाच महिने शिबदीचे चालणार नाहीं, गवगवा पडेल पुढील सालीं रसद कोणी देणार नाहा यास्तव लौकर आल्यानें ठीक आहे माहल विल्हेस लावून चालविले हे आशीरवाद

---

ले २४२ [ १५९ ] — श १६९९ मार्ग शु २ ता २-१२-१७७७

श्री

अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य राजश्री जिवाजी रघुनाथ गोसावी यासि—

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार सु॥ समान सबैन मया व अलफ, राजश्री बाबूराव केशव मजमदार पे॥ सिंदखेड याणा हुजूर विदित केलें कीं, रा॥ मल्हारराव रामकृष्ण याजकडे पे॥ मा॥ची मामलत सन खमसात होती त्या वेळच्या आमच्या वेतनाचें वगैरे व्याज सुद्धा रुपये ४५० साडेचारशें येणें आहेत ते मागतों परतु देत नाहीं त्यास हल्लीं सरकारातून मल्हारराव रामकृष्ण यास रद्द कर्जाच्या ऐवजीं वरात बाबती नादेड येथें दिल्ही आहे त्यापैकीं देवावे म्हणून त्याजवरून हें पत्र तुम्हास सादर केलें असे तरि मशारनिलेचा वेतनाबाबत वगैरे बाकी असेल तो वाजवीचे रुईनें वजा करून सदर्हू ऐवज पै॥ घेणें ऐवज मशारनिलेस देणें जाणिजे छ १ जिलकाद आज्ञाप्रमाण सेखनसीमा

ले २४३ } { श १७०० पौष शु ८
[ ४४६ ] } { ता २७-१२-१७७८

श्री

छ ५ जिल्हेज तिस्सा सबैन मया व अल्फ ११८८ फसली पौष शुद्ध ७ शनवार शके १७०० विलबा नाम सवत्सरे ता० २७ दिजेबर सन १८१८ इ

मल्हार बल्लाळ भडभडे
नारो अनत परचुरे
नाना फडणवीस

अखडित लक्ष्मी अल्कृत राजमान्य राजश्री बाबुराव कृष्ण गोसावा यास

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार सु॥ तिसा सबैन मया व अल्फ श्रीमत महाराज राजश्री छत्रपति स्वामी याजकडून शिके कटार व वस्त्रे आला त्याजबरोबर निशाणाचा पटका व ढाल—तरवार व पड्दळें यावें तें न आलें येविशा राजश्रा कृष्णराव अनत यासही पत्र लिहिलें असे, तरा राजश्रास विनती करून निशाणाचा पटका व ढाल-तरवार व पड्दळें लौकर पाठवून देणे निशाण यावयाचा सांप्रदाय असल्यास निशाण तयार करून पाठविणें पटका न पाठविणें पेशवाईच्यीं वस्त्र देते समयींच हें देत असतात असें असता का राहिलें ? या उपर चागला मुहूर्त पाहून घेऊन पा॰ जाणिजे छ ५ जिल्हेज आज्ञाप्रमाण लेखन सीमा

---

ले २४४ } {आषाढ बा ८ श १७०१
[ २३० ] } {ता ७—७—१७७९

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनति उपरि हैदरखानाकडील एक कारकून व पाच सात जोड्या हरकाऱ्याच्या राजश्री पाटीलबावाकडे जाण्याकरिता आल्या आहेत त्याणी तेथे जाऊन हैदरखानाकडे यातमी वरचेवर लिहून पाठवीत जावी याकारिता हैदरखानानें पाठविलें त्याणीं दस्तक येथील मागितलें तेंही दिलें तो कारकून व हरकारे पाटीलबावाच्या लष्करात येतील, राहुटीराहुटीस घरोघर फिरतील, कोण काय बोलतो, मसल्त कशी हें सविस्तर पाहून व बारीक शोध करून वरचेवर बातमी लिहून कळवितील, याकरिता त्याचा बदोबस्त असावा तेथलि दरबारची रीत तुम्हास माहित आहेच ज्यानें जसें पाहिजे तसे बोलावें बाहेरल्यास याचा अर्थ आतील काय समजतो ? बातमीदाराच्या लिहिल्यावरून हैदरखान भलतेच तर्क काढतील याकारिता उत्तम पक्ष तर कारकून व हरकाऱ्यास एक जागा नेमून यावी आणि ताकीद करावी कीं, शिधापाणी मात्र बाजारातून आणित जावें, वरकड कोणी कोठें जाऊ नये, फिरू नये, दरबारास बोलावू पाठवावें तेव्हा कारकुनानें येत जावें, तेही खाशाशीं अथवा भाईशीं बोलत जावें याप्रमाणें करून पाच सात माणसें त्या जवळ इतबारी ठेवावीं त्याणीं याप्रमाणें राखीत

जावे हें उत्तम अथवा, आपल्या दरबारचाच सारा बदोबस्त चागला करून रहातील तेथे राहूत, जातील तेथे जाऊत हा एक पक्ष, परतु हा पक्ष घडावयाचा नाहीं वर लिहिला हा पक्ष घडावा याप्रमाणे राजश्री पाटीलबाबास सूचना करावी येथें हैदरखानाचे वकील आहेत याशीं पाटीलबावाकडील दाब व मसलतीची अगेजणीं व एकत्व हेंच भाव बोलण्यात येतात तुम्हास कळावे म्हणोन लिहिलें आहे येथील दुसरा अर्थच नाहीं, तेथें ही लिहिल्या अन्वयें करावे छ २२ जमादिलाखर हे विनति पौ छ १२ रजब सुरुसन समानीन मुक्काम वा पचावली सडी स्वारी

---

ले २४५ [९०] — श १७०१ अधिक श्रावण व ता ५-८-१७७९

श्री

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री कृष्णराव बळवंतराव स्वामा गोसावी यासि--

पौ माधवराव नारायण प्रधान नमस्कार विनती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें विशेष —भुजापा शिराळकर वाणी वा मौजे कुरडु पें॥——यांणीं मौजे मारची कमावीस रा॥ जगपतराव निंबाळकर याजकडून केली होती, त्यास वाणी मा॥राने काहीं अन्याय केला स॥ त्याजला न्यावयाबद्दल भागानगराहून नबाबाकडून सजावल आले त्यास वाणी मा॥र मौजे मजकुराहून पळोन जाऊन का॥ वेम येथें राहिला आहे, म्हणोन हुजूर विदित जाहालें त्याजवरून हें पत्र सादर केलें असे तरि तुम्ही आपले कडील का दारास ताकीद करून का॥मा॥री सजावल येतील त्यांचे स्वाधीन वाणी मा॥स करून कबज घेणें जाणिजे छ ११ रजब सु॥ समानीन मया व अल्फ बहुत काय लिहिणें हें विनती

---

ले २४६ [४२८] — श १७०१ भाद्रपद व ८ ता ३-१०-१७७९

श्री

सन ११८९ फसली सन १७७९ इ० तालीक फेरिस्त न ९

श्रीमन्महाराज राजश्री छत्रपति स्वामींचे सेवेशी

बाळाजी बाजीराव व सदाशिव चिमणाजी याणीं लिहून दिला करारनामा ऐसाजे सन इहिदे आर्बैन रौद्रीनामसवत्सरे

सातान्यास तर्थिस्वरूप शाहू महाराज राज्य करीत होते त्याजमुळें वारणेचा तह जहाला होता त्यासि तर्थिस्वरूप शाहू महाराज यांणीं कैलासवास केला त्याच्या पोटीं संतान नाहीं तेव्हां तें राज्य स्वामींचें आणि एकछत्री शिक्का महाराजाचा चालावा

शाहू महाराज असते समयीं किल्ले सातारच्या मुक्कामीं सेवकानीं विनती केली होती जे, शाहू महाराज याचा जीवात्मा आहे तों बाह्यात्कारी त्याचे, सेवक अतर्यामीं स्वामींचे

शाहू महाराज यांणीं कैलासवास केल्यावर दोहीं राज्यावर स्वामींची आणि आम्ही सेवक स्वामींचे, स्वामींच्या आज्ञे प्रमाणे वर्तणूक करू अशी शफत दिली होती, त्याच प्रमाणें दोन्ही राज्यें एक करून एकछत्री स्वामीचा शिक्का चालावा आणि आम्ही शाहू महाराज याचे कारकीर्दी प्रमाणें सेवा करून असावें हें प्रमाण यासि अंतर करणार नाहीं कलम १

वारणे आलीकडे तुगभद्रा पावेतों खाजगी प्रांत करून महाराजास द्यावा

वारणे पासून तुगभद्रे पावेतों गड, कोट, किल्ले, ठाणीं दरोबस्त खासगीस करून देऊ

सातान्यास राजधानीचा खर्च व खासगी खर्चास सरजाम महाराजाकडे द्यावा

शाहू महाराज याच्या कारकीर्दी प्रमाणें देऊन वर्तणूक करूं

स्वामींच्या सनिध लहान मोठे सेवक सेवा करून होते त्यास त्याच्या योग्यते प्रमाणें चालवावें

योग्यतेनुरूप स्वामींच्या आज्ञे प्रमाणें चालवू

हुजूरच्या सनदेनें लोकास गाव इनाम व वतनें दिलीं तीं चालवावीं अंतर करूं नये

स्वामींनीं कृपाळू होऊन ज्यास इनाम गाव व वतनें जीं दिलीं असतील तीं आज्ञे प्रमाणें चालवू

सस्थान बिदनूर व सोंधें व अतरूज व सावनूर येथील चवथाई व तोफेचा ऐवज सरकारांत द्यावा

पावत आल्या प्रमाणें ऐवज पावता होईल आणि स्वामींच्या आज्ञे प्रमाणें निर्वेधपणें होई तसें करूं

स्वामीत व तुम्हात किमपि पडदा नसावा

स्वामींनीं जें केलें तें तुम्हीं परिणामास नेऊन स्वामींच्या लक्षानुरूप चालून प्राजळ रीतीनें स्वामाच्या सेवेसीं सादर असावें

स्वामींची सेवा एकनिष्ठेनें करून स्वामी आज्ञा करतील तदनरूप आज्ञे प्रमाणें मनोदयानुरूप वर्तणूक करू स्वामीचरणीं द्वैतभाव किमपि न धरू

शिंदे, नरगुंदे व पतके पूर्वी हुजूर पागेचे सरदार सरजाम सुद्धा पूर्ववत प्रमाणें स्वामाच्या हुजुरातीस सेवा त्याणीं करावी त्याच्या सर जामाचा व पागेचा फडशा हुजूर होणें तो होत असावा

स्वामाच्या आज्ञे प्रमाणें त्याचे हातून वर्तणूक होय ऐशी करून देऊ आज्ञे प्रमाणें त्याच्या हातून वर्तणूक न होय तरि त्याजकडील सरजाम गड, कोट, किल्ले, ठाणी सरकारात घेऊन देऊ

सरदेशमुखी व बाजे वतनें जा सरकार तालुक्यास आहेत तीं सरकारात असावा

शाहूमहाराजाच्या कारकीर्दी प्रमाणे सरकारात चालवू

स्वामींकडे किल्ले हुजुरातीस आहेत त्याचे सरजाम पूर्वील वहिवाटी प्रमाणें किल्याच्या तनख्यास किल्याकडे सुधामत चालावे

पूर्वील भोगवट्या प्रमाणें निर्वेध चालवू

सरदेश कुळकर्णाचे व इनामगाव चालवावे

आज्ञे प्रमाणें चालवू

आगरे कडील किल्ले व जंजिरे व भुईकोट व पचमहाल जयगडापर्यंत सरकारात यावे

आज्ञे प्रमाणे आगरे कडील किल्ले व जंजिरे व भुईकोट पचमहाल जयगडा पर्यंत दरोबस्त मुलूक घेऊन स्वामींकडे देऊ

एकूण कलमें बारा असत हनराबल कंपनीच्या तर्फेनें मिस्तर राबर्ट इनशा आला

त्याणें विनति केली त्याजवरून जनरल व कौन्सिलाची खातरजमा पटावी याजबद्दल अस्सल तहनामा किते तक पन्हाळ्यास आहेत त्याजवरून बजिन्सम नक्कल शिक्यानिशीं करून दिली असे सुरुसन समानीन मय्या व अल्फ छ २९ माहे रमजान( सन १७८० इसवी ) गुजारत दादाजी यादव निसबत इनशा *

---

ले २४७ }
[ ४८३ ] }

{श १७०१ अधिक शु १९
{ता २९-१०-१७७९

श्री

रवाना छ ९ सवाल सन समानीन

सरकारचा व तुमचा तहाचा ठराव महादजीराव शिंदे व रावरास्ते व कृष्णराव बल्लाळ याचे मार्फत नरसिंगराव तुम्हाकडील वकील यासि बोलोन जाला त्याची याद करार करून आहाद शर्तीनशीं कृष्णराव नारायण व शिंदे याजकडाल गृहस्थ व रावरास्ते याजकडील गोविंद नारायण व गणेश केशव याजबराबर पाठविली आहे कराराप्रमाणें तुम्हाकडून निभावणींत यावें सरकारातूनही करारबमोजीब अमलात येईल म्हणोन हैदर अलीखा बहादूर यास सरकारचें पत्र सरकारचा तुमचा सलुख जाला इत पर दुसरा विचार नाहीं [ पहा तह व करारमदार पृ ८५ ]

---

ले २४८ }
[ ४९९ ] }

{ मार्गशीर्ष श १७०१
{ डिसेंबर १७७९

श्री

बातशाही मुलुख बंगाला इंग्रजानीं आपले तशरूफात आणिला आहे त्यास तो मुलुख कुशाद व मैदान, वसाहत मोठी, त्या प्रांता भोंसले याणीं पचवीस हजार फौजेनशीं जाऊन मुलुख मारून ताराज करावा या बरहुकूम नेमणूक केली त्याबमोजिब खंडोजी भोंसले दसऱ्याची साआलत करार करून निघोन फौज जमा करण्यास घाटा खालीं आले बहुतकरून जमाव जाला बाकीचाही जमाव जलद होऊन बंगाल्याचे जिल्हात भोंसले रवाना होतील दक्षणचे सर्व साहेब-रियासत याचा एका जाला हे कैफियत कर्नल गाडर सुरतेस आहेत त्यास थोडीशी माळुम होताच बायकदिगर मनसबा करू लागले का, मसलहत भारी पडली, तदबिरीच्या मुशाकिलींत येऊन मनसब्याकरिता मुमईस आले मुमईकर जनरलाचें व गाडर मशारनिले याचें कौंसल होऊन कलकत्यास पत्रें गेलीं कर्नल गाडर याणा मुमईतील दोन तीन हजार जमाव करून फिरोन

---

*नकल १७७९ ची असली तरी प्रथमचा करार १७४१ त ठरून तो शाहूचे मृत्युनंतर १७५० चे सुमारें कोल्हापुरकर संभाजीस पेशव्यानीं लिहून दिला असावा त्याची नक्कल पुढें स १७७९ त रुजू झाली हा कागद ले २४९ चा उत्तर भाग असावा हा लेख मोडकरून कोल्हापूर इतिहासांत छापला आहे

छ २६ जिलकादा सुरतेस जमा सुद्धा पोंचले आइदे चाल कोणती सुरू करतील तें पहावे. सरकारच्या फौजा व जिनशी व सरदार शिंदे होळकर सर्व तयारी आहे लेकिन इंग्र-जाचीं या प्रातें बदरें दोन, एक सुरत व ममई खुष्कींत काहीं त्याचा मुलुख नाही आजीं सबब इग्रजानीं बदर बाहेर निघावें इतकी इतजारी आहे अगर तसेच बदरात दम धरून रहातील याजकरिता दहा हजार फौज सुरत प्रातीं रवाना केली, त्याणीं आसपास हगाम करून त्यास तग करावें जमाव थोडा ऐसें समजोन चालून येताल दोन चार मजली भुलावा देऊन मैदानात आणावें बाद सरदार वगैरे सर्व तयारच आहेत फत्तेसिंगराव गायकवाडही त्या प्राती दहा पधरा हजार फौजेनशा आहेत खुलस हाच की, सरकारचा गुता हरगीज तयारीचा राहिला नाहीं तर्फेनची मस लहत एक कच्चें पक्कें पैदरपै मालुम व्हावें म्हणोन कलमी केलें असे आ साहेबाकडील ही कैफियत कलमी करात जावी मरातब कृष्णराव व गोविंदराव नारायण कलमी केलें त्यावरून जाहीर होईल म्हणोन हैदरअलीखा बहादूर यास नानाचें पत्र

---

ले २४९ [ ४२९ ] — श १७०१ सन १७७९

श्री

सन ११८९ फसली सन १७७९ इसवी १ फे॰ नबर १४

यादी सुरुसन समानीन मय्या व अलफ*

१ किल्ले पन्हाळियासि तक्तसिंहासन केलें नाहीं येथील रहाण्यामुळें तक्ताची जागा असें नामाभिधान पडलें आहे थोरले श्रीमन्महाराज राजश्री शिवराज छत्रपति यांणीं सिंहा-सनारूढ होऊन राज्य केलें कलम १

१ तह जाहला त्यासमयीं प्रथम स्वारी साधारण नाम सवत्सरीं सन इहिदे सल्लासीन माघ-मासीं साताऱ्याहून श्रीमन्महाराज शाहूराजे याजकडून श्रीमन्महाराज राजश्री संभाजीमहा-राज छ॰पति यासि न्यावयास आले व नावनिशी श्रीपतराव प्रतिनिधि व नारोराम मत्री व अबाजी पुरधरे देशब्याचे मुतालिक व कृष्णाजी दाभाडे व निंबाळकर व पाढरे व कित्येक नामानामी सरदार किल्ले पन्हाळियाच्या मुक्कामीं फौज सुद्धा आले श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति साहेबास सर्वत्रानीं नजरा व दुस्त व जडजडाव जवाहीर, हत्ती, घोडे नजर करून सल्के करून जोहार केले त्या उपरि पद्धतीप्रमाणें चादरा त्यासि देऊन विडे होऊन ते किल्ले खालीं उतरले उपरातिक महाराज स्वामींचीं स्वारी किल्ल्याखालीं होऊन देवाळें नावली येथें मुक्काम जाहाला तेथून कूचदरकूच जाऊन वाठारावरी मुक्काम केला शाहूराजे उमरजेवरी होते श्रीपतराव व नारोराम मत्री वाठाराहून पुढें उमरजेस गेले आणि

---

* नक्कल पुढें सन १७७९ त रुजू झाली तरी मूळ कागद इहिदे आर्बैनचा म्ह॰ १७४१ चा आहे हा कागद ले २४६ चा प्रथम भाग असावा

शाहूराजे यासह कऱ्हाडा पुढे जखीणवाडीच्या नजीक माळावरी घेऊन आले त्याज बरोबर सपूर्ण सरकारकून व नामीनामी सरदार वगैरे फौजा लक्ष पावेतो जखीणवाडीहून रावताची कोरगिरी वाठारा पावेतों म्हणता दोन्ही सैन्यें मिळून दोन लक्षपयत जय जहाला श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति सोन्याच्या अंबारीत स्वार होऊन समागमे सरकारकून व सरदार व नामीनामी खासे सरदार दहापाच हजारपर्यंत होते कोरगिरींतून मुजरे घेत स्वारी जहाली श्रीमन्महाराज उभयता बाणाचे खास्तीवरी उभे राहून मध्ये लोक फरक करून बनवा टाकिल्या नामीनामी लोकानिशीं शाहूमहाराज घोड्यावरा स्वार होऊन आले श्रीमन्महाराज राजश्री संभाजा महाराज छत्रपतींची स्वारी हत्तीवरी होती, ते घोड्यावरी स्वार होऊन बनवा बिछावल्या होत्या तेथें येऊन उभयता महाराज घोड्यावरून उतरले परस्पर सनिध येऊन ऐक्यता होऊन शाहूमहाराज याच्या पायावरि डोई श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति याणीं ठेविली महाराजानीं परस्परें उभयता बधूनीं आलिंगनें केलीं, त्या वेळेस मोहरा व रुपये व सोन्याचा फुलें रुप्याची फुले परस्पर सत्के जहाले त्या समयीं तोफेची सरबत्ती व नानाप्रकारचा वाद्यें व शहाजानें वाजवून आनद जाहला फाल्गुन शुद्ध ३ तृतीया मदवारीं दोन प्रहरा याप्रमाणे भेटीचा समारंभ जाहला तदनतर शाहूमहाराज याणा श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति याचा हात धरून उभयता बधू एक अंबारीमध्यें हत्तीवर स्वार झाले खवासखान्यात दोन मोर्चले घेऊन संभूसिंग जाधवराव बसले सपूर्ण फौजेच्या कोरगिरीमध्यें जोहार घेत कऱ्हाडापर्यंत गेले कऱ्हाडा नजीक कृष्णातीरीं मुक्काम जाहला दक्षिणतीरीं श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपतींचा मुक्काम, उत्तर भागा श्रीमन्महाराज राजश्री शाहूराजाचा मुक्काम होता, त्या डेऱ्यापर्यंत उभयता महाराज गेले त्या वेळेस शाहूमहाराज याची ज्या हत्तीवर स्वारी होती त्या हत्तीस व दुसऱ्या हत्तीस व दोन रगविलेले घोडे एक रुप्याच्या जिनाचा व एक जरीबादली जिनाचा व दुस्तबादली व जडजवाहीर व ढाल्तलवार याप्रमाण देऊन श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति नदी आलीकडे आपल्या डेऱ्याच्या मुक्कामास आले कऱ्हाडहून उमरजेस उभयता बधू महाराजाची सडी स्वारी जहाली, त्याणीं श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपतीस हजार रुपये सत्का करून बादली दुस्त व जडजवाहीर व हत्ती व रगविलेले घोडे बादली जिनाचे दिले शाहूमहाराजाच्या आग्रहानें उभयता ऐक्यता असून साताऱ्यासि शिमगी पौर्णिमा व्हावी म्हणून ममतायुक्त बोलून श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति यासि घेऊन सातारियासि गेले, त्यासमयीं सपूर्ण शहरचे लोक बाहेर येऊन उभयता बधूचा समारभ पाहून सत्के व खैरात बहूत झाली, आणि साताऱ्यात पेशव्याच्या वाड्यात मुक्काम जहाला दोन महिने मुक्काम होता सपूर्ण सरकारकडून व नामीनामी सरदार याणीं श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज यांसि मेजवानी केली नऊ हत्ती व चाळीस घोडे व जडजवाहीर व दुस्त असे बहुमान आले शाहूमहाराज यांणीं रवानगी समयी हत्ती व रंगविलेले घोडे सामान सुद्धा व ढालतरवार व

जडावाचा खजीर व दुस्तबादली दिली, व रोख दोन लक्ष रुपये दिले, आणि रवानगी केली बरोबर सरकारकून फत्तेसिंग भोसले फौजेनिशा देऊन श्रीमन्महाराज याची स्वारी पन्हाळियासि पावती केली शाहूमहाराज चार कोस घालवीत येऊन माघारे सातारियासि गेले त्या वेळेस तहनामा जहाला त्याची यादी अलाहिदा असे कलम

१ आनद नामसवत्सरे सन खमस सल्लासनि साला श्रीमन्महाराज राजश्री सभाजी महाराज छत्रपति व श्रीमन्महाराज सकळ सौभाग्यादि सपन्न मातुश्री जिजाबाई साहेब याची स्वारी आदीं जेजूरीस जहाली तेथून सेनरीस मुक्काम जहाला प्रतापगडास स्वारी तेथून जहाली श्रीचें दर्शन घेऊन सप्तरात्र मुक्काम तेथें होता तदनतर कूच होऊन महाबळेश्वरा सात दिवस मुक्काम होता तेथून स्वारी सातारियासि जहाली ते समयीं शाहू महाराज व समस्त सरदार व सर कारकून समवेत वेदनदी पर्यंत सामोरे येऊन उभयता महाराजाच्या भेटी होऊन सातारियासि जाऊन श्रीमन्महाराज राजश्री सभाजी महाराज छत्रपति व श्रीमन्महाराज सकळ सौभाग्यादि सपन्न मातुश्री जिजाबाईसाहेब याचा मुक्काम प्रधान पताच्या वाड्यात जहाला दोन महिने मुक्काम तेथें होता उपरात महाराज व श्रीमन्महाराज सकळ सौभाग्यादि सपन्न मातुश्री जिजाबाई साहेब याची स्वारी श्रीशिखरास दर्शनास जहाली महादेवा पर्यंत शाहू राजे महाराज याची स्वारी जहाली होती, तेथून कूच करून निघाले नंतर शाहू महाराज कृष्णातीर नजीक बोरगाव येथपर्यंत सामादिक सहवर्तमान [ आले ] श्रीमन्महाराज राजश्री सभाजी महाराज छत्रपति श्रीमन्महाराज सकळ सौभाग्यादि सपन्न मातुश्री जिजाबाई साहेब स्वारी करवीरास जहाली मग शाहू महाराज याची स्वारी बोरगावाहून सातारियास जहाली कलम

१ इहिदे आर्बैन रौद्रीनामसवत्सरे श्रीमन्महाराज राजश्री सभाजी महाराज छत्रपति व श्रीमन्महाराज सकळ सौभाग्यादि सपन्न मातुश्री जिजाबाईसाहेब याची स्वारी सातारियासि जहाली ते समयीं पाली पर्यंत श्रीपतराव व बाळाजी पडित व सदाशिव चिमणाजी व जनार्दन बाजीराव असे पुढें आले महाराजाची स्वारी पुढें होती तेथें पडित मशारनिल्हे याणीं दर्शनें घेऊन जोहार केले उपरात चादरा देऊन बहुमान केले तदनतर महाराजाची आज्ञा घेऊन श्रीमन्महाराज सकळ सौभाग्यादि सपन्न मातुश्री जिजाबाईसाहेब याच्या जोहारास आले ते समयीं बराबर चादरा दोन होत्या त्या आदीं श्रीपतराव याच्या आगावरी चादर घालते समयीं त्याणीं अर्ज केला जे, "हीं मुलें आहेत त्यासि चादरा आदी घाव्या, उपरात आम्ही म्हातारे आहोंच त्या उपरी त्रिवर्गापैकीं दोघास चादरा दोन व शेला एक या प्रमाणें दिलें उपरात श्रीपतराव यासि दिले याणीं पुढें स्वारी जहाली तेव्हा निमपाळीपर्यंत शाहू महाराज सामादिकसह

ले २५० }
[२४१] }

{ पौष श १७०१
{ जानेवारी १७८०

श्री

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेशी

विनंती सेवक त्रिंबकराव आपाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐशीजे, येथील कुशल तागाईत पौष शुद्ध पर्यंत मुक्काम श्रीरंगपट्टण, स्वामींचे दयावलोकने करून यथास्थित असे या नंतरि स्वामींना कृपा पत्रें राजश्री कृष्णराव तात्यास[2] व राजश्री गणपतराव केशव यास व सेवकास पाठविलीं तीं छ ५ जमादिलोवलेस पावून बहुत हर्ष जाहला सविस्तर वर्तमान गुजराथ प्रांताकडील वगैरे वर्तमान लिहिले तें कळलें बहुत समाधान पाहून पत्रान्वयें स्वामीआज्ञेप्रमाणें तेच दिवशीं दरबारास जाऊन हजरत नबाबसाहेब यास सर्व मजकूर राजश्री तात्या आदि सर्वत्रांहीं विदित करून नबाबसाहेब याणीं अति प्रीति करून उत्तर प्रत्योत्तरें झालीं, तीं राजश्री, कृष्णराव तात्या जोशी याणीं तपशिलवार विनंति सेवेशीं लिहिली आहे त्याजवरून विदित होईल राजश्री, पाटीलबावाकडील पत्रेंही सत्वर येतील येथे दाखल होता क्षणींच नबाब बहादूर याजकडे रवाना करितों म्हणोन आज्ञा केली, तर फार उत्तम आहे अत पर हजरतांहीं खेमे दाखल होण्यास मुहूर्त विचारणा करविली आहे आर्काट प्रांताचे सरहद्देस मिरअलरिजाखा याणीं धामधूम सुरू केल्याचें वर्तमान तात्याचे पत्रावरून श्रवण होईल हजरताचे मुहूर्त एक दोन विचारले ते रहित जाहाले कारण पेशजी सेवेशीं विज्ञप्तिपत्रें लिहितच गेलों, परतु आता हीं पत्रें आलीं येणें करून सर्व संशयानिवृत्ती जाहली एतन्निमित्त आताचा मुहूर्त निश्चयात्मकच सिद्धीस पावेल सेवेशीं श्रुत होय विशेष काय लिहावें कृपा लाभाची वृद्धि व्हावी हे विज्ञापना पौ छ २१ जमादिलावल समानीन ह॥ अर्जी[1] हैदरखान

---

ले २५१ }
[४२६] }

{ श १७०२ चैत्र व १
{ ता १९-४-१७८०

श्री

निशानबुल इमकान नबाब बहादर रोजे अफजूआद

छ दौलत व एकबाल पन्हाहा इजलाल दस्तगाह आजिजानीब सादिकूल एखलास यशवंतराव शिंदे सरसुभेदार बाआदज इबराज मरातीब एखलास मशहूर जमीर लुत्फत खमीर गर्दानिद मैआयद के दरिवीला आयकबल पन्हहानीं खत खुष नमत मिरसूल केलें तें नेक वक्ता पोहचून कलमी केला मजमून बयादवार मालूम होऊन बिशयार खुष वक्तीं हांसील जहाली आयकबल पन्हहाचें येणें या जिल्ह्यास अनकरीब भारी फौज व तोफखाना सुद्धा व्हावें व

---

१ नानाचा कारकून हैदराजवळ याचीं आणखी पत्रें पुढें येतील

२ कृष्णाजी नारायण जोशी हैदराकडे वकिलीस पाठविण्यात आला होता

फौजेच्या खर्चाबद्दल ऐवज जलदीन येऊन पोहचावा ? बईसबब पेंदरपे तीर्थस्वरूपे महाराज मातुश्री व महाराजानीं वनीसाहेबाना कलमी करून पाठवीत असता, नवाब बासवानिविस्तुबुदैक येथून भारी फौज रवाना करून पाठविली असे व आयक्बल पन्हाहाची तयारी करविली असता मोहरमचा आशुरा नजदीक पोहचला बईसबब तहकूब जहाला इनशाह आल्ला–हुता आलाबाद आशुरा कूच करून अनकराव या जिल्यास येत असों ऐवज घेऊन जावयाबद्दल एथून इतबारी मजाम रहावाट जाणणारे दोनशे सवार बकापुरास पाठवून यावे म्हणून कलम केल्यावरून श्रीमन्महाराज वनासाहेबास खुशाली बखुशाली रयनाद जहाली अशास आशुरा खतम होताच आयक्बल पन्हाहानीं भारा फौज व तोफखाना सुद्धा खुद कूच दरकूच जलदीने निघून बकापुरास यावयाचें करारे अज्जम बाजीराव बखे याजकडे कित्येक पोषीश मसलतीच्या मजमूना वास्ते अज्जम राघो विठ्ठल यास फिरस्ताद केले असत या हमराह दोनशे सवार देऊन पाठविले असत तरी तेथे येऊन पोहचताच जुदतर खर्चाची मदत इमदाद पोक्ता ऐवज देऊन रवाना करून पाठवावे मसलतीचा वक्त हाच आहे आशात आयक्बल पन्हहाना ब=फौज येऊन पोहोंचाये हुजूरचे फौजेचा जय आहे हरदु इतिफाकेकडून फितुरीयास तबीह पोहचवून दिलखवाह मतलब हाशाल होतील बारशीचे रोज नजीक न पोंहचले तो आयक्बल पन्हहाचे येणे होऊन मसलत हाशील होई तो अर्थ करावा हरएक बाबे आपली खातरजमा बक्रार राखून यावयाविषयाची अंदेशा खातरेत न आणता खुद आयक्बल पन्हहाना या जिल्यास तसरीफ फर्मावारी जियादय बजुशीस्चे निगास्त आयद आयाम कामरानी मुहामगाद

---

ले २५३ ) [ ८०७ ] }

{श १७०१ चैत्र व १
{ता १९–४–१७८०

श्री

सन ११८९ फसली सन १७७९ इसवी तालिकेचा नकल फेरिस्त नं० १

यादी श्रीमन्महाराज राजश्री छत्रपती स्वामींचे शेवेसा करार होऊन यावे

प्रांत हुकेरी तालुका व मनोळी तालुका व फुटगाव व प्रांत कागल व रायबाग प्रांत पेशजी चालल्याप्रमाणें चालावे मध्ये सांगणाराच्या गोष्टीवरून विपर्यास पडला पुढे होणार नाहीं याप्रमाणे करार करून शफतपूर्वक पत्रें यावा कलम १

तालुका मनोळा येथील सरकार अमल वगैरे फुटगाव व मुकासाबाब व स्वाडफर्मी व कमतकटे वगैरे अमल चालत आला त्याप्रमाणें हुजूर यावे आलीकडे सावनूरकर नबाब व हैदर नबाब व नवलगुदकर देसाई व कितूरकर देसाइ याजकडे ठाणा व गाव वगैरे अम्मल व बाब ज्या ज्याकडे असताल त्या हुजूर सोडून याव्या कलम १

हुकेरी तालुका झाडून जराबाजरा यावा ज्या ज्याजकडे ठाणा व गाव व बाबा ज्या असनाल त्यातील न राहता झाडून हुजूर यावे कलम १

प्रांत रायबाग झाडून जरा बाजरा हुजूर यावा ज्या ज्याकडे ठाणा व गाव वगैरे

बाकी ज्या असतील त्यातील काहीं न राहता झाडून हुजूर याव कलम १

प्रांत कागल झाडून जराबाजरा हुजूर यावा ज्या ज्याकडे ठाणा व गाव वगैरे बाबा ज्या असतील त्यातील काहा न राहता झाडून हुजूर यावें कलम १

फुटगाव वगैरे फुटगाव झाडून जराबाजरा हुजूर यावे, ज्या ज्याकडे ठाणा व गाव असतील त्यातील काहीं न राहता झाडून हुजूर यावे कलम १

हुजुरून बोली करिता प्रधान पताकडे आज्ञा करून ज्या ज्यास पाठविले त्याणीं सदर्हू तालुक्यातील गाव घेतले असतील ते झाडेनिशा हुजूर यावे कलम १

स्वामाच्या पायाशीं कोणी अमर्याद वर्तणूक केली तरी स्वामाच्या आज्ञे प्रमाणे तुम्हा त्यास शिक्षा करून स्वामींच्या आज्ञेत वर्तणूक करीत असे करावे कलम १

देशक व देशपाडे, पाटील कुलकर्णीं वगैरे वतनदार व इनामदार व सरजामी वगैरे स्वामींच्या राज्यातील तुम्हाकडे व तुम्हाकडील तालुकेदाराकडे कोणी आल्यास इनसाफा विषयां व हरएक विषयीं पक्षपात न करिता स्वामींच्या सेवेशीं पाठवून याव कलम १

जरीपटके व दोन हत्ती हुजुरून नेले आहेत ते हुजूर यावे कलम १

स्वामींमध्यें व तुम्हाम ये हरकोणी विपर्यास वारवार पाडतात येविषया शफतपूर्वक विपर्यास न येई असे करावे कलम १

भगवतपत व शेषोपत याणा हुजूरचीं आज्ञापत्रे नेला ता व प्रधानपताकडील उभय ताकडे आहेत तीं व रामचंद्र महादेव, बाळाजी केशव याजकडे गोपाळभट याच्या विद्यमाने हुजूरचीं आज्ञापत्रें व सावकारी पत्र व मनोळीच्या सनदा व दरम्यानगिरीचीं पत्रे व सनदा आहेत तीं व आप्पाजी श्यामजी व महादेव भट याच्या विद्यमानें सावकारी पत्र व हुजूरचीं आज्ञापत्रें आहेत व प्रधानपताकडील कराराचा पत्र आहेत तीं हुजूर यावा

कलम १

स्वामीकडील जजिऱ्याचे व जजिरे निसबतचे आरमार व किल्लेकोट यास तुम्हांकडून व तुम्हाकडील तालुकदाराकडून हरएक विषया उपसर्ग होऊ नये

तालुके विजयदुर्गाकडील ऐवज बाळाजीपंत याणीं करार केला आहे त्याप्रमाणे सरकारात यावे कलम १

कराराप्रमाणें इनामपत्रें राजश्री प्रधानपत व बाळाजी जनार्दन याची स्वामींचे सेवेसीं यावीं कलम १

सरजामी व देशमुख व देशपाडे व इनामदार याजकडून ऐवज इसनेसितैनात व सन अर्बासितैन सालीं नजरे दाखल ऐवज देतला असेल त्याप्रमाणे ऐवज हुजूर यावा व त्याणीं खयात केली असेल तोही ऐवज हुजूर यावा येविषयीं तुम्हांकडून त्याशीं ताकिदी निष्ठुर असाव्या तुम्हांकडून दिक्कत नसावी कलम १

करवीरावरी महादजी शिंदे आले ते समयीं करारदाराच्या यादी व सरकारचीं पत्रें व कागदपत्र कतबे अकरा लक्षाचा कतबा झाडून माघारे यावे कलम १

साळशी महालाकडे जजिरे सिंधुदुर्गाकडील ऐवज चालत आहे त्याप्रमाणे जजिऱ्या कडे चालावे कलम १

मालदरसाल स्वामीचे सेवेसी नजरदुस्त व जवाहीर व हत्ती घोडे सेवेसी पाठवीत असावीं कलम १

राजश्री यशवतराव सिंदे सेनासाहेब सुभा सरसुभेदार हे स्वामीच्या आज्ञेनरूप सेवा करितात आणि स्वामींचा अखत्यार त्याजवरि याकरिता त्याशीं तुमची निखालसता असून उभयपक्षा ऐक्यरूप असावें कलम १

आजपावेतों भगवत आप्पाजी व दे.षो नारायण व रामचद्र महादेव व बाळाजी केशव व आपाजी श्यामजी व महादेव भट याणीं गैरवाका हूजूर विंनती करून तुम्हास हुजूरचा गैरवाका समजावून देऊन राज्याची खराबी केली आणि तुम्हाशा विपर्यास घातला, याजमुळें राज्याची खराबी जहाली त्याचा दिनावा त्याणीं भरून द्यावा लागेल कलम १

राजमडळाचे सेवक व वतनदार याशा तुम्ही आश्रय देऊन त्याचा पक्षपात न धरावा आणि त्याणा सरकारात रुजू असून आज्ञेनरूप सेवा करावी कलम १

सोंदे बिदनूर वगैरे संस्थानें कर्नाटक प्रांतीचीं आहेत, तेथील ऐवज पेशजीच्या करा राप्रमाणें हुजूर यावा कलम १

पत्रें तुम्हाकडील लागतील तीं आज्ञेप्रमाणें द्यावीं कलम १

सरकार तर्फेचे सेवक असता सरकारात राहून गैरवर्तणूक केलिया स्वामी आज्ञा करताल त्याप्रमाणे तुम्हांकडून तोफा व फौज स्वामीच्या सेवेसीं यावा स्वामी त्यासि शिक्षा करतील कलम १

बारा पतके पूर्वीपासून सरकारचे सेवक याचे पूर्वीपासून सरकारचे सरजाम होते ते देऊन त्याणीं हुजूर रुजू असून सेवा करावी कलम १

मनोळी ताळुक्यातील देशमुख व देशपाडे वगैरे वतनदार याजकडे सरकारच्या सनदा व्यतिरिक्त जे गाव असतील ते सरकारात यावे कलम १

बाळाजी पडित प्रधान याच्या स्वदस्तुरची यादी पुण्यास कैलासवासी तीर्थरूप मातुश्री आईसाहेब याची स्वारी जहाली ते समया व करवीरास कैलासवासी तीर्थरूप आबासाहेब याच्या सेवेसीं बाळाजी पडित प्रधान आले त्या समयीं त्याणीं यादी व विनतीपत्रें दे.षो नारायण व भगवत आपाजी याच्या विद्यमानें दिलीं आहेत त्यास अतर करू नये कलम १

किरकोळ वतनदारी स्वामींच्या राज्यातील जे असतील ते स्वामीकडे पाठवून द्यावे कलम १

हणमत शिवराम व भिकाजी नरसिंह व घन शाम यशवत त्या बरोबरचे कारकून व मराठे व मनुष्यें तुम्हाकडे असतील तीं हुजूर पाठविणें कलम १

शक्त स्वामीसी महाराजापासून सावकारा तराडी सावकारीस जातात त्याचा कौल जिन्नरे सिवुट्गारुन घेऊन जात असतात, हल्लीं तुम्हाकडील अमलदार दिकत घेऊन कौलावणीचा पैरव सुरामत चालू देत नाहात, त्यास ताकीद करून पूर्ववतप्रमाणें कौलावण चालावा ते न जहाल्यास ऐवज जिकडे राहील तिकडून घ्यावा लागेल कलम १

तुकेरा व हुकेरा तालुक्यातील गावठाणा याणा व मनोळीच्या ठाण्यातील व घोडीं, गुरे व गाल्गोळा जेनाहाला व रेचले व दागदागाने वगैरे दास्तान शेषो नारायण व भग वत आपाना व रामचंद्र महादेव व बाळाजी केशव व आपाजी श्यामजी याजकडून सदर्हु लिहिल्याप्रमाणें दोन्ही तालुक्यांतील जखिरा सामान हुजूर यावें कलम १

हुकेरा प्रांतातील देसाई याजकडे पेशजी भोगवटे विरहीत काटकाईमुळे गाव अनु भवीत आले आहेत ते गाव देहे आठ हुजूर यावे व पर्वीबद्दल ऐवज त्याजकडून यावा देसाई मजकूर याचा कारभार ज्याणा ज्याणा केला असेल त्याणीं पैवस्तीबद्दल ऐवज हुजूर ऐवज यावा कलम १

पेशजी ठाणा व गावे घेतला ता व गुदस्ता ठाणा व गावे घेतला व सालमजकुरीं ठाणा व गाव घतला आहेत ती गावे, व ठाणा हुजूर यावा आणि त्या पैवस्तीबद्दल वसूल हुजूर यावा कलम १

सरकारचा ठाणा व गावे आलीकडे घेऊन परभारे ज्यास ज्यास दिलीं असतलि त्याज कडून ठाणा व गावापैका बद्दल ऐवज सदर्हू लिहिल्याप्रमाणें हुजूर यावा

आपाजी श्यामजी याणीं शेषो नारायण याजपासून कागदपत्र घेतले आहेत ते हुजूर यावेत कलम १

सदर्हू हुकेरा तालुका व मनोळी तालुका व रायबाग तालुका व कागल प्रांत व लाट रागोळा सुद्धा पाच घराचे खेडे आदिकरून बिघाभर जमीन न राहता झाडेनिशा हुजूर यावे कलम १

किल्ले तारगळचा गडपरा तालुकदाराकडे व देशकाकडे आहे तीं किल्याची किल्याकडे चालत असावा येविषया देशकास ताकिदी याव्या कलम १

राजश्री परशुराम रामचंद्र व गंगाधरराव भिकाजी व रघुनाथराव निलकंठ व आनंद राव व निंबाजी याचा विनतीपत्रें सदर्हू एकूणचाळीस कलमाची यादी पाठविली याप्रमाणें निभावून नेऊ म्हणून शफतपुर सर पत्रे यावींत कलम १

एकूण कलमें एकूणचाळीस

सदर्हू कलमबंदाचा यादी अस्सल राजश्री बाळाजीराम दिमत लष्कर व मुंजाजी सूर्य वंशी सरनोबत व भुभानजी मुरामकर याजकडे दिली मशारनिल्हे राजश्री परशुराम रामचंद्र व गंगाधरराव रास्ते व आनंदराव व निंबाजी याजकडे लष्करास शिरोळच्या मुक्कामास घेऊन गेले तहाच बोलिस्तव सदरहु तालिकेची नक्कल करवीरचे मुक्कामीं चिटणीसीच्या रूमाला ठेविला तालाक किल्ले पन्हाळ्यास राजश्री बाजीपंत तात्या याजकडे पाठविली छ १० रबिलाखर सन समानेन

ले २८३ }
[ ३०३ ] }

{ श १७०२ चैत्र व ११
{ ता २०-४ १७८०

श्री

राजश्री सदाशिवपत स्वामाचे सेवेशी

विनती उपरि राजश्री पाटीलबावाची बोलणी विक्षेपाचीं तेथे होतात, त्याचा लिहिला लोकाच्या घरा इकडे येतात, तेव्हा इंग्रजाचेही घरा बातमी जात असेलच ही गोष्ट मसलतीस वाईट हे घ्यानात येते कीं नाहा ? रती इतकी दरज पडली असता शत्रूस बळ किती येतें याचा विचार करतात का नाहा ? त्यातही कोठे वाकडे असले तरी थोर आहेत ते वाकडें दाखवीत नाहात मग येथे तर परस्परें भाऊपणा अकृत्रिम वाकडें रतीमात्र नसता, उगेच कोते अदेश माणसाच्या लिहिण्यावरून व सागितल्यावरून निष्कारण विपरीत अर्थ करून बोलावे हें तर फारच विलग दिसतें, व या गोष्टी पासून उमेदही सरये अगर बोलण्यानेंच सतोष होतो तर एकाता तुम्हास बोलावून नेऊन जें बोलण्याचें असेल ते बोलत जावें, दुसऱ्यास कळू नये असें तरी व्हावें एवढे मोठे सरदार मसलतीवर गेले त्यास जेणें करून उपयोग त्याच गोष्टी येथून घडत असता, राजश्री पाटील बावाचीं पत्रें व तुमची पत्रें येतात त्यात एक पत्र तरी जाहिराणा दरबारात सर्वांचे वकील बसले असता वाचून पहावें आणि शत्रू व बाहेरील आहेत त्यास एकत्वाचा व स्नेहाचा ऐकल्यावर दाब पडावा व इष्ट आहेत त्यास गोड वाटावे असें पत्र कधींच येऊन पाहिले नाहा जीं पत्रें येतात त्यात मनात कल्पना नाहींत व न यावयाच्या घेऊन व कित्येक रोषें करून व कित्येक विपरीत अर्थ करून लिहून येतातें तीं एकातीं वाचावा, त्याचे पा न्हे रे उत्तर लिहून तुम्हाकडे पाठवावा, या खालींच दिवस गेले पुढें ईश्वरी इच्छा असेल तसें घडेल होळकराकडील मजकूर पत्रा लिहिता, परतु प्रस्तुत मसलतीचे दिवस, वाटेंत लुटारीही फिरतात, एखादें पत्र त्याकडे गेल्यास तूर्त मसलतीस अपाय, याकरिता पत्र पाठविणें तें तजवीजेनें पाठवींत जावें पाटीलबावाचे पारपत्य जहालें तरी सरकार काम, अशा गोष्टी जेव्हा पाटीलबावाच्या मनात येऊ लागल्या त्या परिहार लिहिता कशा जातील ? ईश्वरच त्याच्या बुद्धीस काय साक्ष देईल ती खरी अशीं विक्षेपाच्या मजकुराचा पत्रे वाटेचे गर्दीमुळें इग्रजाकडे धरलीं गेली अमत्यास काय मनात आणितील याचाही विचार करावा तुम्हाकडून पत्र जासूद घेऊन आला म्हणजे आता लाखोटा फोडण्या पूर्वी चित्तात येतें की काय नवा विक्षेपाचा ग्रथ रचला असेल ? मग फोडून पत्रें पहावी तों तेंच निघते ' बरे आहे ! कितीही वाईट वाटावयाजोगें बोलले व लिहिलें तरि आम्ही चित्तात वाकडें काडाभर आणणार नाहीं व करणार नाहीं यास कारण एक तर आम्ही शुद्ध बुद्धीने पाटीलबावाचे ठाया चालतों दुसरें खावदाचे कार्यावर नजर, मग वाईट कशास वाटेल ? रा। छ ✓ रबिलाखर हे विनती पौ छ १६ जमादिलावल वैशाखमास मुक्काम, वाघोडें [२]

---

[१] सदाशिव दिनकर, महादजी जवळ राहणारा पेशव्याचा हस्तक पत्र नाना फडणिसाचे २ वाघोडिया, बडोद्याच्या पूर्वेस १० मैलावर गायकवाडी तालुका

प्रातीं दगा मानिला आहे, आणि चेनापट्टण प्रांतीहा दौड पाठवावयाचा तर्तुद जाहली आहे सत्वरच जाणार राजश्री महादजीराव शिंदे याच पत्रही लवकरच येईल नबाब साहेब याना राजश्री कृष्णरावाखेरीज सर्वांस निरोप द्यावयाचा व खासास्वारी ममलतीस निघावयाची, मुहूर्ताचा निश्चय होत आहे नवाबसाहेब याशीं कित्येक बोलणे जाहले याचा विस्तार राजश्री कृष्णराव तात्या याच्या पत्रावरून निवेदन होईल सेवक पदरचा, सेवेस अंतर नाहीं, करणार नाहीं बहुत काय लिहावे कृपा असू द्यावी हे विनंती पै॥ छ १ जमादिलावल समानान बे॥ अर्जी हैदरखान इ० सन १७७९

---

लें २५६]
[२४२]

श १७०२ वैशाख शु १०
ता १५ ५ १७८०

श्री

सेवेशीं गणेश केशव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत वैशाख शुद्ध द्वादशी पावेतो मुक्काम श्रीरंगपट्टण स्वामींचे कृपावलोकने करून क्षेम असो विशेष कृपा करून हजरत नबाब साहेबाचे अर्जी वर छ १९ रबिलाखरचे पत्र पाठविले ते छ ५ जमादिलावलीं प्रविष्ट होऊन संतोष जाहला पत्रीं आज्ञा कीं राजश्री महादजी शिंदे याजकडील निभावणीपत्राचा मात्र गुंता म्हणून लिहिलें त्यास पथ दूर, मार्ग सुरक्षित चालेना, सबब इतके दिवस लागले कालच त्याचीं पत्रें आलीं कीं, आपण पत्र व मसुदा पाठविला तो पावला उदईक मसुद्याप्रमाणें पत्रे लिहून रवाना करितों पत्र थोडके दिवसातच येईल येताच रवाना होईल तें पत्र येण्याची प्रतिक्षा करूं नये, पत्र आले ऐसें मोजून तुम्ही व राजश्री कृष्णराव व नरसिंगराव व नबाब बहादूर याचा खातरजमा करून मसलतीवर दरकूच जाणें घडेल ऐसें व्हावें तुम्ही मत्ळासह कामे उलगडून लवकर यावे सविस्तर राजश्री कृष्णराव यास लिहिले आहे त्यावरून कळेल म्हणोन, ऐसियास हजरत नबाब साहेब० यानीं स्वामींचे वचनाचे लायकीवर श्रीमंतांशा मन पूर्वक स्नेह केला यात किमपि दरज नाहीं इंग्रजास तबी बेजार करावयासी अग्रेसर नबाब साहेब याजकडूनच मसलत ठरली आहे तेव्हां इंग्रजाचे तबीची फिकिर नबाबसाहेब यास पुरता आहे चैत्र व॥ १० चा मुहूर्त देखाल निश्चय केला होता, परतु गुजरायेकडील बाजारी वर्तमान नाना प्रकार बाजारी लोक बोलू लागले व पुणियाचा ही पत्र येता राहिलीं या करिता तो मुहूर्त टळला आलाकडे दोन वेळ पत्रे आलीं ती आम्हा दरबारास जाऊन श्रवण केलीं उभयता सरदार याणीं इंग्रजाचा छापा सभाळून वस्त चागली केली, येणेकरून सतोषायमान जाहले नतर आम्हास बोलले कीं, रावसिंदे याजकडील पत्रहा आठ चार रोजात येताच तुम्हास रजा देऊन आम्ही मसलतीवर नमूद होतो गुंता नाहीं, म्हणाले श्रीमंतास व स्वामींस मातबरास वस्त्रें जवाहार नेमून ठेविलें होते ते आम्हास प्रत्येक प्रत्येक दाखवून

---

नबाब म्हणजे हैदरखान समजावे हे पत्र हैदराच्या दरबारा असणाऱ्या नानांच्या वकिलानें लिहिलेलें आहे

पेटारे बांधून सिद्ध करून ठेविले हल्ली बदामीस रवाना केले आहेत आम्हास येथून रवाना व्हावयास आठ पधरा रोज पाहिजेत पर्जन्यकाळ समीप आला या करिता हल्ली कृष्णापार जाऊन राहण्यास जागा कोणती आहे म्हणून पुसल्यावर, आम्हीं अथणा चागली जागा आहे म्हणोन सागितलें तेव्हा बोलले कीं, तेथील कमाविसदार यास तुम्ही रातबमसालेविशीं कागद व जासूद जोडी देण, म्हणजे येथून पत्रें बदामीस पाठवून हल्ली पुढें रवाना होतील तेव्हा पत्र व जासूदजोडी दिली त्या समागमे नबाब साहेब याना जासूद जोडी व पत्रें रवाना केली आहेत हल्ली अथणीस जाऊन राहतील आम्हास रजा जाहलियानतर पुढे सेवेशीं घेऊन येऊ आणखी कित्येक नबाब निजामअलीखान याजकडील व स्नेहभावाचें बोलणे जाहले ते विस्तारे राजश्री कृष्णरावजी यान्च्या पत्रावरून निवेदन होईल राजश्री पाटीलबावाचे पत्र सत्वरच येईल पत्र आल्यावर येथे किमपि गुता नाहा आम्हास निरोप देऊन नबाबसाहेब स्वारीस निघतात सदैव पत्रा परामर्ष करावयास आज्ञा जाहली पाहिजे श्रुत होणे हे विज्ञापना पैवस्ती छ २१ जमादिलावल समानीन ह॥ अ [ख'] हे दरखान

---

ले २५७
[२३९]

श १७०२ वैशाख व २
ता २०-५-१७८०

श्री

सेवेशीं कृष्णराव नारायण जोशी कृतानेक साष्टाग नमस्कार विनति येथील कुशल तागाईत छ १५ माहे जमादिलावल पावेतों मुक्काम श्रीरगपट्टण वर्तमान यथास्थित असों विशेष आपण छ २१ रविलाखरचीं पत्रे पाठविलीं ता पावलीं उभयता सरदार याजकडील इग्रजाशीं लढाई झाली याचा व हिंदुस्थानाकडील विस्तारें बातमी पुरवणी पत्रात लिहिली होती त्या सुद्धा पत्र आम्ही दरबारास जाऊन नबाबसाहेब यास श्रवण केला सतोषी झाले नतर आम्हीही स्वारीस निघावयाची त्वरा करावी म्हणोन बोलिल्या ननर उत्तर केले कीं, थोडक्याच दिवसात राव शिंदे याजकडील खतही येताच तुम्हास रजा देऊन स्वारीस निघता, गुत्ता नाहीं, असें मन पूर्वक भाषण केले तेच दिवशा स्वामाकडील पत्र आलीं होतीं त्याचा उत्तरे लिहून आचीवर रवाना केला आहेत प्रविष्ट होतील नबाबसाहेबाचे चित्ता दुसरा अर्थ किमपि नाहा बाजारी खबरीवर औरगाबाद वगैरे येथून वर्तमान मनस्वा लिहून येते याकरिता चित्तात कल्पना येतात, तत्रापि चित्त चचल करीत नाहात श्रीमताकडील मन पूर्वक लक्ष आहे राजश्री आनदराव वकील याजकडलि पत्रे येतात त्यात बातमी आपल्या पत्राप्रमाणे लिहून येता, यावरन ही विवचना करितात का, आनदराव कन्चें वर्तमान लिहून पाठवीत नाहा, बाजारी वर्तमान ऐकण्यात येईल तेही लेहून पाठवीत जावें येथून सुतरस्वार पाठविले आहेत व हरकारेही त्याजपाशा असोन दिनचर्येचें वर्तमान लिहून पाठवावयास आळस करावयास कारण काय'

याप्रमाणें बहुत रागे भरून बोलिले राजश्री नरसिंगराव याणी मर्जी पाहून उत्तरें प्रति उत्तरे करावयाचा ता वेळा ऐशियास स्वामीनी राजश्री आनंदराव यास आज्ञा करून खातमी कच्चा पक्की लिहीत तो अर्थ केला पाहिजे राजश्री पाटीलबावाकडील निभावणी पत्र आले म्हणजे आम्हास रजा होऊन नबाबसाहेब ममलताम जाणार रावशिंदे याज कडील पत्रे आलियाखेरीज लढाईचीं उत्कर्षाचा वर्तमाने कितीही आलियास यास खरें वाटत नाहा नबाबानी वैशाख व॥ १२ स॥स खेमे दाखल व्हावयास मुहूर्त पाहिला आहे कळावें बहुत काय लिहिणे लोभ केला पाहिजे हीं विनंति पौ॥ छ ५ जमादिलाखर

---

श्री

ले २५८ }
[ ३१७ ]}

{श १७०२ वैशाख वद्य ५
{ता २३-५-१७८०

राजश्री सदाशिवपंत स्वामीचे सेवेशीं

विनंति उपरी हैदरखानाचे निभावणीपत्र मसुद्याप्रमाणें द्यावयाची परवानगी राजश्री पाटीलबावाची जाहली होती परंतु इतक्यात अशेरीचा बोभाट आला जे किल्लेदारावर शिबंदी चढली होती त्यास सरकारातून खर्चास आले व सारे जमातदारास खातरजमेचे कागद आले या वर्तमानावरून मना जाहले रात्री स्वारी इंग्रजावर जाऊन माघारी आल्या वर मागता सडेस्वारी चार दिवस जाऊन आपले पत्राचे मसुदे याचे अन्वय पत्रे घेऊन थैली पाठविली आहे त्याची नक्कल अलाहिदा आहे म्हणोन लिहिले त्यास थैलीव नक्कल पावली नक्कलेवरून मजकूर समजला त्यास हैदरखानाचीं पत्र राजश्री पाटीलबावास व आम्हास आलीं होतीं त्यात आम्ही आपले पत्राचा जाब लिहिला तो पाटीलबावास कळावयाकरिता नक्कल व हैदरखानाचे पत्र पाटीलबावाकडे पाठविले होते त्या पत्राचा जाबसाल आमच्या नक्कलेच्या अन्वयें लिहून थैला पाठविली, परंतु निभावणीपत्राचा मसुदा हैदरखानाकडून पाठविला होता त्याप्रमाणे पत्र आलें नाहा तेव्हा हैदरखान चेनापटणावर जात नाहा व सरकारचा पैकाही येत नाहीं, व चार महिने बरसातींत इंग्रज व हैदरखान राजकारण करून बळावितील सर्व प्रकारें मसलतीस विलग पडेल हल्लीं पत्र आले यातही सरकारातून तहा नामा झाला आहे त्याप्रमाणे निभावणीचे पत्र पाठविलें आहे असे लिहिलेच आहे, तेव्हा यावरून गुता न पडावा परंतु हैदरखानाची समज एक प्रकारची, या करता मसुद्याप्रमाणे पत्र त्यात एक अक्षर अधीक उणें न होता कागदावरच शिक्का करून पाठवावे, थैलीचा दरकार नाहीं, अशीं लिहिलीं येतात त्यापक्षीं त्याचे समजेप्रमाणें निभावणीपत्र पाठवून सरकार काम होय तें करावें नाहीं तर हे पत्र पाठवूनही फळ नाहा असें त्याकडून घडेल यास्तव जरूर पत्र घेऊन पाठवावे नबाब निझामअलीखान याणीं आपणच होऊन थैली पत्राची पाठविली ते बजिन्नस पाठविली आहे पत्र पाहिल्यावर मजकूर ध्यानात येईल सारांश पाहता पाटीलबावाचे निभावणीपत्राची वाट हैदरखान पहातात हैदरखान चेना

फटणचे रोखे गेल्यावर नबाव शिकाकौलीकडे जाणार तोंपावेतो हे वाट पहातात एवढा मोठा मनसुबा एक पत्राखेरीज विलग्न कसा पडतो हें ध्यानात आणावे, आणि सरकारचा पेकाही येत नाहीं तह होऊन बहुमानाचे हत्ता आले ते माघारे फिरविणें हेंही वाईट दिसतें कदाचित् अखेर साल जाहले बरसात आली, आता पत्र पाठवून फलही काय? असें ध्यानात येईल तर पत्र पाठविले असता बरसातींत हैदरनाईक चेनापटणाकडे जाईल पर्जन्यामुळे काहीं काट न जाला तर राजकारण लागू पावणार नाहीं सरकारचा पेका येईल, नबाबासही बोलावयास जागा होईल, दूर देशींच्या अर्थे फार चागले आहे अस जाणोन वारवार लिहितों आज पावेतो सरकारच्या कामात पाटीलबावाकडून कोठेही विगलता पडली नाहीं, आणि हल्लीं उगेच सदेह मनात आणून निमित्य ठेवून पत्राविषयीं विलब लावला, तर सदेहाचे मूळ येथून काडीमात्र नाहीं, तेव्हा एका घटकेत दूर करता येतलि, परतु मनसुबा जाहल्यास साभाळणार नाहा असे आहे खातरजमेचे पत्र मसुद्याप्रमाणे लौकर पाठवावे म्हणोन हैदरखानास बोलावयास जागा राहिली नाहीं हैदरखान निघाला म्हणजे नबाबास बोलावयास जागा नाही मग जो अतर करील त्यावर शब्द राहून काम होईल असें आहे याकरिता पत्र जरूर घेऊन पाठवावे अशेरीचा मजकूर लिहिला याची सभूतही नाहीं चौकशी पाहिजे *तशी करावी ये विषया पूर्वीं विस्तरे लिहिलेच आहे उगेच निमित्य काढून सरकार काम विलग्न पडावे हे न व्हावे रवाना छ १९ जमादिलावल हे विनति

---

श्री

(२५९)
(२११)

(श १७०२ वैशाख वद्य ६
(ता २४-५-१७८०

राजश्री सदाशिवपत स्वामाचे सेवेशीं

विनती उपरि डाकेचे कारकून आपाजी सदाशिव व शिवाजी गागरे याणीं महनत करून शर्तीने डाक बसविली व आम्हापाशा जासूद आहेत ते व डाकेचे जासूदाचे खर्चाची आबळ फार आहे म्हणोन विस्तारे फार लिहिले त्यास आपाजी व सदाशिव याणीं मेहनत फार केली याजमुळे त्याचे तैनातेचा व खर्चाचा बदोबस्त करून दिल्हा व गागऱ्याचीही मेहनत ध्यानात आहे जासुदाचे व डाकेचे रोजकर दे [ व ] विले चितो विठ्ठलाच वर्तमान लिहिलें ते सविस्तर कळले आबाचिटणीस याणीं निगडीविषयीं याद दिल्ही ती पाठविली ती पावली त्याप्रमाणे ताकीद पत्रें देविलीं बाळारायाकडील कृष्ण भट वरखेडकर यास इनाम गाव दिला आहे त्याचे कसरे विषयीं लिहिलेत त्यावरून बाळारायाची खातर राखोन कसरेची सनद देविली प्रतापगडच्या वगैरे गप्पाचे वर्तमान लिहिले त्यास तो प्रकार काही नाहीं प्रतापगडचा बदोबस्त चागला आहे राजश्री परशरामपत

---

* येथपासून खुद्द नानाचें अक्षर

भाऊ याणा गुमटास मोर्चे लाविले होते ते हल्ला करून घेऊन चार पाचशे माणूस करवार-कराकडील ठार मारले तिसरे दिवशीं शिरोळही घेतले कितुरकराने उपद्रव केला यामुळे त्यावर गेले मुबईकडून इग्रेज आले होते त्याचें पारपत्य केल्याचा मजकूर आलाहिदा लिहिलाच आहे सर्व गोष्टी श्रीमताचे दैवें करून चागल्याच घडत आल्या व घडताल रवाना छ १९ जमादिलावल हे विनती उभयता सरदारास सरकारचीं पत्रें व लाखोटे दोन व आम्ही राजश्री पाटीलबावास पत्र लिहिले आहे तें द्यावे व श्रीरगपट्णाहून पाटीलबावाच नावे लाखोटा आला तोही पाठविला आहे, पावता करावा राजश्री नारो शिवदेव याचे पत्रात तुम्हा सरकारी मजकूर लिहिले त्याचा उत्तरें लिहून पाठविला घराऊ मजकूर मोरो सदाशिव जैनाबादकर वगैरे याचीं उत्तरे ते वाईस गेले तेथे ज्वर फार आला, बरे होऊन लौकरच येतील, उत्तरेंही पाठवितील हे विनती

---

२६० [३२३] — श १७०२ वैशाख व ६, ता २४-५-१७८०

॥ श्री ॥

राजश्री सदाशिवपत स्वामीचे सेवेशी

विनति उपरी तुम्हीं राजश्री नारो शिवदेव याचे पत्रीं लिहिलें का, राजेश्री पाटील बावाचें बोलणें रेवा उतरणें नाहीं मर्जी असली तर इकडे राहतील, मा आग्रह करीत नाहीं नाहीं तर माझा जाबसाल आता चालला आहे जे, सुरतेस इग्रेज छावणीस जातो बाजल बरसात पुण्यास गेला तर विचार कसा होईल ? याचें उत्तर पाटीलबावानीं केले का, तुमच्या मनात आम्ही कोंडाई बारीवर छावणी करावी तर हे सहसा होत नाही रेवा उतरणे नाहा माझें मानस कोंडाई बारीवर छावणी घडावी, सुरतेची बदी व्हावी, निदान कोंडाई बारीवर फौज टेवावी, पाटीलबावाना बराणपुरावर छावणी करावी त्यास कोंडाई बारीवर छावणी करावयाची मर्जी असल्यास विमनस्कतेचीं पत्रे लिहू नयेत, फार गोड येत जावी ता साधकें पाहून, वृत्तीवर येऊन, चित्तास आले तर कोंडाई बारीवर अगर बऱ्हाणपुरा छावणी करतील बऱ्हाणपुरीं राहिल्यावर स्वच्छतेची व मसलतीस उपयोगाचा साधनें विस्तार लिहिला ता कळलीं त्यास छावणीचे प्रकाराचें उत्तर आलाहिदा लिहिलें आहे, त्यावरून कळेल विमनस्कतेचा पत्रे येथून लिहिण्यात येत नाहात तुम्हाकडून निर्मूळ वृक्ष उभे होऊन येतात, त्याचीं उत्तरे मात्र सरळ रीतीनें लिहीत गेलो कोंडाईबारावरील छावणीच करता गोड ल्याहावें, नाहा तर गोड लिहू नये, असा भाव येथें नाही मुळाच गोट आहे तेथें गोडच लिहीत गेलों व लिहीत जाऊ रवाना छ १९ जमादिलावल हे विनति

---

ले २६१ }
[ ३२४ ] }

{श १७० वैशाख व ६
{ता २४-५-१७८०

॥ श्री ॥

राजश्री सदाशिवपंत स्वामीचे सेवेशी

विनति उपरी छावणीचे प्रकार तरि सुरतेस इंग्रेज छावणीस आले आणि उभयता सरदारही सारे फौजेनिशीं इकडे आले, तर इंग्रेजांना अमदाबाद तालुका व डभाई वगैरे महाल त्याणी घेतले ते त्याकडे कायम राहिले व फत्तेसिंग गायकवाड याचे पोटीं निर्वेध पडले बाजत बरसात मसलत करणे ती इंग्रेज दुसरीकडे करताल तेव्हा साधल्या गोष्टी पाठीमागे पडल्या ही गोष्ट चागली नाहीं, याकरिता सरदाराकडील दहा हजार फौज व गणेशपंत[1] सुद्धा कोडाई बारीवर ठेवावे म्हणजे सुरतेवर दबाव पडेल आणि उभयता सरदारांना अमदाबाद प्रातीं छावणी करून अमदाबाद बरसातात घ्यावी तिकडे राहिल्यावर फत्तेसिंग सहजच येऊन मिळतात, दुसरा उपायच त्यास नाहीं डभाईही महजात येईल तेव्हा इंग्रेजांना सालमजकुरा जितके साधले तितके त्याच्या हातून जाऊन, त्याचे तालुके खराब हे अधीक त्याची नुकसानी असें त्यास समजलें परतु पाणी उतरताच जिकडे इंग्रेज रोंख धरतील तिकडे उभयता सरदारानीं यावे असे पक्के होऊन जाहल्यास हा एक पक्ष आहे, अथवा अधिक फौज अमदाबाद तालुक्यात छावणीस ठेवून मुलुख मारावा आणि निमे फौजेनिशीं उभयता सरदारानीं कोंडाईबारीवर छावणी करावी, परतु या गोष्टींत अमदाबाद येणार नाहीं मुलुख मात्र ताराज होईल फत्तेसिंग काय करतील ते करूत असे आहे परतु उभयता सरदार कोंडाईबारीवर राहिले असता इंग्रेजावर जरब चागली राहील दोहोंतून जें चागलें दिसेल तें करावें बराणपूरचे छावणींत एकही रोंख राहत नाहीं तेव्हा तेथें रहाणें मसलतीस ठीक नाहीं मसलतीचे व दूरदेशाचे अर्थ पाटीलबावानाहा फार समजतात कोणताही प्रकार करणें तो मसलतीस पेंच न पडे असाच करतील आम्हास सुचले प्रकार लिहिले आहेत रवाना छ १९ जमादिलावल हे विनति

---

ले २६२ }
[ ३०१ ] }

{श १७०२ वैशाख व ६
{ता २४-५-१७८०

श्री

राजश्री सदाशिवपंत स्वामींचे सेवेशीं—

विनति उपरि आमची विकृति कारभाऱ्यास आली म्हणोन जावगावीं आमचे पारपत्य करीत होते तो डाव चुकला परतु हश चित्तातील कसा जातो ? या करता आम्हास ईर्षा देऊन लिहितात आतून इंग्रेज व गायकवाड मिळून घेतलेच आहेत एक होऊन तोफखान्याने इंग्रज सडकील, फौजेने गायकवाड दमवील, परतु त्याचे निश्चेत मग नाही

---

[1] गणेश विश्वनाथ मेहेंदळे

तो अपेश पावणार नाहा चिंतो विठ्ठल वगैरे याणीं छापे आणिले, दंगे केले, दर जुजात आमचेच घोडे माणूस जखमी व मरत गेले, इतर कोणाचे नाहीं होळकराकडील पेढाऱ्यांनां चार दिवस मेहनत केला, शेवटीं त्यामही मना केलें याप्रमाणे मगत असोन आम्ही ता म्याडच इंग्रेज चालून आला तेव्हा फजीत पावला गायकवाडाचे राजकारण इंग्रेज कूच करून गेल्यावर इकडे येतो असे होते, परतु अमलात आले नाहा फिरून सूत्र लाविलें का, इंग्रेज सुरतेस पावते करितो,तुम्हीं आडवे न यावें व बशर्ती यादींतील काढावीं, त्याचीं उत्तरे केसोपतानीं केलियाचा व साहा घटिका रात्रीस केसोपतास गोटा बाहेर करून दिल्याचा, दिवसा ठेविण्यास पुण्याहून गोपाळराव रामचद्र निसबत गायकवाड व गोविंदराव देश मुख चामारगोंदेकर निसबत माधवराव जाधवराई, व हरिपताकडील कारकून असे चौघे कारकून व दोन हुजरे सरकारचे फत्तेसिगाकडे राजकारणास आले आहेत त्यासि गाठ पटेल म्हणोन केसोपतास पाहाटेचे रात्रीसच काढून दिल्हा पुण्याहून पत्र तुम्हास येतात का राजकारणाचा अखत्यार पाटीलबावाचा मग सरकारातून कारकून हुजरे का पाठवावे ' राजकारण करून पाहावे म्हणून पाठविले तर, त्याणीं आम्हासी फेडून गायकवाडास भेटाव-यास जावें, तें काहाच नाहा किती दिवस त्याचे लष्करात आले, भेटले, आम्हास चिटी देखील नाहीं सुरतेस गेले, दादास भेटले, दाहा रोज तेथें राहून बायकाशीं दादाशीं राजकारणें करून आले सुरतत गणेशपताना कसे जाऊ दिले व ते तेथून इकडे कसे येऊ दिले, हें आम्हास ठीक दिसत नाही धनीपणा कारभाऱ्याकडे आहे आमचें पारपत्य त्याचे मनात आहे म्हणून अशीं कारस्थाने चालला आहेत इंग्रेज नर्मदेचे उत्तरतीरीं असता मोहीम आमचे गळा आहेच रेवापार दक्षिणतीरा जाऊन सुरतेस छावणी करील, इकडे कारभाऱ्यानीं साभाळून घ्यावा आम्ही चाकरी धन्याची जाणतों, त्यासि बेमानी करणें नाहीं थोर झाल्यास बलावितलि तेव्हा जाऊ तोंपावेतो रेवा उतरणें नहीं कारभाऱ्यासही ममता करून चालवणें तर दुरून चाकरी सागावी यातच निखालसता सम जेल अगदाच आम्हा नसावे असे असल्यास आणखी छायेस पोट भरू, परतु या उपरि रेवा-पार जाणार नाहीं याप्रमाणें ल्याहावयास आज्ञा केली त्यावरून लिहिले असे म्हणोन विस्तारें लिहिलें तें कळलें त्यास कारभारी असतील त्यास विकृति येईल आम्ही काहीं कार भारी नाहा श्रीमताचे सेवक, चाकरी करावी इतकें जाणतों, सुचेल तें ल्याहावें, बोलावें, करावें, इतकें जाणतो व जेथवर आपले वस्तु सेवा होईल तितकी करावी सर्व भार पाटील बावावर असता अशीं बोलणीं बोलून तुम्हाकडून लिहावीं याचे कारण काहा दिसत नाहा जे दौलतेचे स्तभ व ज्याजवर दौलतेची मदार आणि आमचा अकृत्रिम भाऊपणा असता आबगांवीच आमच पारिपत्य करीत होते हें बोलणे कसें निघाल ईश्वर जाणे तो डाव चुकला म्हणोन इंग्रेज, गायकवाड यास मेळवून पारपत्य करावें हें तो त्याहून विशेष कल्पना चालली याचें उत्तरच नाहीं यात एक खरें का निष्ठेत अतर नाहीं येणें करून इंग्रेज गायक-वाड फजीतच पावत गेले व ज्याणा लबाडया केल्या तेही फळे पावले हें यथार्थ पाटील-बावाची निष्ठा तशीच आहे ईश्वर दिवसेंदिवस अधीकच यश देईल, हीच इच्छा आमची

आहे सूत्रे अनुसधानें सोब यानीं वगैरे खेळविला, छापे आणविले म्हणोन लिहिलें, त्यास जो एकनिष्ठेनें काळजी धरून खावदाचें काम करतो त्यापुढे कोणाचें चाल्त नाहीं व पाटी लबावा मेहनत करून लढाया करतात म्हणूनच दरजुजास माणूस घोडे मरतच गेले, जो तमाशा पाहणार त्याचें कशास मरेल ? हीं उघडीच गोष्ट आहे पेंढाऱ्याम मना करविलें हें तर अपूर्व वाटलें असो, जे असें करताल ते फळेंही पावतील ज्याणीं बहुत लढाया मोठ्या मोठ्या मारल्या त्यास ख्याड म्हणत असतील ते बुद्धिमान म्हणावे ! गायकवाडाचा मजकूर विस्तारें पूर्वी लिहिलाच आहे पुण्याहून गोपाळराव रामचद्र पाठविले येविशीं पूर्वी लिहिलेंच होतें इक्राच्या तुमच्या लिहिण्यात गोविंदराव व हरिपताकडील कारकून व विसाजी कृष्णाकडील मल्हारपत असे चौघे सुरतेस येऊन, दादाशा बायकाशा राजकारण करून, गायकवाडाकडे आले, त्याची केसोपताची गाठ पडेल म्हणोन केसोपताम रात्रीसच काढून दिल्हा असे लिहिल तेव्हा यावरून व मागील गोष्टीवरूनही बातम्या यथार्थ कळतात व सागणार सागतात, त्यात केसोपत गेले होते तेव्हा वर्तमान खरेच असेल तुमचें पत्र येताच माधवरायाकडील गोविंदरात्र चाभारगोंद्याम बायकोम बरें वाटत नाहीं ह्मणोन तेथें फार दिवस आहे, त्याम बलात् पाठविले आहे, व मल्हारपंत विसाजीपताकडील येथेंच आहे दोघाम पाटीलबावाकडील गोविंदपत येथें आहेत त्यास भेटविलें हरिपताकडील कारकुनाचे नावच लिहिलें नाहीं, येरवीं तोही भेटविला असता गोदबान रात्रीम केसोपतास काढून दिलें तें इग्रेजाच्या भयाकरिता असेल, त्याचा अर्थ विपरीत लावून चागला बनाविला तोच ध्यानात आला तेव्हा मुळींच चौघे कारकून गेले नाहींत मग दादा, बायका, गायकवाड याकडे राजकारणें खरीच जाली असतील ! तेव्हा पाटीलबावास त्याणा भेटून जावें ते काम गेले हें ठीकच आहे जेव्हा चौघे कारकून जाऊन राजकारण होतें आहे तेव्हा तुह्मास लिहिलें कीं राजकारणाचा अखत्यार पाटीलबावाचा असता याप्रमाणें केलें तेव्हा दोष खराच हा दोष ज्यापक्षीं आहे त्यापक्षीं इग्रेज सुरतेस आल्यावर रेवा दक्षिण तीरची मोहीम सहजच इकडे लागली ज्यापक्षीं कारकुनच येथें पाटीलबावाकडील कारकुनास भेटविले तेव्हा अवध्याच गोष्टी एतद्विषयीं संदेहाच्या जाऊन जिकडे इग्रेज जाईल त्याचे छातीवर छावणी करणें प्राप्त हें सिद्धच झालें ही फार चांगली गोष्ट आहे कारकुनच गेले नाहीं त्यापक्षीं गणेशपत काय जाऊ देतात ? आणि जाणें कसें घडेल ? हें पाहावें दुरून चाकरी करून बेमानी होणार नाहीं, रेवा उतरणें नाहीं, हीं बोलणीं मात्र बोलावयाची मर्जी त्याची असल्यास त्याणीं बोलावी, परतु श्रीमत लहान, सर्व भार पाटीलबावांवर व दौलतेंत जीव काय आहे, हें सभाळावयास योग्य कोण आहे, हे सर्व अर्थ त्यास समजतात त्याप्रमाणें समजून करितात मग आम्हीं काय ल्याहावें ? परतु या गोष्टी बोलण्यात देखील येऊ नयेत व याचें कारणही नाहीं ज्याच्या घराण्याचे एकनिष्ठतेचे बाणे चाल्त आले त्यांच्या चित्तात दुसऱ्याचे छायेस पोट भरू हीं अक्षरेंच येणार नाहींत ही खातरजमा आहे इग्रेज गायकवाड मिळवून घेतले असते तर मुबईकर इग्रेज बेलापुरास उतरून बेलापूर व परसीक घेऊन पनवेलीस

आले त्याजवर राजश्री सखारामपंत पानसी व बाजीपंत जोशी याजबरोबर तोफखाना फौज व गाडदी देऊन पाठविले, हे घाटावर जाताच पनवेलीहून तळोजास जाऊन मजबुती केली तो याणा जाऊन गाठ घातली, दुसरे दिवसीं हल्ला करून चार पाचशे माणूस ठार त्याचे गोरे व फिरंगाले मिळोन मारले, तोफा चार व गरनाळ एक पाडाव आणिला, कांहीं गोरे धरले, त्यात एक सरदारही पाडाव आला आहे, हे होताच तिकडे त्याणा कल्याण घेतले, तेव्हा कल्याणवर जाऊन वेटा देऊन मारगिरी होत आहे हा मोडा जाहला व तोफा आल्या यामुळे मुबईकरास चाड येऊन आगळणी करात आहे, श्रीमताचे दैवे करून जर बच पावतील, तेव्हा मिळवून घेतल्यावर अस का व्हाव! साराश इकडून दादाशी व बायका व गायकवाड याकडे कोणी राजकारणास पाठविलें नाहीं व पाटीलबावाचे वाकडे व्हावें हें चित्तातही नाहीं अखत्यार इंग्रेजाच्या मसलतीचा पाटीलबावावरच आहे कोणेही प्रकार मसलत चागला शेवटास जावी, पाटीलबावास यश यावे, भाऊपणा दिवसेंदिवस अधिक चालावा, हीच इच्छा आहे रवाना छ १९ जमादिलावल हे विनति

२६३ }
३०६ } { श १७० वैशाख व ६
{ ता ०४ ५-१७८०

श्री

राजश्री सदाशिवपंत स्वामीचे सेवेशी

विनति उपरि कोंडाईबारीवर छावणी करावयाचे मी बोलतों याचें कारण इंग्रजाचे उरावर कटार राहील सुरतेची बदी जहाल्यास उत्तम बऱ्हाणपुरीं राहिल्यास इंग्रज पुण्याकडे गेल्यास आणता येतील, व मनात कलोषता आल्या आहेत त्याची पैरवी होईल कागद पत्र येतील जातलि व येणारास जवळ पडेल हरतऱ्हा होऊन निखालसीचा प्रकार घडेल या अदेशावर मी बोलतों, श्रम करता घडेल तें खरे आणि दूर गेलें तितकें बरें इंग्रज व दादाचा सलुखा होत असला अगर बिघाड ही जहाला आणि पुण्यावर चालून आले तर सरदार नसताही आम्ही सभाळून घेऊ असे असल्यास त्र्याश्रम कशास करावे? पाटीलबावा तिकडे आल्यानतर एकादी गोष्ट त्याचे दृष्टी विलग पडली तर माझें पारपत्य होईल नेकीबदीचा अदेशा दोहींकडून सेवकाकडे नसावा दगाफटका कोणीं कोणास करू नये म्हणोन लिहिले त्यावरून अपूर्व वाटलें परस्परें सुखदु खाचे सोबती पाटीलबावा आम्ही खावद एक, त्यात भाऊपणा, खावदाच्या चाकरीवर एकनिष्ठ त्यात क्रियाही जहाली त्याप्रमाण परस्परें वरण्यात येतें तेव्हा दगाफटक्याची शका तुमचे चित्तानें घेऊन कसे लिहिलेत? तुमचा उपाय नाहा तेथील सारी मडळी बोलता बोलता चित्त बेहरम होऊन गेले असेल त्यामुळें असे लिहिण्यात आले त्यास या गोष्टी घडावयाच्याच नाहींत, मग त्याहाव काय? तुम्ही कोंडाईबारीवरील छावणीचीं साधकें लिहिलींत तीं प्रमाण परतु मनसुब्याच्या रीतीने दोन प्रकार आलाहिदा पुरवणी पत्रात लिहिले आहेत, त्यातूनच चागला दिसेल तो करावा रवाना छ १९ जमादिलावल हे विनती ×

---

×येथून पुढील शभरदीडशें पत्रे सदाशिव दिनकर व नारो शिवदेव आणि नाना फडणीस याजमध्यें गेलीं आलेलीं आहेत

श्री

ले २५८ } [ २०२ }

{ श १७०२ वैशाख व ६
{ ता २४-५-१७८०

राजश्री सदाशिवपंत स्वामीचे सेवेसी

विनंती उपरि पुण्याहून चौघे कारकून सुरतेस येऊन दादाकडून व बायकाकडून मनसबा काय करून आले असतील [ तो ] ते जाणत मजकूर गोंदबाशीं† बोलून गाडराशीं बोलले त्यानें उत्तर केलें जे, दादासाहेबाचे पत्रावाचून मजला कबूल नाहीं सबब गोविंदराव आणखी एक गृहस्थ पुन्हा सुरतेस दादाचें पत्र आणावयास गेले आहेत मोहीम सागितला, आह्मास दोष लावून चित्तास येईल तसे लिहितात, आधीं लिहिणें उचित नाहीं, तत्राप दोष लावून लिहावें, इरेस घालाव, साहित्य करावें, आमचे बगलेंत आघ आहे ती विसरून मेहनतीविशीं इरेस घालून सरकार काम करून घ्यावें ही वाट आहे, तें न करिता आमच्या पारपत्याचीच विवचना होत आहे नाहा म्हणतील तर गोंदवा स्पष्ट सरकारचे नाशास प्रवर्तक हे लिहिलीं गेलीं असता खरें वाटलें नाहीं सांप्रत शि नो र चा डो द, क नां ळीं व राजपिंपळ्याचा हिस्सा गोंदबानें अन्यास न पुसता इग्रेजास सनदा दिल्या, आणि डबाई किल्ला परगणा आपले बायकोचे चोळीबद्दल घेतला इग्रेज कूच करून मागें गेला असता त्याचपासून खाला करून गोंदबानें आपला अमल बसविला तेव्हा गोपाळराव वगैरे चौघे गृहस्थ पुण्याहून आलेले ते समजावीत असतील का डबाई, अमदाबाद सरकारात देतील तर आम्हापासून याद करार करून नेली आहे का, अमदाबाद, डबाई आम्हाकडे ठेवावा सरकारचा पेका मागू नये कोणे प्रकारे इग्रजातून गायकवाड काढावा या अर्थे बशर्त इग्रेजाचे पारपत्यास तुम्हा आम्हास मिळाल्यावर अशी बशर्त घालून याद दिला असताही आले नाहींत, तेव्हा हरामखोर का हिंदू हें समजावें त्याचा विश्वास धरून त्याजकडे कारकून पाठवून राजकारण लाविलें, त्याजपेक्षा आम्हीं हरामखोर ठराविले तेव्हा गायकवाडानें इग्रेजाकडे राजकारण लाविलें आह्मास तोंडघशा पाडावें हीं मसलत कारभारी बुडवितात, धन्याचे हित करतात आम्हस लिहितात [ का ] एक वर्ष लागो दोन वर्षे लागोत, नेस्तनाबूद इग्रेज करावा, सलुख करणे तर नबाब, भोंसले, नाईक व सरकार चौघाचे समतें करावा, आपण आतून गृहस्थ पाठवून राजकारणें करतात कसे ही करून आम्हीं तोंडात खावी, हे मनोरथ सुफल होत या उपरि आम्हीं नर्मदा उतरत नाहीं गाडर सुरतेस छावणीस जातो कारभाऱ्यांना दादास इग्रेजास मेळवून घेतलाच आहे तेव्हा दोन नाहींत इग्रेज बेमान [ आहे असें ] लिहितात हें तर आमचे समाधानार्थ याचें उत्तर वीस बावीस दिवसात आणवणे म्हणोन पाटीलबावा बोललें म्हणोन विस्तारें लिहिलें तें कळलें * त्यास विसाजी कृष्ण याकडील कारकून मल्हारपंत पुण्यात आहेत व गोविंदराव चाभारगोंद्यात आहे

† गोविंद गोपाळ कामतेकर गायकवाडाचा दिवाण इग्रजास सामील होता

* येथपर्यंत पाटीलबावाच्या बोलण्याचा आशय

हो आणविला आहे असें असता दादाकडे र रतस गेला आणि गाडराशीं गोंदबाचे विद्यामानें उत्तरें प्रत्युत्तरें जालीं हे फारच खरे वाटलें- दोष लावून चित्तास येईल तसें आम्हीं कोणते लिहिले ? ज्या नव्या नव्या गोष्टी उत्पन्न करून सदेह देऊन तुम्ही लिहिता त्याचे था न्हे रे मात्र विस्तरें लिहितों मसलतीचा जिम्मा हे तिकडूनच लिहित यत गेले ते आम्ही सरळ रीतीनें लिहित गेलों सरकारचा मजकूर सुचला तो लिहिला हें काहा वाकडे भावें करून लिहिलें नाहीं काहींच लिहू नये अशी मर्जी असल्यास तसेंही घडेल दोष लागावा अशा भावेंकडून लिहिण्यात येत नाहीं स्वभाविक चागली गोष्ट मनात येते ती लिहीत असतों इरेस आम्ही काय घालावयाचें आहे ! थोर आहेत ते आपल्या एकनिष्ठतेची व थोरपणाची इरे त्यास असते बगलेंतील आगीचें पूर्वीं बोलण्यात येतच गेलें येविषयींचें उत्तर जहालें त्याचें स्मरण असेलच साहित्यही होईल तेथवर करीतच आहों इरेस घालून सरकार काम करून घ्यावें ही वाट आहे हें खरेंच, परतु जे काम करीत नसतात त्यास ही गोष्ट योग्य पाटीलबाबाचें करणें तसें नाहीं मन घालून सरकार काम काळजीनें करतात तेव्हा इरे काय घालायची ? गोंदबा सरकारचे नाशास प्रवर्तक असें कळल्यावर आम्ही काय उणें केलें ? राडा, पोरें धरून कैद केलीं, किल्यावर घातलीं मनसुब्याच्या रीतीनें पाटीलबावा तिकडे गेल्यावर फत्तेसिंग येऊन भेटतील गोंदबा कामावर पडतील असें समजून राखीत गेलों वाकडे पाऊल दृष्टीस पडल्यावर मुलाहिजा केला नाहीं हें ध्यानात येतें कीं नाहीं? चोळीबद्दल महाल देतले ती चोळी किल्यावर अडकाविली आहे आता हे शास्त्रार्थ लिहून काय ? पारपत्य केल्यावर अवघ्याच गोष्टी होतील बोलणारच पुण्याहून कोणी गेले नाहींत, मग गोंदबाचें बोलणें डबाई अमदाबाद सरकारात देतील हें काय धरावयाचे आहे ? पाटीलबावानीं बशर्तीची याद गायकवाडास लिहून दिली ती समजूनच दिल्ही असेल असें असताही आले नाहींत, तेव्हा हरामखोर कीं हिंद् हें समजावें म्हणोन लिहिलें त्यास इंग्रजास म्हटले तेव्हांच हरामखोर त्यावर पाटीलबावा जात तों मर्यादा होती तेही गेली अप समजूनच जफ्त्या करून गोविंदराव गायकवाड यास पद द्यावें म्हणोन लिहून पाठविले, तेव्हा समजूनच लिहिलें इंग्रजाकडून गायकवाडास काढून पाटीलबावास भेटावितों असे गोपाळराव येथें बोलले, त्यावरून रामजी पाटिलाच्या विद्यमानें त्याशीं बोलून पाठविलें हा मजकूर पूर्वीं दोन तीन वेळ लिहिण्यात आलाच आहे याखेरीज दुसरा जाबसाल काहीं नाहीं व दुसरा कोणी बरोबरहि दिला नाहीं त्याणे चिठ्ठी अथवा निरोप पाटील बावाकडे पाठवावयाचा होता मग काय प्रतिबध असेल, ईश्वर जाणें दुसरें काहीं नाहीं तेव्हां गायकवाड, इंग्रेजाकडे राजकारण लाविलें गुडघा दिला असें घडतें कीं काय ? ही मसलत कारभारी बुडवतात म्हणोन लिहिलें त्यास, कारभारी बुडावितात किंवा कशी घडत आली हें ध्यानात यावयाजोगेंच आहे याचा विस्तार लिहिता फारच आहे आतून गृहस्थ पाठवून दादा, इंग्रज, गायकवाड, याशीं राजकारण केलें नाहीं वर्ष लागो दोन वर्षें लागोत, इंग्रजाचें पारपत्य करावें, हाच निश्चय पक्का आहे तह करणें तरी चौघाचे विचारें करावा जे निश्चय ठरले आहेत तेच काईम आहेत इंग्रेज बेमान हें खरेंच लिहिलों

प्रत्ययासही आले आहे व येईल सुरतेस इंग्रज आला अथवा कोठही गेला तरी पाटीलबावासच पारपत्य करावे लागेल वरीतच आहेत सशय कोणे बिशी घेऊ नये रवाना छ १९ जमादिलावल हे विनति

---

ले० २६५ [ ३१८ ]

श १७०२ वैशाख व ६
ता २४-५-१७८०

श्री

राजश्री सदाशिवपत स्वामींचे सेवेशीं

विनति उपरि, कित्येक सदेहामुळें रेवा उतरणार नाहीं असें म्हणतात, त्यास येथे रतीमात्र वाकडा अर्थ नाहीं, व पुढेंही घडावयाचा नाहीं हे सदेह राजश्री नारोपत, व रामजी पाटील याची गाठ पडल्यावर अवघे दूर होऊन सतोषच होईल कारभाऱ्यासही ममता करणें तर दुरूनच चाकरी सागावी असें बोलतात त्यास राजश्री पाटीलबावास चाकरी सागणें त श्रीमतानीं सागावी ते ल्हान तों पर्यंत जेथें उणें पडेल तेथें साभाळणे त्याकडे आहे तेव्हा कारभारी काय चाकरी सागतात ? रेवा उतरणार नाहीं ही गोष्ट चित्तात देखील आणू नये सर्व भार त्यावर मसलत पडेल तिकडे साभाळणें त्याकडेसच आहे रवाना छ १९ जमादिलावल हे विनति

---

ले० २६६ [ ४६३ ]

श १७०२ वैशाख व ६
ता। २४-५-१७८०

श्री

( रा पत्र छ १९ जमादिलोवल समानीन वैशाखमास )

बहुत दिवस गुजरले आ मेहेरबाकडून खत येऊन खुषी होत नाहीं त्यास दोस्ताचे अलमात ऐसें नसावें हमेश खत कितावतीचा शिलशिला जारी असोन आपली खेरखुषी कळवीत जावी येखलासास लाजम आहे आ मेहरबाचे जाणें ताहाल चेनापट्टण प्रातीं होत नाहीं आज पावेतों इंग्रजास चहूकडून ताण बसोन आयास यावे भोसले मातबर फोजेनशीं कटकच्या जिल्ह्यात पोहोंचले, बलकी इंग्रजाचे तालुक्यात हगामा सुरू केला असेल सरकारच्या फौजा व सरदार याची व करनेल गाडर याची दररोज लढाई होत आहे घेराघेरीमुळें इंग्रज बतग केले चालून आले तेथें निभाव होईना, व सरदारापुढें मुकाबिल्यास कायम न रहावे व गिराणी ही न्याहायत जाली सबब इंग्रज माघारे सरून बडोद्याचे आश्रयास गेले बिलफैल आ मेहरबाकडून ताण बसावा इतकाच तवकूफ त्यास मसलहतीवर नजर देऊन जूद चेनापट्टण तालुकियात जाणें होय तें घडावें राव शिंदे याचे पत्राचा अटकाव असलिया तेंही जलदच येईल पत्राविशीं रावशिंदे यांजकडे बहुत वेळ कलमी केलें कीं रहाच्या खलशामुळें निभाव होत नाहीं हमेशा हारकारे लुटले जाऊन सड येतात, त्यास मोठी मसलत, तहून रहाणें मुनासब नाहीं राव शिंदे याचे पत्र येताच आ मेहरबाकडे

पोहोचावीत असा य बाबे खातरजमा असावी अजाचे तवीचा मसलहत उमदी बबस्त तदारार होऊन नमुदान ावी हे सल्लाह नेक याजकारिता मसलहतीस मदनजर राखून चना पगणच्या जिल्ह्यात सरंजाम सुद्धा पहोचवून तालुका तारूत व ताराज करावा सर्व दरजे व मरातब आ साहेबाचे दालानिशीत आहेत कलमी करावे ऐसें नाहा ममईकर इग्रजाना कोकणच्या सरहद्दीन शोखी केली सबब सरकारचा जमियेत जाऊन त्यास तबा करून कत्तल केलें जरबा पाच चार होत्या त्या धरून आणिल्या मुफसल कृष्णराव नारायण यास लिहिले आहे ते जाहीर करतील म्हणोन हैदरअलीखा बहादर यास नानाचे नावे हिंदवी पत्र

---

ले० २८७ [२०६]

श १७०२ ज्येष्ठ शु १२ ता १४-६-१७८०

श्री

राजश्री विसाजीपत[१] व सदाशिवपत स्वामींचे सेवेशीं

विनाति उपरि तुम्हा छ २० जमादिलावल नजीक बाघोड्याचे मुक्कामीं पत्रें पाठविलीं तीं पावला " इग्रेज नर्मदेच्या काठीं पार आहेत दोन तान पलटणें अलीकडे होतीं यास्तव बक्षी व भगीरथराव व पाराजीपत सडे तिकडेच होते मग सात रोज राहिला देश वाईट छावणीची सोय नाहीं पाऊस लागल्यानतर जाणें कठीण पडेल याकारिता बक्षी वगैरे बोलावून घेतले ते आज आले उदईक कूच होऊन हकेरचा [ हलोलचा ? ] मुक्काम नेमला दोहोदचे मार्गे माळव्यात जाऊन नतर छावणीचा विचार कोठें ठरेल ते विनति करीन " म्हणोन लिहिलें तें कळले त्याम इग्रेज रेवातीरीं असता पाठीवरील फौज काढून आणिली येणें करून ते मोकळे जाहाले सुरतेकडे काहीं पलटणें आलीं व काहीं माडवीकडे आलीं व काहा पाण्यातून कल्याणाकडे आलीं पर्जन्याच्या व पाण्याच्या अडचणीमुळें निघणे प्राप्त जाहालें म्हणोन लिहिले त्यास गोविंदराव गायकवाड याजबराबर फौज यावयाची नेमली असेल तीच काही दिवस इग्रजाच्या शहावर असती तर इग्रज फैलाव करू न पावते फार पावसाची झड बसावयाचे सुमारावर गोविंदरायाजवळ जाऊन रहाती असो उभयता सरदार वाटेच्या पाण्याच्या अडचणीमुळे माळव्यातून येत आहेत बरें आहे परतु जलदीनें येऊन कोंडाईबारीवर उभयताची फौजेसुद्धा छावणी करावी हें पुढील मनसब्यास उपयोगी चागलें सर्व भार राजश्री पाटीलबावावर उणें पडेल तिकडे सभाळणें त्यासच आहे दौलतेची काळजी वाहातात, तेव्हा उत्तम तेच करतील येविशीं येथून काय सुचवावें ? बराणपुरावर छावणी केली असता मसलीतीचा रोख सुटतो याकारिता कोंडाईबारीवर छावणी करावी हें चागले उज्जनीस छावणी करावी असें झालें तर फारच विलंब सर्व गोष्टीस पडेल मग दौलतेची आशा कशास धरावी ? रा। छ १० जमादिलाखर हे विनति

---

१ विसाजीपत आठवले

लें० २५८)
[२२४]}

{श १७०२ ज्येष्ठ शु १४
{ ता १५-६-१७८०

श्री

राजश्री हिसाजीपत व सदाशिवपत स्वामीचे सेवेशी

विनंति उपरि गणेशपत बेहरे याजवर इंग्रजानी छापा घातला ते समयी थोडीशी लढाई जाहाली, मशारनिल्हेस दोन तीन जखमा लागल्या, सभाळून निघोन हातगडा कडे आले, हे पूर्वी लिहून पाठविलेंच होते हे इकडे येताच तिकडे पारनेर यावर इंग्रेज वर जाऊन मारागिरी किल्ल्यावर केली दोन तीन हल्ले किल्लेकऱ्यानी मारून काढले आताच वर्तमान आले की किल्ला त्याणी घेतला पुढही ठाणीं घेत येणार राजश्री सखारामपत पानसे व बाजीपत जोशी फौजे सुद्धा कल्याणकडे होते त्यास मद्रासेहून तीन हजार माणूस इंग्रजाचे गलबतातून मुबईस आले व सुरतेहून दोन हजार माणूस मुबईस आले ते मिळोन वसईवर येणार अशा बातम्या निकडीच्या आल्या त्यावरून उभयता मशारनिल्हे वसईकडे गेले कल्याणकडे दुसरी फौज रवाना केली पर्जन्याचे दिवस, फौजेचें राहाणें कोंकणात कठीण इंग्रज पाईचीं माणसें, +त्यास पर्जन्याचा विधिनिषेध नाहीं आणि त्याच जमाव तर इकडे भारी होत चालला व कोंडाई बारी पावेतो येऊन ते तिकडील बदो बस्त करणार, याकरिता उभयता सरदाराकडील दहा हजार फौज जलद कोंडाईबारीवर पाठवून छावणी करवावी मागाहून उभयता सरदारानींही लौकर यावें राजश्री पाटील बावानींही या गोष्टीची तर्तूद केलीच असेल राजश्री परशरामपत भाऊ याजकडील वर्तमान सिरोळ घेतलें व कितुरकर भेटल्याचे पूर्वी लिहिलेंच आहे भाऊ गोकाकेकडे गेल्यावर येसाजी शिंदे व सटवाजी भोसले व मानाजी शिंदे त्रिवर्ग मिळोन, हजार बाराशें राउत व दोन हजार प्यादा असे कोल्हापुराबाहेर निघोन, दौड करून गाव मारू लागले जयराम स्वामींचे वडगाव लुटलें हें वर्तमान भाऊस कळल्यावर चार हजार फौज त्रिवर्गावर रवाना केली त्याणीं येऊन गाठ घातली लढाई जाहाली तिघाजणाचा मोड जाहाला तीनशें घोडे पाडाव आले पाईचे लोक व स्वार त्याजकडील फार मारले गेले शेवटीं सडे दोन तीनशें रावतानिशीं पळाले ते सामानगडच्या माचीस गेले तेथ पावेतों पाठलाग केला याप्रमाणें वर्तमान जाहालें, ते कळावें याकरिता लिहिलें आहे कितुराकराकडील सरकारचीं ठाणीं येणें व कोल्हापुरचा बदोबस्त राखणें याकरिता कृष्णे पलीकडे छावणीस फौज पाच हजार ठेवावी लागेल रवाना छ ११ जमादिलाखर हे विनंति पै।। छ २४ जमादिलाखर सुरूसन इहीदे समानीन मुक्काम उज्जनी

---

+ इंग्रजाचें पायदळ फार व मराठ्यांचे घोडदळ या गोष्टीस उद्देशून वरील लेख आहे

ले० २६९ } { श १७०२ ज्येष्ठ व २
[ ३२० ] } { ता १८-६-१७८०

श्री

राजश्री सदाशिवपंत स्वामीचे सेवेशीं

विनंति उपरि तुम्ही चंद्र २९ जमादिलेवल मुक्काम नजीक बारीया[1] तालुक पायागड येथून पत्र पाठविले तें पावलें, स्वामीचीं आज्ञापत्रे सादर जाहलीं तीं वाघोड्यास पावलीं राजश्री पाटीलबावास दाखविलीं व त्याचेंही पत्र दिलें हैदरखानाचे निभावणीपत्राची परवानगी निक्षूण जाहाली आहे आज अगर उद्यां घेऊन पाठवितों म्हणोन विस्तारें लिहिलें ते कळले त्यास हैदरखानाचें पत्र लौकर देण्याविषयीं निक्षुण सांगितलें हे फार चांगले जालें येणेंकरून मसलतीस + + ++ उपयोग + + + पडेल पेशजी तुम्ही पत्र पाठविलें होतें त्यांत लिहिलें होतें जे, मागाहून निभावणीपत्र पाठवितों त्याजवरून हैदरखानाकडील वकील येथें आनंदराव आहेत त्यास सांगितलें जे, पाटीलबावाकडून निभावणीपत्र लौकरच येईल, असें सांगितलें त्यावरून वकिलानें पठाणास लिहून पाठविलें, जे निभावणीपत्र लौकर पाठविणार त्यावरून वैशाख वद्य एकादशीस हैदरखान डेरेदाखल जाले म्हणून बातमीचीं पत्रें आलीं तुम्हास कळावें म्हणोन लिहिलें आहे राजश्री भगीरथराव शिंदे वगैरे पांच सात हजार फौज व तोफखाना दोहदचे मार्गें पुढें रवाना जाले, मागाहून पाटीलबावाही जाणार छावणीचा मजकुर उज्जनीचा तर्कांद दिसतो म्हणोन लिहिलें, त्यास ही गोष्ट ठीक नाहीं मसलतीस विलंब दिसतें याजकरितां तुम्ही राजश्री पाटीलबावाशीं बोलून कोंडाईबारीकडे सच छावणी करावी असा निश्चय करावा ही गोष्ट जरूर जाली पाहिजे येणेंकरून शत्रूवर दाब, मसलतीस उपयोग, याजकरितां कोंडाईबारीवरच छावणी करावी असें पाटीलबावाशीं बोलून निश्चय ठरेल तो लिहून पाठवावा निभावणीपत्र पाठवितो म्हणून तुम्हीं पूर्वीं लिहिलें होतें त्याचा इशारा वकिलास केला त्यावरून डेरे दाखल जाले हल्लीं पत्र यावयाची परवानगी जाली पत्र लौकर पाठविणार त्यास पत्र लौकर येऊन त्याजकडे गेलें म्हणजे ते कूच करून चेनापटणाकडे लौकरच जातील + सारांश उभयतां सरदाराची छावणी कोंडाईबारीवर व्हावी हें मसलतीस चांगलेंच उज्जनीस राहिल्यानें फार विलंब आहे आम्हास चांगलें दिसेल ते ल्याहावें, सूचवावें तेही दौलतेस व मसलतीस उपयोगी तेंच करतील हैदरखानाचे निभावणीपत्राची परवानगी जाली म्हणोन पूर्वीं तुम्ही लिहिलें होतें तींच अक्षरें हैदरखानाकडील आनंदराव यास दाखविलीं व येथुनहीं पत्रें हैदरखानास लिहिलीं कीं, राजश्री पाटीलबावाचें पत्र येतें, तुम्ही संदेह न धरता लौकर निघोन चेनापटणाकडे जावें त्यावरून हैदरखान डेरे दाखल जाले कांहीं फौजा तिकडे रवाना केल्या तुम्हाकडून मसूद्या प्रमाणें निभावणीपत्र रवाना जालेंच असेल हें पत्र पावताच हैदरखान लौकर जाईल. राजश्री नारोशिवदेव याची रवानगी चहू पांचा दिवशीं करतों वाईहून आले* रवाना छ १४ जमादिलाखर हे विनंति

---

१ देवगड वारिया गोधऱ्याजवळ + येथें मूळ पत्र फाटून अक्षरें गेलीं आहेत
*यावरून नारोपंत वाईचा राहणार होता असें होतें

ले २७० }
[ ४७८ ] }

{श १७०२ ज्येष्ठ व ९
{ता २६-६-१७८०

श्री

( छ २२ जमादिलाखर इहिदे समानीन )

आ साहेबीं खत फरहत नमत पाठविलें ते नेक्वख्तीं पोंहचून शादमानी हांसल जाली. आपण शुतर स्वाराबरोबर शिंदे यांचें खत पाठविलें तें पोंहचलें लेकीन हें खत निभावणीचें नव्हे, येथून पत्र लिहिलें त्याचा जबाब आहे आम्ही आपले दोस्तीवर नजर देऊन कूच-ब कूच रवाना होऊन गेलों असों शिंदे यांणीं निभावणीचें खत पाठविल म्हणोन पत्रात लिहिल तें कोठें राहिलें याची तहकिकात करून पाठवीतमें करावें म्हणोन कलमी केलें चुनांचे आ मेहरबाकडोन खत येऊन पोंहताच शिंदे याजकडे शुतर स्वाराची जोडी रवाना करावी तों इतांक्यात शिंदे याजकडून निभावणीचें खत रवाना करावयाचें राहिलें होतें तें मशार-निले यांणीं पाठवून दिल्हें हलीं आ साहेबाकडे पाठविलें आहे, पोंहचेल खताची इंत-जारी न करता एखलामावर नजर देऊन कूच ब कूच बेंगरुळाचे रुखें आ मेहरबाचें जाणें जाले, त्यास दोस्तीस लाजम व मसहलतीस मुनासब व दानाई व दूरदेशीस नेक तेंच अम-लांत आलें करारात व बोलण्यात जे गोष्ट आली त्यांत इकडून दुसरा अर्थ होवयाचा नाहीं येविशीं खातरजमा असावी खुलस करार बमोजीब सरकारातून कोणताही गुता राहिला नाहीं आ साहेबी बेंगरुळावर मुक्कामात न होता जलद मुखालिफाचे ताळुकियात पोंहोचून मुलुख ताख्त व ताराज करावा व प्रजास आयास आणून तबी वाकई अमलात यावी, व कृष्णराव नारायण वगैरे याची रवानगी इकडे जलद व्हावी आ मेहरबा करार-बमोजीब अमलात आण-तील, या बाबे दोस्तदाराची खातरजमा आहे बाजे मरातब राव मशारनिले यास कलमी केलें ते बयान करतील त्यावरून वाजे होईल म्हणोन नवाब हैदरअलीखा बहादूर यांचे नानाचे नांवें हिंदवी पत्र

---

ले० २७१ }
[ २२७ ] }

श १७०२ ज्येष्ठ व १२
ता २९-६-१७८०

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनति उपरी मुबईचे बातमींत वर्तमान आहे कीं, राजश्री पाटीलबावास कलकत्ते-करानीं पन्नास लाख रुपये द्यावयाचे करार केले त्यापैकीं तीस लाख रुपये तेथून रवाना झाले म्हणोन येथें बातमी आली तुम्ही तर हें वर्तमान काहींच लिहिलें नाहीं बारकाईनें शोध करून लिहून पाठवावें रा छ २५ जमादिलाखर हे विनंति

---

ले २७२ ) [ ४७१ ]) { श १७०२ ज्येष्ठ ( जून १७८०

श्री

हैदरअलीखान याजकडील वकील दोन आले त्याचा तपशील लिहिला व पहिले वकिलास उमेदवार करून कारस्थानी केली, ते सर्व अर्थ समजण्यात आले, ऐशियास हर कवाइतीनें सरकार काम ज्यात चागले तें पेशजीपासोन करीत आला, पुढेंही कराल, येविशी खातरजमा आहे नबाब निजामअलीखा वगैरे यास पेशजी फरमान पाठवण्याविशीं तुम्हास लिहिले होतें, त्याप्रमाणें तुम्हा पातशाह यास अर्ज करून फरमान तयार करविले असताल कदाचि [ त् ] नसले जालेया हल्लीं मसोदे पाठविले त्याप्रमाणें अर्ज करून फरमान तयार करवून पाठवावे +

---

ले २७३ ) [ ३२५ ]) {श १७०२ आषाढ व ७ (ता २३-७-१७८०

श्री

राजश्री सदाशिवपत स्वामीचे सेवेशी

विनति उपरि राजश्री पाटीलबाबा उज्जनीस होळकर इंदुरास छावणी करणार हीं गोष्ट मसलतीस फार विलग पडली सर्वत्र जाहिराणा जाला कीं मसलत सोडून घरास गेले, ही गोष्ट उघडी बाहेरील समजणारास दिसते घरातील रीतीने पहता पाटीलबावास इंग्रजाचें पारपत्य करणें जरूर व त्याप्रमाणें काळजी धरून तर्तुद ही ते करीत आहेत हीं आमची खातरजमाच आहे परतु बरसात होतांच फौज सुद्धा इंग्रजाशीं जाऊन गाठ घालीत तों पावेतों सर्वत्रास विलगपणाचीं बोलणीं बोलावयास कारणें जालीं व इंग्रजाशींही सावरून चतुर्मासात कोण कसें सधान लावील याचा सदेह प्राप्त आहे यास्तव छावणीस इंग्रजाच्या उरावर मातबर सरदार योजून दहा बारा हजार फौजेनिशीं पाठवून नबाब हैदरखान व भोंसले यास दुहेरी पत्रें पाठवावीं कीं इंग्रेज जरबेंत आल्यामुळें सुरतेस छावणीस निघोन गेले पुढें बरसात त्या प्राती भारी, भारी फौजेस रहावयास अडचण, यास्तव पंधरा हजार फौज छावणीस अमके ठिकाणीं ठेऊन आम्ही उज्जन अथवा बराणपूर काय निश्चय ठरला असेल तेथें छावणीस आलों सर्व तयारी जारी आहे बरसात होताच इंग्रजाचे पारपत्यास जाणें घडेल छावणीस राहिलों हें हीं इंग्रजाचे तोंडावरच आहे व पल्ला ही नजीक आहे जलदीनें जाऊन पोंचू जो नक्षा इंग्रजाचें पारपत्याचा ठरला आहे त्याप्रमाणें आपले आपले तर्फेचें इंग्रजाचें पारपत्य करावें त्याप्रमाणें पत्रें जरूर पाठवावीं येणें करून त्याची खातरजमा पटेल आणि मसलत सोडणार नाहींत पत्रें न गेल्यास मसलत सरदारांनीं सोडली असें होऊन अगदीं मनसबा नासेल आज पावेतों खट-

---

+ हें पत्र पुण्याहून नानानें दिल्ली येथील हिंगणे वकिलास लिहिलेलें आहे

चट करता करता हैदरखान बेंगरुळा पुढ गेले मीर वगैरे फोजा पुढे रवाना केल्या आपण ही मागाहून दरमजल जात आहेत भोसल्हे बंगाल्यानजीक गेले नबावानीं ही आपले चिरंजीव याजबरोबर फौजेची तयारी करून बाहेर काढिले आहेत हैदरखान इंग्रजावर गेला हा बातमी नबाबास कळल्यावर आता रहाणार नाहीत असा मनसबा तोडास आला असता उज्जनीचे छावणीच वर्तमान कळल्यावर सवास संदेह पडेल यास्तव पत्रे लौकर पाठवावा म्हणजे दुसरा होनाच चाहोकडून ताण चागला बसावया जोगा आहे मनसबा रयास आला आहे सर्व ही मनसबा व दूरदेशा पाटीलबावा समजतात आम्हास जे सुचते तें आम्ही ल्याहावें म्हणून लिहिले आहे +उज्जनीस गेल्यामुळ मसलतीस एक प्रकार जाहिराण्यात दिसेल तत्राप ताण तर इंग्रेजाचे उरावर दहा बारा हजार फौज ठेवून पाठी वर रहाणे व्हावयाचें होतें असो, पुढ तरी मसलतीस चागल पडे व दिसे असें करावे रवाना छ १ रजब हे विनंति पैवस्ता छ २० रजब सुरसन इहिदे समानान मुक्काम उज्जनी बाहेर हरनाथ कासीद

---

ले २७४ } { श १७०२ श्रावण शुद्ध २
[ ३२१ ] } { तार २-८-१७८०

श्री

राजश्री सदाशिवपंत स्वामींचे सेवेशीं

विनंती उपरि तुम्ही छ १२ माबानचें पत्र पाठविलें तें छ २६ मिनहुस पावले राजश्री पाटीलबावा यांणीं बलावून सांगितलें जे, आम्हास वरचेवर कोडाईबारीवर यावें म्हणून लिहिलें येतें, त्यास गोहदकर जाट व इंग्रज एक होऊन शिप्री कोल्हारावर छावणी केली व नजफखानाची व जयपूरकराची फौज एक होऊन होळकराकडील रामपुरा वगैरे महालचीं ठाणी उठवून त्याणी आपलीं कायम केली असें असता आम्ही देशीं गेल्यास माळवा शत्रू घेतील मग जातीने काय घडणें तें घडेल फौज आम्हाजवळ राहणार नाही याजपेक्षा कलकत्त्याहून दक्षणेकडे इंग्रज यावयास निघतात त्यास वाट अतरवेदींतून पडली आहे, ही मना केली म्हणजे सुरत मुंबईकराची कुमक होणार नाहीं पातशाहा व नजफखान यास मिळवून घेऊन इंग्रजाचे पारपत्य करावें ही मसलत चागली व ग्वालेरीचें वर्तमान गोहदकरानीं घेतल्याचें व रघुनाथराव रामचद्र कुटुबसुद्धा मारले गेल्याचें व आबोजी इंगळे कुटुबसुद्धा निघून आल्याचें व खानदेशात केसो कृष्ण आल्याचें व सारेच देशी एक जागा आल्यानें वहूकडील मसलती कशा आटोपतात ? विचारास आलें तर सरकारातून देश व कोंकणची मसलत साभाळावी, नबाब भोसले याची देखील फौज आणावी, होळकरानीं खानदेशचे महाल केसोपतानीं घेतले ते सोडवून खानदेश व गुजराथ मिळून इंग्रजाचें पारपत्य करावें आम्हास सांगितल्यास पातशाहा नजफखान व राजेरजवाडे मिळून घेऊन इंग्रजाशीं गाठ घालितों, याप्रमाणें विचारास आलें तर होळकरासही पत्रे पाठवून खान

---

+येथून अक्षर खुद्द नानाचें आहे

देशचा मसलत याजकडे लावावी आम्हास हिंदुस्थानात जाण्याची परवानगी पाठवावी म्हणोन विस्तारें लिहिलें ते कळल त्यास येविशाचीं उत्तर राजश्री पाटीलबावाचें पत्र आलें त्याचीं विस्तारें उत्तर लिहिलीं आहेत त्याजवरून तुम्हास सविस्तर कळेळ पूर्वीं तुमचीं दोन पत्रें पुढील मसलतीच्या मजकुराचीं आली होतीं त्याचीं उत्तरें पूर्वीं दुहेरी लिहून पाठविलीं तीं पावलीच असतील इंग्रजाच्या तीन मसलती एक हिंदुस्थान, एक गाडर, एक मुबईकर, अशा तीनहीं करणें प्राप्त त्यात हिंदुस्थानचे इंग्रजाचे मसलतीस पातशाहा नजफखान अनकूळ होतील यामुळें हलकी जाईल, मुलूक व पैकाही सरकारात येईल, अशी आहे खानदेश गुजराथ व देशची मसलत औघड आहे यास्तव राजश्री पाटीलबावाचें येथें कोंडाईबारीकडे जाहल्यास फार चागलें, नाहीं यापक्षीं होळकर फौजसुद्धा व सरकारचे सरजामी पवार व राजश्री शिवाजी विठ्ठल वगैरे मिळून भाद्रपदमासीं कोंडाईबारीवर येथें होय असें करून मग पाटीलबावानीं हिंदुस्थानचे मसलतीवर नमूद व्हावे होळकराचा अनमान इकडे यावयाविषयीं जाहल्यास पाटीलबावानीं कोंडाईबारीकडे परिछिन्न यावें होळकरास पत्र पाठवावें म्हणोन लिहिले त्यास येथून पत्रें पाठवावा त्याचे जाब त्याणीं येथें लिहून पाठवावे, फिरून त्याचीं उत्तरें जावीं, या खालींच दिवस निघोन जातील मसलतीस दिवस राहिले नाहींत याकरिता राजश्री पाटीलबावानीं होळकरास अथवा त्याजकडील कारभाऱ्यास बलावून आणून साफ पुसावें कीं, एक हिंदुस्थानची मसलत व एक गाडराची खानदेश गुजराथ सुद्धा, यातून तुम्ही कोणती करता ? जी ते कबूल करतील ती त्यास सागून त्याणीं तर्तुदेस लागावें आणि उभयता सरदारानीं सरकारात पत्रें पाठवावीं याउपरि अवकाश राहिला नाहीं इंग्रज तो पर्जन्यातही पेशकदमी करीत आले तेव्हा ते दसरियाची वाट पहात नाहीं असें मनात आणून लौकर तर्तुद दोहीकडील व्हावी कोणाकडे कोणती मसलत हा उभयता विचारें राफता लिहून पाठवावें त्याप्रमाणें सरकारातून पत्रें पाठवावीं असें असल्यास पाठवू परतु पत्राची वाट न पहाता आपल्या कामावर नमूद व्हावें वरकड इकडील अडचणीचे प्रकार पूर्वीं तुम्हास विस्तरें लिहून पाठविलेच आहेत त्यांतही श्रीमताच्या दैवें करून जें घडेल तें खरें नबाबाची व भोसल्याची फौज इकडे आणविली असता न यावयाचीं कारणें पूर्वीं लिहिलींच आहेत त्यावरून कळनील. रवाना छ ३ रमजान हे विनति

---

ले २७५
[ ३२२ ]

श १७०२ श्रावण शु. ३
ता ३-८-१७८०

श्री.

राजश्री सदाशिवपत स्वामींचे सेवेशीं

विनती उपरि पूर्वीं तुम्हा राजश्री पाटीलबावास राजश्री पुरुषोत्तम महादेव[1] यांचे

---

१ हिंगणे, दिल्लीच्या वकिलातीवर

पत्र आलें होतें त्याची नक्कल येथे पहावयाकरिता पाठविला, व सरकारातहा मशारनिल्हेचीं पत्रें आलीं होतीं त्यातील साराश पहाता, पातशाहा व नजफखान याच्या मनातून इंग्रेजाचे पारिपत्य करावे, इकडील फौज मदतीस असावा, उभयता सरदारा न गुजराथचे मसलतीचा पिछा सोडू नये, व पातशाह व नजफखान यास टाकून इंग्रजाकडील राजकारण आलें असता स्नेह करू नये ` विषयीं वचन प्रमाण परस्परें खातरजमेचीं झालीं असता, पातशाह व नजफखान इंग्रजाची मसलत करतात असे अर्थ त्यात लिहिले आहेत त्या पक्षीं उभयतां सरदाराकडील दहा बारा हजार फौज पातशाहा व नजफखान याशीं पक्का करार परस्परें होऊन त्याकडे पाठविलीं असता ते इंग्रजाशीं बिघाड करून मसलत करतात, आणि उभयता सरदार कोंडाईबारीकडे आले असता हेहो मसलत चागली होईल उभयता सरदारातून एकजण कोंडाईबाराकडे येऊन एकाने हिंदुस्थानची मसलत करावी हें तों पातशहास फारच अनुकूलतेचे पडेल साराश या समयीं पातशाहा व नजफखान यास जरूर मेळवून घ्यावें त्याचा आपला करारमदार पक्का करावा मग फौज अथवा एका सरदारान जाणें कोणते ठराव करणें तें करून लौकर करावें परतु पातशाहा व नजफखान यास मेळवून घ्यावें हें तुम्ही पाटलिबावाशीं बोलून लौकर अमलात येई ते करावें आता दिवस राहिले नाहीत त्वरा व्हावी रवाना छ ३ रमजान हे विनंति

---

ले २७६ } [ ३२६ ] } — { श १७०२ श्रावण शु ४ { ता ४-८-१७८०

श्री

राजश्री सदाशिवपत स्वामींचे सेवेशीं

विनंति उपरि आलीकडे तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं त्यास राजश्री पाटीलबावा पुढील मनसुब्याची तरतुद व मसलत कशी करतात हें सविस्तर लिहून पाठवावें. पाटीलबावास सर्व प्रकारें श्रीमताचे दौलतीची काळजी आहेच, व सर्व भारही त्यावरच तेव्हा येथून विस्तारें काय ल्याहावें व जें सुचत गेलें तें पूर्वी लिहित गेलोंच आहों उज्जनीस गेल्यामुळें व फौजेस निरोप देतात या वर्तमानानें चहूकडे अदेश पडले आहेत, त्याचीं निराकरणें आम्ही करावयाचे रीतीनें करीतच आहों परतु इंग्रजाची मसलत शेवटास नेलीं तरच सर्व गोष्टीचा परिणाम उत्तम त्याची तरतूद साल्मजकुरीं तरी लौकर व्हावी भाद्रपद मासीं फौजे सुद्धा कोंडाई बारीवर आणि गोविंदराव गायकवाड याजबराबर दहा बारा हजार फौज देऊन अमदाबाज व बडोद्याकडे कामास सुरू व्हावा इंग्रजाचें कोशल ठरलें त्यातील बातमी ऐकण्यात आली आहे कीं गुजराथची ममलत गुदस्ता बेत केल्याप्रमाणें अमदाबाज डबाई घेऊन मुलूक कबजेंत आणला आणि स्वस्थपणें सुरतेस आलों, छावणी केली माल मजकूर बरसात होताच, किंबहुना भाद्रपदमासीं गाडर जमियती सुद्धां कोंडाई बारीन खानदेशात येऊन पुढें चाल करावी आणि मुबईकर व मद्रासेहून मुबईस तीन हजार माणूस आलें आहे त्या सुद्धा पुण्याकडे चाल करावी आम्हा पुढें कोण ठह

पावतो ? अशी मगरूरीचीं बोलणी होऊन सिद्धात ठराविला आहे, व मुबईस मामयनाचा तरतुद भारी होत आह ही बातमी प्रमाण आहे यास्तव त्याचें निघण नाहा जाहलें तर आपण छातीवर त्याचे जाऊन उभे रहावें तरच काही मसलत होईल या गोष्टास थोडीसा ढील जाल्यानें मसलत सभाळणें कठीण आहे या करता फौजेस निरोप देऊ नये कदाचित् म्हणतील कीं फौज जेव्हा पाहिजे तेव्हा वरचेवर जमा होईल, तर हा गोष्ट देशा असल्यावर फौज नजीक असल्ये या करता लौकर जमा होत्ये, दूर असल्यावर देशचा फौज जमा होण्यास दिवसगत लागते तेव्हा पुढें विलग पडेल हे सविस्तर अर्थ पाटीलबावाशीं तुम्हीं बोलावें तेही सर्व समजतात थोरपणास उचित तेंच करतील रवाना छ ३ साबान हे विनंति पवस्ता छ १७ साबान सुरुसन इहिदे समानीन मुक्काम उज्जेन

---

ले २७७ [३०४] } { शके १७०२ श्रा शु ८ ता ८-८-१७८०

श्री

राजश्री सदाशिवपत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि हैदरखानास मसुद्याप्रमाणें पत्र राजश्री पाटीलबावाचें पाठविले तें पावलें, म्हणून पूर्वी तुम्हास लिहिलेंच होतें हैदरखानानें सरकारच्या वकिलास निरोप देऊन बेंगरुळास गेले निभावणीपत्रही त्याकडे रवाना केलें सरकारच्या वकिलाबरोबर त्यानाही आपले कबील मातबरे नूरमहमदखान या जवळ त्याणीं आपले कडाल तहनामा व मध्यस्थास खातर जमेचीं पत्रें देऊन, बराबर नरसिंगराव वकाल यासही देऊन रवानगी इकडे केली सरकारच्या वकिलापासून हैदरखानानें निघते समथा खातरजमा करून घेतली कीं, पाटीलबावाचे निभावणीपत्र लौकर पाठवून द्यावें त्यास निभावणीपत्र इकडून गेलें चागलेंच जाहलें बागलकोट्या नजाक वकील आल्याचीं पत्रें आलीं येथें आल्यावर लिहून पाठवू आलीकडे हैदरखानाची पत्रें त्याचे वकिलांस आलीं त्यात बेंगरुळाहूनही कुच करून हैदरखान कडपचा थाचे घाटानें अर्काटवर गेले, व मिरा बराबर फौज देऊन चेनापट्टणचे तालुक्यात हगाम पूर्वीच सुरु कराविला चेनापटणची बातनी आली त्यात लिहिलें आहे कीं, हैदरखान बिघाड करून येत आहे, यामुळें महमदअलीखान व चेनापट्टणकर इंग्रज बहुत घाबरे होऊन ल्ढाईची तरतूद करतात, व वकिलानें कु पी या बातमीत सूचना लिहिली आहे कीं, इंग्रज व महमदअलीखान मनसबा करतात कीं, पतप्रधान याकडे अनुसधान लावावें, आणि हैदरखानास सागावें कीं तुम्ही पतप्रधान याचा काय भरवसा धरलात ? आम्हास म्हणतात कीं, "तुम्ही आम्ही मिळोन हैदरखानचें पारपत्य करू त्यास आम्ही पतप्रधान याचा स्नेह चाहत नाहीं जर तुम्ही नच ऐका तर आम्ही या प्रमाणें करतों आणि तुम्ही आम्हास अनकूळ झाले तर पतप्रधान याची दौलत तुम्ही आम्ही मिळोन घेऊ" असा शकटभेद हैदरखानाचें व सरकारचें द्वैत पडावें या करता करणार आहेत सावधता असावी हैदरखानाचें सरकाराशीं स्नेह सपादून इंग्रजाशीं बिघाड केला हा ये समयीं मोठा उपयोगीं आहे इंग्र

जाचें मानस आहे कीं, हैदरखान, श्रीमंत व नबाब तिघाच्याही दोलता घ्याव्या त्यास कोणेंही प्रकारें एकाशीं शरूट भेद करून एकास खालीं पाडावें, असे करता एक राहील त्यास आपण शेवटीं गुडाळावें याची पूर्ता बंदोबस्ता असावी म्हणोन वकिलाने लिहिल आहे, हे वर्तमान पाटीलबावास सांगावें येथील तो मजबुदा पाटालबावाचे भरवशावर पक्कीच आहे पूर्वी पत्राच्या रवानग्या तीन चार जाल्या त्याचा उत्तरे अद्याप आला नाहा, हें काय? आता वाटेचाही पेच नाहीं याकरता पत्रें वरचेवर येत जावा रवाना छ ३ सबैन हे विनंता पातशाहा व नजफखान याजकडलि मजकुराचा पत्रें राजश्री पुरुषोत्तम महादेव याजकडून इंग्रेजाचे मसलतीविशा आलीं होता तीं तुम्हाकडे पाठविला त्यास दिवस फार जाहले उत्तरें निश्चय काय तो ठरावून गेला पाहिजेत दिवस थोडे पुढें राहिले, व राजश्री दिवाकरपंताकडील मजकुर लिहून पाठविला होता वगैरे मजकुराचा जाबच येत नाहीं तर वरचेवर जाब माळुमात जमा धरून पाठवीत जावे हे विनंती नबाबाची थैली पाटीलबावास आली होती ती पूर्वी पाठविली त्यात आदवानी करता गुता असे लिहिलें असेल त्याचे उत्तर ल्याहावें कीं, आदवानीचा उपद्रव हैदरखानानीं मना करून हैदरखान चेनापट्टणावर गेले या उपर इंग्रेजाचा वकील आपणाशीं आहे त्यास साफ उत्तर देऊन निरोप द्यावा आणि सिकाकोल, राजबदरीकडे इंग्रेजाचा नतीजा लौकर द्यावा आपण नक्षा ठरावून पाठविला त्याप्रमाणें केलें असता विलंब आपणाकडून होऊ नये या अन्वयें लिहून† एक नकलही पाठवावी हे विनंती पै।। छ १७ सबैन सुरुसन इहिदे समानीन मुक्काम उजैन

---

लें० २७८ [ ४६० ] — { शा० १७०२ श्रावण शु. १५ ता १५-८-१७८० }

श्री

( रा छ १८ साबान इहिदे समानीन )

आम्ही बेंगरुळास पोहोंचून नूरमहमदखान वगैरे याची रवानगी करून पुढें दरकूच रवाना होऊन गेलों असों आइदे इंग्रजाची तबी जाले मजकुरास कलमी करण्यात येईल इंग्रजास माकूल तबी करावी ऐसें मुकरर केले आहे त्यास चेनापट्टणाकडे ताण बसताच आपल्याकडे सलुखाचा पैगाम लावनील तरि त्याशीं सलुख न करिता तबीच करावी या कामावर मुकय्यद राहून अमलात ये ऐसें करावें, म्हणोन कलमी केलें चुनाचे, नूरमहमदखान वगैरे गजिंद्रगड पावेतों पोचल्याची बातमी आली ताहाल कृष्णा उतरले असतील येऊन पोहोंचतील टोपीकराची जात बेइमान व फरेबी एकीकडे राजकारणें लावून एकास दगा करतील येविशींची मेहतियाद व हुशारी असावी, म्हणोन इकडून पेहाम आ साहेबास कलमी करण्यात आलें दर्याविला आ मेहेरबाही तोच अंदेशा दिलात आणोन कितेक लिहितात त्यास सरकारातून जो दारमदार जाला त्यात तफावत हरगीज यावयाचा नाही बे

---

† हें नबाबास महादजीनें लिहावयाचें अशी सूचना नानाची आहे

बाबें पक्की खातरजमा असावी ख्याल दिगर दिलात न यावा इंग्रजाचे क्वायतीचा व चालीचा नक्षा सरकारात खूब माऌम आहे आ मेहेरबाकडे बळेंच कोणी पाठवून राजकारण लावितील, व तमा तवके दाखवून शोहरा करतील, आणि सरकारात लिहितील कीं नबाब बहादराचा आमचा जाबसाल ठरावात आला, याच तऱ्हेनें सरकारातही राजकारणाची शकल करून आ मेहरबास कल्पी करून सिगोफे बरपा करतील हर क्वाइतीनें तरफैन खलल आणावा या कामास इंग्रज कसूर करणार नाहींत याज करिता आ साहेबीं त्याचा भुलावा व दगाबाजी नजरेंत राखोन शकशुभ दिलात न आणिता करार बमोजीब खातरखा जमा करावी सरकारातून ही सुल्हपोशास तवी वाकई अमलात येईल दुसरी गोष्ट हरगीज होवयाची नाहीं येविशीं खातर जमा आहेच आणि असावी राव शिंदे याजकडील निभावणीचें खत पेशजी रवाना जालें तें आ मेहेरबास पोंहोंचलें असेल अगर पोंहचेल म्हणोन हैदरअलीखा बहादर यास नानाचे नांवें हिंदवी पत्र

---

लेख २७९ } { श १७०२ श्रावण व
[ ३०५ } { ता १८-८ १७८०

श्री

राजश्री सदाशिवपंत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि इंग्रजाचीं काहीं पल्टणें व गुल्जारखानाचा भाऊ सोनगडास आलें मागाहून दुसरीही कुमक येणार त्या तोंडावर फौज छावणीस असावी, त्याची तरतूद पाटीलबाबानीं केलीच असेल तूर्त त्या तोंडावर कोणीच नाहीं असें जाणून राजश्री गणेशपंत बेहेरे याची छावणी फौज सुद्धा तिकडे करविली छाप्यामुळें गळाठा लोकाचा थोडा बहुत जाहला व मागील देणीं मुबलग तीं सकटें काय त्याहाचीं? तथापि थोडी बहुत तर्तुद येथून होईल ती करून दिली व गणेशपंत बेहरे याणींही हिंमत धरून छावणीस राहिले विसाजी आपाजी पाटीलबावा पासून निरोप घेऊन निघाले, त्यासही येथून पत्रें पाठविलीं कीं, तुम्हीं फौज सुद्धा गणेशपंत बेहरे याजकडे जाऊन तेथें छावणी करावी परंतु फौजेचा गळाठा फार, छावणीस रहाणें न होय, याकरिता टोक्या आलीकडे आले कोंकणात फौज होती, तिची तळेगावावर छावणी करविली मुंबईकर नजीक कसा प्रसंग पडतो कळत नाहीं, याकरिता फौजेची छावणी करविणें प्राप्त जहालें तसेंच करवीर प्रांतातही राजश्री परशुरामपंत भाऊ याणीं फौज छावणीस ठेविली पर्जन्यकाळीं फौज कोंकणांत रहाणें कठिण, आणि कोणे समयीं कोणे स्थळास इंग्रेज दगा करतील, याकरिता दहा बारा हजार गाडद ठेवून वसई वगैरे जागाचा बदोबस्त केला आहे यापैकीं अनंदराव रास्ते व धुळप याजबरोबर पांच हजार माणूस देऊन कल्याणा नजीक मलगगड आहे तेथें राहून कल्याणकराशीं नित्य उठोन पेटा बेलापुराकडे असें करून झोंबट लाविलें आहे त्यास चैन पडू देत नाहीं असें केलें आहे गाडदी वगैरे पाईच्या माणसांचा दरमहा दीड लाख होतात व फौजेचें देणें पावणेदोन कोड चढलेंच आहे शिवाय तोफखाना व किल्लेनिहाय व हुजूरातचा खर्च व आरमार वगैरे खर्च

किती आणि जमा काय हें ध्यानात यावयाजोगे आहे गेले अखेर साल पावेतों साल-मजकुराच्या रसदा जाऊन हैदरखानाकडील खडणीच्या ऐवजीं मोबदला करून चालविलें आता बाकी राहिली नाहीं राजश्री पाटीलबाबा श्रीमंताच्या पायाशीं एकनिष्ठ व आमचा भाऊपणा अकृत्रिम, बरें वाईट सागावयास जागा इतकाच, असें जाणून लिहिलें आहे सर्व साभाळणें राजश्री पाटिलबाबाकडे आहे व भारही त्यावरच आहे र॥ छ ३ साबान हे विनती पाटीलबावासही पत्र पाठविलें आहे प्रविष्ट करावें हें विनती पौ॥ छ १७ साबान सुरूसन इहिदे समानीन मुक्काम उज्जेन

---

ले २८० } { श १७०२ श्रावण व ५
[४५८] } { ता २०-८-१७८०

दुसरा मसुदा ॥ छ २४ साबान इहिदे समानीन

आ साहेबीं छ २९ रजबचें खत मसरत नमत पाठविलें तें नेक वक्तीं पोंहचलें आम्ही भारी जमियतनशीं घाट उतरून चगम व कळसपाक, पोळूर व त्रिनामल ति म रायगड व हुलभगड वगैरे मकाणात ठाणीं घातलीं त्याजकडील बार व तुरुक स्वार घोडीं पाडाव आणिलीं, व तमाम तालुक्यात दौड पाठविली मच्छिलीबदराकडून गुटूरच्या रस्त्यानें इग्रजी कुमक येत असता दहा हजार फौज पाठवून त्या जमियेतेसच घेराघेरी करविली आहे इग्रज आपली फौज जमा करितात मोकाबिल्यास येतील तरि खुदाचे फज लेनें तबी होईल ते जहुरात येईल तरफैन जुदाई नाहीं कैफियत इकडील तिकडे व तिकडील इकडे मालुम होत असानी म्हणोन कलमी केलें जुनाचे आ मेहेरबाहीं इग्रजाचीं मकाणें घेतलीं व तमाम तालुक्यात दौड ताख्त व ताराज करण्यास गेली आहे व कुमकेचे जमियेतेस घेराघेरी करविली आहे हें ऐकून न्याहायत खुषी जाली आं साहेब इरादा करून मातबर सरजामानशीं त्या जिल्ह्यात गेले, तेन्हा टोपीकरास खूब नसियेत पोहोंचवितिल येविशीं खातरजमा आहे सरकारात सरजाम तयारी आहेच बाजे फौजाही जलद मुखालिफाचे मोकाबिल्यास नमूद होतील बादशाहाकडून इग्रजास तबी करण्याची मसलत ठरून इशारा आला त्यास मसलत कबूल करून दिल्लीस जबाब रवाना जाले याचा ता पेशजी आ मेहेरबास कलमी करण्यात आला सरकारची व आपली जुदाई नाहीं सलाह मसलत एक याज-करितां पैहाम आपली खैरियत व इग्रजाचे तबीची कैफियेत हमेश कलमी करीत असावी म्हणोन नबाब हैदरअलीखा बहादूर यास नानाचे नाव हिंदवी पत्र

सोनगडाकडे पलटणें इग्रजाचीं आलीं यावर इकडून गणेशपत बेहेरे फौजसुद्धा दौड करून गेले कोकणातही लढाई सुरू आहेच छ १९ साबान इहिदे समानिन श्रावण

---

ले २८१ } { श १७०२ श्रावण व ८
[ ४७० ] } ( ता २३ ८ १७८०

छ २१ मोहरम ॥ श्री ॥

( रा छ ५ समानान )

बहुत दिवस गुजरले आसाहेबाकडून खैरीयेतचे खत येउन वर्तमान कळत नाही त्यास दोस्तीचे अल्मात ऐसे नसावें हमेश खैर आफीयेतचें खत पाठवून दिलशाद करीत जावा हें लाजम आहे आ मेहरबाचे जाणे चेनापट्टण जिल्ह्यात जालें असेल जालें नसालिया करार बमोजिब जलद जाणे होउन इंग्रजास ताण बसवून सजा अमलात यावी गुजराथ प्रांतीं कर्नेल गाडर याशा व सरकारच्या सरदारापाशीं लढाई सुरू आहे पाच-चार लढायात इंग्रजास नाशिहातच जाली तेव्हा या फौजापुढें आपला टिकाव होत नाहीं ऐसे समजोन कर्नेल गाडर याणीं सुरतेस माघारा जण्याचा मनसबा करून, नर्मदा किनाऱ्यास आले, पिच्छावर सरकारच्या फौजा आहेत कोंकण प्रांतीं ममईकर इंग्रजानीं हंगामा केला त्याचे तबीचे व कोलापूर व कितूरकर वगैरे याणी सरकार तालुकियास इजा दिली त्यांचे पारिपत्य त्यांचें कुलआजुल्-कद्र कृष्णराव नारायण यास कलमी केलें ते जाहिर करतील त्यावरून मुफसल मालूम होईल तरफैन दोस्ती व येगानगत तेव्हां सल्लाह मसलत पैहाम इतला करीत असावी सर्व मरातब आ साहेबाचे दिलनिसीन आहेत म्हणोन हैदरअलीखा बहादूर यास नानाचे नावे हिंदवी पत्र

---

ले २८२ } { श १७०२ श्रावण
[ ४६८ ] } ( ऑगस्ट १७८०

श्री

तुम्ही सरकार कामाविशीं बहुत कळकळीनें सायास करिता म्हणोन रघुनाथभट यांणीं सागितलें त्यावरून परम सतोष जाला साप्रत रघुनाथभट यास पाठविले आहेत सविस्तर मजकूर इकडील मागतील त्याप्रमाणें तुम्ही व मशारनिले एकविचारें होऊन ज्या योगे सरकारकाम चागलें होय व लिहिल्याप्रो घडे तें करावें यातच इकडील तिकडील कामें व नफे आहेत राजकारण मोठें याचें यश तुम्ही घ्याल ही खातरजमा, आणि घ्यावें पत्राची उत्तरें अति सत्वर पाठवावीं म्हणोन रामकृष्णभट केळकर यास नानाचे नावें पत्र

---

ले २८३ } { श १७०२ भाद्रपद शु ५
[ २४९ ] } ( ता ३-९ १७८०

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनती उपरि तुम्हास जाऊन बहुत दिवस जाहले, अद्याप उज्जनीस पोंहचून पत्र न आलें हें काय ? असो राजश्री पाटीलबावांचीं व सदाशिवपत याचीं पत्रें पुढील मसलतीचे

मजकुराचीं पूर्वी दोन आलीं त्याचा उत्तरें पूर्वींच पाठविलीं तीं पावलाच असेताल हल्लीं ग्वालेर गेली वगैरे मजकुराचा पत्रे आलीं, त्याचींही उत्तरें पाठविलीं आहेत ग्वालेर गेला वाइट गोष्ट झाली इश्वरी इच्छा ' साराश गुदस्ता जाहले प्रकार त्यास तुम्ही माहीतच आहा असा जाहले तें गुदस्त साल मजकुरीं तरी जलदीनें स्वच्छतेने मसलतीचा उद्योग त्वकर घडावा नाहीं तर परिणामी नाट नाहीं उगेच सदेह व निमित्यें ठेवावीं यात कोणाचेही कल्याण नाहीं नाश किती होतात हे पाहव आम्हास बरें वाईट सुचेल ते लिहावे म्हणून लिहितो जें थोरपणास उचित ते करतील राजश्री पाटीलबावास सागावे कीं आपण कोणतीहा मसलत करावी, परतु दृष्टि इकडे ठेवावी रा। छ ३ रमजान हे विनति पातशाह व नजबखान याम जरूर मेळवून घ्यावे इग्रेजाचे मसलतीस फार उपयोग पडेल हे विनती

———

ले० २८५ }
[ ८७५ ] }

{ श १७०२ श्रावण व ११
{ ता २-८-१७८०

श्री

तिसरा मसुदा रवाना छ २५ साबान इहिदे समानान

चेनापट्टणकरास इकडून खूब ताण बसताच इग्रज बजिद होऊन आपल्याकडे राजकारण लावितील, व मुद्देमाफक कबूल करतील, ते खातरेस न आणिता दोन तीन साले लागलीं तरी लागोत, लेकीन तबीच करावी याची मजबुती असावी, म्हणोन हमेश आसाहेबाचे कलमी करण्यात येते व हल्लीं महमद अलीखा याचे बोलण्याची अखबार विनाजीपताकडून आली त्याची नकल व आ मेहेरबाचे पत्र नूर महमदखान व नरसिंगराव याजकडे आलीं मशारनिले याणीं अथणीचे मुक्कामीहून इकडे पाठविलीं त्याजवरून मुफसल कैफियत मालुम जाली चुनाचें, पैहाम आ साहेबा अदेशा दिलात आणोन कलमी करावे ऐसे नाहीं तरफैन करार मदार जाला तो मजबूत व पक्का आहे इग्रज बजिद होऊन व तमा दाखवून राजकारण करू लागल्यास तरफैनच्या सल्लाह मसलतीखेरीज हरगीज मजूर होणार नाहीं, याविशीं पक्की खातरजमा असावी आ मेहेरबा चेनापट्टणच्या सरहद्देस गेले, इग्रज नजदीक, त्याची चाल बहुरगी, तऱ्हे तऱ्हेचे मकर व फरेब दाखवून तरफैन दिलात खलश यावयाविशी खियाल नमूद करतील त्यास आ साहेब दुरदेश व मजबुत मिजाज इग्रजाचे मकर-फरेबास खूब वाकफ तेव्हा त्याचे खियालावर न जाता तबीच करतील, येविशीं खातरजमा आहे बिनाबर इतिला कलमी केला असे मुफसल राव मेहेरबा राव रास्ते व कृष्णराव बल्लाळ लिहितील म्हणोन नबाब हैदरअलीखा बहादूर यास नानाचे नांवे हिंदवी पत्र छ १९ साबान इहिद समानीन श्रावण

———

१ वारवार

ले २८५
[४८४]

श १७० भाद्रपद शु ८
ता ६-९-१७८०

श्री

रा छ ७ सवाल इहिदे समानीन

आ मेहरबानीं तिमरी व कावेरीपाक येथे ठाणे घालून अर्काटचे मुक्कामाचे खत पाठविले होतें तें पोंहोंचलें त्याबाद पधरा रोजाचा आरसा गुजरला, लाकिन् तिकडील कैफियत व आपलीं खैरीयेत इतल्ला होत नाहीं सबब इतजारी असे त्यास मुखालिफ कोणे ठिकाणीं, व जमीयेत किती जमा झाली आइदे त्याचा इरादा व तर्दुद काय आहे, हे अखबारेवरून आसाहेबास रोजबरोज मालूम होतच असेल त्या बमोजीब दोस्तदारासही मुतवातेर कल्मी करीत असावे मुखालिफावर आमेहेरबाची तदबीर दीनबदीन गालब मजबूद पडावी व हे अखबार पैहाम इकडे येत असावी, या गोष्टीची दरखास्त बहुत आहे इकडील सर्व तयारी जाली आहे बाद दसरा सरदार व फौजा मुखालिफावर नमूद होतील कर्नेल गाडर मुबआले त्याचीही तयारी येविशींचे मरातिब औतजात दोस्ता नूर महमदखा व नरसिंगराव लिहितील त्यावरून वाजेह होईल म्हणोन हैदरअलीखा बहादूर यांस नानाचे नावें हिंदवी पत्र

आहे बाददसरा मुकाबिल्यास आल्यास होईल ते जहुरात येईल

---

ले २८६
[२६०]

श १७०० भाद्रपद व १
ता १४-९-१७८०

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशी

विनती उपरि आमची व राजश्री पाटीलबावाची भेट जाल्यावाचून मसलत निर्वेध होत नाहीं, त्यापक्षी भेटीचा योग करावा, भेट होताच मसलतीचा ठराव लवकर होऊन आपलाले कामावर जावे असें जाल्यास उत्तम दिवसगत लागल्याने शत्रु हावभरी होतील तसे होऊ नये फौजेचा जय सिरोज भेलशाचे सुमारे करवून आम्ही थोडक्या फौजेनिशी बऱ्हाणपूर पों। येतों, तिकडून नानानी यावे, आमची त्याची स्वच्छता भेटी होऊन झाली असा लौकिक होऊन मसलतीचा उपयोग पडेल चारी मनसब्याची घोरणे ध्यानात आणून मसलती वाटून जिमेवार लावाव्या होळकराचे ध्यानास मसलत येईल ती त्याणी कबूल करावी जड राहील ते आम्हास कबूल आहे हिंदुस्थान कबूल करतलि तर साधने साधून कोठवर जावे हा जिमा लावावा आज सात वर्षे फौज किती ठेवितात ? एके ठिकाणी मसलतींत शरीख राहून चाकरी कशी घडती हें ध्यानातच आहे यास्तव पृथक मसलत सांगावी म्हणजे मन घालून करतील शहाणा कारकून इंदुरास त्याजकडे पाठवून आतापासून फौजेची तयारी करविली पाहिजे कालहरण करतील तर इंग्रज हावभरी होतील तेंही ठीक नाहीं.

हिंदुस्तानचे काम जड आहे कोंडाईबारीच त्याजकडे योजोन फाज वरवावी भेटी होताच त्याणीं कोंडाईबारीस जावे आम्ही सिरोज भेलशाचे सुमारे फाजेत जाऊ या सर्वांनीं एकत्र राहून पारपत्य करू म्हटल्यास हिंदुस्थान माळवा रहात नाहीं साराश एकत्र जाल्यास जो विचार उत्तम दिसेल तो करावा म्हणून पाटीलबावाना बोलण्यात आणिला मजकूर लिहिला उत्तम आहे साराश पाटीलबावाची आमची भेट व्हावी मसलत ठरावी, त्याप्रमाणें आप लाले जिम्यावर जाव, दिवसगत लागू नये, ही सल्लाह चागला आहे त्यात लौकिकहा रहातो कार्याचाही उपयोग आहे आमचे मते हा सल्लाह उत्तम आहे अशाच करणे त्यापक्षी पत्र पावताच फोजेचा जथ म्हटल्याप्रमाणे तिकडे पाठवून व जथ पाडावयाचा प्रकार करून पाटील बावाना होळकरा सुद्धा खानदेशात यावे हिकडे लिहून पाठवावे त्याप्रमाणे आम्हीही कूच करून येतो भेटींनतर सारेच चागले होईल मग मसलत ठरेल तसे करता येईल परतु इतकाही प्रकार आश्वीनमासा जाला पाहिजे म्हणजे चागला पुढे लाबला तर मसलतीस विरुद्ध असे आहे हिकडेहि शत्रूचा वेध व हिंदुस्थानातहा आहे तिकडून पाटीलबावाना खान देशात उद्योग केला असता व आम्ही हिकडून यावयाचा केला असता मसलतास कसे पडेल, हेहा ध्यानात आणून पक्की ती सल्लाह करावी रा छ १४ रमजान हे विनती

---

ल० २८७ }
[ २२१ ] }

{ श १७०२ भाद्र व ०
{ ता १५-९-१७८०

॥ श्री ॥

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशी

विनति उपरि राजश्री पाटीलबावाचीं व सदाशिवपत याचा पत्रे पूर्वी हिंदुस्थान व कोंडाईबारी व पुण्याकडील मसलताचे प्रकार विस्तारें लिहून आलीं त्याचीं उत्तरे विस्तारे सर्वही निश्चय करून पाठविलीं होतीं का, आता पत्रें लिहून जाब जाणेयास दिवस राहिले नाहींत असे समजून पाटीलबावानीं कोंडाईबारीकडे यावे असे लिहिलें असता, " हिंदुस्थानात दुसरा पाठवितात, तेव्हा आम्हास उणेपण, हिंदुस्थानाची मसलत करावो म्हणोन लिहिलें, आता आम्हास दूर काढून टाकले, होळकरास कोंडाईबारीकडे पाठवावें " असे लिहिलें तर पहिला सकेत होताच ही शका निघणार हिंदुस्थानात होळकरास पाठवावें असें लिहिले असता हिंदुस्थान त्याकडे सागितले हे वाईट वाटणार तेव्हा दोहो सरदारानीं मसलती करावयाचें येथून लिहिलें असता सदेह येणार म्हणोन असें लिहिले का, एकानीं कोंडाईबारीकडे सरकारचे पथका सुद्धा यावे एकानीं हिंदुस्थानची मसलत करावी उत्तम पक्ष पाटीलबावानीं कोंडाईबारीकडे यावे हे न होय, त्यापक्षी होळकरास फौज सुद्धा कोंडाईबारीकडे पाठवून मग हिंदुस्थानचे मसलतीवर नमूद व्हावें जो ठराव करणे तो पाटीलबावानींच करून उत्तर सत्वर पाठवावें असे लिहिले असता तुम्हीं लिहिलें कीं, इतकीच कल्पना घेऊन पूर्वी वाद प्रतिवाद घालतील त्यास त्याणीं कल्पना घ्याव्या त्या आम्ही

उघड्या लिहून निश्चयही यावरच ठेविला तेव्हा कल्पना घेऊन वाद प्रतिवाद घालावयास जागाच राहिली नाहीं हे सर्व अर्थ समजूनच पत्रे लिहिलीं होती तींच दाखवून निश्चय करावयाचा होता त्याचे चित्तात कल्पना उठतात त्याचें निवारण करणार ईश्वर परतु आपण जी गोष्ट चागला, श्रीमताचे दौलतेचें कल्याण व पाटीलबावाचे स्वरूपास उत्तम तेंच लिहित जावे, व बोलत जावे, असे समजून लिहितो आता पत्रे जाणे येणें यास अव काश नाहीं असे उभय पक्षींचा भेटीचा प्रकार लिहिलात हा चागला आहे परतु पाटील बावा व होळकर दोघास येणें लागेल तेव्हा हिंदुस्थानचे इग्रजास व पातशा नजीबखान सुद्धा सर्वांस वाटेल कीं, सरदार देशा गेले हे जाणून बखेडा करतील, इकडे गाडर मुबईस आल्यास पचवीस दिवस झाले सरजाम व तरतूद ही त्याणा भारीच केली आहे आश्विन शुद्ध पक्षी निघणार म्हणून बातम्या मुबईच्या वगैरे पैदरपै येतात या सधींत आम्हीं गगा पार गेलों म्हणजे काय कल्पना काढून हावभरी होतील कळत नाही हा पेंच मोठाच दिसतो श्रीमताचे पाय ध्यानात आणून स्वच्छ अत करणे सदेह सर्व शपथी पूर्वक टाकून देऊन करून इग्रजाचें पारपत्य पूर्वी मसलती लिहिल्या त्यातून कोणता ठराव करणे तो करून आपआपले कामावर जाऊन निकड करावी जाहिराणा चागला बाहेर दिसावयाकरिता चितो विठ्ठल वगैरे मडळी चागली शोभेने पाठवावी सरकारचीं कामें जाहिराणा चागली दिसे अशीं आहेत ते केली म्हणजे सहज लोकाचेही सदेह जातलि घरातलि गोष्ट तर एक आईचीं लेंकरें, सदेह टाकले म्हणजे स्वच्छताच आहे नवे जडावे लागत नाहीं हाही प्रकार आहे दुसरें तुम्हीं लिहिले का, होळकराचे घरात फूट, त्याची तोड पडल्यावर फौजेची तरतूद ही तर गोष्ट फार विलग दिसते दिवस तर नेटास आले आणि तोड पडून पुढें फौजेची तरतूद होणें यास दिवसगत लागणार हें चागले नाहा याचा विचार लौकर करणे तो करून भाद्रपद अखेर होळकराची फौज जमा होय तें करावे कोणता निश्चय ठरवितात तो लवकर लिहून पाठवावा, याप्रमाणे जाईल साराश तुम्हा भेटीचा प्रकार लिहिला हा चागला मुहूर्त पाहून उभयता सरदारानीं लौकर निघोन खानदेशात यावे आम्हींही येऊ आता विलब न करावा रा। छ १, रमजान हे विनति

---

ले ४८८ [४५७]

श १७०२ भाद्रपद व ३ ता। १६-९-१७८०

श्री

रा। छ १५ रमजान सन इहिदे समानान

आ मेहेरबा आर्काट पावेतों पोंचले असता इग्रज +ताहाल नमूद होत नाहींत त्यास कोणीकडे जमाव करविला असेल अगर पाळेगार वगैरे कोणीकडे राजकारण लाविलें आहे, व महमद अल्ली व ते एकत्र आहेत या आलाहिदा आहेत आणि काय मनसबा

+ हा कालपर्यंत

करितात हे काहीं समजत नाहीं टोपीकराची जात मक्री व दगाबाज शायेद भुलावा देऊन काहीं एक शक्कल नमूद करावी या तदबिरेत असताल याजकरिता येविशींची वातनी पुर्तेपणीं राखून येहतियात व हुशारी होत असावी आज राहा येगानगत दिल-निशान जाले ते कल्मीं केले असे बफजल इलाही आ मेहेरबा दूरदेश व कुलाहपोश याचे फदफरेबास खूब वाकीफ, तेव्हा या गोष्टीची खबरदारी होतच असेल दोस्ती दारासही पैहाम इतला करीत असावी म्हणोन हैदर अलीखान बहादूर यास नानाचे नावे पत्र

---

लें० २८९ } [ २४० ] | श १७०२ भाद्र व<br>ता १९-९-१७८०

॥ श्री ॥

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशी

विनती उपरि किल्ले साल्हेरचा मजकूर पेशजी राजश्री सदाशिवपत याचे पत्रीं लिहिला होता, परतु पत्रातील मजकूर जमा धरून उत्तर पाठवावे हे सदाशिवपत लिहितच नाहींत त्यास इग्रजाकडील व दादासाहेबाकडील सूत्रे किल्लेकऱ्याकडे लागलीं आहेत याज करिता आम्हास येथून कळेल तसे करावे लागेल राा छ १९ रमजान हे विनती पैा छ २९ रमजान भाद्रपद शुा इहिदे समानीन मुा उजेन

---

ले २९० } [ २२० ] | श १७०२ भाद्रपद व १४<br>ता २७-९-१७८०

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेसिं

विनती उपरि तुम्ही भेटीचा निश्चय केला तो उत्तम तेथून राजश्री पाटील बावाचा निघावयाचे मुहुर्तावर निश्चय ठरेल, तो लिहून पाठवावा, त्याप्रमाचें आम्हीं निघोन येऊ येथे फौज वगैरे जमा करून मुबईचे तोंडावर राजश्री हरीपत राहतील परतु कल्मे

होळकरास बरोबर घेऊन येताल, यावे कोणेही गोष्टींची अडचण आम्हास पाडू कोणी ठिकाणीं आमची भेट, कोठपावती नये येविशयीं पक्के असावे

आम्हीं यावें हें लिहून पाठवावे बराणपुरा- उभयता सरदारांचे फौजाची तरतुद आलीकडे चाळीस कोस येणे घडावे लौकर होऊन जमा व्हाव्या भेटी होऊन

भेट आलियावर फिरोन संदेह उत्पन्न निश्चय ठरून आपापल्या मसलतीवर नमूद नहोत स्वच्छता, संतोषानें मसलत करण्या व्हावे
विशीं उत्साह असे घडावे हिंदुस्थान व सुरतेकडील दोघानीं दोन मसलती कराव्याच, हा निश्चय असावा

सरकारचे काम पूर्वी येथें मन घालून करीत होते त्याप्रमाणें करावें वाकडे आत बाहेर कोठें काहा नसावे इतक्या गोष्टीची पुर्ता खातरजमा करून चिठी आली म्हणजे निघोन येऊं आतून बाहेरून शोध करून घेऊन लिहून पाठवावे आम्हीं येथून निघणार त्यापक्षीं श्रीमताचें राहणें पुण्यात ठीक नाहा यास्तव पुरदरास राहतील रा। २७ रमजान हे विनंति पत्राचे उत्तर त्वकर पाठवावें हे विनंति +

---

ले २९१ [२०३] श १७०२ आश्विन शु १० ता ३०-९-१७८०

श्री

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं

विनंति उपर सव ही गोष्टी राजश्री पाटीलबावाचे चित्तात आल्या जाहले ते दुरस्त या उपर मागील अर्थ लिहण्यात न यावे म्हणोन लिहिलें त्यास मागील अर्थाचा विस्तार पूर्वी पासूनच करीत नाहीं कोठे कोठे लिहिण्यात येते, त्याचे कारण हेच कीं, पुढे तरी सरकार काम चागले व्हावे इतकाच अर्थ वाकडेपणाने लिहीत नाहीं आता लिहिलेत यावरून राहिले कोणे प्रकारें कार्य व्हावें, म्हणजे जाहाले तेही थोर आहेत समजस आहेत, उत्तम तेच करतील, ही खातरजमा आहे शिवाजी विठ्ठल व पवार याकडील कज पट्टींच्या यादी तयार करविल्या, मागाहून पाठवितों चितो विठ्ठल वगैरे मडळी पाठविती, गाडदी अद्यापि आले नाहींत, म्हणोन लिहिलें उत्तम आहे गाडदीही रवाना केले आहेत परतु त्वकर न पोहोंचल्या तुम्ही पक्कीं बदोबस्ती करून पाठवावे नबाब व ह्दरखान यास दोन थैल्या व मुधोजी भोसले याचे नाव लाखोटा व दिवाकरपताचे १पत्र खुले व तिहींच्या नकलावरून मजकूर कळला उत्तम लिहिलें आहे ज्याचीं त्याकडे रवाना करू रा छ १ सवाल हे विनंति पो छ ९ शनवार प्रात काळ

---

+ हें सर्व पत्र नानाच्या हातचें आहे गुजराथेंत शिंदे होळकर इग्रजावर गेले त्या पूर्वी त्याच्या व नानाच्या भेटी व्हाव्या असे ठरत होतें, असें ह्यावरून दिसतें

हें सर्व पत्र खुद्द नानाच्या हातचें आहे १ चोरघोडे भोसल्याचा दिवाण

ले २९२ } [४७५] }

{श १७०२ आश्विन शु ११ {ता ९-१०-१७८०

श्री

रा उ १० सवाल इहिदे

आसाहेबीं खत मसरत-नमत-पाठविले ते बवख्त नेक पोहचले चेणापट्टणाहून जनरल मडोर नामे जंगी सरंजामसुद्धा मोकाबिल्याचे इरादाने कचीस आल्याची खबर आली त्या वरून आम्ही अर्काटेहून कचीस पोहोंचून त्यास घेरा दिल्हा मच्छलाबंदर व गंटुराहून करनल बेली नामे सरदार सरंजामानिशीं कुमकेस येत होता, त्याजवर फौज पाठवून घेरा घेरी करविली ते कचीहून चौ कोसाचे फासल्यानें गढीचा आसरा घेऊन राहिले त्याचे उपराळ्यास जनरल मडोर याणे आपले हामराही पैका वेष चुनीदी जमियेत पाठविली करनल बेली याणा आपली व कुमकेत आलेली जमियेत घेऊन इकडील फौजेशीं लढाई करीत येत चालिले हे बातमी कळताच कचींत मडोर याचे तोंडावर जमियेत ठेवून आम्ही खाशी फौजसुद्धा चालून जाऊन मारामारी करोन कर्नल बेली याचे फौजेस कत्तल आम केलें खुद्द कर्नल बेली सरदार या शिवाय मातबर तीस पालखी-निशीन सरदार व पाचशे गोरे हे साबूत पाडावं आले पाचशें फिरंगी व दोन हजार बार पावेतो मारले गेले§ बाकी कुल् लष्कर लुटून घेतले हे कचीस जनरल मजकूर याणें ऐकून घाबरा होऊन रात्रींचे वख्तीं जमावसुद्धा फरारी जाला त्याचे पिछावर इकडून फौज पाठविली याशीं त्याशीं लढाई होऊन निम्म जमियेत मारून घेतली सर्व सरंजाम टाकीत टाकीत काहीं जुज जमियेत नशीं चेंगलपट येथील गढीचे आश्रयास जाऊन पोहोंचला इकडून फौजेनें त्या गढीस घेरिले आहे खुदाचे फजलेकडून तबी अनकरीब होईल ते लिहि-ण्यात येईल म्हणोन कलमीं केले चुनाचे आ मेहेरबाही गाडद व तोफा व फौज वगैरे मातबर सरंजामसुद्धा इंग्रजावर इरादा केला तेव्हा दोस्तदारास हेच यकीन् होते, जे अव्वल टोपीकर मैदानात येऊन मोकाबिला करू पावणार नाहींत अडचणीचे जागा मकर फरे-बानें जें होईल तें करतील अगर मुकाबिल्यास आले तरि आ साहेबाचे सरंजामापुढे टिकणार नाहींत बेशुभ शिकस्त खाऊन फरारी होतील याची आजमायेष आज सहा वर्षे जालीं सरकारच्या फौजाशीं व इंग्रजाशीं लढाईचा मारका रुबकार आहे लेकीन कुलहपोष हमेश अडचणीच्या जागा धरोन फंद फरेबच करीत राहिले कोणही रोजीं मैदा नांत येऊन मोकाबिला केला आणि कायम राहिले हे तरकीब नजरेस आली नाहीं चुकोन

---

९ इंग्रजी ग्रंथात तर बेलीस कुमक केली नाहीं सबब जनरल मनरोस दोष दिलेले आढळतात

§ स्वाधीन होतों असे निशाण दाखवून शस्त्रे खालीं ठेविल्यावर इंग्रजी फौजेवर हल्ला करून हैदरानें कत्तल केली असा त्यावर आरोप आहे फ्रेंच सरदार हैदराकडे होते त्याणी ह्या वेळीं पुढें होऊन बरेच इंग्रज लोक वाचविले अशी फ्रेंच लोकाची स्तुति केलेली आढळते

मैदानात गाठ पडली, तेव्हा शिकस्तच होऊन गेले मबब दोस्तदाराचे दिलात ह गुजरले होते बफजल-इलाही त्या बमोजीबच जहुरात आले मुखालिफास खूब नशीयत पोहोचली यावरून न्याहयेत खुषी व खुरमी जाहली खुदा येताला हे फत्ते आ मेहेरबास व जमिये दोस्तास मुबारक लाये इग्रजाचा शिकस्त व आ साहेबाची फत्ते हे खबर श्रीमत खुदावत न्यामत राव पतप्रधान यास अर्ज होताच बहुत खुषवख्त होऊन आपल्या तदबिरेस व जुरतेस तहसीं व आफरींत फर्माविली याचा पत्ता ता ऐनजात दोस्ता नूरमहमदखा व नरसिंगराव लिहीतील त्यावरून दीलनिशीन होईल आइदे महमदे आलीखा व गोरदोर चेनानापट्नात आहेत त्याची रवेश मकरी व दगाबाज चार दिवस दम खाऊन कलकत्त्यास लेहून तेथून जमियत जहाजावर अगर खुषकींतून आणवितील मजबुत होऊन फितना फिसाद बरपा करतील अगर बमीनत आपणाशीं राजकारण लावून तमा व तवक्का दाखवितील तरफैन इत्यफाक व येकादिलींत खळश आणावयास कसूर करणार नाहींत आ मेहेरबा त्याचे रस्म व रवयास खूब वाफक आहेत टोपीकरानीं जमून जोर धरला नाहीं तो पावेतो लगट एक हिरेरी करून नेस्त व नाबूद करण्यात येतील या बाबे खातर जमा आहे इकडील कैफियत तरि दसऱ्याचे रोजी सातनेक पाहून खेमे बाहेर दिल्हे जलदच खेमेदाखल होण्यात येईल बाद इकडून ही कुलहपोशास नशियेत कस कशी होईल ते जहुरात येईल हमेश खत पाठवून तिकडील केफियत कलमी करीत जावी म्हणोन हैदरअलीखा बहादूर यास पत्रें हिंदवीं

१ नानाचे
१ हरीपततात्या

२

ले ७९० } [ ७१५ ]

{ श १७० आश्विन व १४ ता २८-१०-१७८०

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशी

विनति उपर इकडे येण्याचा मजकूर राजश्री तुकोजा होळकराशा बोलण्यात आला का नाहीं ? नसला आला तर आइते समयीं कदाचित दिक्कता काढतील, विलबाने निघतील याचा विचार केलाच असेल लिहण्यात तुमचे कोठे आलें नाहा यास्तव लिहिले आहे आता त्वरेने येणे होऊन मसलतीवर नमूद व्हावें, नाहीं तर अशाच खाली दिवस जातील खर्चा खाली सरकार येते काम काहींच होत नाहीं शत्रू हावभरी होतात, बळकट होतात हे सर्व विचार ध्यानात यावया जोगे आहेत रा छ २७ सवाल हे विनती

लें० ९४ } { श १७०२ कार्तिक शु ३
[ १-७ ] } { ता २०-१०-१७८०

श्री

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशी

विनंति उपरि होळकर प्रकर्णी पाच चार वेळ पत्रें तपशिल करून सादर जाहाला त्या प्रमाण राजश्री पाटीलबावाशी बोलत गेलो, परंतु ज्या समयी होळकराकडील मजकूर काढला ते वेळेस सारीं बोलणी एकीकडे टाकून चार चार घटका वाद प्रतिवाद होत गेले पाटीलबावाचे म्हणणे कीं, 'खावदाचे घरींहून जाबसाल होणे ते यथायुक्त होत असावे, पूर्वीच्या चाली पाहाव्या, ता धोरणे पुढे चालवीत असावा, न ऐकिले त्यास समजून सांगावे ते न होता बाईस सपुष्टात घालावे अशीच साऱ्याची मजा एकसा दिसते यावरून आश्चर्य आहे! अहल्याबाई होळकराची सून, तिचा अपमान केला असता लौकिकात ठीक दिसेल कीं काय? तीही केवळ अपमान करून घ्यावया जोगी नाहीं होळकराना फत्तरगडचे आलीकडे आज पावेतो फौज किती बाळगली व चाकरी कोणती केली, सरजामाचा वसूल आज पावेतो किती आला त्याचे आमचे महाल बरोबरीचे आहेत त्यात त्याचे महालाचा वसूल आमचे महालापेक्षा कमी का आकारतो, याची पुरशास धनी पणाचा कारभार जिकडे असेल त्यानीं करावा एकाचाच पक्ष करून लिहिणे बोलणे युक्त नाहा' अशीं बोलणीं झाला पाटीलबावानीं पत्र ये विशी लिहिले आहे त्यावरून कळेल अहिल्याबाई कडील याद आली ती पाटीलबाबानीं दिल्ही ती पाठविली आहे पावेल म्हणून विस्तारे मजकूर लिहिला तो सर्व कळला त्यास अहिल्याबाई कडील याद पाठविली ती पाहिली त्यास अशा यादी मागेही एक दोन वेळ आल्या त्यास अशा यादानीं काम काहीं व्हावयाचे नाहीं कालहरण होते येविषयाचे तपशिलवार उलगडून पूर्वी दोन चार वेळा लिहिले आहे, त्याचे उत्तर असे सांगतात की त्याचें वाक्य वेदतुल्य ऐकोन लिहितात त्यास वेदतुल्य वाक्य ऐकावयाचे नाहा वास्तविक गोष्ट असेल तीच लिहिली असेल सर्वांचे मानस बाईस सपुष्टात घालावें असें आहे म्हणून बोलले, त्यास बाईस सपुष्टात घालावयाचे प्रयोजन काय आहे? सरकार काम व्हावें, मातबर सरदारी, दिवस मसलतीचे समीप आले, फौजेची तयारी जाली पाहिजे, विना पैक्या खेरीज फौज जमा कशी होते? या करिता पूर्वी तपशिल वार लिहिले होते, त्याचीं उत्तरे अशा यावीं कीं काय? असो, तुम्ही पूर्वी लिहिले आहे त्या अन्वयें पाटीलबावाशीं बोलावे आणि बाईस पाटील बावाचे पत्र पाठवावे कीं, 'डौलाचे खर्चापुरता ऐवज बाईनीं ठेऊन तेथील वहिवाट बाईकडील महालकरी तिहीं माहलीं आहेत त्यानीं करावी बाकीचे महाल राहिले त्यास होळकरास मसलत सबधे पैका लागेल तो बाकीचे महालापासून घेतील" असें बाईस पाटील बावानीं निक्षून लिहिल्या शिवाय तोड पडत नाहा असे पत्रोपत्रीं मजकूर वारवार लिहिले असता काहीं काम होईल असें वाटत नाहीं मसलतीचे दिवस जवळ आले फौजेची तयारी होऊन चाकरीचे उपयोगीं पडली पाहिजे, या करिता लिहिल्या अन्वये तुम्हीं बोलून बाईस पत्र पाटील बावानीं पाठवावें

म्हणजे तोंड पडेल, नाहीं तर पडावयाची नाहीं फौज किता बाळगली ? महाल खराब कां ? चाकरी काय झाली ? हे पुसावें तर इकडील आवघेच जाबसालास पाणी पडतें सरकारची नुक्सानी मात्र भारा हे खरें दुई नसल्यास इतकेही जाबसाल पुसावे, नीट करवावे सरकार मसलतीस उपयोग पडावा, इतकेही करिता येतें असो, लिहिल्याअन्वयें बाईस लिहून पाठवावे, आणि अमलात येई ते करावे बाईस सपुष्टात घालावी ही गोष्ट येथे नाहीं असती तर ते मार्ग निराळे घडत जाते पूर्वील साप्रदायावर जावे तर दुई नसते तेव्हा कोठेच पेंच पडत नाहीं विरुद्ध पडल्यावर सरदारा कोणीकडे ? त्याचे कसे व्हावें ? याचा विचार करावा लागतो, हें सर्व मनात आणावें रा छ १ जिल्काद हे विनती

---

ले २९५
[२९१]

स १७०२ कार्तीक व १
ता १३-११-१७८०

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशी

विनती उपरि छ २७ रमजानपासून डाकेबराबर मात रवानग्या पत्राच्या केल्या एकाही पत्राचे उत्तर अद्याप येत नाहीं आश्विन वद्य ७ निघतों म्हणून पत्रे पाठविलीं त्यास दीड महिना होऊन गेला राजश्री पाटीलबावा कधीं निघून येतात हेंही वारवार लिहिलें आश्विन वद्य सप्तमीस आह्मी निघून खडकावर मुक्काम केला त्यासही पाऊण महिना होऊन गेला असो, कार्तीकमास गेला अद्याप उभयता सरदार आपापले घरा फौजाची तरतूद नाहीं मसलतीचा निश्चय नाहीं श्रावणपासून पत्रे पाठवीत गेलों का, भाद्रपद अखेर कोंडाईबारीवर फौज यावी त्यासही ठिकाण नाहा गाडर आपले सरजामानिशीं खुषकीनें वसईनजीक आला वसईचीं वरकड ठाणा तालुक्यातील घेतला एक वसई फक्त राहिली त्यास मुबईकराना मोर्चेबदीचे वगैरे सामान बेसुमार केले तें धारावीस आणून ठेविलें कार्तीकी पौर्णिमेचें भरते समुद्रास येते त्या दिवशा पाण्यातून व खुषकींतून येलगार किल्ल्यावर करणार म्हणोन बातमी आली पूर्वी रास्त्याचे पथक व §मुसाभरज वसईकडे रवाना केले म्हणोन लिहिलें होतें परतु इग्रजाचें सामान भारी थोडे फौजेने उपराळा होणार नाहीं याकरिता रामचद्र गणेश व बाजीपत याबराबर गावडे, निंबाळकर वगैरे हुजरात पाच सात हजार देऊन मागाहून रवानगी करितो पैक्याचे ओढीमुळे प्रसग कठीण पडला आहे आणि मसलत तर सारी इकडेच मुबईकर सुद्धा भारी पडली आहे सरदार तर उभयता

---

§ मुसा भरज हा कोण ? एक पोर्तुगीज सरदार पेशव्याचे पदरीं होता त्याणें वसई नजीकच्या लढाईत रामचद्र गणेशा प्रमाणेंच बहुत पराक्रम केला पण त्याचे नाव सिनोर नरोन्हा असें होते

आपले घरा परिणाम दौलतीचा ईश्वराधीन आहे आमच्याने होईल तेथवर करतो ईश्वरी इच्छा असेल तशा बुद्धीही सरदारास होताल लिहिण्याची, बोलण्याची अवधी या उपर काहीं राहिली नाहीं गुजराथ त्याणीं वेध नाहा याकरिता मोकळी टाकून वसईकडे आले सर्व मनसबा विचार ध्यानात आणून पहावा र॥ छ १५ जिल्काद हे विनती

---

ले २९ [ ४७ ]

श १७०२ मार्ग ९
ता ५ १२ १७८०

श्री

छ ८ जिल्हेज मार्गशीर्ष इहिदे समानीन र॥ केले

आमेहेरबानीं खत मसरत नमत पाठविलें ते सातनेक पोहचले अर्काट मकाण नामी मसनदनसीचें त्यात मुखालिफा कडील सरजाम पोख्त होता ते छ ४ जिल्कादीं हल्ला करून ठाणे कायम केलें कित्येक लोक कत्तल आला व बाकी दस्तगीर जाले हे मकान खुदाचे फजलेकडून फत्ते जाले हे खुष खबर मालुम होवयाबदल लिहिली असे हमेश आपली शादमानी व तिकडील मनसब्याची कैफियत निगारष स्रीत असावी म्हणोन कलमी केलें चुनाचे अर्काट मकाण मसनदनसीचे, तेथील बदोबस्त जाल्यास बहुत दाब व लौकिक व बकाया मुरदराज जाऊन मुखालिफावर जरब ऐसे जाणून आज राहायेगानगत निगारष करण्यात आलें होते बफजल इलाही तेथील बदोस्त खातरखा जाल्याचीं पत्रें आ साहेबाचीं आलीं त्यावरून न्याहयत खुषी जाली त्याचा बयान कलमी करण्यात येत नाहीं बहुत बेहतर व बन्या जाले आईंदे आजराहा ये मसलत मुल्की व राहिल्या मकाणाच्या बदो-बस्ताची तदबीर होतच असेल इग्रज मक्र फरेब बहुत जाणतात आसाहेबही त्याचे रस्मर-वयास खूप वाकीफ हे मरातब मुफसल कलमी करण्यात आलेच आहेत मुकरर ल्याहावें याची हाजत नाहीं इकडील मजकूर तरि साबिक्र कर्नेल गाडर मय सरजाम सुरतेनजीक होते त्याणीं दोन पलटणें केशोपत याजबराबर खानदेशात पाठवून रुख नमूद केला होता त्यावरून गणेशपत त्याचे मुकाबल्यावर आहेत त्याजपाशीं फौजेचा जमाव करविला मैदा-नात यावे हे इतजारी होती मैदानच्या लढाईची जुरत न पाहून गाडर मजकूर याणीं तो रोख सोडून तमाम सरजामासुद्धा दर्याकिनारियानें कोकणात नमूद जाले सरकारातूनही सरदार फौजा घाटाखालीं रवाना केल्या लहान मोठ्या एकदोन लढाया जाल्या त्यात हटवून माघारें घातले याउपरि थोडेच रोजात होईल ते जहुरात येईल भोंसले फौजेसुद्धा सरहद्देवर होते तेही बगाल्यावर उतरले असतील नवाब निजाम अलीखान बहादूर याची फौज व सरदार जमा जाले व होत आहेत जलद शिकाकोलीकडे निघावे म्हणोन इकडून पैहाम कलमी करण्यात येतच आहे शिंदे होळकरही डेरेदाखल होऊन फौजाचा जमाव जाला व करितात मेहेरबान कृष्णराव नारायण याची रवानगी फौजसुद्धा आसाहेबाकडे

जलदच केली जाईल येविशाचे मरातीब ऐतजाद दोस्ता नूरमहमदखान व नरसिंग राव लिहितील त्यावरून वाजे होईल सदर्हू प्रमाणें हैदर अलीखा बहादूर यास नानाचे नावें हिंदवी पत्र

छ ७ जिल्हेज इहिदे समानीन मार्गशीर्ष

---

ले २९७
[ ४८२ ]

सु १७००
सन १७८०

श्री

उभयताचे नावे हैदरखानास छ १० सन

आअमारत पन्हानीं महबतनामा आक्रीशमामा इबलाग केला तो बरवख्त पोंचला व सदाकतअतवार नरसिंगराव तमाजी मोहिबाकडून पारचे घेऊन आले ते पोहचून मोमिइले याणीं कितेक वजे दोस्तीचे इरादे जाहीर केले ते मालूम होऊन बहुत खुशवख्ता जाहाली साहेब मेहरबान दोस्ता लक्षणराव रास्ते हुजूर येऊन याणी नरसिंगराव मोमिइले याणा मोहिबाकडील कितेक मुन्दमे इजहार केले ते अया जाले लेकिन आ अमारत पन्हाची व खुदावद न्यामत पंडित प्रधान साहेबाची दोस्ती मुस्तकीम होऊन दीनबदीन जादा चालोन दोस्तीची तरक्की व्हावी ह तर्फैन बजा आहे बील फैल लक्ष्मणराव मोमिइले यास कुल कैफियत जाहीर केली आहे ते नरसिंगराव तमाजी कलमी करतील ते दर्याफ्त करून मुकदमा अमलात येणे, हे मसलतीचे जागा नेक आहे हमेशा किताबत पाठवुन दील ताजगी करणे दोस्तीचे जागा लाजम असे

---

ले २९८
[ ३७२ ]

शके १७०२
सन १७८०

॥ श्री ॥

राजश्री विसाजी आप्पाजी गोसावी यासि

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ महादाजी शिंदे दंडवत विनंता उपरि येथील कुशळ जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणें विशेष तुम्ही फौजसुद्धा कसबे आकोळनेर इकडून येणार म्हणून विदित जहाले, त्यास राजश्री आपाजीराव दाभोळकर याजकडे को। मजकूर हा गाव आहे तरि त्या वाटेनें आकोळनेरावरून येणार असला ऐशियास गाव चुकवून यावें कदाचित् त्याच वाटेनें आला तरि कसबे मजकुरीं मुक्काम न करून ताकीदीस स्वार देऊन रखवाली करावी+ रा। छ २३ रजब गावाशीं उपद्रव तुम्हाकडील काडीमात्र

---

+ येथून खुद्द महादजीचें अक्षर येथें बाजूवर महादजी शिंदे याचा शिक्का आहे

लागू न द्यावा गाव इकडील आहे येविशीं निक्षून ताकीद असावी बहुत काय लिहिणे हे विनंती

मोर्तब
सुद

---

ले १९ }
[ ४ १ ] }

{शके १७०२
{सन १७८०

श्री

आपले दुषमानाची [ ? ] तबियत बहुत काइली होती त्यास फजल इलाही आराम होऊन गुसल केली, याची हकीकत सदाकतदस्तगाह नरसिंगराव तमाजी यांणीं अर्ज केल्या वरून न्याहत खुषी जाहली याचा तपशील काय ल्याहावा ? आपल्यास सेहत जालियाचे खुषीचे पारचे वगैरे तपशील फर्द आलाहिदा पाठविले असत + + + + + कितेक मरातब हुजरून गोविंद नारायण व गणेश केशव दि॥ आनंदराव भिकाजी रास्ते यास इरशाद जाले हे बयान करतील व सदाकत दस्तगार मजकूर लिहितील त्यावरून वाजेह होईल हमेशा खत किताबत फरहद जादा करीत जावी

---

ले ०० }
[ ४७९ ] }

{श १७०२ मार्ग व ६
{ता १७ १२ १७८०

श्री

तुह्मा छ २० माहे जिल्हेजचे पत्र पाठविलें ते छ २२ माहे मोहरमीं पावलें सविस्तर मजकूर लिहिला तो समजला त्याचीं उत्तरें व इकडील मजकूर राजश्री बाळाजी जनार्दन यांणीं लिहिला त्यावरून कळेल मेवा सेव दाणे पधरा पेटारी एक पाठविली ते पावली तिकडील वर्तमान वरचेवर लिहीत जाणे म्हणोन पुरषोत्तम महादेव हिंगणे यास सरकारचें पत्र

---

ले ३०१ }
[ १०९ ] }

{सन १७८० च्या पुढील

॥ श्री ॥

श्रीमत राजश्री तात्या *स्वामींचे सेवेशीं-पोष्य भवानी शिवराम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे तागाईत चैत्र वद्य ११ पर्यंत मुक्काम शहर स्वामींचे कृपावलोकने

* हरिपंत तात्या फडके ?

सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष–राजश्री सेनाखासखेल याजकडील उपसर्ग सरकार अमलात होऊ नये या अथा सरकारातून पूर्वी त्यास पत्रे आली होतीं ती त्याजकडे प्रविष्ट करून त्यांचा उत्तरें आला ता सेवेशीं पाठविलीं आहेत अवलोकने भावार्थ ध्यानास येईल यजमान स्वामींची मला आज्ञा आली त्याप्रमाणे माही सरदारास पत्र लिहिले होतें त्यास तो मजकूर गाळून उत्तर आले बाजिन्नस कारकुनाची चिठ्ठी आली त्याची प्रती पाठविली आहे साराश कोणी [ कोणती ? ] गोष्ट शाश्वत नाहीं काठेवाडात सरकार महालीं फौजेचा उपद्रव लागतोच आहे सरदारानीं फौजेत वरचेवर पत्रे दिल्हा, परतु प्रमाण राहिले नाही विस्तारे कोठवर लिहू ? स्वामींचीं खासदस्तुर पत्रे बोभपर येत गेली त्याचा स्मर रहावा, पोटीं विवेक करावा, त काही मनात न आणता दिवसा दिवसाचे करणे नवान पडते असो सालमजकुरीं काठेवाड झालेवाडचा पैसा ठराबून आले प्रमाणे साहुकाराकडे भरणा पावेल ऐसें दिसत नाहीं करारात गायकवाडाकडील उपसर्ग न लागावा ऐसे आले आहे कौलपत्र मवासास या अन्वये आहेत इच्छा सर्वोत्तमाची स्वामींची कृपा तारक आहे विस्तारे विनती वारवार कोठवर ल्हिावी ? स्वामींचे ध्यानात आहे तेथे रा॥ गमाजी [ गयाजी ? ] पाटील यासि निक्षूण ताकीद होत जावी वरकट मजकूर सर्व ती॥ राजश्री खंडोपत दादा व राघोपत विनती करिता अवगत होईल हे विज्ञापना

---

ले ३०२ } [ ४८९ ] }

{ श १७०० पौष व १० { ता २१–१–१७८९

श्री

आ अमारतपन्हानीं किताबत इरसाल केली ते उसुल होऊन मजमून मालूम जहाला ऐशास बंदेगानअली राऊ साहेब पंडित प्रधान साहेबाचे दौलतींतीन कित्येक खिसा लिहिला तरि जागा जागा हरएक बखेडे जालियास सहजात बदोबस्त होऊन येतात सरकार तर्फेचे सरदाराहीं हिंदुस्थान प्रातीं तमाम बदोबस्त अमल बसवून पादशाहातीचे बदोबस्त करीत आले बिलफैल इग्रज वगैरे उमेद धरून येतात त्याचाही बदोबस्त सरकारचे सरदार आहेत तेच करतील आमा बदेगान अलीच्या दौलतींतील खिसे मोहिबी इशारे बकरार बयादवार क्लमीकरिता हे दाना दूरदेश असतील त्यास लाजस नसे लेकिन इग्रजाकडील पलटणे व व कौसलदार येतील त्यास पोंहोचवून द्यावे लागेल म्हणोन इशारा केला त्यास जे सरकारचे फितुरी ते तुमचे फितुरी असता त्याची सरबरा होते इहताजुबजमाजे होठेवर आहे त्याचा फायदा जहाला तो अलम रोषन् आहे ज्यानब या प्राती येऊन मोहिबाचे मुलखास उप सर्ग अद्याप न केला हल्ला कौंसलदार तुम्हीं पोंहोचून देणार तुमचे मुलखाची तालुक्याची खराबी होईल कीं आबादी राहील हे दिलात दूरदेशीने जाणावे

ले ३० ]
[ ४६ ]

श १७० पौष व १
ता २१-१-१७८१

श्री

मबईक्राकडोन एक शक्स राव मेहरबान हरीपत याजकडे काहीं बोलावयास म्हणोन लष्करानजदीक येऊन राव मशारनिले यास सागून पाठविले त्यास लष्करात येऊ न देता ताल्लुकियातून काढून दिल्हा आ साहेबास कळावे सबब कलमी केलें असे ये त जा त दोस्तानूर महमदखा व नरसिंगराव हरदो मानिले यातून तेथून कितेक बोलून रवाना करून त्यास हरदोतून एकजण त्यास तेथून पाठवितील त्याणीं कृष्णराव नारायण याचें हाम-राहा जलद यावे, ऐसे आ साहेबाचे खत यावे, येविशीं पेशजी कलमी केले त्या जबाबाची इतजारी असे येविशींचे मरातीब हरदो मशारनिले कलमी करतील त्यावरून वाजे होईल

इग्रज मकर फरेब जाणतात त्याचे रवेशास आ मेहरबाही खूब वाकीफ कलमा कराव-याची हाजत नाही आ साहेबाकडे ही मकर फरेब करण्यास व राजकारण लावण्यास चुक-णार नाहात

---

ले ३०४ ]
[ ४९७ ]

श १७०१ पौष ब १२
ता २१-१-१७८१

श्री

श्रीमत खुदावत-न्यामत राव पतप्रधान याचा व आपला पक्का सलुख होऊन करार-नामे अहाद शर्तीनशीं कृष्णराव नारायण सरकारचे मातबर याजबराबर देऊन व आपल्या कडील नरसिंगराव याची रवानगी जाली लौकरच आ साहेबापाशा पोंहोचतील दरीविला आखबारे वरून मालुम जाले कीं, आ मेहरबानाची फौज आदवनी व मुदगल वगैरे नबाब निजाम अलीखा बहादूर याचे ताल्लुकियात येऊन हरकत केली प्रात तमाम वैराण जाला मकाणास मोहसारा होणार ऐशियास खुदावत-न्यामत राव पतप्रधान याचा व नबाब निजाम अलीखा बहादूर याचा सलुख व एकलास बहुता दिवसाचा, सर्व बाबे त्याशीं जुदागी नाहीं हल्लीं आ साहेबाचाही पक्का सलूख होऊन दोस्ताची मजबुता जाली तेव्हा तिन्ही दौलती एक व बेहबुदी व मसलत एक, जुदागी राहिली नाही इंग्रजास तबी कर-ण्याची मसलत मातबर अवघ्याचे एकदिलाने मुखालिफाची तबी व्हावी दरमियान असे मिक्रोपेमुळे मोठे मसलतींत कमती येती आपले आपल्यात पेच येतात हे सल्लाह दौलत नाहीं याजकरिता फौजेस ताकीद होऊन माघारी आणवावी नबाबाचे ताल्लुकियास उप-सर्ग लागू नये अमिरुलउमराव बसालतजग याणीं इग्रजाशीं राजकारण व पैगम केला सबब अवल हा बदोबस्त करावा हे आ साहेबाचे दिलात असेल त्यास येविशाचे कुल मरा-तब नबाब मवसुफ यास कलमी केले आहेत त्याचा येविशींचा बदोबस्त जलदच करतील इग्रजाचे तबीचे मसलतीस नबाब मवसुब एकदील आहेत शिकाकोल राजवदरीकडे चालून

जाण्यास लौकरच खेमे-दाखल होणार अदवना कडाल हगाम लौकर आपण मना करवावा, सर्व मसलती व दूरदेशी आपले दीलनशीन आहेतच मुफसलबयान नरसिंगराव पोचल्या नंतर करतील त्यावरून माळुम होईल म्हणोन हैदरअलीखा बहादूर यास मदारुल महाम व राव रास्ते व कृष्णरावजी याचे नावें पत्रे

---

ले २०१ }
[ ८८७ ] }

{ श १७०२ पौष व १२
{ ता २१-१-१७८१

श्री

छ २५ मोहरम सन इहिदे समानान पौषमास

आ साहेबी खत फरहत नमत इबलाग केले ते बसातनेक पोंहचून शादमानी जाला इंग्रजाची फौज गारत जाली हे खबर पोंहचताच जनराल कूट भारी जमावानशी चेनापट्णास आला इकडाल बदरावर मुखत्यार व जगी सामानाची तयारी करीत आहे इंग्रजाना नागपूरचे भोसले यासि मकाफी जावसाल बोलोन सलुरा करून घेतला मोगलाकडे तो मातबर फिरंगी जाऊन दरमदार जालाच आहे कूट मजकूर चेनापट्णास आल्यावर मबईकर व गाडर यास कोणीही वजेने श्रामताशी सलूख करून तिकडील सरजाम इकडे घेऊन येणें ऐशी खतें लेहून जाहाज रवाना केले म्हणोन चेनापट्णची बातमी आली जनराल मजकूर चहूकडील जमियेत जमा करून मोकाविल्यास निघणार, खुदाचे फजलेकडून त्याची तबी होईल ते जहुरात येईल इंग्रज मकरी काबूतलब त्यांत्रे चालीस वाफक असा येथून ल्याहावें ऐसे नाहीं कर्नाटकगड वगैरे कितेक गड किल्ले व महमद अलीखाचा भाऊ अबदुल वहाबखा दस्तगीर जाले अमदाबाद वगैरे मुलूख सोडून देऊन दरोबस्त इंग्रजी जमाव घेऊन जलद येणे या मजमूचे खत व दुसरे जाहाज गाडराकडे कूट मजकूर याणा रवाना केले, लढाईचा आजम् मुकरर केला आहे, तिकडे खाली मैदान रहात आहे सबब सुरत वगैरे मकाणे व बंगाल्याकडे भारी पायबद बसे ऐसे करावें कृष्णराव नारायण याजबराबर दोन हजार स्वार देऊन इकडे पाठवावे, बाकी मरातब नूर महमदखान व नरसिंगराव सांगितल्यावरून माळुम होईल, म्हणोन कलमी केले चुनाचे, जनराल कूट इकडील बदरावर मुख्त्यार, तो जमाव सुद्धा चेनापट्णास आला, व चार्लस इस्मत जनराल ही नवा जाला, हें अखबर सरकारात आली होती, त्यावर हरदो मशारनिले यांची पत्रें सरकारात आला की, आम्ही चेनापट्णास आलो आपली दोस्ती चाहातों त्यास कोण्याही बदरास जनराल नवा येतो तो अव्वल सरकारात खत पाठवीत असतो व कोणाचेंही खत सरकारात आले तरी त्याचा जबाब द्यावा हा कदीमापासोन शिरस्ता, सबब त्याचे खताचा जाब दिल्हा त्यात मजमू, नेकी, दोस्तींत खलल कोणीकडून हें जाहीर आहे याची इतला पेशजी आमेहरबानास निगारष केलाच आहे भोंसले स्वराज्याचे सिकमात, तेव्हा मकफी सलूख करून घेतील हें कयासात गुजरत नाहीं थोडेच आरशात बंगाला गारत

केल्याच्या खबरा आपल्यास पोहचतील, ऐसें हमेश भोंसले सरकारात लिहितात इकडूनही हे शकल जलद नमुदाम यावी म्हणोन पत्रें जातात इंग्रजाच तबीचा नशा नबाब निजामअलीखा बहादूर याचे सल्लाहानें ठरला साल्गुदस्ता अदवनाच्या मझेलामुळे नमूद न जाले मझेला फैसल जाला तो बरसात सुरू जाली बादबरसात आजम् करतील ऐसें होतें बरसात गुजरली, तांहाल निघणे होत नाहीं व मिस्तर हालन यास लावून ठेविले सबब सरकारातून त्यासीं लिहिण्यात येतच आहे हल्लीं आपल खत पोंचल्यावरही निकडीनें नबाब मवसुफ यास लिहिलें आहे व कोण्ही मातबरही त्याची मिजाज दरयाफ्त करण्यास रवाना करण्यात येईल जनराल कूट याणें अलबता मेडकर व गाडर याजकडे जाहाज पाठविलीं असताल इंग्रज मकरफरेब बहुत जाणतात हरएक जागा इत्यफाकात जुदाइ आणोन आपली गुरबत व रास्ती दाखवून खुष्कीचे दौलतींत दखल करीत चालिले याच चालीने तरफेन दिलात शुब आणताल, याचे बयान मुफमल पैहाम आसाहेबास कल्मी करण्यात आले व आमेहरबाही त्याचे खयास खूब वाकीफ खलस दुनयाईत जितक्या तमा व तवक्कान्या शक्ला आहेत त्या इकडे व तिकडे बहुताद हल्लीं व आइंदे दाखवितील हर तदबिर निफाक पाडावयास कसूर करणार नाहींत लेकीन सरकारात जे गोष्ट करारमदारात आला तेच पक्की व मजूर आहे दुसरी शकल दिलात याव याची नाहीं येतिशींचा खातरजमा साबीक जाली, त्या बमोजीब असावी दुनयाईत व दौलतीचे अलमात कौलकरार आहादपैमान हे उमदी चीज आहे याचा हिफाजत केलियातच दौलतीची सरसबाजी आहे जेथें वचनात तफावत तेथें दौलतीची कायमी कशी राहील? खुदायताला पेहाम निगा करीत असतो जेथे रुखुनाची पास तेथेंच फजल इलाहा, ऐसें समजावें तरफैनच्या इत्यफाकांत कोणाचें काहीं चालणार नाहा व नफेही यातच आहेत हें दूरदेशीनें समजोन इकडील करार बमोजीब कायमी आहे आमेहरबाचीही असावी कोणेही बाबें दिलात शुब येऊच नये करनल गाडर वसईकडे आला, त्यास किल्याची मजबुती पक्की व सरजाम पोक्त फौजा उपराल्यास जाऊन पोंहोचल्याच होत्या तशात मारगिरी व लढाई सुरू होता किल्लेदार याणें हरामखोरी करून मकाण त्याचे हवाली केलें आपण निघोन जात असता सरकारची दौड जाऊन दस्तगीर करून आणिला हरामखोराम फैलाबमोजीब सजा होईल लेकीन मकाण मुखालिफाचे कबजात तूर्त गेलें इनशाआल्लाहोताला तरफैन्च्या एक दिलींत मुखालिफाची शिकस्त होऊन सर्व खातरखा होईल मुजाका नाहीं इंग्रजाकडील केसो कृष्ण नातार काहीं पलटणें व तोफा व स्वार जमाव सुद्धा खानदेशात हगामा करीत होता त्याचे तबीवर गणेशपत बफौज होते दरींविला रावमेहरबान तुकोजीराव होळकर मजमीयेत त्या जिल्हात आले त्याजकडील काहीं फौज व गणेशपत बेहरे एक होऊन त्याशीं लढाई केली, तीन प्रहर पावेतों लढाई जमली अखेरीम सरकारचे फौजानीं चालून घेऊन पलटणें गारत केली, तोफा व हत्ती घोडे व बदूका वगैरे कुल जिन्नस लुटास आला चद्रराव पवार सरदार त्याकडील ठार पडला जातीनिशी कसोशत पहाडात पळून गेला आइंदे गणेशपत व होळकराकडील काहीं फौज पेंढार कुल सुरतेकडे ताख्तताराजी करण्यास रवाना करविलें होळकर मैफौज हुजूर आणविले, जलदच येतील मेहरबान हरीपत हुजुरात

वगैरे फौज सुद्धा कोकणात गाडराचे मुकाबिल्यावर आहेत जागा अडचणीची, सबब मैदानात काढून लढाई घ्यावी या तदबिरेंत आहेत कोंकण व सुरतेकडे पायबद असता गाडर हे मसलत सोडून निघू पावणार नाहींत जनराल कुट जमाव करितो, मुकाबिल्यास आल्यावर मैदानात आसाहेबापुढें ठरणार नाहीं बफजलइलाहा नतीजाच पोंहोचेल मेहरबान कृष्णराव नारायण याची रवानगी आसाहेबाकडे केली फौज रवाना करण्याची तयारी होत आहे, अनकरीब रवाना होइल येविशींचे मरातब ऐतजात दोस्ता नूर महमदखान व नरसिंगराव कलमीं करतील त्यावरून जाहार होईल म्हणोन हैदर अलीखा बहादूर यास पत्रें हिंदवी

---

ले ३०६ }
[ ४६४ ] }

{श १७०२ माघ शु. ८
{ता ४-२-१७८१

श्री

( छ १० सफर इहिदे माघ शु. १० दशमी )

इग्रज बेइमान कारबूतलब बगाला वगैरे हिंदुस्थानात ज्या दौल्तींत त्याचा कदम शिरला तेथील अहवाल काय जहाला व इमान देऊन सलूख कसा राखतात हें मश्हूर आहे दक्षणेंत याच बमोजीब मकर फरेब करीत चालिले खुषवींत टोपीकराची चाल वाईट, सबब यास पोख्त सजा करून खारीज करावें, [ ही ] सल्लाह नेक जाणून इग्रजाचे तबीचा नक्षा सरकारात मुकरर जाहला त्या बमोजीब सरकारातून लढाई सुरू आहे भोंसले बगाल्याचे सरहद्देस जाऊन पोहोंचले हैदरअलीखान याणीं चेनापट्टण तालुका अर्काट वगैरे वूल्कमाणें तशरुफात आणिलीं पक्त चेनापट्टण राहिलें तेथें ही महासरा दिल्हा नवाब निजामअलीखा बहादूर याच्याही फौजा शिकाकोल राजबदरीकडे जाणार चौकडून ताण बसला आहे इग्रज पाय्याचे किती दिवस ठरणार ? ईश्वर सत्तेनें होईल तें जहुरात येईल सरकारातून आणखीही मातबर फौज बगाल्यात कलकत्याचे सुमारें रवाना करण्याची तर्तूद होत आहे फौजेच्या सरजामाचे तदबिरोविषयीं आपल्यास पेशजी लिहीण्यात आलें जबाब ताहाल आला नाहीं सबब इतज्यारी आहे इग्रजाची चाल बादशाहा आदिकरून सर्व दौलतदारास वाईट हे दूरदेशीचे मार्गे समजोन त्याचे तबीचा शकल नमूदात आणावी. आपणाकडोन उत्तर आलें कीं फौज पोख्त बगाल्याकडे आली ऐसें समजावें नितेक जाबसाल बोलण्यास राघो मल्हार यास आपणाकडे पाठविले आहेत सविस्तर बोलतील त्याप्रमाणें तर्तूद व्हावी हा ऐन वख्त आहे ऐसा समय आन्दे तदबीर केल्या यावयाचा नाहीं पत्राचे जाब जलद येऊन पोंहोचावे म्हणोन पत्रें हिंदवी

२ चेतशिंघ †
१ सरकारचें
१ नानाचें
———
२

---

† काशीकर चेतसिंग सुमानसिंग हा चेतसिंगाचा कारभारी असावा या पत्रावरून नानानें इग्रजाविरुद्ध सर्व हिंदी सत्ताधीशास कसें उठविलें तें दिसून येतें

१ बाबू सुभानसिंग यास नानाचे नावें जास्त लिहिणें कीं तुम्हीं चेतशिंघ यास दूरदेशीने सागून लिहिल्याप्रमाण जलद घडावें म्हणान व यादप्रमाण मजकूर

---

३

( तीन पत्रें छ १६ मोहोरम सु। इहिदे समानीन )

---

ले ३०७ }
[ ४७३ }

{श १७०२ माघ शु १२
{ता ६—२—१७८१

श्री

छ १२ सफर सन इहिदे समानीन माघ

आसाहेबी खत फरहन-नमत इबलाग तें बसाआल्त नेक पोंहचून शादमानी जाली इग्रजाची फौज गारद जाली ही खबर पोंहचताच जनराल कूट चिनापट्टनास भारी जमावसुद्धां आला इकडील बदरावर मुखत्यार आहे इग्रजानीं नागपूरचे भोसले यासि मिलाफी जाबमाल बोलून मुलूख (सल्ख ?) करून घेतला मोंगलाकडे तो मातबर फिरंगी जाऊन दारमदार जहालाच आहे कूट मजकूर चेनापट्टणास आल्यावर ममईकर व गाडर यास कोणीही वजेनें श्रीमताशीं सलुख करून तिकडील सरजाम हिकडे घेऊन येणें ऐशीं खतें लिहून जहाज रवाना केलें म्हणोन चिनापट्टणची बातमी आली जनराल मजकूर मोमाविल्याम निघणार खुदाचें फजलें करून त्याची तबी होईल ते जहुरात येईल इग्रज मकरी, कावूतलब त्याचे चालीस वारीफ असा येथून लिहावें ऐसें नाहीं तिकडे सुरत बगाला खालीं मयदान रहात आहे तिकडे भारी पायबद बसे ऐसें करावें कृष्णराव नारायण याजबराबर दोन हजार स्वार देऊन इकडे रवाना करावें बाकी मरातिब नूरमहमद खान व नरसिंगराव सागतील त्याजवरून मालूम होईल म्हणोन कलमी केलें जुनाचे भोसल स्वराज्याचे शिरमात तेव्हा मिलाफी सलुख करून घेतील हें क्यासात येत नाहीं थोडक्याच आरशात बगाला गारत केल्याच्या खबरा आपणास पोंहचताल ऐसें हमशा भोसले सरकारात लिहितात इकडूनही हे शकल जलद नमुदात यावी म्हणोन पत्रें जातात इग्रजाचे तबीचा नक्षा नवाब निजाम अलीखान बहादूर याचे सल्लाहानें ठरला साल्गुदस्ता आदवनीचे मझेल्यामुळें नमूद न जाले पुढें बरसातही गुजरली तहाल निघणें होत नाहीं व मिस्तर होलन यास लावून ठेविले सबब सरकारातून त्यास लिहिण्यात येतच आहे हल्लीं आपलें खत पाहचल्यावर नबाब मौसुफ यास निकडीनें लिहिलें आहे इग्रज मकर फरेबी बहुत जाणतात हरएक जागा इतिफाकात जुदाई आणोन आपली गुरबत व रास्ती दाखवून खुषकीचे दौलतींत दखलगिरी

करीत चालिले याच चालीनें तरफैन दिलात षुभ आणतील याचे बयान मुफसल पयहम आ साहेबास कलमी करण्यात आले, व आसाहेबही खयास खूब वाकीफ आहेत खुलास दुनयाचे अलमात जितक्या तबक्याच्या शकला आहेत त्या तरफैन दाखवून हर तदबिरीनें निफाक पाडावयासि कसूर करणार नाहींत लेकीन सरकारात जे गोष्ट करारांत आली तेच पक्की व मजूर आहे तरफैनचे इतिफाकात कोणाचें काहीं चालणार नाहीं, हे दुरदेशीनें समजोन इकडील करार बमोजब कायमी आहे आमेहरबानाचीही असाची कोणेहा बाबे दिकत व षुभ येऊ नये फीलहाल राव मेहरबान तुकोजीराव होळकर व गणेशपत बेहरे एक होऊन केसो कृष्ण दातार खानदेशात इग्रजी स्वार पलटणें व जमावसुद्धा हगामा करीत होता, त्याची खूब तबी केली इग्रजी पलटणें कापून काढलीं चद्रराव पवार सरदार यांजकडील ठार पडला खासा केसोपत पळोन गेला गणेशपत बेहेरे व होळकरांकडील काहीं फौज सुरतेकडे ताख्तताराजी करण्याम रवाना जाले दोस्तदार ही बमयफौज कोकणात गाडराचे मुकाबिल्यास आहों राव मेहरबान तुकोजीराव होळकरही फौजसुद्धां येऊन पावले, जागा अडचणाची सबब मयदानात काढून लढाई घ्यावी, ह्या तदबिरात आहों खुदाचे फजलेकडून होईल तें जहुरांत येईल करनेल कूट जमाव करून मुकाबिल्यास आलियावर आ साहबापुढें ठरणार नाहीं खुब नतीजा पोंहचेल मेहेरबान कृष्णराव नारायण यांची रवानगी आसाहेबाकडे जहाली आहे फौजेची तयारी होत आहे अनकराब येऊन पोंहचेल येविशींचे मरातीब आयतेजाद दोस्ता नूरमहमदखान व नरसिंगराव कलमा करतील त्याजवरून वाजे होईल म्हणोन हैदरअलीखान यास हरीपत तात्याचें पत्र

---

ले ३०८ श १७०२ माघ वा ३
[ ८७६ ] ता ११ २ १७८१

श्री

( छ २० सफर माघ इहिदे समानीन )

आ साहेबीं खत-फरहत्त नमत इबलाग केले तें बसाअत नेक पोहोंचून शादमानी हांसील जाली त्यात कलमी केल कीं, बिल्फैल जनराल कूट भारी जमावानिशीं चेनापट्टणाहून बाहेर निघाले आहेत आह्मीही त्याचे तर्बचे पैरवींत असो खुदाचे फजलेकडून चद्रोबात जे होईल तें जहुरांत येईल भोंसले यांणीं बगाल्याकडाल मोहीम करण्याचा करार असता कूट मजकूर इकडे येतो, बल्कीं भोंसलें यांसि कांहीं देणेंघेणें करून आला याकारतां भोंसले तिकडे मोहीम करात नाहींत निजाम अलीखान करारा प्रमाणें सिकाकोल राजबदाराकडे न जातां फिरगियाकडील मातबर वकिलास आपणांपाशीं ठेवून फिरंगियाचा व आपला दारमदार मखफी करून घेऊन आपले मारफतीनें श्रीमतांकडील सलुखाचा करून देतों ऐसें सांगतात, म्हणून तेथून फिरंगियाकडील वकील चिनापट्टणास लिहून पाठवीत आहे त्याजवरून जनरल कूट मजकुरानें मोंगलाचा व श्रीमतांचा सल्ला जैशी त्यांची खातर

असेल त्या प्रमाणें करून घेऊन तमाम फौज तिकडे बोलावून, एक तरफ लढाई पाडावी असें त्याणीं मोकरार केलें आहे त्यास आपले कायममिजाजावर नजर देऊन करारप्रमाणें इकडून अमलात येत आहे आपणाकडोनही अमलात येईल करारास जिनहार कसूर येणार नाहीं हें यकीन आहे जानों बैन जुदागी नाहीं याजकरिता इकडाल कैफियत कलमी केली असे कृष्णराव नारायण यास दोन हजार स्वारानिशीं जल्द रवाना करावे फराशिसाची सत्ता-वीस जहाजें मोरास बदरास येऊन येथूनही निघालियाची खबर आली आपणास मालूम व्हावें याजकरितां कलमी केलें असे म्हणोन आ साहेबानीं मुफसल मरकूम केलें तें जाहीर जालें चुनाचे भोंसले बंगाल्यात जाऊन इंग्रजाचे सरहद्देवर पोंहचले तेथून इकडे पैदरपै पत्रें पाठवितात कीं, इंग्रजाचे मुलखात ताख्त ताराजा केल्याचें वर्तमान जल्दानेंच येऊन पोंहचेल, ऐसें लिहितात याजकरिता काहा देणें घेणें करून इंग्रजाशीं सलुख करून घेतील ऐसें क्यासात येत नाहीं आलीकडे यानीं ताख्त ताराजी केली ऐसा खबरही आहे लाकीन भोंसले याज-कडान पत्रें आला नाहीं तीं आलियावर आ साहेबास इतला केला जाईल नबाब निजाम अलीखान बहादूर याचे सल्लाहानें इंग्रजाचे तबीचा नक्षा ठहरला, ऐसें असता मिस्तरास लावून टेविले आणि मसलतीस नमूद ताहाल होत नाहीं येविशीं सरकारातून नबाब मौसुफ यासि लिहिलें होतें त्याचे उत्तर आले कीं, इंग्रजाचा वकील आसल्यास काय मुजाका ? दौलत आहे तेथें वकाल असतच आहेत लाकीन राव पडित प्रधान यासि करार केला त्यांत कसूर सरेमो यावयाचा नाहीं त्यास इकडूनही त्याजकडे बरेचवर लिहिलें जात कीं, करारा-प्रमाणें सिकाकोलीकडे जलदीनें नमूद व्हावें जनराल कूट याणें मोंगलाचा व श्रीमंतांचा सल्लाह करून घ्यावा याजप्रमाणें मोकरार केलें आहे म्हणोन आ साहेबीं कलमी केलें त्यास इंग्रज जात हरामजादी व काबूकार व मकरफरेब फार जाणतात हरएक जागा इतिफाकात निफाक पाडोन तरफेन दिलात घुभ पाडतील याचा बयान मुफसल पेशजीं आ साहेबास लिहिण्यांत आलाच आहे दरीवला याणीं चाल याच बमोजिब धरिली आहे परतु सरका-रातून जे गोष्ट करारात आली तेच मजूर ये बाबे आपणास खातर जमा पक्का आहेच आणि असों यावी फराशिसाचीं सत्तावीस जहाजें मोरसाहून निघालीं तेव्हां लौकरच येतील ते आलियानें इंग्रजाची तबी बवाकई अमलात येईल मेहेरबान कृष्णराव नारायण याची बमय फौज रवनगी करण्याची ढील नाहीं लाकीन कित्येक मरातीब मसलतीचे आं साहेबाशीं बोलावयाचे आहेत याजकरिता येत जात दोस्तां नूरमहमदखान याणीं अंगर नर-सिंगराव याणीं हमराहा कृष्णराव नारायण याचें आलें पाहिजे ये बाबे आ साहेबास इतला केला आहे, त्याचे जबाबाचा इंतजारी आहे जाब लौकर यावा बमयफौज येऊन पोंहचतील याजप्रमाणें नानाचे नावें हैदरअलीखान यास पत्र

ले ३०९ }
[ २८२ ] }

{ श १७०२ फाल्गुन शु १
{ ता २५ २ १७८१

श्री

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं

विनंती उपरि बाईकडे +महालाची वहिवाट चालत आहे त्याप्रमाणें त्याची त्याजकडे चालून कर्जदाराकडे महाल आहेत तो ऐवज सरकारात घ्यावा असें असल्यास उत्तम आहे राजश्री तुकोजाबावाकडे ऐवज द्यावा तरि त्याचा खर्च मात्र समजाविताल तूर्त मसलतीचा अर्थ तर ध्यानातच आहे त्याजकडे सरदेशमुखीबद्दल ऐवज येणें त्याऐवजीं सरकारात घ्यावा असें असल्यास पाटीलबावाशीं बोलून बाईस लिहून पाठवून बाईनीं ऐवज सरकारात द्यावा याप्रमाणें निश्चयात आणावयास येईल सुचली विनंती लिहिली आहे आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक होईल म्हणोन लिहिलें तें कळलें त्यास सरदेशमुखीचा ऐवज सरकारचा त्यांजकडे वाजबी येणे आहे त्या पक्षीं तुम्ही पाटीलबावांशीं बोलून बाईस लिहून पाठवून सरकारच्या ऐवजाचा फडशा लवकर करून घ्यावा ऐवज फार येणें आहे सरकारात येईलसें करावे रा छ १ रविलावल हे विनंती

---

ले ३१० }
[ २३१ ] }

{ श १७०२ फाल्गुन शु ५
{ ता २८ २ १७८१

श्री

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं

विनंति उपरि तुम्ही छ ४ रविलावलचें पत्र पाठविलें तें पावलें राजश्री पाटीलबोवा दरकूच खामखेड नजीक भेलसें पाच कोस येथें गेले इंग्रज सिप्रीपासून सुरजे पावेतों ठाणीं बसवीत आले तों अबाजी इंगळे व सदाशिव मल्हार याच्या त्याच्या लढाया होत आहेत तुरक स्वारापुढें वाढोन आले होते त्यावर लढाई करून काहीं मारले, काहीं पळाले, दोन चार धरून आणिले तों पाटीलबावा आल्याचें वर्तमान ऐकून पुढें यावयाचें महकूफ होऊन सुरजेजवळ मुक्काम केला राणेखानभाई† पुढें फौज घेऊन गेले खेची राजगडवालेही आले फौजा जाऊन पोंहोचल्या रस्त बाहेरील बद केली सिप्रीपासून ठाणीं बसवीत इंग्रज आले तीं ठाणीं चदेरीकर राजे याणें उठवलीं ते पाटीलबोवास येऊन सामील होणार इंग्रजाचा सदर्भ आला आहे कीं, आम्हास माघारे जाऊं द्या म्हणतात, असें लिहिण्यात आलें आहे पक्कें लिहिलें येईल तेव्हा लिहून पाठवू आपल्या कडील वर्तमान इंग्रजाचें येत नाहीं

---

\+ बाइ होळकर=अहल्याबाई

† ज्याने महादजीस पाणीपत येथून पळून येत असता आपल्या पखालीच्या बैलावर बसवून दक्षिणेंत आणिलें त्यास महादजी भावाप्रमाणें लेखी व म्हणूनच त्यास ‘ भाई ’ असें म्हटलें आहे मागेंही बरेंच पत्रात ‘ भाई ’ असें म्हटलें आहे ते यांसच

म्हणोन तेथें बापूजी रघुनाथ ठेविले आहेत त्यापाशीं म्हणत होते परभारें त्यांस वर्तमान गाडर्ड बोरघाट चढोन वरता आला हें कळलें म्हणून पुसत होते, म्हणोन लिहिलें, तें कळलें त्यास पाटीलबावा भेलशा नजीक जाऊन पोहोंचले, उत्तम जाहले इंगळे व बक्षीची तुरक स्वाराची लढाई जाहली त्यात जे तुरक स्वार सापडले त्याची जबानी इंग्रजाचें लष्करचें वर्तमान सविस्तर पुसून लिहून घेऊन पाठवाव्या व इंग्रजाबरोबर सामान खरेंखुरें किती आहे हाही शोध घेऊन लिहून पाठवावें, व श्रेची राजगडवाले याची व आपली मिळोन सारी फौज आपले मिळोन किता हें सविस्तर लिहून पाठवावें बाहेराल रसद बंद केली याप्रमाणेच चौतर्फा बंदी चांगली केल्याने आयास येताल रुदेरावाल्यानें कोणकोणता ठाणीं उठविलीं ? पाटीलबोवास कधीं येऊन भेटणार ? त्यापाशीं जमाव किता आहे ? हें लिहून पाठवावें माघार जाऊ द्या म्हणोन इंग्रजाचा सदर्भ आला आहे । त्यास ते दगाबाज आहेत, त्याचें कदापि ऐकू नये सदर्भ लावून फौज चोहोंकडे गेली म्हणजे मग ता चाल करतिल आयते मैदानात सापडले आहेत पारपत्यच होय तें करावे गाडर बोरघाट वर चढून आल्याचें वर्तमान इकडील सविस्तर पूर्वी लिहून पाठविलेंच आहे रा छ २१ रविलोवल हे विनंती *

---

ले ३११ [२०९] — श १७०२ फाल्गुन शु १२, ता ७-३-१७८०

श्री

राजश्री नारोपंत स्वामींचे सेवेशी

विनंती उपरि प्रस्तुत इकडील वर्तमान तर छ ३ रबिलाखरी खोपलीहून चार पलटणें तोफा वगैरे सरजाम घेऊन मजबुदीनें पनवेलास रस्त आणावयाकरिता रात्रीस कूच करून जाऊ लागलीं, तों राजश्री परशरामपंत भाऊ याची बातमी होतांच, याणींही रात्रीसच त्यांसीं जाऊन गाठ घातली निकड करून लढाई लागली तों पहारी लागूनच होत शें दीडशें माणूस ठार व दोनश पावेतों जखमी इंग्रजाकडील वेलें तीन चारशे बदुका व दाहा बारा उंट व छकडे दारू गोळ्याचे व डेरे राहुट्या व चार साडे चार हजार बैल त्यावर कांहीं जिनसी व कांहीं रिताडाचे याप्रमाणे पाडाव आणिले उजडताच मुक्काम त्याचा बारवईवर अडचणीच्या जाग्यात जाला त्यावर दुसरे दिवशीं रात्रीस कूच करून जाऊ लागला तो त्याणीं गाठ घातली शें पन्नास त्याकडील माणूस मारले व हजार बैल पाडाव आणला इकडून बाणांचा मारगिरी केली त्याणें त्या कडाल दारूचे छकडे होते त्यास आग लागून त्याकडील माणस फार जळालीं रात्रीसच पळून पनवेलीस गेले बराबर दीड दोन हजार पावेतो बैल राहिला तो बराबरच नेला त्याजवर जरब बसून नाश फार जाला याकरितां मुंबईकडाल पलटणे घेऊन मजबुदाने तिकडून येतील व घाटावर एक तोंडीं लढाई निम्म्या फौजा घेऊन जाऊन मारगिरी करावी तेही करितात घाटावर बातम्या बाधून अडचणींत

---

* या पत्रातील हकीकत इंग्रजी ग्रंथात आढळत नाहीं

राहिले आहेत पुढें वाढून येत नाहींत तेव्हा कामही मातबर होत नाही याकरिता राजश्री तुकोजी होळकरही फौजसुद्धा कोळव्या घाटाने कोंकणात गेले भाऊ व हे एक होऊन तिकडून रस्त देऊन येतील त्यावर निवड करताल राजश्री पाटील बावास पत्र लिहिलें आहे तें प्रविष्ट करावें रा छ १२ रबिलाखर हे विनंती

---

ले ३१२ }
[ २८६ }

{श १७०२ फाल्गुन व ६
{ता १५—३—१७८१

श्री

राजश्री नारोपंत स्वामींचे सेवेशीं

विनंति उपरि तुम्हा छ २८ सफरचीं उज्जनीचे मुक्कामचीं पत्रे पाठविलीं तीं पावलीं राजश्री शिवाजी विठ्ठल याच्या गळीं हिंदुस्थानची मसलत घालून सुरतेकडे यावें, अथवा शिप्राचे पल्टणाचे तरीं पारपत्य लौकर व्हावें दिवस थोडे राहिले व मोठा मनसबा तूर्त होत नाहीं, या दोंहोतून तरी एक लौकर घडावा, याप्रमाणें लिहिलें होतें हें राजश्री पाटीलबावानीं ऐकून उत्तर केले कीं, मसलत चागली लिहिली आहे परंतु इंगळे जाऊन इंग्रजाशी भिडले असता इंग्रजानीं सिप्री घेऊन पुढें चाल धरली भूपाळकरानीं त्याशीं राजकारण लाविलें कीं तीन लाख रुपये देऊन भेलसे घेऊन देणें आम्ही मागें कूच केलें म्हणजे इंग्रज पुढें येऊन भेलशास लागेल भूपाळकर सामील होईल भेलसें देऊन अगदीं माळवा हाता खालीं घालून बऱ्हाणपुरास ठेप देताल यास्तव आम्हासच इंग्रजाचे पारपत्यास गेलें पाहिजे याचें पारपत्य करून देशास येतों दरकूच इंग्रजावर चालले सुज्याअलपुरापुढें नऊ कोसावर मुक्काम गेल्याचें वर्तमान आलें त्यापुढें फौज घेऊन भाई गेल्याचें वर्तमानही आलें आम्ही होतो तेव्हाच भाई बोलत होते कीं, सुजाअलपुरापासून पुढें जाऊ गेले असतील लष्करात होतों तेयें शरीर प्रकृत नीट नाहीं, याकरितां राजश्री सदाशिवपंत दादाजींचे भाचे बापूजी रघुनाथ व गंगाजीस लष्करात ठेवून उज्जनीस आलों काशिदाच्या जोड्या तेथें ठेविल्या आहेत वर्तमान लिहिण्यात येईल पाटीलबाबाची डाक लष्करापासून येथपावेतों आहे येथून पुण्यापावेतों सरकारची डाक आहे पत्रें येतील राजश्री शिवाजी विठ्ठल व बळवंतराव धोंडदेव व पवार पाटीलबावास सामील झाले म्हणून लिहिलें तें कळलें त्यास सिप्री कडील पल्टणें पुढें न येता उगीच तेथें राहिलीं होतीं असें समजोन सुरतेकडील विचार लिहिला होता हल्लीं पल्टणेंच पुढें आलीं तेव्हा खुद्द राजश्री पाटीलबावाच इंग्रजावर गेले, त्यापक्षीं भूपाळकराचें राजकारण इंग्रजाशीं होऊ पावणार नाहीं आता त्या पल्टणाचें पारपत्य करावें हाच मनसुबा चागला पाटीलबावाच गेले तेव्हा जय चागला पडून पारपत्य करतील यात गुंता नाहीं प्रकृत नीट नाहीं म्हणून उज्जनीस आलेत, उत्तम केलेंत औषध घेऊन लवकर बरें व्हावें बापूजी रघुनाथ लष्करात ठविले त्यानीं वर्तमान वरचेवर लिहून पाठवीत जावें शिवाजी विठ्ठल वगैरे पाटीलबावास सामील झाले, उत्तम झालें रा॥ छ १९ रबिलावल हे विनंती

ले ३१३ } { श १७०२ फाल्गुन व १०
[ २७७ ] } { ता १९-३—१७८१

श्री

राजश्री याविराजित राजमान्य राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

पोष्य बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जावें विशेष राजश्री खंडेराव पवार राजश्री महादजी शिंदे याजकडे गेले आहेत म्हणोन ऐकिल्यात आलें, ऐशियास इकडे सरकार चाकरी भगावयाचे दिवस, त्याचें पथक इकडे आहे, यास्तव मशारनिले आले पाहिजेत तरि तुम्हीं पाटीलबावास लिहून पाठवून पवार तेथून निघून लवकर येत तें करावे रा। छ २३ रबिलावल बहुत काय लिहिणें लोभ असों द्यावा हे विनंती

---

ले ३१४ } { श १७०२ फाल्गुन व १३
[ ४७४ ] } { ता २२-३-१७८१

श्री

छ २६ राबिलोवल शिमगा हिंदे समानीन पत्र रवाना जालें

गाडर जमावासुद्धा घाटावर येउन अडचणीचे जागा मुक्काम करून आहे मेहेरबान हरीपंडत व तुकोजीराव होळकर सामान सरंजामसुद्धा त्याचे मुकाबल्यास आहेत मुनवातिर लढाया अमलात येतात मेहरबान परशरामपंडत यास बमयफौज रस्तबंद करून पायबंद द्यावयाकरिता घाटाखालें कोंकणात रवाना केले शिपरी कोल्हारावर इंग्रजी पलटणें आलीं, त्याचे तबींकरिता रावमेहरबान महादजीराव शिंदे त्या रुखें चालून गेले हें आसाहेबास पेषजी कलमी करण्यात आलच आहे दरांविला परशराम पंडत याणीं इंग्रजी पलटणें पनवेलीहून रसद घेउन येत होतीं त्याजवर फौज पाठविली त्या फौजेनें पलटणाशीं गाठ घालून दोन तीनशें लोक इंग्रजी कत्तल केले एक निशाण व तीनसे बदुखा व शभर बैल बाबत व दोनशें बैल गल्ला ऐसे लुटून आणिलें तिकडील तोफांचे गोळ्यानं परशराम पंडत याजकडीलही घोडीं व लोक ठार व जखमी जाले ते रोजीं पलटणास पुढें जावयाची फुरसत न सापडली सबब अडचणीची जागा व झाडीचे आसरियानें मुक्काम करून राहिलीं. परशरामपंडत खोपलाचें रुखें होते, त्याणीं दुसरे दिवशीं कुल् सरंजामसुद्धां त्या पलटणावर येउन इलगार केला तेव्हा पलटणें फौजेच्या मुकाबिल्यास ठरून सकता झाडींत पसार झालीं व गाडर याकडून कुमक येऊन रात्रीं गलबत न करता पलटणें झाडींतून निघोन गेलीं अडचण व झाडीचा आसरा नसता तर गारतच केलीं असतीं गाडर जमावासुद्धां घाटावर मुक्काम करून आहे त्यास हरीपंत व होळकर याणीं छ २४ रबिलोवलीं तलाव्यास जाउन त्याचे जमावावर तोफा लागू केल्या व बाणाचीही मारगिरी बेतऱ्हा केली, ते वख्तीं तिकडोन इंग्रजी लोक चालून आले, त्यास हरिपंत व होळकर याणीं गाडरबर स्वार पायउतारा करून हटवून माघारें घातले खुलासा गाडर यास दुतर्फा फौजेचा ताण

व शह बसला, सबब अदेशात आहे पुढें यावयाची ताकद होत नाहीं महादजीराव शिंदे यांजकडोन बातमी आली कीं, कुमक नामें सरदार इंग्रजी पलटणासहित शिराजे नजीक दोहों कोसावर मुक्काम करून होता तेव्हा त्याशीं मुकाबील होऊन ताफाचा व बाणाची मारागिरी केली इंग्रज लढाईचा ताब आणू न सकता हटून शहरचे आश्रयास गेले आर्जीमबब आम्हींही ताकुबावर जाऊन व लगट करून न्यहायत आजिज व वतग केलें या प्रमाणें शिंदे याचें पत्र आलें त्यावर दोन दिवस चौगिर्दा फौज उभी करून तोफाची व बाणाची मारगिरी करून तग केलें त्यावर दुसरे दिवशीं आखारष इंग्रज बोहिम्मत होऊन दुसरा इलाज न पाहता चदेराचे रुखें फरारी जाले ते वख्तीं महादजीराव शिंदे थाणीं त्याचा पाठलाग करोन इंग्रजी लोक दोन तीनशें तहतग केले, व बाहार बुनगा लुटान घेतलीं त्या लढाईत शिंद्याकडील एकदोन सरदार व घोडीं व काहीं लोक कामास आले आईदा फौजेचे पलटणाशीं लडाई होत जात आहे बहुत करून पलटणें गारत होतील ऐसें कियासात येतें याबमोजीब सरसरी सरकारचे कारकुनाकडून लढाईतच पत्र लिहून बातमी आली मुफसल मागाहून वर्तमान आलियावर लिहिलें जाईल म्हणोन हैदर अलीखा बहादूर यास नानाचे नावें हिंदवी पत्र

---

ले ३१५ [२७२]

श १७०३ चैत्र शु १
ता २५ ३ १७८१

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे शेवेशीं

विनती उपरि गाडराची ल्ढाई सुरू झाली याउपर वर्तमानें वरचेवर येत जाउन आम्हास कळवीत जावें असें रा० पाटीलबाबा बोल्ले म्हणून लिहिलें त्यास जें वर्तमान होत गेलें तें लिहीत गेलों पुढेंही वरचेवर लिहून पाठवीत जाऊ प्रस्तुत गाडर सव्वा महिना बोरघाटावर येऊन जाहला अर्धा सरजाम खालीं ठेविला आहे अर्धा वरता आहे अड चणीची जागा धरून बतेऱ्या बांधोन तोफा ठेऊन राहिला आहे रा० हरिपंत व होळकर पचवीस तीस हजार फौजेनिशी कारल्यानजीक आहेत नित्य तोफा घेउन जाउन ल्ढाई होत असत्ये कोंकणातून पिछाडीवर रा० पर्शरामपंत भाऊ बारा हजार फौजेनिशीं आहेत तेही खालील पलटणावर निकड बरीच करतात परंतु अद्याप घाट सोडून पुढें येत नाहीं या पुढें वर्तमान होईल तें लिहून पाठऊ

सरकारचा ऐवज रा० पाटीलबावाकडे येणें याचें उत्तर पूर्वीं लिहून पाठविलें आहे रा० राघोपंत गुरुजी तेथें आहेत सरकारचा ऐवज किती होतो तें रुजवातीनें याद करावी म्हणोन लिहिलें त्यास रुजुवातीनें याद करतों, परंतु याची एखादी वरात केल्यास फलाणे मुदतीस देऊ अशी काहीं तोड पडावयाजोगी असल्यास लिहून पाठवावें मसलतीवर रा० पाटीलबावा गेले असता लिहू नये परंतु सरकारात लाचारी व वरातही करावयास कोठें जागा राहिली नाहीं याकरितां लिहिलें आहे

रा० पाटीलबावाच पत्र पाटविलें तें पावलें त्याचें उत्तर पाठविलें आहे तें प्रविष्ट करावें रवाना छ १९ रविलोवल हे विनति

———

ले ३१६ [ ३१५ ] | शके १७०३ चैत्र शु ५ ता २९-३-१७८१

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि राजश्री पाटालवावा व फौज एकत्र होउन इंग्रजाचे भोंवते एक दिवस फिरून तीन कोसावर मुक्काम आहे तेथें आले दुसरे दिवशीं तोफा तयार करून घेउन गेले तों इंग्रज भेलशाच्या सुमारे दोन कोस आले होते ते माघारे सुरजे जवळ जाऊन पुढें पाव कोसावर बतेऱ्या बाधोन तोफा ठेवून मारागिरी करतात पाटालबावा बरोबर दोन तोफा लब-छड्या आहेत त्याचे गोळे इंग्रजाच्या मुक्कामा पावेतों जातात परतु त्याणीं काम व्हावें असें नाहीं यास्तव भेलशाहून दोन तोफा भारा आणावयास पाठविले आहेत ते आल्यावर निकड करणार इंग्रजाचा जोर भारी पडावासा नाहीं इंग्रज सुरजेजवळ आला येणें करून पोटाची बेगमी आहे लष्करा बाहेर त्या कडाल कोणी येऊ पावत नाहीं पाटीलबावाजवळ फौज पेंढार सुद्धा वीस हजार आहे निकड केल्यास लौकरच कार्य व्हावेंसें आहे म्हणून लिहिलें कळलें त्यास इंग्रज मैदानात आले आहेत त्यावर पाटीबावाही खूप फौजे सुद्धां गेले आहेत जथही बरा पडत चालला आहे तेव्हा निकड करून पारपत्य करतील ही खातरजमाच आहे भेल्शाच्या तोफा येऊन पोहाचल्याच असतलि भोंवताल्ची वदी इंग्रजाच्या पक्की करून भूल करून मग निकड केल्यास काम चागले होईल युद्धाचे कार्यास पाटीलबावा दीक्षित, येथून ल्याहावेंसें नाहीं भूपाळकर फौज पाठवितो म्हणून पत्रें पाठवितात, अद्याप त्याकडील कोणी आलें नाहीं म्हणोन लिहिलें त्यास भूपाळकर याचा विश्वास धरू नये खासा अथवा फौज पाठविली तथापि सावधता असावी भूपाळकराचीं पत्रे येथें आलीं होतीं कीं वकील पाठवितों त्याचें उत्तर पाठविलें कीं, इंग्रजाचे पारपत्यास तुम्हीं जाउन राजश्री पाटलिबावांस सामाल व्हावें व वकील इतबारी पाठवून द्यावा हें वर्तमान तुम्हास कळावें म्हणोन लिहिलें आहे रवाना छ २३ रविलावल हे विनती

———

ले ३१८ [ २१८ ] | ता २०-४-१७८१

॥ श्री ॥

राजश्री पाटीलबावा गोसावी यासि

आशीरवाद विनति उपरि पनबलाहून पाच पलटण गाडराकडे बोरघाटास येत होतीं त्यावर राजश्रा तुकाजी होळकर व राजश्री परशरामपत भाऊ यांणीं निकडानें लढाई

करून इंग्रजाकडील नाश फार केला हें पूर्वी सविस्तर लिहिलेंच आहे त्यावरून कळलें असेल घाटावरूनही राजश्री हरिपंतानीं तोफा त्याच्या बतेऱ्यानजीक नेऊन मारगिरी इंग्रजावर फार केली, व त्यानींहा मारगिरी भारी केली छ २३ रोज मजकुरीं रात्रीस गाडर आपले सरंजामासुद्धा घाबरा होऊन घाटा खालीं उतरला तें वर्तमान हरिपंतास कळनाच फौजसुद्धां घाटावर जाऊन वरून तोफाची व बाणाची मारगिरी केली त्यावर दुसरे दिवशीं समाकून गाडरानें कूच करून जाऊं लागला, तो होळकर व परशरामपंत फौजसुद्धा तिकडून आडवे होऊन इंग्रजावर निकड केला, व हरिपंतही फौजसुद्धा व दोन तीन तोफा घेऊन घाटाखालीं उतरून पाठीमागून निकड केली हजारो गोळ्याचे छकडे व गाड्या व डेरे राहुट्या वगैरे पाडाव आणले लढाई दुतर्फाही चालली आहे म्हणोन पत्रें आलीं मागाहून होईल तें लिहून पाठवू आपल्याकडाल वर्तमान सविस्तर वरचेवर लिहून पाठवीत जावें ग्वालेरी सिमथरकर गुजरानीं घेऊन आपणाकडे पत्रें पाठवीत म्हणोन वर्तमान ऐकिलें त्यावरून संताष जाहला परंतु आपलें पत्र सविस्तर वर्तमान लिहून आलें नाहीं या दिवसात इंग्रजाकडील ग्वालेर आली ही मोठी गोष्ट लौकिकाम व मसलतीस चांगली जाहली प्रस्तुत इंग्रज कोठें आहे वगैरे सविस्तर वर्तमान लिहून पाठवावें इंग्रजावर फौजाची निकड बसून लढाई होत आहे घाबरा जाला आहे रा। छ २५ राकर बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती

---

ले ३१९ [२४७] — ता २०-४-१७८१

॥ श्री ॥

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं

विनंति उपरी तुम्ही छ ११ रबिलाखरचें पत्र पाठविलें तें पावलें गंगाजी रामजी पाटील बावाजवळ सडे स्वारींत आहे त्याचे पत्र छ ५ त रखेच आलें तेंच बजिन्नस पाठविलें आहे त्यात फौज जमा होऊन इंग्रजास घेरा घालून आहेत व ग्वालेरचें वर्तमान लिहिलें आहे, विदित होईल, म्हणून लिहिलें तें कळलें, व गंगाजीचें पत्र पाहिलें फौज जमा होऊन इंग्रजावर नित्य लढाई होते, फार उत्तम आहे पुढें इंग्रज कोणिकडे रोख धरतो व पाटील बावा तर्दुद काय करतात हें लिहून कळवावे ग्वालेरचा किल्ला घेतला म्हणून लिहिल आहे त्यास ही गोष्ट मोठीच झाली ग्वालेर सरकारात आली येणें करून इंग्रजाचा थारा मातबर मोडला व मनुष्यासही उपयोग पडला पुढें होईल तें वरचेवर शोध चांगला करून लिहून पाठवीत जावें इकडील वर्तमान राजश्री पाटील बावास लिहून पत्र पाठविलें आहे हें प्रविष्ट करावें, त्या पत्रावरून तुम्हासही सविस्तर मजकूर कळेल इंग्रज घाबरा होऊन माघारा जात आहे इकडील फौजाची निकड बसली आहे पुढें होईल तें लिहून पाठवू रा छ २५ राखर हे विनंति

ले ३१९ } { ता २६-४-१७८१
[ १२२ ] }

श्री

पो छ १ जमादिलोवल सन इहिदे समानीन वैशाख शुद्ध ३ गुरुवासर

श्रीमत महाराज राजश्री रावसाहेब ‡स्वामीचे सेवेशीं- विनती सेवक हरी बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान ता छ २९ रबिलावर पावेतों स्वामींचे कृपावलोकनें यथास्थित असे विशेष स्वामींनीं छ २५ रा लावरचे आज्ञापत्र स्वहस्ताक्षर कृपा करून सादर केलें तें छ २७ मिनहूस पावोन परम संतोष जाला इंग्रज घाट उतरोन गेला. तुम्हीही त्याचे पिछावर गेला उभयता सरदार आहेत चहूंकडून येकदाच एल्गार करून इंग्रज बुडवून टाकणें म्हणून आज्ञा ऐशास इंग्रज घाटमाथा खंडाळ्यावर होता त्यास राजश्री परशरामपंत व तुकोजी होळकर यास फौज सुद्धा घाटाखालीं अगोदर रवाना केलें होतें यांणीं त्याची रस्त मना केली होती यामुळें त्याचे लष्करात महागई जाली व आम्ही खंडकाळ्याचे मुक्कामीहून एका दो रोजात ला [ क ? ] व पास येऊन तोफा सुरू करून मार गिरी करीत होतों महागाइमुळें त्यानीं घाटमाथाहून कूच करून खालीं उतरून खाला पुरास इंग्रज आला आम्ही छ २५ रालावरी घाटाखालीं उतरून रात्रीचे त्याचे लष्कराचे पाऊण कोसाचे तफावतीन उभे होतों त्यास त्याणीं ते दिवशीं प्रहररात्र रहाता कूच करून चालिला तेव्हा आम्हीं फौजसुद्धा निकड करून झुजाचें तोंड लाविलें सरकारचे सरदार व लोक व गाडदी व हशमा लोकानीं स्वामिसेवा एकनिष्ठता महाराजाचे चरणाचें चिंतन करून इंग्रेजाचा जगी मार होत असता खातरेस न आणिता लढाई सुरू करून मोठ्या तारफेनें बेन्याहत [ बेनियाहत ? ] मर्दुमी करून युद्ध केलें इंग्रेजास जरब चागली दिल्ही त्याजवर छ २८ रालावरी खालापुरापुढें चौक आहे त्या मुक्कामीहून त्याणीं कूच केले त्यास आम्ही प्रहर रात्रीस पहाटेचे तयार होऊन त्याचे पिछावर आलों व उभयता सरदा ही आले तोफाची मारगिरी त्याजवर केली, व लोकानीं व सरदारानीं काल निकड करून झुझाचें तोंड लाविल सर्वांनीं स्वामिसेवा जीवाभ्य श्रमें करितात इंग्रजाचे माणूस फार जाया जाहलें गाडर इंग्रेज याणीं हिंदुस्थानात जागा जागा लढाया केल्या त्याच तौरानें इकडे मर्दुमी दाखवावयास आला त्यास स्वामी प्रतापवान् सरकारात सरदार व लोक वीर भारथी आहेत, याणीं मोठे मोठे मनसुबे करून शत्रू पादाक्रात केले असता या टोपकराचा मजकुर काय ? स्वामींच्या तेजप्रतापें याचा गर्व परिहार जाहला याचें पुरतें पारपत्य स्वामीच्या आज्ञेप्रमाणे करावें हाच आमचा सर्वांचा सेवाधर्म, तदनुरूपच धावदाव पाहून लगट करीतच आहों दारूचें बळ फार, लढवई चागला, म्हणूनच मर्दुमी करून मुक्कामास जातो इंग्रज पनवेलीस जाऊन पोहोंचला आम्ही दो तिही कोसाचे अतऱ्यानें आहों कालचे लढाईत एक तोफ इंग्रजांची पाडाव जाली व बदुखा आल्या दारू मार्गानें लोकास फार सापडली पढाऱ्यानीं बैल आणिले, त्याच माणूस फार जाया जालें सर्व गोष्टी स्वामींचे पुण्यप्रतापाच्या आहेत. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना

‡ सवाइ माधवराव

ले ३२० }
[ २४४ ] }                                                    { ता। २८-४ १७८१

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि गाडराचें थैलीपत्र आम्हास आलें होतें त्याचा मजकूर व त्याचें उत्तर लिहिलें तो मजकूर राजश्री पाटीलबावास कळावयाकरिता पत्र लिहून पाठविलें होतें त्यावर दुसरें पत्र जाहजाचा सरदार पातशाई इग्रजावडील याचे थैलपत्र आलें होतें त्याचा मजकूर व उत्तर लिहिलें त्याचा मजकूरही लिहून पाठविला होता त्यास पाटीलबावाच्या पत्राचीं उत्तरें आलीं त्यात गाडराचे पत्राचा मजकूर लिहिला तो कळला हें उत्तर आलें नाहीं, आणि मागाहून जाहजाचे सरदाराचा मजकूर लिहिला त्याचें उत्तर आलें आहे तेव्हा गाडराचे मजकुराचें पत्र पावलें कीं न पावलें हें काहीं समजले नाहीं, यास्तव शोध करून लिहून पाठवावें, व श्रीमतास आरोग्य जाहल्याचें पत्र पूर्वी पाठविलें तेंही पावलेंच* असेल रा छ ३ जमादिलावल हे विनती

---

ले ३२१ }
[ ३०८ ] }                                                    { ता। ३०-४-१७८१

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि येथून तुम्हास पेशजी लिहिलें होतें कीं, तूर्त गोहोदकराशीं बिघडू नये त्यास ममतेंत घेऊन इग्रजाचे मसलतीस हमवार करून व आणखी चार राजेरजवाडे अनकूळ करून घेऊन यमुना उतरून पाटीलबावानीं अतरवेदींत हगामा सुरू करावा, पुढें पाहिजे तसें करावयास यईल, म्हणून लिहिलें होतें त्याचें उत्तर पाडुरंगपत यागीं लिहिलें कीं, प्रसगीचें वर्तमान तर वरचेवर विनविलेच आहे यदा यमुनेस उतार नाहीं त्यापक्षीं पार जाणें कळतच आहे अतरवेदास मसल्त पाडून इग्रजाचे पारपत्याची तरतूद असावी तेव्हा साऱ्याचे दोष पोटात टेवून तूर्त मसल्तीचे अर्थ समेटून घेऊन उपयोगीं पडतसे करावें, तें नाहीं, त्यापक्षीं चार दिवस हगामाचे याच प्रातीं घालून अखेरीस सहजच साऱ्या गोष्टींची अडचण, तेव्हा विचार करणें प्राप्त व इतकें घडावयाचा प्रसग दृष्टीस पडतो यामुळें सूचनार्थ विनती लिहिली आहे कदाचित् दैवें करून एखादें घबाड साधल्यास मग त्याजवर या प्रातीं छावणी होऊन देशीहून फौज बोलवून बाज बरसात मातबर मसल्त होईल तर न कळे विचार करून पाहतां अशा गोष्टी घडाव्या हें दिसत नाहीं, म्हणून लिहिलें तें कळलें त्यास तिकडील मसल्ती विषयीं भरवसा राजश्री पाटीलबावाचा मानतों असें असता पुढील विचार या प्रकारचे दिसो लागले हें ठीक नाहीं -पाटीलबावा मातबर सरदार, नाव लौकीक मोठा,

---

* सवाई माधवरावास देवीचें दुखणें झालें होतें

याचा नक्शा राही तें घडावें पहिलीं लिहिणीं काय येत गेलीं आणि होत आहे काय हें पाहवें. रवाना छ ४ रविलाखर हे विनती

---

ले. ३२२
२४८ ]

{ता ५-५-१७८१

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री पाडुरंगपंत स्वामीचे सेवेशीं

पोष्य बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जावें विशेष राजश्री नारो शिवदेव यास येथून पत्रें लिहून पाठवीत असता त्यात राजश्री पाटीलबावाचे चित्तास वाईट वाटावयाजोगे तर काहीं लिहत नाहीं, तथापि त्याच्या समजेस एकादें वाईट वाटतें त्यास पेशजी एक वेळ नारोपंतास लिहिलें होतें कीं जे पाटील बावाचे चित्तास वाईट वाटावयाजोगें असेल ती पुरवणी दाखवू नये, मजकूरच तोंडानें बोलत जावा याप्रमाणें लिहिलें असता मध्यें एकादे वेळेस पत्रें दाखविल्यावर वाईट वाटोन उदासीनतेचे भाव तुमच्या लिहिण्यात का येतात ? असो, हल्लीं लिहिले आहे तरि पाटीलबावास सनाथ वाटावयाजोग्या ज्या पुरवण्या असताल त्या वाचून दाखवीत जाव्या कदाचित एखादे पुरवणींत त्यास वाईट वाटावयाजोगें असल्यास ती पुरवणी दाखवू नये मजकूरच तोंडानें त्यास संतोष वाटे असा बोलत जावा रा० छ १२ जमादिलाखर बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंति

---

ले ३२३ }
[ २१६ ] }

{ता १७-५-१७८१

श्री

राजश्री पाटिलबावा गोसावी यांसि

आशीर्वाद विनंति उपरि इकडील कितेक मसलतीचे विचार राजश्री नारो शिवदेव यास लिहिले आहेत सर्व समजोन पुर्तेपण मनन करून पोक्त विचारें उत्तर लिहून पाठवावीं दौलतीचें सर्व ओझें आपल्यावर आहे मसलता तों तिढणींच्या दिसतात तजवीज करून उलगडल्या पाहिजेत पत्राचा उत्तरें सत्वर यावीं रा छ २२ जमादिलावल बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंति

---

ले ३२६ }
[ २७४ ]}

{ता। १७-५-१७८१

श्री

राजश्री नानापंत स्वामीचे सेवेशीं

विनंति उपरि पांडुरंग रघुनाथ याचे पत्रांतील मजकुराचीं उत्तरें

छ १८ जिल्हेजीं शेषन्हून दोन पलटणें कुलारमा यावयास निघाली, त्यावर भाई जाऊन लढाई झाल्याचा मजकूर लिहिला तो कळला

छ २५ जमादिलाखरचे पत्राच्या रवानगीचा लखोटा पावला नाहीं शिरोंजे पावेतों थाग + + त्याचे ठिकाण लावतों म्हणून लिहिल आहे त्यास त्या लाखोट्याचा शोध जरूर लावावा इंग्रजाकडील वगैरे कित्येक मसलतीचे मजकूर नाजूक पत्रांत लिहून गेले आहेत एखाद्या परक्याच्या हातीं लागल्यास वाईट पडेल, व पाटिलबावास ही मजकूर समजणार नाहींत याजकरिता शोध जरूर करून ठिकाण लावावें, आणि पाटीलबावास पत्रें गेलीं आहेत त्याच्या मालुमाती जमा धरून उत्तरें यावीं व तुमच्याही पत्राची मालूमात जमा धरून उत्तरें असावीं, म्हणजे मजकूर ध्यानांत येतो अलीकडे तुम्ही उज्जनी महेश्वरास आहां याकरितां इकडून पत्रें जातात तीं पांडुरंगपंताकडे पाठवितों तीं तुमच्या नावचीं पत्रें म्हणून मालूमात धरून येथें पत्रें लिहित नाहीं आपलेकडील मजकूर मात्र लिहितात, त्या पुरवण्या येथ पाठविता येणें करून येथील पत्राचें उत्तर समजत नाहीं व येतही नाहीं

इकडून पत्र राजश्री पाटीलबावास पाठविलीं त्याचीं उत्तरें मागितलीं त्याचें उत्तर पाटीलबावानीं केलें कीं, सांप्रत कांहीं आम्ही लिहित नाहीं त्यावयाजोगा दिवस आणील ते दिवशीं लिहू या विषयीं बोललों कीं ही रीत मोंगलास किंवा हैदरखानास लिहिण्याचा विचार आपले घरीं हें चित्तांत आणावयाचें कारण नाहीं त्यावरून आम्हास उत्तरें लिहावयास सांगतलीं आहेत मागाहून घेऊन पाठावतों म्हणून लिहिलें आहे त्यास पांडुरंगपंतानीं उत्तरें चांगलींच केलीं आपले घरीं पत्र लिहिण्यास संकोच असू नये जं करें वाईट होईल तें इकडून आम्ही लिहित असतों, तिकडून त्यांनींही लिहावें येविषयीं दुसरा अर्थ चित्तांत आणूच नये

छावणीचे प्रकरणीं राजश्री शिवाजीपंत बापू व गंगाधर गोविंद व झांशीकर व हाडे कोटेवर यांचीं खलबतें निरनिराळीं होऊन त्यांनीं उत्तरें केल्याचा मजकूर कलमवार लिहिला तो कळला त्यास जो तो आपले परी बोलतो परंतु मसलत पाटीलबावावर आहे, याकरितां इंग्रजाच्या शहावर छावणी करून त्याची रस्त बंद होय व जेर न होत तें करावें

रा। छ ९२ जमादिलावर हे विनंति पो। छ १२ रजब सुरसन इसने समानीन

छाके बराबर

ले १ ७ }
[ ५०० ] }

{ज्येष्ठ व ११ श १७०१
{ता १७-६-१७८१

पो छ २ ७ जाखर

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाबूराव स्वामीचे सेवेशी

पो बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणोन स्वकाय कुशल लिहीत जावें विशेष तुम्हीं पत्र छ १९ जमादिलावलचें पाठविलें ते पावलें इंग्रेज घाटावर आला होता ते समयीं श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेब व श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति आपल्यास यश यावें व शत्रूचा पराजय व्हावा हे चिंतन करीत होतीं, त्याप्रमाणे घडलें संतोष जाला सविस्तर वर्तमान लिहून पाठवावें म्हणोन लिहिलें, ते कळलें ऐशियास गाडर इंग्रज भारी जमाव व पोख्त सामान सरंजाम व तोफा घेऊन लढावयाची हिंमत धरून बोरघाट चढून अडचणाचा जागा धरून राहिला होता तेथें मातबर फौजेचा येलगार व्हावयाचा इलाज नसता राजश्री हरीपंत फडके फौजेसुद्धा खंडकाळ्यानजीक मुक्काम करून तेथून अहानशीं इंग्रेजाकडे तळाव्यास जाऊन इंग्रेजावर तोफा लावून बाण सोडून मारगिरा व करोल वगैरे लोक पायउतारा करून निकड करीत गेले, व राजश्री परशुरामपंत भाऊची रवानगी फौजेसुद्धा घाटाखालीं इंग्रेजाची रस्त बंद करून ताण द्यावयाबद्दल केली त्याणीं घाटाखाली जाऊन गाडराचा पलटणें रस्त घेऊन बोरघाटास येत होतीं, त्याजवर दोन वेळां निकड करून २ लढाई मारून तीन चारशें माणूस त्याचें ठार केलें डेरे राहुट्या दारूचे छकडे व रुप्याचीं भाडीं व पांच हजार बैल घोडीं वगैरे लुटून आणिलीं त्याजवर पनवेलीहून पांच पलटणें गाडराकडे कुमकेस येणार ही बातमी येताच राजश्री तुकोजी होळकरही फौज घेऊन घाट उतरून कोंकणांत गेले, आणि इंग्रेजाचीं पलटणें, चालोन येत होतीं त्याजवर होळकर व भाऊ याणीं घेतलें या समागमें तोफा नसतां करोल पाय उतार करून घोडे उठवून इंग्रजाचे आराब्या पावेतों जाऊन हत्यार लाविलें निकडीनें जुजलें त्याही लढाईंत चार पांचशें माणूस इंग्रेजाचे ठार जहालें इकडीलही घोडे माणूस ठार जहालें उंटें छकडे बंदुका वगैरे त्याजकडील पाडाव आले, घाबरे होऊन खोपवलीचा पल्ला जवळ व गाडरानें दोन पलटणे पुढें कुमकेस पाठविलीं, यामुळें तीं पलटणें खोपवलीस येऊन पोहोंचलीं परंतु त्यांची बाकी खराबी बहुत जहाली इकडूनही राजश्री हरीपंत याणीं फौज व तोफा गाडद घेऊन जाऊन गाडरावर निकड भारी केली दुतर्फा मातबर शह व जरब बसला

---

" मूळांत जमादिलाखरचें " असें आहे व पत्राचा महिना " जमादिलावल " लिहिला आहे हें अर्थात चुकीनें नक्कल करणारानें लिहिलें असावें पुढेंही लढाई हल्ले वगैरेचा महिना ' जमादिलाखर ' असा दिला आहे तो आम्ही बदलून ' जमादिलावल ' केला आहे व अस्सल पत्र लिहिल्याचा महिना "जमादिलाखर" दिला आहे स का स

फिरून कुमक अथवा रस्त येऊन पोहोचविण्याची मुष्कील पडली त्याचे लष्करांत दाण्या-वैरणीची महागाई झाली व तेथें नेट धरून रहावयाची हिंमत न राहिली अशा विचारांत पडून छ २३ रबिलाखरीं गाडर जमियत व सामान सरजामसुद्धा रात्रीं घाट उतरून खालीं जाऊ लागला ही बातमी हरीपतास लागताच तयार होऊन गेले तों ते खालीं उतरले याणीं वरून मारगिरी केली तेव्हा दुसरे रोजीं खालून इंग्रेज कूच करून जाऊ लागला, तों हेही खालीं उतरून त्याशीं गाठ घेतली व तिकडून होळकर व भाऊ याणीं ही निकड बसविली बरी लढाई जहाली इंग्रेज घाबरा होऊन शे दिडशें मुर्दे त्याणीं टाकिले ते त्यास काढावयाची फुरसत न पडली गाडे छकडे दारू व हजारो गोळे तोफाचे पाडाव आले ते दिवशीं तीन चारशें माणूस इंग्रेजाचे ठार पडले भारी गळाठा त्याचा होऊन खालापुरास राहिला तेथून छ २४ रबिलावली चौकास जाऊ लागला तेव्हाही हरीपत व होळकर व भाऊ असे तिघे तिहींकडून इंग्रेजास घेरून लढाई दिली त्या दिवशींही इंग्रेजाचे पाच सातशे माणूस ठार जखमी जहालें दारू गोळे बदुका छकडे आले तेथून छ २८ तारखेस कूच करून पनवेलीस जाऊ लागला तेव्हाही यांणीं गाठून फारच निकड केली आराब्या पावेतों घोडे चालवून लढाई मारिली हजार बाराशें माणूस त्याचे ठार जखमी जहाले चार सरदार त्याजकडील मातबर पडले त्यात एक दोन गाडराचे प्रतीचे चागले लढवाई मर्द होते बदुका व तोफा बेसुमार पाडाव आले बुणगें वगैरे लुटले गेले दारूगोळे तर मुबलक सोडविले इकडीलही घोडे माणूस बरेच जाया जखमी जहाले परतु इंग्रेजास जरब चागली बसली फार खराबी त्याची जहाली मुडदे देखील काढावयाची फुरसत न सापडली शिकस्त होऊन मुबईकडे बदराकिनारा गेला याप्रमाणें महाराजाचें प्रतापें होऊन इकडील सरदारास यश आलें सर्व प्रताप महाराजाचा, पुढे ही होणे ते महाराजाच्याच प्रतापे होऊन ह्या राज्याचें कल्याण होईल चिंता नाहीं, राजश्री गणेशपत बेहेरे फौजसुद्धा सोनगडाकडे आहेत तिकडे इंग्रेजाचीं पलटणें होतीं त्यासही मशारनिल्हेना जरब बरीच पोहोंचविली, व प्रस्तुत कोकणातून राजश्री बाजीपत यास फौजसुद्धा वसई तालुकियात व सुरतेपर्यंत मुलखात गर्दी करून ताण द्यावयाबद्दल रवाना केलें असे ते सविस्तर कळावें म्हणोन लिहिलें असे व श्रीमंत महाराज याणीं श्री आबासाहेब व महाराज याचे सेवेशीं विनातिपत्रें लिहून पाठविलीं आहेत गुजरावीं श्रीमंतास देवी येऊन आरोग्य जहालें स्वारी पुण्यास आली. शा छ १४ जमादिलाखर बहुतकाय लिहिणे लोभ असावा हे विनंति §

---

§ह्या पत्राची नकल आम्हांस रा० सा० गोपाळराव बळवंत नेने यांजकडून मिळाली.

ले ३२८ } [ २८३ ] }

{आषाढ शु ७ श १७०३ { ता २८- १७८१

॥ श्री ॥

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनति उपरि

चार पाच हजार गोसावी+ झाशीकडून पाटीलबावानीं आणविले होते ते आले त्याची खानगी भाइकडे केला सांप्रत गोसावी बैरागी वगैरे मिळोन कमपेष दहा हजार पायींचा जमाव इकडील जहाला आहे पलटणे* कोलारस शेषई व डोंगराची जमा कोलारसास येऊन तोफा नेणार त्या समयीं इकडून निकड करावयाचा विचार आहे, म्हणून लिहिलें त्यास पायींच्या माणसाचा जमाव बराच जाहला निकडही करतील रा छ ५ रजब हे विनति

जाल्मसिंग कोटकर यासि छ ७ मिनहूस निरोप दिल्हा ते कोठ्यास गेले, दोन तीनशें स्वार व दोन तीनशे पायींचे माणूस लालाजी बल्लाळ याजबराबर ठेविले म्हणून लिहिलें, त्यास सस्थानिक व राजे रजवाडे जमीनदार यास निरोप द्यावयाचा नव्हता औध्यासच निरोप दिल्हा हें ठीक जाल नाहीं जें करणे तें विचार पाहुनच करीत असतलि पेो छ १९ रजब सुा इसनेसमानीन डाके बराबर

---

ले ३२९ } [ ८२ ] }

{आषाढ शु ९ श १७०० { ता २०- -१७८१

॥ श्री ॥

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेसीं

विनति उपरि त्रिंबक महादेव काकिर्डे¶ याजकडे सरकारचे कर्जपट्टीचा ऐवज येणें त्याचा फडशा जाहला नाहीं, याजकरिता त्याचे गावची सरकारात जप्ती करून कर्जपट्टीचा ऐवज घतो तुम्हास कळावें म्हणोन लिहिले आहे रा छ ७ रजब हे विनती

---

+ हे गोसावी लोक शिंदे पेशवे वगैरे सर्वांच्या लष्करात थोडे बहुत असत दुसरे बाजीरावाजवळ एक नगा पल्टण म्हणून होती ती गोसाव्याचीच होती

* हीं पलटणें इंग्रजाचीं शेषई, कोलारस वगैरे ठिकाणें झाशीचे पश्चिमेस आहेत डोंगरीची जमा ' हे शब्द वाचण्यात काहीं चूक असावी ' बुढा डोंगर ' म्हणून शेसई जवळ आहे त्याचें नांव या मोहिमेंत येतें

¶ महादजी गोविंद काकिर्डे पूर्वी महादजीचा दिवाण होता त्याचा मुलगा

ले ३३० } { आषाढ व १ स्न १७०३
[ ३१५ ] } { ता -७-१७८१

श्री

राजश्री नारोपंत स्वामींचे सेवेशीं

विनंती उपरि माधवराव तुकदेव मानाजी शिंदे वगैरे मिळून दोन तीन हजार फाज जमा केला आणि खूळ करावे या उद्योगांत होते ही बातमी येताच त्याजवर प्रति निधीकडील फौज पाठविला त्याची व माधवराव वगैरे याची गाठ गोपाळपुरानजीक पढरपुरी पडोन लढाई झाली माधवराव यास जखमा लागोन पाडाव आले मानाजी शिंदे यासही जखमा लागल्या, आणि पन्नास पाउणशे लोकानशीं पळून गेले वरकड फौज लुटून फस्त केली वर्तमान तुम्हास कळावे म्हणून लिहिलें आहे रवाना छ १ रजब हे विनंति

पेवस्ता छ ९ रजब सुरूसन इसने समानीन मुक्काम वस्ती बुडा डोंगर डाके बराबर

---

ले ३२१ } { भाद्रपद व १ स्न १७०३
[ २६१ ] } { ता ३-९-१७८१

॥ श्री ॥

राजश्रि याविराजित राजमान्य राजश्री नारोपंत स्वामींचे सेवेशीं

पोष्य बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाव विशेष राजश्री सदाशिव पवार याजविशी मजकुराचे पत्र राजश्री पाटील बाबा यास लिहिलें आहे त्यास तुम्हीं तें पत्र वाचून पाहून त्याप्रमाणें पाटील बाबाशीं बोलून आनंदराव पवार याजला इकडे पाठवून देवबावें सदाशिव पवार याचे महालीं व कारकुनास आनंदरायाकडील हरएक विशीं उपद्रव लागतो त्याचा बंदोबस्त करून उपद्रव न लागे ऐसें करवावें रा छ १८ रमजान बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती

---

* सदाशिव पवार—हा धारकर पवार याच्या मुलखात पेशव्याचा जाहगीरदार असावा

ले ३३ [ २९४ ]

मार्गशीर्ष शु १२ श १७०
ता २७-११-१७८१

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनता उपरि राजश्री पाडुरग रघुनाथ याणीं लिहिले त्याचा उत्तरे

इग्रज दरकूच ग्वालेरीस जाउन पुढे हेष्टिनाचे कुमकेस जाणार दहा तोफा व दोन हत्ती इग्रजानीं नेले होते ते चिमणाजी पताचे स्वाधीन केले कोलारसात सरकारचे ठाणे कायम जहाले शेषईतही ठाणे सरकारचे पाठवितो, म्हणोन चिमणाजी पतानीं लिहिले त्यास ही पलटणे हेष्टिनास मिळाल्यावर मसल्त भारी पडेल याचा विचार काय केला आहे, हे राजश्री पाटीलबावास पुसावे तोफा हत्ती दिल्या, मतल्बाकरिता घेतल्या, परतु पुढील विचार आधी करावा तरच चागलें कोलारस सिप्रींत ठाणा बसलीं याचा सतोष मानू नये

चेतसिंग राजा पाच हजार फौज व पन्नास हत्ती खजीना घेऊन विजेगडास कुटुब ठेवून रेवामुकुदपुरास आला, तेथून मुजरत पत्रे राजश्री पाटीलबावास पाठविलीं राजाचे मत फिरोन जमाव करून, इग्रजावर जावे पाटीलबावाकडे वकील रवाना केल , तो आल्यावर काहीं पैक्याची तोड पडल्यास त्या प्राता जावे असा विचार दिस तो म्हणोन विस्तरे लिहिले त्यास अमानी इग्रजास मिळाला व फितुर चेतसिगाचे फौजेंत जाल्यामुळे राजा हलका जहाला, या मुळे निघाला, परतु हिमत आहे, अशा समयीं त्याची कुमक करून इग्रजाचे पारपत्य करावे केवळ पैक्यावरच दृष्टा ठेवू नये मसलतीवर नजर टेवून करावे समय आहे

रा छ १० जिल्हेज हे विनती

---

ले २ [ ४४५ ]

पौष शु ७ श १७०३
ता २२-१२-१७८१

श्री *

शिका

दस्तक सरकार राजश्री पतप्रधान ता कमाविसदारान व चौकीदारान व रहदारान व बाजेलोकान व जकाती महालानिहाय सुरूसन इसने समानीन् मया व अलफ राजश्री नारो कृष्ण कारकून निसबत दफ्तर हशम याचे तादूळ खडी २ दोन एकूण बैल स्वर २० वसि खातें फिरगाण कोकणातून खरीदी करून हर एक घाटे एक खेप पुणियास आणितील त्यास आणू देणें जकातीचा तगादा न लावणें जाणिजे छ ६ मोहरम आज्ञा प्रमाण

लेखन सीमा

---

* येथे बाजूवर शिका आहे

ले ३३४ }
[ ७ ] }

{श १ ०
{सन १७८० पूर्वीचे पत्र

श्री

राजश्री यादवराव बल्लाळ दिंमत बजाजीराव घाटगे स्वामाचे सेवेशी पो शामराज बल्लाळ फडणीस कृतानेक साष्टांग नमस्कार विनंता विशेष राजश्री पांडुरंगराव यादव याज कडे मजमदारीचे काम देविले त्यास त्याचे हातून काम घेऊन वेतन देववित जाणे राजश्री परशराम पंडित व जयवंत बाबा मंत्री व रघुनाथ पंडित सचिव व रघोजी भोसले सेनासाहेब सुभा व राजमंडलचे कारभारी व बाळाजी जनार्दन व परशराम रामचंद्र व परशराम सदाशिव व त्र्यंबकराव सदाशिव व जयवंतराव बाबा व फत्तेसिंग बाबा गायकवाड याप्रमाणे हुजूरची मंडळी यावयाचीं, त्यास राजाजीराव घाटगे व बहिरजीराव व निराजी शामराव व शामराज निळकंठ पेशवे व निजाम अलीखान व हैदरखान व मुरादखान वगैरे व राघोजी आंगरे बजारतमाब सरखेल व गोविंदराव गायकवाड हिंमत बहादूर याप्रमाणे राजमंडल यावयाचीं त्यास त्याची बरदस्त बराबर मंडळी सुभानराव व घोरपडे व पिराजीराव घोरपडे व शामराव गोविंद व जानराव बाजीराव शलकर [ ? ] याप्रों यावयाची त्यास त्याची बरदस्त ठेवणे रा छ जमादिलावर बहुत काय लिहिणें हे विनंति +

---

ले २० }
[ ११० ] }

{श १७०२
{सन १७८० पूर्वीचें पत्र

श्री

राजश्री बाजाराव यादव दिम्मत पंत सचीव स्वामीचे सेवेशीं—

पो गंगाधरराव यादव दिम्मत बाजीराव घाटगे नमस्कार विनंती विशेष–राजश्री माधवराव बल्लाळ फडणीस याचे चिरंजीव बळवंतराव याजकडे मजमदारीचे काम देविले आहे त्यास याचे हातून काम घ्यावें व दुसरे राजश्री तुकोजीराव आटोळे सफेजंग बहादूर व यशोदाबाई जाधव गंगाधरराव गोविंद व बाजीराव रघुनाथ व पर्शराम पंडित व जयवंत बाबा मंत्री व अहिल्याबाई व रघोजी आंगरे व रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा व लक्ष्मणराव वगैरे राजमंडळ याची स्वारा यावयाची त्यास त्याची बरदास्त ठेवणें रा॥ छ साबान बहुत काय लिहिणे हें विनंती

---

+ हैदर तारीख ७—१०—१७८२ रोजीं वारला, त्यापूर्वीचें पत्र असावें

ले ८-
[ १२ ]

श १७०३
सन १७८ पूर्वीचे

श्री

राजश्री यादवराव बल्लाळ फडणीस व मजमदार व दफ्तरदार स्वामीचे सेवेसी पो॥ बाजीराव यादव कृतानेक सा नमस्कार विनंती विशेष–राजश्री पांडुरंगराव रामचंद्र व दिनकरराव शामराव याजकडे मजमदारीचे काम सरकारातून देविले यास्तव त्याचें हातून काम घेऊन वेतन देवीत जाणे राजश्री परशुराम पंडित व जयवंतबाबा मंत्री याप्रमाणें स्वारी यावयाची यास्तव त्याचा बरदास्त ठेवीत जाणें दुसरे राजश्री येशवंतराव पारसनीस व बजाजाराव घाटगे व जनार्दन बल्लाळ व त्र्यंबकराव यादव व जाफरखान व शादरखान व महमदखान व निजाम अलीखान व शामखान व हुसेनखान व पिराजीराव व हबीरराव तुकोजीराव आटोळे समशेर बहादर सेनाकर्ते व सेना धुरंधर व राजआज्ञा ममलकत मदार, हबीर पारनीस याप्रमाणे राजमंडल यावयाचे त्यास त्याची बरदास्त ठेविण्यात यावी, हे विनंती

---

ले ३२१
[ १० ]

श १७०३ माघ व ७
ता। ४ १७८२

श्री

राजश्री नारोपंत स्वामींचे सेवेशीं

विनंती उपरि इंग्रजाचे तहप्रकरणीं पाहता हैदरखानाचे कलम मनस्वी लिहिले आहे याचे कारण पाहता शोध लागला का, हैदरखानाचा तह इंग्रज करीतच नाहींत सरकारात वकील आला व भोसले मोगल, त्याविशीं बोलतात तेव्हा हरएक तोड काढून तह करतील तेव्हा आपले महत्व राहात नाहीं या करिता हैदरखानाचे पक्षाचे यांणीं पेशजीं लिहिलें पुढें हैदरखान सुद्धा तह करावा म्हणून पत्रें येऊ लागलीं, त्यास त्याचा दाब इंग्रजावर असावा, तेव्हा त्याणें खानाचे तोडजोडीचा मजकूर बोलावा , तें तर नाहीं कसेंही करून आपले हाते तह करून आपलें मात्र महत्व रक्षावें या अर्थें इंग्रजानीं म्हटलें ते कबूल केलें सरकारचे जाबसाल नीट जाले नाहींत आणि खानाचेंही काहीं नाहीं, तेव्हा आपला ऐवज बाहेर निघलो तेव्हा तहनाम्यात लिहिलें आहे तें कलम लिहून घेतलें साबाचा जाबसाल हातीं घ्यावया विशींचें कबूल करीतच नाहीं आम्हाशीं तर निक्षून बोलले आहेत कीं, साबास दिल्हा तरच तह करू, न देत तर करणार नाहीं त्यास मध्यस्त पाटीलबावा, यास्तव मध्यस्तांचे हवाला करावा हें बोलून पहावें दिल्हा तर हाताखालीं ठेवावा नाहीं तर पेंच आम्हांवर घालावा असाही विचार आहे इंग्रज आपल्या पाशीं ठेवून अखेरसाल पावेतों दतिया, चदेरी, नरवर, खेची व भूपाळ ही मसलत करावी पुढें अखेर सालीं उज्जनीस

जाऊन बसावे तिकडे यावयाविशा पत्रे आल्यास बोलाव का, तीन वर्षे मसलताच्या पेचामुळें ताकद राहिली नाहीं फौज दूर करून दोन वर्षे घरा बसले आहेत त्याणीं मसलत करावी, हे वाद घेऊन बसावें असे रग दिसतात गोहदकराचे पारिपत्य झाल्यावरून मोठे कृत्य झालें यावरून मजा बेहवा जाली आहे लिहिले मजकूर प्रगटात येऊ नयेत भाई सरकारपल्यावर निक्षूण आहे नवे कारभारी याचेही वावगे नाहीं या उपरि होईल ते वर्तमान लिहिन इतक्या विक्षेपाच्या गोष्टी होळकरा करिता म्हणोन बोलण्यात भाव दिसतात म्हणोन विस्तरे करून भाव लिहिले ते सविस्तर कळले त्यास हैदरखानाच्या कलमाचा प्रकार तर पेशजी लिहिलाच आहे त्याप्रमाणे अमलात यावे दादासाहेबाचा प्रकार तर तुम्हाशी निक्षूण दादासाहेब दिल्हे तरच तह करू, नाहीं तर करणार नाहीं याप्रमाणें बोलले आहेत तेव्हा याप्रमाणे करतीलच इग्रज आपल्यापाशा ठेवून अखेर साल पावेता दतिया, चदेरी वगैरे ही मसलत करावी, पुढे अखेर सालीं उज्जनीस जाउन वसावे, तिकडे यावयाविशा पत्रे आल्यास मसलती मुळें ताकद राहिली नाहा, फौज दूर करून दोन वर्षे घरीं बसले आहेत त्याणीं मसलत करावी असे रग दिसतात म्हणोन लिहिले त्यास पाटील बावाचीं पत्रे जलदीचीं आलीं कीं, इग्रेस निरोपाची जलदी करतो या करिता तहनामा व डौल लौकर पाठवावा, या विषयीं पत्रे आला त्यावरून तहनामा व डौल पाठविले तेव्हा इग्रजास आपल्यापाशीं बहुत दिवस कशास ठेवतील? येथून लिहिल्याप्रमाणे दादासाहेबास हवालीं करून घ्यावयाचें करून खानाचीही तोड पाडतील फौज दूर करून दोन वर्षे घरा बसले आहेत त्याणीं मसलत करावयाचा प्रकार तर त्याचे घरीं बखेडा त्या विशीं कितीक वेळा पत्रे पाठविलीं आहेत परतु काय जालें? असो त्याचा बदोबस्त जाल्यावर मसलतीस ही उपयोग त्याजकडून घडेल लिहिले मजकूर प्रगटात येऊ नयेत म्हणोन लिहिले त्यास हा मजकूर प्रगटात आणिला नाहीं भाई सरकारच्या पल्यावर निक्षूण आहेत व नवे कारभारी याचेंही वावगें नाहीं म्हणोन लिहिलें, त्यास सरकार कामाची काळजी भाईस आहे तेव्हा त्याजपासून सरकार उपयोग तेंच घडत असावे व नवें कारभारी याचे स्वरूप समजलेच आहे पुढे घरीं बसावे खर्चाखालीं आलों म्हणावें, असें लिहिले त्यास काय ईश्वर बुद्धी देईल ते करतील परतु समयास सरकार कामास अतर करणार नाहींत रा छ १ रबिलावल हे विनंती

---

ले २३८ }
[ २९१ ] }

{श १७०३ फाल्गुन शु २
{ता १४ २-१७८२

॥ श्री ॥

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनति उपरि. चदेरी व दतिया व ओंची या सस्थानात उपद्रव देऊ नये, म्हणोन आज्ञा जाहली होती तें पत्र पाटीलबावास दाखविलें नाहीं कारण सस्थानाविशीं नकार

झाल्यास विक्षेप मानितील याकरिता दाखविले नाहीं व मजकूरही बोलिलो नाहीं. स्वामानीं हा मजकूर राजश्री आपाजीराव यास लिहिला होता ते पत्र राजश्री राघोपत† गुरुजी याणीं पाहिले होते त्यावरून एके दिवशीं सस्थानचा मजकूर निघाला तेव्हा राघोपत बोलिले कीं, तिन्ही सस्थाने घ्यावयाची परवानगी सरकारातून येईल असे दिसत नाहीं यावरून मर्जी बहुत विक्षेपास पावली आम्हा सस्थानें घेऊच लागल्यावर आम्हास परवानगी कशास पाहिजे ? असें मनास येईल तेस विक्षेपानें बोलू लागले व बोलतात, हें आम्हास ही परभारे समजले आहे राण्याने याजकडे पैगाम लाविला आहे कीं ग्वालेर देतों हे म्हणतात गोहदेसुद्धा घेईन याप्रमाणे बोलणीं होतात येविशाचा वगैरे होळकराविशीं विक्षेपाचा बोलणी बोलतात त्याचा मजकूर सविस्तरें करून लिहिला तो सविस्तर कळला त्यास सस्थानाविशा परवानगी येईल असे दिसत नाहीं हे राघोपताना बोलल्यावरून इतका विक्षेप होऊन बोलावयाचें कारण काय ? ति ॥ सस्थाने सरकारचीं त्याचे रक्षण व्हावें ते एकाकडे राहून सस्थानिकाचे पारपत्य करुन सस्थाने घेऊ, कोणी परवानगी [ बद्दल ] बोलल्यास विक्षेपाची बोलणीं दाख [वितात] तुम्ही यविशी सुचवीत जावे गोहदकरापाशीं बोलणीं बरीच जरबेची घातली आहेत येणें करून तो नरम पडून जसें म्हणतलि तसें ऐकेल होळकराविशीं विक्षेपाचीं बोलणा बोलतात, त्यास होळकराचे घरीं बखेडा काय पडला आहे, त्याणीं येथून कसकसे लिहिलें अर्हे, त्याचा उलगडा होऊन †तेस्त होत नाहा असो हल्लीं आलाहिदा पत्र लिहिल आहे त्याजवरून कळेल ग्वालेर येत असल्यास गोहदेची ममलत समेटावी हें चांगलें दिसत तेहीं विचार पाहून चागलें तेंच करतील रा छ १ रविलावल हे विनति

---

ले ३२९ [ ८७ ] | श १७०२ फाल्गुन शु ५ ता १४ २ १७८

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं,

विनता उपरि सुरतेंत अद्भुत वायू सुटोन घरें दारें पडला हें वर्तमान विलायतेस गेल्यापासून कौसल झालें त्यात आपली बेमानी ऐसें जाणोन हेष्टिनास फाशी यावें असा निश्चय जाला त्यावरून हेष्टिनास घेउन जावयाकरिता मेस्तर होम व स जा व ल पाठविले आहेत त्यासि हेष्टिन बोलतो कीं, आता मी श्रीमताशीं वगैरे विरुद्ध वाढवीत नाहीं, सलुख करितों व हैदरखानाशींही सलुख करतों, व काशीच्या राजाची स्थापना

---

† येथें मूळपत्र फाटलें आहे

राघोपत गुरुजी व मल्हारदाजी बल्लाळ गुरुजी याचा काहीं आप्तपणा नाहीं पहिले कोकणस्थ व दुसरे कऱ्हाडे

करता, याप्रमाणे वर्तमान आले सत्यामिथ्या श्री जाणे परतु काशीच्या राजाच्या घरीं कलकत्याहून पत्रे आलीं आहेत ++ तुमचे काम तुम्हाकडे सागून स्थापना पूर्ववत् करावी याप्रमाणें निश्चय होतो म्हणून आलीं व काशीकडून पत्रे आलीं का हेष्टिनानें काशींत राजाची स्थापना केली होती त्यास कैद केले यावरून कलकत्याची बातमी खरी असेलसे वाटतें मुबईस जनराल विलायतेहून दुसरा आला त्याणें बदोबस्त करून मागील जनराल यास फाशी दिलें व सुरतेस सात हजार माणूस मुबईहून आले ते सुरतेत वगैरे गुजराथेताल बदोबस्त करणार म्हणोन पायागडाहून पत्र पाटीलबावास आले, म्हणोन लिहिल तें सविस्तर कळल त्यास कलकत्याची बातमी खरी असल्यास याचा अनुभव पाटीलबावास लवकरच येईल कीं, पाटीलबावा जसें म्हणतील तसें इग्रज कबूल करतील, आणि तह करतील हेंहा दृष्टास पडेल मग कलकत्याचे वर्तमान खरे असे समजण्यात येईल हैदरखानाच्या तहाचही बोलणें हैदरखानाचा व इग्रजाचा तह होणें तो सरकारचे विद्यामानें व्हावा हे इग्रजाशीं बोलून करारांत आणावे मुबईचे वर्तमान पायागडाहून पत्र आलें म्हणून लिहिले, परतु ही बातमी खरी असती तर येथे ही बातमी समजता ह्या *बातम्या खऱ्या नाहींत कलकत्याची येथे येते, त्यात हे काहा नाहीं व मुबईचीही नाहीं रा॥ छ १ रविलावल हे विनता

---

ले ४० [ २५८ ] { रा॰ १७० फाल्गुन शुद्ध ८ | ता॰ २०-२-१७८२ }

श्री

राजश्रा नारोपत स्वामाचे सेवेशीं

विनति उपरि चिठ्ठी पाठविली ती पावली नारो हरीनीं टाक ग्याचे स्वाधीन आहे, त्यास कोणी उज्जनीस पाठऊन न्यावयाजोगें असल्यास न्यावें, म्हणोन लिहिल त्यास येथून कोणी पाठऊन आणिवणें ठीक नाही तुम्हींच नारोपतास ल्याहावे कीं, सोवत चांगला पाहून, बसावयासा वगैरे सोय करून देऊन, रवाना करणे खर्च प ल नो देऊ अथवा तुम्ही टाघातून एकजण येऊ म्हणून लिहिले त्यास तुमचेंच येणे झालें तर आणावयाची सोय चागलीच होईल रा छ ७ रविलावल हे विनति नारो हरीकडून रवाना करण्यास युक्तिने येथे प्रविष्ट होय असा आपला बराबर कोणी देऊन पाठवावा हे विनंति

---

\+ या शब्दापुढील दोन अक्षरें फाटली आहेत

* येथपासून नानाचें अक्षर हें सर्व पत्र नानाच्या हातचे आहे

ले ४८१ } { श १७०२ फाल्गुन व ८
[ ९ ] } { ता ५ ३ १७८१

श्री

राजश्री सदाशिवपंत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि तुम्हा छ २७ सफरचा पत्रे पाठविला तीं पावला स्वामाना तहनामा पाठविला तो सिप्रात पावताच पुढे रवाना रला मागाहून माव राजश्री रामजीपाटाल बाहोचलो पाटीलबावाची व नारोपताची भेट जाहली यादावरून जाबसाल पाटीलबावासीं होतात इग्रजाशीं बोलून करारात आले म्हणजे विनति पत्रीं लिहावयास येतील म्हणोन लिहिले ते कळले त्यास तुम्हा तेथे गेला आहा सविस्तर पर्याय तुम्हाजवळ व रामजी पाटिलाजवळ बोलण्यात आलेच आहेत व लिहिण्यात आले आहेत त्याप्रमाणें लवकर अमलात यावे, वरकड नारो शिवदेव यास लिहिले आहे त्यावरून कळेल रवाना छ २२ रबिलावल हे विनति

---

ले ४८० } { श १७०४ वैशाख शु ३
[ ८३ ] } { ता १५-४ १७८२

श्री

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि स्वामाकडून पत्रे आलीं तीं सविस्तर राजश्री पाटीलबावांस दाखवून आज्ञेप्रमाणें एकेक कलमा करिता चार चार वेळ खेचीत बोललो त्याणीं इग्रसेनाशीं बोलून जाबसाल निश्चयात आणिले ते पाटीलबावानी आठ कलमें तपशीलवार पत्रा लिहिलीं व तुम्ही लिहिल्यावरून सविस्तर कळले, त्याचीं उत्तरे पाटीलबावाचे पत्रा लिहिलीं आहेत, त्याजवरून सर्व कळेल व कित्येक मजकूर हैदरखान प्रकरणा वगैरे तुम्हास लिहिले होते ते मजकूर तुम्हीं जमा धरून त्याचीं उत्तरें पाटीलबावानीं लिहिलीं आहेत त्याजवरून कळेलम्हणोन लिहिले त्यास पाटीलबावाचे पत्रावरून सर्व मजकूर समजला त्याचीं उत्तरे ही पाटीलबावास लिहिलीं आहेत त्यावरून कळेल रा। छ १ जमादिलावल हे विनती

---

ले ३४३ } { श १७०४ वैशाख शु ३
[ ९१९ ] } { ता १ -४-१७८२

श्री

राजश्री रामजी पाटील गोसावी यासि

अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य राजश्री बाळाजा जनार्दन आशार्वाद विनती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जावे विशेष सिप्रीचे मुकामीहून निघोन लष्करात

गेल्यावर तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं इग्रजाच तह प्रकरणीं वगैरे सविस्तर बोलणें होऊन अमलात यावयाचें त्यास तुम्हास जाऊन फार दिवस जाले बोलणीं जालींच असतील ये विशीं तुमचीं पत्रे यावीं, ती काहींच न आलीं यावरून अपूर्व वाटले त्यास इग्रजाचे तहाचे व होळकराकडील मजकूर सविस्तर बोलण्यात आले, व श्रीमत राजश्री दादासाहेबास येथे आणून देऊन सरकारात स्वाधान करावे हे तुमचें बोलणें निश्चयाचें आहे त्याप्रमाणे कराल ही खातरजमा आहेच परतु तेथे पाटीलबावाशीं पक्के बोलन कसे केलें हें सविस्तर लिहुन पाठवावें, व राजश्री नारो शिवदेव यास फार दिवस तिकडे जाऊन जाहाले, त्याचे घरच्याही अडचणी आहेत याकरिता त्यास पाठवावयाविशीं राजश्री पाटीलबावा यास लिहिले आहे, +तुम्हा येथें पावल्यावर पत्र एक न आले हे काय ? किता एक बोलणीं जालीं होता, त्याचें कमे केले हें बरचेवर लिहून पाठवावयाचे होते असो, हल्लीं सविस्तर लिहून पाठवावे रा छ १ जावल बहुत काय लिहिणे लोभ असा दीजे हे विनती

---

ले ३८८ [ २२० ] — श्र १७०४ वैशाख शु ४ ता १९-४ १७८२

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री दिनकरपत स्वामीचे सेवेशी

पोष्य बाळाजी जनार्दन साष्टाग नमस्कार विनति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जावे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिला मजकूर सविस्तर कळला परगणे शाहाडोराव परगणे कामबाग व आहिरवाड्यातील वगैरे ठाणीं इग्रजाने घेतली होतीं त्याजवर आम्ही व राजश्री यादवराव हरी दिमत शामराव नारायण राजेबहादर याणीं मिळोन चदेरीच्या राजास सामिल करून शिबदी ठेऊन इग्रजाचा ठाणीं उठवून आपलीं ठाणीं बसविलीं आहेत म्हणोन लिहिलें ऐशियास इग्रजाचीं ठाणीं उठविलीं उत्तम केलें त्यास ठाणी यावयासि शिबदी खर्च कार्याकारण जरुराती जाहला असेल त्याचा हिशेब राजश्री नारो शिवदेव यास समजावावा ते समजोन खर्चाची हिसेरसीद करून माहलावर ऐवज बसवितील तो सरकारी व सरजामीं माहलचे कमाविसदारापासून घेऊन ठाणीं त्याचे स्वाधीन करावीं इग्रजापासून ठाणीं तुम्ही व मशारनिल्हेनीं घेतलात येविशी तुमचे व त्याचें बोलणें आहे त्यास तुम्ही हुजूर यावें समजोन करावयासि येईल रा छ २ जा लोवल बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंति ’

---

+येथपासून खुद्द नानाचें अक्षर

ले ३४७
[ -५९ ]

श १७०४ वैशाख शु ४
ता १ ४-१७८२

श्री

राजश्री नारोपंत स्वामींचे सेवेशीं

विनति उपरि राजश्री पांडुरंगपंताचे पत्रांतील जाबसाल

येथून लिहिले होते कीं फरासिसाचे पातशाहाकडून मुसामुतीण वकील आला त्याचे बोलण्यात फरसिसाचा जमाव लौकरच फुलचरीस होईल अनुभव येण्याचेही दिवस थोडे राहिले आहेत असे आहे म्हणून लिहिले होते ते राजश्री पाटीलबावास निवेदन केले उत्तर आले का खानाकडे फरासिसाचा जमाव येऊन पोचला असलियास मोठे काम आहे परंतु करारप्रमाणे आले मात्र पाहिजेत नजीक आले म्हणून खानाना लिहिले होते आलीकडे पत्रे त्याजकडील आलाच असतील जमाव कोठपर्यंत आला हे लिहून पाठवावे व तिकडील इंग्रजाचेंही वर्तमान लिहून पाठवावे म्हणोन लिहिले, त्यास फरासिसाचा जमाव हैदरखानाकडे येऊन पोहचला हे पेशजी लिहून पाठविलेंच आहे त्यास साडेचार हजार फराशीस खुषकीस उतरले, व साडेनऊ हजार पावेतो गलबतावर आहेत फराशीस आलिया पूर्वी इंग्रजाकडील कर्नेल बारस पांच सात हजार जमावानिशीं होता, त्याची व खानाची लढाई होऊन बारसाचे लोक गारद करून सरदार पाडाव आणिला त्याजवर टिपू व फराशीस मिळून जाऊन इंग्रजाचे ठाणें गुडलूर म्हणून आहे ते घेतलें ठाणें घेतल्यावर फाराशींस निघून ज्या बदरीं मुक्काम होता तेथें गेले त्याजवर खानाना फराशिसास लिहून पाठविलें कीं, तुम्हीं आपणाकडील जमाव आणखी लौकर येऊं द्यावा त्याचे उत्तर आलें का, तुमचे आमचे बोलणे होऊन अद्याप ठराव जाहला नाहीं याप्रमाणें उत्तर आलें म्हणून वर्तमान लिहिले आले तुम्हास कळावे म्हणून लिहिलें आहे खानाना तिकडे इंग्रजास जरब बराच दिल्ही आहे येविशी राजश्री पाटीलबावासही पत्र लिहून पाठविले आहे प्रविष्ट करावं

येथे उदिष्टन आला होता त्यास इंद्रसेन राजश्री पाटीलबावाकडे आला आहे, म्हणून सांगितले त्यावरून त्याचे चित्तातील आशय दिसला कीं, इंद्रसेन मुख्य हेष्टिनाकडून आला आहे, तेव्हा तो कसे बोलेल हा आशय कळावयाकरिता येथून लिहिला होता त्याचें उत्तर पाटीलबावानीं केलें कीं, इंद्रसेन मुख्य हेष्टिनाने इकडे पाठविला याचें कारणे हेष्टिनास मान्य, याचे योग्य तेस गाडर देखील पोंचत नाहीं जितके इंग्रजाकडील वकील सल्ख्याचें बोलणें बोलतात तितके इतल्हा इंद्रसेनास देतील याची योग्यता विशेष आहे तेव्हा उदिष्टनाचे अंतःकरणा येत असेल हें प्रमाण, म्हणोन बोलले, म्हणून लिहिलें त्यास इंद्रसेनाची योग्यता सदरहू वर लिहिल्याप्रमाणें पाटीलबावा बोलले त्यापक्षीं इंद्रसेन तह करील तो हेष्टिनास मान्यच पडेल, तेव्हा सरकारचे मुद्देमबाफक हैदरखान सुद्धा पाटीलबावा तह करून घेतीलच ही खातरजमा आहे

+एक बातमा आली आहे का, इंग्रजांनी फराशिसाकडे बोलणे लाविले आहे मग काय घडेल पहावे इंग्रेज फराशिसाच्या जागा घेतल्या त्या बजिन्नस सुद्धा देणार असेही आहे हैदरखानाना सरकार व खान, फराशीस मिळून तह करावा म्हणोन कलमवार याद पाठविली, आणि लिहिले कीं, अधिक उणे कसे करावयाचे त लिहून पाठवावे त्यात कित्येक कलमात पेच होते ते उलगडून सरकार व हैदरखानास चागले व त्यात फराशिसासही चागले पडून उपयोग अशीं उत्तरे लिहून पाठविलीं आहेत

नबाबासही इंग्रेजावर मसलत कराव याचा उद्योग करीत आहो घडेल न खरे

सविस्तर राजश्री पाटीलबावास कळवावें रा छ० २ जमादिलाखर हे विनंती

---

ले ३४६ [२६७] | श १७०४ वैशाख शु १- ता २ -४ १७८

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनंती उपरि राजश्री पाटीलबावाना इंद्रसेनाशीं बोलावे का, टिपूने वेदनूर घेन ल्यातच आहे मुसाबुसी फराशीस भारी सरजमानिशीं महमुद (?) बदरास दाखल जाहल। याउपरि बिदनूरचे काम झाल्यावर टिपू व फराशीस एक होऊन चेनापटणास महसरा करणार तेथें इंग्रजी सर्व बदरचा जमाव जमा जाहला त्याणीं ज ला खालीं अथवा चेनापटण त्याणीं घेतलें तरी कपणीस मोठा पेच बसेल याची तजवीज काय ठराविता ? तुमची आमची दोस्ती जाहली तेव्हा तरफे न सल्लाह मसलत समजली पाहिजे, असे बोलोन त्याचें उत्तर काय होतें तें ऐकून घेऊन, पाटीलबावानीं बोलावे कीं, तुमचे आमचे करारात ज्या रकमा आल्या त्याप्रमाणे टिपूनें ऐकल्यास उत्तमच झालें न ऐकल्यास श्रीमत फौज सुद्धा अनकूल आहेतच परतु नबाब निजाम अलीखान व भोंसले यास ही मसलतीस अनुकूळ करून घेतलें पाहिजे," इंग्रजाचा त्याचा पहिला दोस्तीचा शिलशिला आहे हल्लीं करारनाम्यातही कलम लिहिलेंच आहे यास्तव "तुम्ही कलकत्यास ई मा जु दौ ला बहादर यास ल्याहावें, आणि नबाब निजाम अल्लीखान बहादूर व भोंसले यास त्याची पत्रें जावीं कीं श्रीमताशीं सल्लख महादजी शिंदे याचे विद्यामानें जाहला, हल्लीं फराशिस आले त्याची तबी करणें जरूर, तुम्ही आमचे दोस्त व हल्लीं पतप्रधान याणीं तुमचें कलम पक्कें करून घेतलें, तेव्हा विशेष दोस्ती जाहली, यास्तव फौज कुल सरजाम सुद्धा तुम्ही आमची कुमक करावी हें चागलें या अनवयें दाबानें ल्याहावें असें इंद्रसेनाशीं बोलोन लौकर करावें दिवस हगामास थोडेच आहेत पाटीलबावा म्हणतील "असफदौला व महमद

---

+येथपासून रा॰ नानाचें अक्षर

अलीखान इंग्रजाचे पेटयात, नबाब निजाम अलीखान व भोंसले आमचे पेटयात, तेव्हा त्यास इंग्रजाकडून पत्रें कशास लिहावीं ' आपणच बोलावे त्यास आम्ही नबाबाशा व भोंसल्यापाशा बोलों लागल्यास ते सरकारावर येहसान येऊन जाबसाल करतील तेव्हा आपल्यावर येहसान करून घेण्यापरीस परभारे जाल्यास उत्तम कलकत्याहून त्यास पत्रे परभारा आलीं म्हणजे "याचे जाब उभयताहीं लिहितील कीं, श्रीमत फौज घेऊन कुमकेस यावे म्हणजे आम्ही सिद्ध आहो " असे जाब लेहून सरकारात लिहितील कीं "कसे करावें" तेव्हा इकडून सल्लाह सागू कीं ' फार उत्तम आहे, आम्ही चालतो तुम्हीहा फौज सुद्धा चालावे " यात बहुत नफे आहेत म्हणजे नीट पडेल गोडीस येईल काम होईल या पैकीं इंद्रसेनाशा किती बोलावे, त्याजकडून कलकत्यास कसे लिहावें, कलकत्तेकरानीं नबाब भोंसले यास पत्रें कशीं लिहावी, याची तजवीज पाटीलबावाचे विचारें ठरेल तसें करतील ज्यात दाबाने काम होय असे रीतीनें घडावे इंग्रजाचीं पत्रे दाबाचीं जावीं केवळ फराशीस आहे म्हणून घाबरेपणाचीं नसावी सुचले व मनात आले तितके लिहिलें या पैकीं चागलें उपयोगी व ज्यात काम, तितकेंच पाटीलबावा घेतील व तुम्हीही असेंच सागावें रवाना छ २२ जमादिलावल हे विनंती

---

ले ३४७ [ २३८ ] { श १७०४ वैशाख व ८ ता ३ ५ १७८२ }

श्री

पु॥ राजश्री नारोपत स्वामचि सेवेशीं

विनति उपरि वसई वगैरे कोंकण व गुजराथ प्रातींचा मुलूख, इंग्रजानीं घेतला आहे तो देऊ, अमदाबादेविशीं मात्र फत्तेसिंग गायकवाड यासि आमचें वचन गेले आहे तेवढें स्थल त्याकडे ठेवावें, याप्रमाणें इंद्रसेन बोलतो राजश्री पाटीलबावा म्हणतात कीं ही गोष्ट घडावयाची नाहीं, म्हणोन लिहिलें त्यास र॥ फत्तेसिंगाची वर्तणूक तिगस्ता कसकशी जाहाली तें सविस्तर पाटीलबावाचे ध्यानात आहेच तेव्हा आमदाबादेविशीं उत्तर केले तें ठीकच केले सरकारचा गुजरात प्रातातील मुलूख इंग्रजाकडे गेला असोन तो दरोबस्त सरकारचा सरकारात इंग्रजापासून माघारा यावा असें पाटीलबावानीं करावें व करतील ही खातरजमा आहे आमदाबादची ओढ ते धरणार नाहींत परतु हैदरखानसुद्धा तोड पडून तह ठरणें हेच कठीण र॥ छ २९ जमादिलावल हे विनंति

ले ४८ } [ २८९ ] }

{ श १७०८ अधिक जेष्ठ शु
{ ता १५ ५ १७८

श्री

राजश्री नानापत स्वामीचे सेवेशीं

विनंती उपरि राजश्री पांडुरंगपताचे पत्रातील जाबसाल—

नबाबाची चाल ठीक दिसत नाहीं तुम्ही तर इंग्रजाचे मसलतीवर गुतला आहा तुम्हास पेंच न बसावा या करिता बल्हारी व गुतीच्या सुमारें दहा पधरा हजार जमाव करावा दोस्तीचे जागा सलाह जाणून लिहिले आहे म्हणून येथून हैदरखानास लिहिले आहे ते याचें उत्तर स्नेहाचे रीतीनें सुचविले उत्तम केलें असे यावे, ते एकीकडे राहून आणखीच तऱ्हेचे उत्तर आले तो मजकूर राजश्री पाटीलबावास कळवाल म्हणून येथून लिहिला होता त्याचे उत्तर आले का, महमद अली खान याचा मुलूख हैदरखानास प्राप्त जाला यामुळें मसलतीचा विचार त्याचे ध्यानात येत नाहीं, परतु नबाब भोसले इंग्रज एक झाले असता पेंच भारी बसेल हे त्याचे समजेस येत नाही तथापि आपले मसलतीस सोबती झाला आहे तेव्हा त्यास सोडून इंग्रजाशी सला करणे ठीक नाहीं हैस्तिनाकडन इद्रसेन येथे आला आहे त्याचे बोलण्याची भवता न भवता होऊन कलमबदी याद आलाहिदा पाठविली आहे त्यावरून ध्यानास येईल याप्रमाणे उत्तर झाले म्हणून लिहिले ते कळलें त्यास हैदरखान आपले मसलतीस सोबती झाला तेव्हा त्यास सोडून इंग्रजाशी सलाह करणे नाही हा येथील खबीर पक्का आहे पाटीलबावाकडून कलमबदीची याद आली त्याचीं उत्तरें आलाहिदा कलमबदी लिहून पाठविली आहेत त्यावरून कळेल +हैदरखानाची समज व चाल एक प्रकारची याचा अनभव राजश्री पाटीलबावास येईल तत्राप इंग्रजाचे मसलतीवर उपयोगा पडेल, याकरिता त्यास सोडून करता नये

या प्रांतीं उष्ण काळ भारी ग्वालेर तालुक्यात झाला लागन माणसे फार मरतात व धान्याची धारण कमी व वैरणीचा तोटा, वगैरे लिहिले तें सविस्तर कळले

सगमरवरी दगड या दिवसात चागला निघत नाही पर्जन्य काळीं काढले तसे मिळतात, याकरिता पर्जन्यकाळीं श्रीमंताचे आज्ञेप्रमाणें दीड गज लाब व गजभर रुंद अर्ध गज तीस तसू जाड याप्रमाणे पाठवून देऊ, याप्रमाणे पाटीलबावानीं सांगितलें म्हणोन लिहिलें व दुसरी बातमी लागली कीं, धारे जवळ मांडवगड किल्ला आहे तेथें पातशाही मारत सगमरवरी दगडाची आहे व दगडही मोठाले आहेत, वर लिहिल्याअन्वये तेथेंही मिळेल म्हणोन लिहिले, त्यास तेथेही शोध करवावा व तुम्ही वर लिहिल्या अन्वये पर्जन्य काळीं दगड जरूर पाठवावा सगमरवरी दगडास तिकडे उणे नाहीं लवकर पाठविल्यास येईल, परतु आमचे काम याकरितां कसें होईल पहावें

रोज छ ५ जमादिलाखर हे विनंती

---

\+ येथपासून नानाचें अक्षर

ले ३४९ }
[ २९३ ] }

{ शके १७०४ अ ज्येष्ठ शु ८
{ ता २०-५-१७८२

श्री

राजश्री नारोपंत स्वामींचे सेवेशीं

विनती उपरि तुम्ही चंद्र १४ जमादिलोवलचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं राजश्री पाटीलबावा यांचे लष्करांतून रा० पांडुरंग रघुनाथ यांचे पत्र व पुरवण्या मिळोन तीन आलीं तीं पाठविलीं आहेत, त्यावरून ध्यानांत येईल, म्हणोन लिहिलें तें कळलें त्यास पत्रें पाठविल्याप्रमाणें पावलीं त्यांचीं उत्तरें

अत्रीचे गढीवर तोफांची मारागिरी करून गढी घेतली, तेथून दुसरे दिवशीं कूच करून सालबाईचे मुक्कामीं येऊन गढीवर मारगिरी सुरू केली आहे, लौकरच जेर होईल, म्हणोन लिहिलें तें कळलें त्यास आज पावेतों गढी हस्तगत झालीच असेल पुढें होईल तें लिहून पाठवावें

पुरुषोत्तम महादेव यास देवआज्ञा झाली-याचें वर्तमान लिहिलें तें कळलें *राजश्री देवरावही दिल्लीस समयास पोहोंचले तेही कार्यांत उणें पडूं देणार नाहींत

नजफखान वारल्याचें वर्तमान †लिहिलें तें कळलें त्यास येथें वर्तमान येताच राजश्री पाटीलबावास व तुम्हास पेशजी लिहून पाठविलें आहे कीं खान वारले तेव्हां इंग्रज पातशहाकडे अनुसंधान लावून, लोभ भारी दाखवून, पातशहास हाताखालीं घालून, आगरें वगैरे जागा दाबावयास चुकणार नाहींत त्यास पाटीलबावा ग्वालेरीजवळ आहेत, तेथपर्यंत जाऊन पातशहाचें अनुसंधान दुसरीकडे न लागतां आपले हाताखालीं घातल्यास मोठीच गोष्ट आहे, व समय हाच आहे, म्हणोन विस्तारें करून पत्र पाटीलबावास लिहिलें आहे व तुम्हासही लिहिलें आहे त्यावरून कळलेंच असेल सदरहू लिहिल्या अन्वयें जरूर घडावें

+पातशहास ममतेंत घेऊन बंदोबस्त आपले लगामीं लावून घेतल्यानें मोठीच गोष्ट आहे दूर देशीनें पाहिल्यास ध्यानात येईल जरूर करावेंच करावें पैकाही तिकडे मिळेल सर्वही केल्यास घडावयाजोगें आहे पुढें ईश्वरी इच्छा रोज चंद्र ७ जमादिलाखर हे विनंति

---

ले ३५० }
[ ३४२ ] }

{ शके १७०४ अधिक जेष्ठ शु ८
{ ता २०-५-१७८२

॥ श्री ॥

राजश्री आपाजीराम स्वामींचे सेवेशीं

विनंति उपरि तुम्ही छ १९ रबिलाखरचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं हेष्टिनाकडून

---

*हें वाक्य नानाच्या हातचें आहे पुरुषोत्तम महादेव व देवराव हे हिंगणे +येथपासून नानाचे अक्षर

† मृ ३ ४ १७८२

इंग्रेजेन आला आहे त्याचे बोलणे जहालें त्यातील भाव राजश्री पाटीलबावानीं सांगितले कीं, इपटेनचे तहाप्रमाणे हल्लीं तह करावा त्यात साष्टी खेरीज करून करावा व अतरवदीचें कलम तो मुळींच नाहीं व आज पावेतों मुलूख किल्ले वगैरे सरकारचे जे घेतले आहेत ते सोडून सरकारात यावे याप्रमाणें वाकिलाचे बोलण्यात आहे व पाटीलबावाच्या बोलण्यात आहे कीं, पगडीवाल्याचा पक्ष इंग्रजानीं करू नये, व टोपीवाल्याचा पक्ष सरकारातून होणार नाहीं ऐसें इंग्रजाजवळ बोलले त्याने उत्तर केलें जे, आम्ही पगडीवाल्यापैकीं नबाब, भोंसले, हैदरखान या तिघाचा पक्ष करणार नाहीं तुम्ही महमदअली व सुजातदौलाचा लेक यांसि तुमचे विरुद्ध नसावें याप्रमाणे बोलणीं जहालीं ये विशीचा मजकूर पाटीलबावानीं लिहिला आहे, त्यावरून श्रुत होईल हैदरखानसुद्धा तहाविशीं गोष्ट अवघड पडली आहे म्हणोन विस्तारे करून लिहिलें तें सर्व कळलें त्यास साष्टी खेरीज करून इपटनचे तहाप्रमाणें तह इंग्रज करणार, त्यास इपटनचे तहापेक्षा तळेगावावरील तह जहाला आहे तो चागला आहे, व त्याची सर्व माहीतागिरी पाटीलबावास आहे त्याप्रमाणे तह जाला असता चागले त्याखेरीज मुलूख इंग्रजानीं आलीकडे घेतला आहे तो सरकारात देऊन हैदरखान सुद्धा तह करावा असेंच पाटीलबावा करून घेतील महमदअलीखान सुजातदौलाचा लेक यासि तुमचें विरुद्ध नसावें ऐसें इंग्रजाचें म्हणणे, त्यास सुजातदौलाचा लेक ते आपल्या पेट्यात घेऊन बोलतात तेव्हा सरकारचा करोडीचा मुलूख अतरवेदीचा जातो, व महमदअलीखान याचा मुलूख हैदरखानानीं घेतला आहे तो सोडवावा तेव्हा ही गोष्ट हैदरखान कशी ऐकतात ? साराश सरकारचे मुद्देमवाफक हैदरखान सुद्धा पाटीलबावानीं तह करून घ्यावा हें चागलें §इपटेनचे तहाप्रमाणें केल्यानें इतके दिवस मसलत करून खराबी काय झाली ? हैदरखान सोबती करून घेतला यात नक्षा काय राहतो ? इपटेनाप्रमाणें तर राजश्री पाटीलबावा जामगावाहून पुण्यास आले होते, तेव्हाच गाडराचें बोलणे होतें या करिता इपटेनाप्रमाणें करणें ठीक नाहीं सविस्तर राजश्री पाटीलबावाचे पत्रांचा उत्तरें व राजश्री नारो शिवदेव यांस लिहिलें आहे रवाना छ ७ जमादिलाखर बहुत काय लिहिणे, लोभ असावा हे विनति

' पौ छ ७ रजब जेष्ठमास शुद्ध नवमी सौम्यवासर सुरुसन सल्लास समानीन

---

ले ३५१ } [ २३३ ] }

{ श १७०४ अधिक ज्येष्ठ शु १३
{ ता २५-५-१७८०

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशी

विनति उपरि राजश्री पाडुरगपताचे पत्रातील जाबसाल सालबाइ गढीवर मारागिरी होत आहे, लौकरच हस्तगत होईल, म्हणोन व तोफा लागू करावयाचा मजकूर कळला देवराव हिंगणे याचीं पत्रें राजश्री पाटीलबावास आलीं कीं नजफखान मेला, प्रस्तुत तेथें

---

§येथपासून खुद्द नानांच्या हातचा मजकूर

बखेडा जाहला आहे, अशा समयास आपली स्वारी इकडे आलियास स्वल्प मेहनताने महत् लाभ घडावा असें आहे पातशहा आपले लक्षात आहे वरकड थोरलाले अमीर उमराव इच्छा करतात कीं, पाटीलबावाची स्वारी या वेळेस इकडे आल्यास मोठा उपयोग आहे नाहा तर इंग्रज इकडे प्रवेश करतील मग उपाय चालणार नाहीं याप्रमाणे सर्वांचें मानस आहे हा समय पुढे यावयाचा नाहीं म्हणोन पत्र आले ता पाटीलबावाला दाखविलीं म्हणोन लिहिले त्यास पाटीलबावाना या समयात दिल्लीस जाऊन, पातशाहा हाता खालीं घालून, बदोबस्त करावा हे येथून ही पेशजी विस्तार लिहून पाठविलेच आहे त्याप्रमाणे जरूर घडावे

चदेरीचे राजाचा बदोबस्त करून घ्यावयाकरिता पाटीलबावानीं बळवतराव धोंडदेव याजबरोबर बैरागी देऊन राजा बरोबर चदेरीस रवाना केले तेथें गेल्यानतर बळवतराव व राजधर एक जाहाले तेव्हा राजा निघोन चदेरीस गेला उभयता एक होऊन राजाचे मुल्का जवळून खडण्या घेतात राजाचा पाटीलबावास पत्रें येतात का, आपण बदोबस्त करून द्यावयाकरिता बळवतरावास दिल त्याणा आम्हास केद करावे असें केलें तेव्हा निघोन चदेरीस आलो बळवतराव लिहितात कीं राजा दगा देऊन पळून गेला, याजकरिता राजधरास अनुकूल करून घेतलें, बैरागी यास निरोप दिल्हा आता बळवतराव मात्र आपल्या फौजेनिशीं चदेरी प्रांतीं आहेत राजाचे मुलकापासून खडण्या घेतात इकडे येण्यास शिंदीच्या तळ्याचे निमित्त दाखवितात याप्रमाणे वर्तमान आहे म्हणोन लिहिले त्यास राजाचा बदोबस्त करून द्यावयाकरिता बळवतराव यास पाठविले ते व राजधर एक जाहाले तेव्हा राजा चदेरीस गेला आता राजा आपले परीं बनाऊन लिहितो व बळवतराव आपले पर्ग बनाऊन लिहितात, परतु यातील छाण पाटीलबावानीं करून करणें त करावें रा छ १ जमादिलाखर हे विनंति

---

ले २५२ }
[ २०० ] }

{ श १७०४ अधिक ज्येष्ठ वद्य १
{ ता २७-६-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशी

विनंती उपरि — तह प्रकर्णी इंद्रसेनाची भवती न भवती होऊन सरकारचे तहाचा निश्चय बोलण्यात आला, त्याचीं कलमें पांडुरंग रघुनाथ याणा लिहिलीं त्याचे जाबसाल —

| | |
|---|---|
| साष्टी व उरण खेरीज करून वसई वगैरे कोकण प्रांतीचे किल्ले व जागे जे इंग्रजानीं घेतले असतील ते सोडावे म्हणून लिहिले त्यास मुख्य मुद्दा साष्टीचा तो खेरीज करून वरकड जागे सोडतात, त्यास साष्टीसुद्धा | दरोबस्त जागे सोडवून घ्यावे हें चागलें श्रीमत राजश्री दादासाहेब यास पाटीलबावाचे स्वाधीन करावें, जोपर्यंत सुप्रवृत्तीने चालत तोपर्यंत पचवीस हजार रुपये दरमहा हपटनचे तहाप्रमाणे त्यास द्यावे, म्हणोन |

लिहिल त्यास दादासाहेबास पाटीलबावाचे विद्यमानें कुटुंबासुद्धा सरकारात हवाली करावे याप्रमाण व्हावे हें चागलें हुपटनचे तहा प्रमाणे चालावयाचें कबूल करावें सुरळीत चालल्यास चालवू

आमदाबाज सुद्धा गुजराथ प्रांतींचा मुलूख घेतला आहे तो सोडावा म्हणून लिहिलें, उत्तम आहे

हुपटनचे तहात सरकारातून लिहून दिल्हें आहे कीं तीन लक्षाचा मुलूख भडोच नजीक इग्रजास तोडून द्यावा ह कलम पाटील बावानीं उडवून देऊन सदहू मुलूख इग्रजानीं मागू नये याप्रमाणें करारात आणलें म्हणून लिहिलें तें कळलें त्यास निदानीं तीन लक्षाची जागीरही इग्रजास देऊन साष्टी, उरण सरकारात घ्यावयाचें करावे हाही एक निदान पक्ष करावा

भडोच पाटीलबावास द्यावी असा तळे गावच्या तहात इग्रजाचा करार आहे त्याप्र माणें हल्लीं द्यावी म्हणून लिहिले, उत्तम आहे

सदहूप्रमाणें जाबसाल बोलण्यात येऊन निश्चयापावेतो देखिल गोष्ट आली होती, इतक्यात कालचीं पत्रें श्रीमताचीं आलीं तेव्हा पासून मर्जी ठीक नाहीं याउपर काय ठरेल पहावें म्हणोन लिहिलें, त्यास राजश्री पाटील बावानीं इग्रजाशीं जाबसाल बळ पडेल असे चित्तात यावे ते न येता मर्जी ठीक नाहींशी झाली असो मर्जी ठीक न दाखवून सरकार काम चागलें घडत असल्यास उत्तम आहे परतु हैदरखानाचे तहाचें यात कोठेंच लिहिले नाहा हें काय ? हैदरखानाचे मुद्दे कोणते कबूल केले, काय ठरावेले, हे या लिहिण्याबराबर असावे तें काहाच लिहिले नाहीं हैदरखानसुद्धा तह जाला तर करावा, हा येथील विचार व राजश्री पाटीलबावांचाही विचार आहेच याकरिता हैदरखानाची तोडजोड कशी, त्याचे मुद्दे कोणते ठरले व हैदरखान यास कसें सागावें, कदाचित् हैदरखानास फराशीस आल्या मुळे बोढू लागले तर याचा तोड काय ? तें पुसोन लिहून पाठवावे रा। छ १४ जा।कर हे विनति

---

ले ३५ (२०२) — श १७०४ अधिक जेष्ठ व १, ता ७-७-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामाचे सेवेशी

विनति उपरि राजश्री पाडुरगपताचे पत्रातील जाबसाल –

राजश्री पाटीलबावाचे कारभाऱ्याचे खलबत झाले त्यातील आशय भाईनीं सागितला, तो आलाहिदा विनविला आहे परतु भाव तो आढळत नाहीं साराश मस लत होत नाहीं ही गोष्ट खरी सदाशिव मल्हार याशीं दोन दिवस खलबत दाट चाललें आहे चोविसावे जमादिलावलचे रोजीं दो प्रहरा इग्रजाचा कारभारी व सदा शिव मल्हार आले त्याचें चार घटका खल- बत झालें मागती सायकाळीं सदोबा आल्या वर द ह ताजी मुनशी बोलावून मागती खलबत जालें यातील आशय समजल्यावर

विनती करीन म्हणून लिहिलें त्यास खलब तातील अन्वय तुम्हास कळलाच असेल सविस्तर शोध करून लिहून पाठवावा पाटील बावाचें व कारभारी याचे खलबत झाले त्यातील आशय भाईनीं सागितला तो आला हिदा तुम्हीं लिहिला त्याचें उत्तर सविस्तर लिहून पाठविले आहे त्यावरून कळेल

पाटीलबावा एके दिवशीं म्हणू लागले का, इग्रज श्रीमत दादासाहेबास तुमचे स्वाधीन करू असें म्हणतात, याचें कसे करावें ? त्याव रून उत्तर केलें का, हा विषय आमचा नाहीं, याचे उत्तर श्रमित करतील आज्ञा होईल तर हा जाबसाल त्याजकडे लिहून पाठवितो, ते याविषयींचे उत्तर लिहितील, असें बोल लेत म्हणोन लिहिलें त्यास पाटीलबावांस मसलती करणे तेव्हा बदोबस्त राहणार नाहीं याकरिता दादासाहेबास पाटील बावानीं आपले बिद्यामानें सरकारात हवालीं करावें म्हणजे बदोबस्त चागला राहील व मागे पुढें सरकारचा शब्दही कोणावर नाहीं छ १८ जमादिलाखर हे विनती

---

ले ३५४
[ २५८ ]

श १७४ अधिक जष्ट व १
ता २७-५-१७८०

॥ श्री ॥

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशी

विनति उपरि राजश्री पाडुरग रघुनाथ याणा लिहिले का नवे जमादिलोवलचीं पत्रें बेविसावे मिनहूस सादर झालीं, त्यात श्रीमताचीं पत्रें राजश्री पाटीलबावाचे नावे चार होतीं ते पाटीलबावास प्रविष्ट केलीं व आपले नावाचा पत्रे व यादी पाहिल्या तह प्रकरणी चारी यादी पाटीलबावास दाखविल्या, व आपल्या पत्रापैकी एक थोरली पुरवणी खेरीज करून वरकड दाखविली या खेपेचीं उत्तरें तीक्ष्ण आहेत पाहून उत्तर झाले कीं, याचीं उत्तरे करू भाईच्या शरिरीं समाधान नाहीं परतु तसेच बलाऊन आणले त्यास पत्रें दाखविलीं साराष पत्रें पाहिल्यावर मर्जी ठीक दिसली नाहीं उत्तरें झाल्यावर सविस्तर विनती करीन उत्तरास दीसगत लागते म्हणोन आपण लिहिलें होतें, त्यास श्रीमताचीं पत्रें येतात त्यात भाव कसे व इकडील तर्दुद कशी हे सर्व ध्यानात आहेच उत्तरें लौकर होत नाहींत याचे अर्थ उघडेच आहेत श्रीमतानीं या पेक्षाही अधीक लिहिल्यास यदा याच्याने मसलत होत नाही हे परिछिन्न उघडे बोलतात कीं, आपण होळकर सारे निसूर बसून आम्हावर दगड टाकितात आम्ही इग्रजाच्या मसलतीचा कसाला गुदस्तपासून कसा केला हे पाहावे सारे तमाशा मात्र पहातील, व पहावा ही इच्छा आहे एखाद्या जागा मसलतीमुळें पेंचात आल्यास तिळा इतकी कुमक म्हटली तर कोणाच्यानें व्हावयाची नाहीं असो बोलून फळ काय ? ज्याचा त्याणे आपला विचार पाहून करणें तें करावे असेही विचार एकातात होतात तेव्हा अतरवेदची मसलत होण्याचा अर्थ यावरून यानास येईल तूर्त महिना पधरा दिवस या प्रांतीं घालऊन छावणीच्या दिवसात बहुत करून अवतिकेस जातील असें दिसते याजवर

न कळे म्हणून विस्तार करून लिहिले ते सविस्तर कळले त्यास पेशजी पाटीलबावास लिहिले होते कीं, इंग्रेज हेष्टिनाकडून सलुखाचे जाबसालास मुक्त्यारीनें आला आहे त्याशा हैदरखान सुद्धा सरकारचे मुद्दे मुवाफक कसकसे बोलावे येविशी लिहिले होते त्यावरून इंग्रेज मुख्य हेष्टिनानें तहाचे बोलणे बोलावयास पाठविला हा मुक्त्यार असें जाणून पाटीलबावानीं त्याशीं हैदरखान सुद्धा तहाचें बोलणे, त्याची याद, व हैदरखानाचे मुद्याची याद वगैरे यादी पाठविल्यावर मजा संतोष होऊन यादी बद्दल हैदरखान सुद्धा तहाचे बोलणें इंग्रेजाशीं घालाव व त्याप्रमाणे अमलात यावें, असे भाव लिहून सविस्तर लिहिले होतें, यात मर्जी दिक्क व्हावी असें नव्हते असो बाह्यत्कारी मर्जी दिक्क दाखविली असेल परंतु पाटीलबावा यादीच्या अन्वयें सरकारचे मुद्देमवाफक हैदरखान सुद्धा तहाचे बोलणे इंग्रेजाशा बोलून आणितील ही खातरजमा आहे हे उघड बोलून दाखवितात कीं आपण, होळकर, सारे मिळून बसून आम्हावर दगड टाकतात आम्ही इंग्रजाच्या मसलतीचा कसाला गुदस्तापासून कसा केला हें पहावे सारे तमाशा मात्र पाहताल तिळा इतका कुमक व्हावयाची नाहीं असो ज्याचा त्याणें आपला विचार पाहून करणे ते करावे असे विचार एकांतात होतात, म्हणून लिहिले त्यास गुदस्तापासून पाटीलबावावरच कसाला इंग्रजाच्या मसलतीचा पडला, परंतु तितकाही कसाला सोसून पुढे मसलत करणें ही योग्यता पाटीलबावाचीच तर होय पाटीलबावावर गुदस्तापासून मसलत पडलीच, परंतु गुदस्ता इकडे गाडर बोरघाटावर येऊन मसलत पाडली तेव्हा पल्ला जवळ, मसलत समीप पडली, तेव्हा करणें प्राप्त सरकारात पैक्याची अडचण कोणे प्रकारची, तथापि अडचणींत अडचण सोसून फौजेचा जथ पाहून इंग्रजावर मसलत केली मातबर सरदार होळकरही समयास आले इंग्रजाची व सरकारची लडाई होऊन इंग्रज शिकस्त खाऊन कोण्या तऱ्हेने माघारा गेले, त्याची पायमल्ली किती झाली, कोणे तऱ्हेने गेला, हे सविस्तर वरचेवर पत्रें लिहून गुदस्ता पाठविलींच होतीं, त्यावरुन ध्यानात आलें असेलच तेव्हा तमाशा पहातात किंवा मसलत केली हें ध्यानात येतच असेल साल मजकुरा तर तहाचेंच बोलण बोलावयास इंग्रजानें वकील पाठविला आहे त्याशा बोलणे पाटीलबावा बोलतच आहेत तेव्हा हैदरखान सुद्धां सरकारचा तह पाटीलबावा चांगलाच करतील ही खातरजमा आहे पाटीलबावा कसें करतात हा तमाशा पहावा हे इच्छा येथील नाहीं मोठीं मोठीं कामें पाटीलबावानी करावीं, सरकारचे मातबर उपयोग तेच घडत असावे, आणि पाटीलबावाचें कल्याण असावे, सरकारच्या मोठ्या मसलती होऊन पाटीलबावास यश यावें, भाऊपणात अंतर पडू नये असें घडावें, हाच संतोष मोठा आहे व याप्रमाणे पाटीलबावा करतील हा खातरजमा आहे तिकडे परावा+ मुलूख मसलत केल्यानें मनसबा होऊन पैका मिळेल असे आहे व खाली मेदान,याकरितां सुचतें तें लिहितों आपलाच आपण नाश करून घ्यावा असें ज्याचे चित्तात असेल त्याचे मनात तमाशा पहावा असें येईल तर कळेना येथील समज अशी नाहीं रा छ १४ जमादिलाखर हे विनंति

---

+ परकीयांचा

ले ३०७ } [ २८८ ] }

{ श १७०४ अधिक जेष्ठ व १ { ता २७-०-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनंती उपरि राजश्री पांडुरंगपताचे पत्रांतील जाबसाल —

सालबाईचे गढीस मोर्चे लाविले आहेत कार्याकारण तोफाची मारगिरी होत असते गढी लवकरच हस्तगत होईल तदनतर स्वारी हिंमतगडाकडे जाणार राणा ग्वालेरीस होता तो गोहदेस गेला म्हणून लिहिलें तें कळलें त्यास गढी आजपर्यंत हस्तगत झालीच असेल पुढे होईल तें लिहून पाठवावें सावध असत जावें

पेशजी महतपूरचा मजकूर येथून लिहून पाठविला होता व पुढे घालमेल करूं नये म्हणून लिहिले होते, त्याचें उत्तर पाटील बावांनी केल्याचा मजकूर पुढें घालमेल कशास करू, येथील जमीनदारानीं बोभाट सांगितले, सरकारचा माहाल खराब होतो असें जाणून केलें म्हणून लिहिलें तें कळलें

हेष्टिन काशीहून निघून कलकत्यास गेला त्यांतील आशय इंद्रसेनास ठावका असेल, याचा शोध करून लिहून पाठवावे, म्हणून येथून लिहिले होते त्याचें उत्तर लिहिलें कीं, येथे शोध केला, इंद्रसेनाच्या बोलण्यात हेष्टिन काशीच्या कार्यभागानिमित्य आला होता, तो उरकल्यावर मग कशास राहावें म्हणून माघारा गेला काशीहून लोक येतात जातात त्यांच्या बोलण्यात हैदरखानाचा ताण भारी बसल्यामुळे अतरवेदींतील सारा जमाव घेऊन माघारा गेला असें आहे इकडील मसलतीवर पाटीलबावा आहेत हे अतरवेदी खालीं पाहिली असता चाल करतील याजकरितां इंद्रसेनास सलुखाचे बोलण्यास पाठविला म्हणून लिहिले तें कळले त्यास हेष्टिन मात बरच मनसबा करायास काशीस आला होता परतु हैदरखानाचा ताण व फराशीसाचें येणें यामुळें गेला इकडील समारोप केला असें दिसते

रा छ १४ जमादिलाखर हे विनती

---

ले २५६ } [ ७२ ] }

{ श १७०४ अधिक जेष्ठ व ८ { ता ३-६-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनंतीं उपरि, राजश्री पांडुरंगपतानीं छ २७ जमादिलावलचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं वर्तमान कळलें राजश्री गोविंदराव यांणीं येथून बातमीचा मजकूर लिहिला होता तो तुम्हीं कळावयाकरितां पत्रीं लिहिला तो मजकूर अवघा लटका आहे येविषयींचीं उत्तरें सविस्तर मागाहून पाठवू रा। छ २२ जमादिलावल हे विनती

---

ले ३५७ } { श १७०४ जेष्ठ शु २
[ ७०० ] } { ता १ -७-१७८२

श्री

राजश्री नारोपंत स्वामींचे सेवेशीं

विनंती उपरि इंग्रेजाचा व सरकारचा सलूख जाला तेव्हां हैदरखानाने कराराप्रमाणें न ऐकिल्यास सरकार व इंग्रज मिळोन खानावर मसलत करावयाची त्यास नबाबास टाकतां येणार नाहीं मसलतीस मेळवून घ्यावे लागतील कारण कीं, हैदरखान फराशास व नबाब एक जाले तर मसलत भारी पडेल या करता नबाब निजाम अलीखान या मसलतींत आले तर त्यासही वाटणी द्यावी लागेल म्हणोन पेशजीं छ ११ रमजानचे रवानगींत साल गुदस्त तुम्हास पुरवणी लिहिली होती त्याचें उत्तर तुम्ही लिहिले का, राजश्री पाटीलबावानीं उत्तर केलें जे, नबाबास वाटणी देणे असें उघड इंग्रजाशीं बोलू नये, म्हणजे ते आपल्या पेंच्यात राहिले याचें उत्तर केलें कीं, नबाबाची समजूत पडणार नाहीं नबाब मसलतीस सामील झाल्यास त्याची तोड तुम्हीं व आम्ही मिळोन काढावी त्यात तिसरा हिसेदार ठरतो, यास्तव इंग्रेजाशीं बोलावें कीं, तुमचा मुलूख तुम्हीं घ्यावा आमचा आम्हीं घ्यावा हैदरखानाचा मुलूख सुटेल त्याची वाटणी फौजेवर करावी फौजेच्या अन्वयें दोन हिस्से सरकार, तिसरा हिस्सा इंग्रेज याप्रमाणे साधेल तर करून घ्यावें, असें मत आहे म्हणोन पेशजीं तुम्हीं लिहिले होते त्यास हल्लीं टिपू व फराशीस एक जहाले याचा सरजाम भारी जमला आहे नबाबाकडेही त्याचीं अनुसधानें आहेत, नबाबास टिपूमिया व फराशीस एक, जाले तर मसलत भारी पडेल, याकरिता नबाब सामील करून घ्यावे हें चागले तेव्हा वाटणी द्यावी लागेल, या करिता इंग्रसेनाशीं बोलून कसकसे ठरावात आणले आहे ते लौकर लिहून पाठवावे बोलणे जालें नसल्यास हल्लीं बोलून येविशीं ठरावात आणून लौकर लिहून पाठवावे रवाना ७ १ साबान हे विनंती तहनामे दिले घेतल्याचीं पत्रे आलियावर तुम्हाकडे पत्राच्या रवानग्या फार जाल्या जाब येत नाहींत हें ठीक नाहीं, वरचेवर उत्तरें पाठवात जावी हे विनंती

---

ले ३५८ } { श १७०४ जेष्ठ शुद्ध ९
[ ७०१ ] } { ता १९-७-१७८२

श्री

चिरंजीव राजश्री पांडुरंगपंत बापू यासि प्रति नारो शिवदेव अशीर्वाद उपरि येथील कुशल तागायत छ ८ साबान यथास्थित असे विशेष तुम्हीं पत्रें व तहाच्या यादी पाठविल्या त्यात मुद्दा मोठा साष्टी व हैदरखान त्यापैकीं साष्टी तरि होत नाहीं व हैदरखान यानीं महमद अलीचा व इंग्रजाचा मुलूख घेतला आहे तो सोडून द्यावा, त्यास त्यानें करोड रुपये खर्चून प्रांत सोडविला तो सोडतो कसा ? मसलतीवर कायमच आहे नवे फराशीस आणिले आहेत, तेव्हां इंग्रजाचें पारिपत्य पुरते करणार तीन किल्ले मात्र बाकीस राहिले असता त्यास

काहीं पेंच नाहा, राहिले तें येतच आहे गाडराकडून सरकारात वकील आला होता त्याचे बोलण्यात होते का, साष्टी सुद्धा घ्यावी, परतु हैदर नाइकाचा पक्ष सोडावा हे वर्तमान श्रीमतानीं लिहिले होते, त्याचा उत्तरे हैदरनाइकाचे पक्षाचा आलीं त्याचे जाब श्रीमतानीं लिहिले त्याजवरून मर्जी बहुत खट्टी जाहाली असें असोन बावानीं तह असा कसा केला ? साष्टी नाहा व हैदरचा तह न झाल्यास गुजरातचा तीन लक्षाचा मुलूख सुटणार नाहीं हैदरखान यांनीं घेतला मुलूक सोडावा ही गोष्ट घडावयाचीच नाहीं ते त्याचा तह होतच नाहा यामुळें हैदराचा पेच पडल्यास भारी पडेल किंवा नाहीं याचा विचार बावानीं केल्या वाचून तह केला नसेल तहाची यादी जाहाली ती इग्रजापाशीं दिली ते यादीची नक्कल चेनापट्टणचे इग्रजाकडे जाईल ते फूट पाडावयाकरिता त्यास दाखला देतील, तेव्हा त्याचा पेच सध्या पडेल असे दिसते येविशीं पत्रे श्रीमतांचीं येतात तीं तुम्हीं दाखवीत असता किंवा नाहीं हेहि समजत नाहीं असो श्रीसत्तेने घडेल तें प्रमाण सुचले ते लिहिलें आहे तुम्ही समय पाहून विनति करीत जाणें —अशेरीवर बावाकडील लोक चढून केशवराव जग न्नाथ उतरून गेले, हे वर्तमान पूर्वी लिहिलेंच आहे किल्ला नाक्याचा व भिल्ल भोंवताले बहुत, यास्तव बदोबस्त किल्ले याचा व वाटचा बदोबस्त जाहाला पाहिजे याचा विचार केला असेल तूर्त या प्रातीचे लोक ठेविले आहेत याच्याने परिणाम लागेलसा दिसत नाहा माणूस प च ग ड किल्ले तयार असावे त्यात दोन तीनशे माणूस आपले ममतेचे असल्यास चागले हें तुम्ही सुचवून उत्तर काय होईल तें लेहून पाठवावे माजी किल्लेदाराचे किरकोळ फडसे करावयाचे होते ते केले या उपरि येथून निघोन लौकरच येतों राजश्री आबाजी नाईक समागमेंच येणार, त्यांस त्याचे मातुश्रीस ज्वराची पीडा जाहाली आहे त्यास काहीं एक उतार पडल्यावर निघोन येऊ नाइकाचे तीर्थरूपही येथे भेटीस येणार त्याजकडे पालखी पाठविली आहे तेही येतील भेट होईल वरकड काहीं गुता नाहीं राजश्री दाजी पुण्यास गेले सुखरूप जाऊन जाब आला तो तुम्हाकडे पाठविलाच आहे होळकराकडील जाब-सालाची चिठ्ठी राजश्री बाजीपत मामानीं श्रीमताचे नावें आणिली ते ती त्याप्रमाणे मातुश्री अहिल्याबाईनीं ही चिठ्ठी दिली त्यात नाव आमचें लिहिले आहे त्या चिठ्या व बाईचे बोलण्याचे अन्वय व बावाचे बोलण्याचे भाव मामानीं सागितले त्याप्रमाणें श्रीमताशीं बोलले, त्याचीं उत्तरें निश्चून जाहालीं नाहींत झाल्यावर लिहून पाठवितील याप्रमाणें मातु-श्रीस बोलून पुढें उज्जनीस येऊ तुम्हास स्वाराविषयीं लिहिलें आहे त्याप्रमाणें पाठवून द्यावे बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद

---

ले ३५९ }
[ ३२७ ]}

{ श १७०४ आषाढ व १४
{ ता ८-८-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशी

विनति उपरि राजश्री पाटीलबावानीं इग्रसेनाशी तहप्रकरणीचे जाबसाल करार मदा—

रात आणिले त्याचा कलम बदी याद ठरविली त्या यादाचा नकल श्रीमताकडे पाठवावयास दिली ता याद पारशी व तिची हिंदवा करून दोन्ही यादा पाठविल्या आहेत त्या वरून सर्व भाव ध्यानास येतील या करता त्याचीं उत्तरें दूरदेशींचे विचारें करून लिहिण्यांत यावीं म्हणोन विस्तारें करून लिहिले तें सर्व कळलें त्यास दोन्ही यादी पाहिल्या मजकूर सर्व कलमवार ध्यानात आला साराश कोणेही प्रकारें सरकार काम होऊन पाटीलबावांस येश यावें यास्तव निदान पक्षाची तोडजोड लिहून पेशजी यादी पाठविल्याच आहेत त्या पाहून सर्व समजण्यात आलेंच असेल व हल्लीं तह प्रकर्णीची याद पाहून उत्तरे कलम बदी लिहून पेशजीच्या अन्वये पाठविलीं आहेत याप्रमाणे बोलून करारात आणावे पाटीलबावाच्या पत्राचीं उत्तरें लिहिला आहेत प्रविष्ट करावीं +या तहनाम्यात दिकती फार आहेत याचे विस्तार कलमवार पूर्वी लिहून पाठविले आहेत, ते पाटीलबावाशीं बोलिल्यास त्याचे ही चित्तात यावया जोग्या आहेत ऐकल्यावर उत्तर काय करतात ते लिहून पाठवावें रवाना छ २० माबान हे विनंति

---

ले ३ ० [ ०५ ]

श १७ आषाढ व ४
ता ८-८-१ ८०

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनति उपरि राजश्री पाडुरगपत यानीं लिहिलें जे राजश्री पाटीलबावानीं सागितले कीं,

श्रीमत राजश्री दादासाहेब यास पाटीलबावाचे स्वाधीन करू असे कलमबदींत लिहिले नाहीं परतु इग्रसेनाच्या बोलण्यात करार आहे कीं कलमबदीचे यादींत दादा साहेबाचे कलम लिहिलें आहे त्या मुदतीस युक्तीचे वाटेनें तुमचे स्वाधीन करू म्हणोन लिहिले त्यास इग्रजाच्या या बोलण्यावर जाऊ नये ते दगाबाज आहेत या करितां दादा साहेबांस अगोदर आपले हातीं घ्यावें अथवा कचेश्वरास आणून पोंहचवून यावें येविशींचा मजकूर पेशजीं लिहिला आहे व हल्लींही कलमबदीच्या उत्तरावर आलाहिदा लिहिला आहे याप्रमाणें घडावा

कलमबदीचे यादींत हैदरखानाचे कलम लिहिलें आहे त्याप्रमाणें घडल्यास उत्तम कदाचित हैदरखान तुमच्या सांगितल्यावर नच ऐके तर भडोच नजीक तीन लक्षाचा मुलूख हपटनचे तहात सरकारातून इग्रजास लिहून दिल्हा होता तो हल्लाच्या तहात इग्रजापासून माघारा सरकारात घ्यावयाचें ठरविले आहे तो मुलूख तीन लक्षाचा माघारा मागू नये वरकड लिहिल्याप्रमाणें सरकारचा तह करावा हैदरखानाशीं आम्ही परभारां समजून घेऊ असेंही इग्रसेनाच्या बोलण्यांत आहे म्हणोन लिहिलें त्यास हैदरखानाचे मुद्दे इग्रज कबूल करते तर मुलूख इग्रजास

---

+नानाच्या हातचा मजकूर.

द्यावा लागता, हैदरखानाचे मुद्दे इग्रजानीं कबूल करणे हें घडत नाही त्यापक्षा हैदरखान तरी कसे ऐकताल हे समजलेंच आहे त्याअर्थी सरकारचा मुलुख तरा कां गमवा ? हैदरखानाचे बोलण्यास या मुल्काचा सबध लागत नाहा

रा॥ छ २७ साबान हे विनती

---

ले . १ }
[ . ] }

{श १७०४ आषाढ व ४
{ता॥ ८-८-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनती उपरि राजश्री पांडुरग रघुनाथ याणी लिहिलें जे राजश्री पाटीलबावानीं सागितले कीं इग्रजाच्या तहाचा ठराव न जहाला तर सलुखाची भानगड तुटताच बगाल्याकडे फौजेची रवानगी होऊन बगाल्यांत हगाम सुरू होय अशी तर्तूद जाहला पाहिजे. विना इग्रज जरबेंत येत नाहीं सुचलें ते सागितले आहे असे बोलले म्हणोन लिहिलें त्यास इग्रजास ताण देऊन जरबेत आणावे ही मुख्य गोष्ट, परतु पूर्वी इग्रजांचे मसलतीचा नक्षा ठरला त्याप्रमाणे चोहींकडून ताण बसता म्हणजे इग्रज जरबेंत येऊन म्हटलें तसें ऐकता परंतु ती गोष्ट घडला नाहीं मसलत पडता सरकार व हैदरखान उभयतांवर पडली तथापि इग्रज नरम पडून चोहींकडून सलुखाची भानगड पाडली परतु सरकारचे मुखत्यार पाटीलबावा त्याशीं बोलावयास मुख्य कलकत्याहून हेष्टिनाकडून इग्रसेन मुखत्यार आला त्याशीं पाटीलबावानीं सरकारचे मुद्दे मवाफक हैदरखान सुद्धा तहाचे बोलावे म्हणोन येथून विस्तारें करून लिहून पत्रे वरचेवर लिहित गेलों गाडराकडून उदिष्टीन येथें बोलू लागला, त्याचे बोलण्यापेक्षा पाटीलबावा जवळ अधीक होईल हें जाणून त्यास निरोप देऊन पाटीलबावानींच मुद्दे माफक तह करावा, पाटीलबावास यश यावें, आणि सरकार काम मातबर घडावें, म्हणोन लिहिलें होते त्यास पाटीलबावावाकडून इग्रजाच्या तहाच्या बोलण्याची भवती न भवती होऊन कमलबदीच्या यादी आल्या, यात पहाता हपटेनच्या तहा पेक्षाही काहीं कल्मात नुकसान दिसते याकरिता तह प्रकरणीं यादी पैकीं निदानपक्ष लिहून पेशजी यादी पाठविल्या आहेत व हल्लीं ही लिहिले आहे याप्रमाणें घडावें, म्हणजे सरकार काम होइल व पाटीलबावास यश येईल रा॥ छ २७ साबान हे विनता

---

ले २६९ }
[ २७१ ] }

{श १७०४ आषाढ व ४
{ता॥ ८-८-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनति उपरि राजश्री पाडुरगपतानीं लिहिलें का, राजश्री पाटीलबावाच्या सागितल्या-

---

उदिष्टिन=Watherstone

प्रमाणें इम्रजाच्या तहप्रकरणींची पुरवणी व दिल्लीकडील मजकुराची पुरवणी श्रीमत दादासाहे-बाचे व तिही लक्षाचे मुलखाचें कलम लिहिलें आहे ती पुरवणी व बगाल्याचे मसलती विषयींची पुरवणी एकून चार पुरवण्या लिहिल्या आहेत त्याचा उत्तरें येतील ( तीं ) पाटीलबावास दाखवावीं लागतील, याकरिता दाखविण्यास उपयोगी पडत अशीं उत्तरे यावा म्हणून लिहिलें आहे, त्यास या चहू पुरवण्याचीं उत्तरें दाखवावयाजोगींच येथून लिहिलीं आहेत दाखवावीं रा। छ २७ माबान हे विनती

---

ले ३६२ }
[ २५ ]

{ शके १७०४ श्रावण शु २
{ ता ११ ८-१७८

॥ श्री ॥

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशी

विनंति उपरि पाडुरगपताचे पत्रातील जाबसाल कलमबदीच्या यादा पाठविल्यांत भडोजेचा मजकुर नाहीं त्यावरून आशका येईल तर सरकारचा इग्रजाचा तह झाल्यास भडो-च पाटीलबावास द्यावी याप्रमाणें इद्रसेनाने वेगळें पाटीलबावांस लिहून दिली आहे हे पाटीलबावांनींच सागितलें म्हणोन लिहिलें ते कळलें त्यास भडोजेचा जाबसाल वेगळाला लिहून घेतला, असाच तह समयीं साष्टीचा ही जाबसाल उगवून घ्यावयाचा होता पेशजी रामजा पाटलाकडे यादी आली ती त्याणीं आणून दाखविला त्यात भडोजेचा जाबसाल काहीं नव्हता याकरिता पेशजी लिहिलें होतें का, साष्टीकरिता पाटीलबावानीं भडोजेचा जाबसाल उगवून घेतला नसेल असो हल्लीं निदानपक्षीं लिहिल्याप्रमाणे घडावे म्हणजे चागलें हल्ली तुमच्या लिहिण्यात भडोजेचा जाबसाल उगवून घेतला म्हणून आहे उत्तम आहे येथील विचार आढळतो जे, कलबदीच्या यादीवरून श्रीमतास विचार पडून आमच्या साधनास लागतील त्या काळीं आपण जसे म्हणू तसें घेऊन मुख्य इग्रजाचा तह आपले हातून घाडावा हा मनोदय आहे, याकरिता याप्रमा-णे श्रीमतास कर्तव्य असल्यास मग यश दुस रीकडे कशास यावे ? म्हणोन लिहिलें त्यास इग्रजाशीं तह करावा हा मनोदय येथीलही आहे परतु तहाचीं कलमे चागलीं सरकार उपयोगीं मुद्दे माफक अशीं तर उगवून घेतलीं पाहिजेत किंवा नाहा इग्रज बोलतो ते आपला नफा पाहून बोलतो त्या अनवये कबूल केले असता हपटनच्याही तहास नुकसानी मग तळेगावचा तह कोणीकडे ? याकरिता पेशजी लिहिल्याप्रमाणें व हल्लीं निदान पक्ष लिहिल्या-प्रमाणे होत असल्यास उत्तम मग कसेंही करून तोड काढण्यास येईल याकरिता याप्रमाणें घडल्यास बरे

सविस्तर अर्थ पेशजी लिहिलेच आहेत व हल्लीं लिहिले आहेत ध्यानात आणून ज्यात त्याच्या लौकिकास चागले व सरकारचे मुद्देमाफक तेंच घडवितील तुम्हीं सविस्तर बोलावें रा। १ रमजान हे विनंति

---

ले ३६४ } [ २०७ ] }

{ श १७०४ श्रावण शु १ { ता ११-८-१७८२

॥ श्री ॥

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशी

विनता उपरि राजश्री पाडुरग पताचे पत्रातील जाबसाल —

राजश्री पाटीलबावा उचपाड परगण्यात येऊन गढ्या सोडवितात पाच सहा गढ्या सोडऊन शिवाजी पत बापूचे हवाला केल्या आणखा पाच सहा आहेत त्या सोडविल्या नतर मग दुसरीकडे जातील स्वारी हिंमतगडा कडे जाणार म्हणून लिहिले तें कळले

बरवामागराचा मजकूर लिहिला तो सविस्तर कळला

पूर्वीचे खानगींत दादासाहेब व हैदरखान याचीं कलमें दोन लिहिलीं आहेत परतु आलीकडे बारिक मनास आणिता दादासाहेबाचें कलम लिहिल्याप्रमाणें इद्रसेनाच्या बोलण्यात आहे, हैदरखानाचा जाबसाल लिहिल्याप्रमाणें बोलण्यात नाहीं, व कलमबदीत हैदरखानाचे कलम लिहिलें आहे त्याप्रमाणें खचित आहे असे असता पाटीलबावा काय समजोन बोलले त्याचे ते जाणत परतु जाबसाल ध्यानांत असावा म्हणोन लिहिलें तें कळलें त्यास जसें दादासाहेबाचा जाबसाल इद्रसेनाशीं करार करून घेतला तेव्हाच तुम्हापाशीं बोलले असतील परतु दोहीं कलमाचे अर्थ पहाता नुकसानीच आहे आधीं दादा आपले स्वाधीन करून घ्यावे तेव्हा तहाचें पक्कें ठरावें हें जालें नाहीं व हैदरखानाचें कलम तर काहींच उगवून घेतलें नाहीं रवाना छ १ रमजान हे विनती

---

ले ३६५ } [ २११ ] }

{ श १७०४ श्रावण शु १३ { ता २१-८-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनति उपर इग्रजाचा तह हैदरखान सुद्धा खातरजमा व्हावें असें मनात्त होतें यात लौकिक चागला ते नाहीं त्यापक्षीं सरकारचे मुद्दे साष्टी आदीकरून तरी व्हावे तेंही नाहीं तेव्हा निदानपक्षाचीं कलमे लिहून पत्र लिहिलें आहे याप्रमाणें तरी खामखा घडावें तुम्हीं राजश्री पाटीलबावाशीं एकातीं बोलावें कीं इग्रजाचा तह आपले हातें होतो ही गोष्ट लहान नाहीं यात कस्त करून सरकारचीं कलमें जितकीं अधिक साधतील तीं साधावी, हा लौकिक मोठा आहे पाटीलबावाही दूरदेशही आहेत त्याचेही ध्यानात यावया जोगा कलमें आहेत या उपर त्याचेही थोरपणास व श्रीमताचे दौलतेस उपयोगी तें करतील रा छ ११ रमजान हे विनति

---

हें सर्व पत्र खुद्द नानाच्या हातचें आहे

ले ३६६ } { श १७०४ श्रावण शु १३
[ २७८ ] } { ता २१-८-१७८२

श्री

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशी

विनंती उपरि हैदरखानाम्न टाकून तह केला असता खान वाईट मानून उगाच राहणार नाहीं तेव्हा सरकारातून इंग्रजास मिळून मसलत करणे प्राप्त याचा करार इंग्रज गुदस्ता भोसल्याचे विद्यमाने बोलत होते कीं, सरकारचा तह करून खानावर मसलत करावी जो मुलूख व किल्ले सुटतील त्यापैकीं निमे सरकार व निमे इंग्रज याणीं घ्यावे, त्यात सरकार तालुक्यास लागतें ते सरकारात घ्यावे, इंग्रजास लागते ते इंग्रजास घ्यावे असे बोलत होते त्यास तें येथून ऐकिलें नाहीं हल्लीं करारात आणावयाचे राजश्री पाटीलबावाचे विचारे जाल्यास या मसलतीस निजामअलीखानास टाकिता येणार नाहीं कारण हैदरखान व फरासीस [ व ] नबाब एक होतील मसलत भारी पडेल याकरिता जर निजामअली खान यात आले तर त्यासही वाटणी द्यावी लागेल जर नबाब मसलतीस षराक न झाले तर घाटावरील तालुका श्रीरंगपट्टण, बिदनूर वगैरे सरकरात घ्यावे घाटाखालील तालुका कुटावर खेरीज करून इंग्रजानीं घ्यावे हैदरखानाचे पारिपत्य सरकार व इंग्रज मिळोन करावे हा मजकूर पुढील ममलतीचा लिहिला आहे रा छ ११ रमजान हे विनंती

---

ले ३६७ } { श १७०४ श्रावण शु १४
[ २३२ ] } { ता २२-८-१७८२

श्री

राजश्री नारोपंत स्वामींचे सेवेशीं

विनंति उपरि सरकारातून तह इंग्रजाशीं नबाबास व भोसल्यास न कळविता केल्यास दोघेही उदास राहून वाकब्याही चाली धरतील व तसाच मनसुबा पडल्यास हैदरखान व नबाबही एक व्हावयास चुकणार नाहींत व कित्येक गोष्टीस वाईट पडेल कदाचित् पाटीलबावा म्हणतील कीं, दोघाचेही विचारे नक्षा ठरला असता एक तर पैका घेऊन माघारे आले एक घरींच स्वस्थ राहिले मसलतीस षरीक असते तर त्यास घेऊन करावं तें नाहीं मसलत सरकारावरच पडली तेव्हा सरकारातून तह केल्यास वाईट त्यानीं का मानावें ? त्यास एक गोष्ट त्यांस बोलण्यास आहे कीं इंग्रज आम्हाशीं बहुत नफे बोलत होते, परंतु आम्हीं श्रीमंताचे दोस्तीकारिता कबूल केले नाहींत, व आंतून बातम्याही मनास आणिता इंग्रज नबाबाशीं बहुता रीतीनें बोलत होते, परंतु श्रीमंताच्या दोस्ती करता इंग्रजाशीं गुंतले नाहींत असेंच आहे यास्तव परभारेंच सलूख केला असता वाईट मानतील असें आहे घेऊन केलें असता उपयोगी पडेल इंग्रजाचा तह करण्यास हैदरखान तुटतो याकरिता नबाबाचे मक्त्याचे रुपये दरसाल इंग्रजाकडे यावयाचा करार आहे व इंग्रेजही देत असतात, परंतु आपण तहनाम्यात कलम ल्याहावें कीं, नबाबाचा मक्ता दरसाल तुम्हाकडे करार आहे त्या

प्रमाणें देत जावा तसेंच भोसल्याचीहा चौथ बगाल्याची देत जावा याप्रमाण तहनम्यात इग्रजाशीं बोलून जरूर ल्याहावें येणे करून नबाबास व भोसल्यास गोड वाटेल यात इग्रजाचेंही काहीं जात नाहीं राजकारणास उपयोगीं पडेल रा छ १२ रमजान हे विनति

---

ले ३६८ } [ ३१४ ] { श १७०४ श्रावण शु १४ ता २-८-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनता उपरि मौजे वेळास हा गाव आमचा वतना आहे तो इग्रजाकडे कोकणात बाणकोटा खालीं आहे तो सोडून घ्यावा असे मनात होतें, परतु साथ सरकारची सुटली नसता आपला गाव सोडून घ्यावा हे ठीक नाहीं तुम्हास कळावे म्हणोन लिहिले आहे रवाना छ १२ रमजान हे विनति

---

ले ३६९ } [ २६५ ] { शके १७०४ श्रावण शु १४ ता २-८-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशी

विनता उपरि हैदरखानाशीं वचनाप्रमाणें होऊन करार मदार जाहले त्यास टाकून आपले मुद्दे मात्र करून घेऊन तह इग्रजाशीं करावा, तेव्हा हैदरखान याचे विरुद्ध सरकाराशीं पडेलच फराशिसाचे पात्शाहाकडून मुसामूतीण वकील येथें आला आहे त्याशीं दारमदाराचीं कलमें ठरावात आलीं त्याच्याही नकला पूर्वी पाठविल्या आहेत, त्यास तह इग्रजाचा केला असता तेही विरोधच मानतील इतकेही करून इग्रजाचा तह करावा तर सरकारचेही मुद्दे खातरखा कोठे होतात ? तेंही नाहीं, व इग्रज तह करतील त्याप्रमाणे चालवितील, हाही भरवसा येत नाहीं असे पेंच आहेत त्यास हैदरखानास सोडावें, त्याचें विरुद्ध करून घ्यावें, फराशिसाचे राजकारण तोडावें, तेव्हा सरकारचे मुद्दे निदान पक्ष कलमवार पत्रोत्तरीं लिहिले आहेत त्याप्रमाणे तरी घडावे फराशिसाचाही भारी सरजाम मुसाभुसी सरदार या बरोबर देऊन त्याचे पातशाहानें इकडे रवाना केला तो मोरस बदरास आला पुढे लौकरच येणार म्हणोन बातम्या आल्या आहेत ते व हैदरखान एक होतील तेव्हा इग्रजास मसलत सभाळणें कठीण पडेल याकरिता इग्रजानीं सरकारचे मुद्दे ऐकून तह केला असता सरकार व इग्रज व नबाब भोसले यास घेऊन त्या मसलतीचें धोरण एव्हा पासून बाधिलें पाहिजे, याचाही विचार केल्यानें बरें आहे नाहीं तर खान व फराशिस एक जाहले असतां सर्वांस पेंच पडेल गत एक करू जाता दिवसगत लागेल, याकरिता हाही मजकूर इग्रजाशीं बोलून ठेवावा कीं तुमचा तह झाल्यामुळें हैदरखानानें आम्हाशीं विरुद्ध केल्यास तुम्ही आम्ही मिळोन खानाचे पारपत्य करावें फराशीस हैदरखान मिळोन एक जाहले असताही करावे याचा तपशील आलाहिदा लिहिला आहे रा छ १२ रमजान हे विनति

ले ३७० [२५८]

श १७०४ श्रावण शु १४
ता २२-८-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशी

विनती उपरि राजश्री पाटीलबाबाचे व इग्रसेनाचे बोलणें तह प्रकरणीं होऊन ठराव जहाला त्यातील साराश प्रथम पाडुरगपतानीं लिहिला, त्यावर रामजी पाटील यांजकडे याद आली त्याचे कलमात गुण दोष येतात ते भाव लिहून उत्तरे पेशजीच गेलीं, तदुपरात पाटीलबाबानींच तह प्रकरणीं दोन यादी हिंदवी व पारसी पाठविल्या त्याचींही उत्तरें पेशजीच पाठविलीं, व हल्लींही निदान पक्षाचीं कलमे शेवटील तोडजोडीचीं लिहून पत्रे पाठविलीं आहेत याप्रमाणें तर घडावेंच घडाव याउपरि येथें लिहून पाठवून उत्तर जाण्यास दिवसगत लागते इग्रजाची मसलत शेवटास जाऊन पुढील मसलतींचे डौल धरावयाचे धोरवट एव्हापासून घडले पाहिजेत, या करता येथे लिहिल्या तोडजोडीप्रमाणें घडविलें असता चागलें व पाटीलबाबा मातबर सरदार त्याणीं सरकारचा तह इग्रजाशीं पक्का केला हाही त्यांचा नक्षा मोठा होतो सर्व भाव हे पाटीलबाबाचे ध्यानात येण्याजोगे आहेत साराश इग्रजाचा तह पक्का करावा तह जाला असता हैदरखान यास बाईट बाटोन वाकडी चाल धरल्यास त्याचेही पारपत्यास इग्रजानीं षरीक असावे हें आधीं शपथपुर सर पक्कें करून घ्यावे सदहुं लिहिल्या तोडजोडी इग्रजासही भारी पडावयाजोग्या नाहात त्याणेंही कबूल कराव्या व पाटीलबाबानीं इग्रजाकडून कबूल करवाव्या तुम्ही पाटीलबाबाकडे जाणार ते पोहोंचलाच असाल नसले तरी पत्रदर्शनीं लाब लाब मजली करून दोन तीन पर्याय लिहिले आहेत हे सविस्तर एकातीं चागले रीतीनें बोलून करावे रामजी पाटील व सदाशिवपत याची रवानगी करतों म्हणोन पूर्वीं पत्रें पाठविलीं होतीं, परतु त्यास येथें पोंचावयास दसरा येईल, तदनतर उत्तर प्रत्युत्तरें येण्यास व जाण्यास दिवसगत लागते, मसलतीचे धोरवट पुढील बांधण्यास दिवस रहात नाहींत, याकरिता सर्व अर्थीं खोलून लिहिले आहेत तहाचा ठराव होताच अगोदर दादासाहेब यास कुटुबसुद्धा इग्रजानीं आणून द्यावे मग किल्ले, कोट, व मुलूख याच्या चिठ्ठया घ्याव्या, नाहीं तर अगोदर किल्लयाकोटाच्या सनदा घेऊ नयेत किल्ले, कोट, शहरें व मुलूख सरकारात देतील, जाहिराणा शौबरेत सलुखाची जहाली, मग दादासाहेबाविशीं बाहाणे लावितील, नाना प्रकार करतील इकडे हैदरखानही सुधे रहात नाहींत मग पेच पडेल हें पुरतें ध्यानात आणून दादासाहेबास अगोदर आणवून ठेवावें मग ठाण्याच्या चिठ्ठया घ्याव्या हपटेनचे तह समयीं इग्रजांनीं दादासाहेबाचा करार केला, अगोदर ठाणीं मुलूख घ्यावीं, मग दादाही कराराप्रमाणे येतील, त्यावरून मुलुख व ठाणीं घेतलीं, मग दादाचे येण्यास नाना प्रकारच्या दिक्कती लाविल्या कीं, मुबईकर लबाडी करतात मुबईकर म्हणत कीं, कलकत्तेकर करतात असें करून दादास ठेवून पुढे तळेगावची मसलत केली या करता लिहिलें आहे दादासाहेब कुटुबा सुद्धा आले व ठाणी किल्ले आल्यावर मग इग्रसेनाचें येणें श्रीमतांपाशीं घडावें, येणेकरून चांगलें पूर्वी राजश्री पाटीलबावांचेही लिहिण्यात

होते कीं, इद्रसेनास पुण्यास पाठवावयाचें असल्यास पाठवू तो आल्यानें जाहिराप्यास चागलें लिहिल्याप्रमाणें तुम्ही बोलून करावें याउपर तह प्रकरणीं लिहिण्याचा अर्थ काहीं राहिला नाहीं सर्व भार पाटीलबावावर ठेविला आहे त्याचे थोरपणास येऊन जेथवर कलमें साधतील तें साधून ज्यात चागले तें करावें करतील तुम्ही लिहिल्या अन्वयें सर्वही अर्थ एकातीं चागलें रीतीनें बोलावे रवाना छ १२ रमजान हे विनती

---

ले ३७१
[ २५३ ]

श १७०४ श्रावण शु १४
ता २२-८-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

बिनति उपरि, नबाब व भोसल्यास कसें कळविणार, कसें करणार, हें काहीं लिहिलें नाहीं असें पाटीलबावा म्हणतील, तर याची तोड योजिली आहे कीं, इग्रजाशीं तह पाटीलबावानीं पक्का गुप्त करून येथें लिहून पाठवावें, आणि त्या यादीची नकल येथून एक नबाबाकडे व एक भोसल्याकडे लिहून पाठवून पत्रे येथून ल्याहावीं का, इद्रसेन पाटीलबावाकडे आला, तो सरकारचे मुद्दे याप्रमाणें बोलतो यांचें उत्तर काय ल्याहावें, कदाचित् म्हणाले× कीं पाहून आमचे हातून केल्यास नफा अधिक करून देऊ, तर त्याची मुदत महिन्या दीडामहिन्यात काय अधिक नफा करून देतात, असें तेथें वकील असतील त्याणीं ++धावी इद्रसेनानें कौल करार येथें केला असता याहून मुद्दे त्याचे विद्यमानें इग्रजानीं अधिक करणें हे गोष्ट कळतच आहे तेव्हा याहून अधीक होत नाहीं असें सागतील मग केल्यास त्यास सतोष राहून केलें असे होईल ही एक तोड कळावयाकरिता लिहिली आहे रा छ १२ रमजान हें विनति

---

ले ३७२
[ २६८ ]

श १७०४ श्रावण व ८
ता ३१-८-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशी

विनति उपरि इद्रसेनाशीं तह प्रकरणींचीं बोलणीं होऊन राजश्री पाटीलबावाकडून याद आली त्याचीं उत्तरें गुणदोषाची एक पुरवणी, व एक तहनाम्यात कलमें लिहावयाचीं एक, एकूण दोन पुरवण्या व आणखी मजकुराच्या पुरवण्या लिहून छ २१ रमजानीं रवानगी केली त्यात तहनाम्यात लिहावयाच्या कलमाच्या पुरवणींत गायकवाडानीं पेशजीप्रमाणें सरकारात चालावें, न चालल्यास त्यांचा बदोबस्त होणें तो सरकारातून होईल, हें कलम

× भोंसले किंवा नबाब याणीं असें म्हटल्यास

+ येथें काहीं अक्षरें गेलीं आहेत

दुबारा लिहिण्यात आले आहे त्यास एके ठिकाणी रफुकाचें +कलम असावें आणि त्याचें उत्तर त्या कलमावर असावें कीं, रफुकाचे कलम आलाहिदा लिहिलें आहे हें कलम असावे. म्हणजे तहनाम्याचे यादीस सत्रा कलमास ताळा पडतो त्यास हें कलम राहून गायकवाडाचेंच दुबारा पडलें आहे त्यास तुम्ही तेथें पत्रें पाहिल्यावर पाटीलबावाशीं सदर्हू लिहिल्या अनवयेंच समजावून बोलावें रा छ २१ रमजान हे विनती रामजी पाटील व सदाशिव पत याची रवानगी करणार होतों, त्यास रायाजी पाटील व सदाशिवपत याची रवानगी करावी, रामजीपाटील येथें असावे, असें त्याचे विचारे ठरले तह प्रकरणीं निश्चयाचे प्रकार तुम्हास लिहून पाठविलेच आहेत होईल तेथवर करून करावें त्यात अगोदर दादासाहेब यांस स्वाधीन करून घ्यावे हे जरूर घडावें वरकड होळकर सबधी वगैरे मजकूर सविस्तर उभयताबराबर सागोन पाठवितों यास जाण्यास उशीर लागला, याकरिता तह प्रकरणीं पत्रें लिहून तुम्हाकडे रवाना केलीं, हा मजकूर यास येथें कबू दिला नाहीं याजवळही तुम्हास लिहिल्याप्रमाणे कलमें बोलिलों रायाजीपाटील याणीं कबूल केलें आहे कीं, वास कलमाचे यादीप्रमाणें पाटीलबावाशीं बोलून अधिकउणीं अक्षरें कलमात घालावयाचीं कलमें दहा आहेत, तीं तर करून घेऊ म्हणोन बोलिले आहेत परतु यास दिसगत लागेल याकरिता पुढें लिहून पाठविलें हे विनती

---

ले ३७३ } { श १७०४ श्रावण
[ २०६ } { आगस्ट १७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि इग्रजाचे तह करण्याची कलमबदीची याद पूर्वी राजश्री पाटीलबावाकडून पारशी व हिंदवी आली, त्याचीं उत्तरें व निदान पक्षाचीं कलमे सरकारचे तहाचीं लिहून पत्रें पूर्वी तुम्हाकडे पाठविलीं ती पावलींच असतील सरकारचा तह इग्रजाशीं पाटीलबावाचे विद्यमानें जाहाला हे शोहरत इग्रजानीं हैदरखानास कळविली, व पाटीलबावाचे लष्करची ही बातमी खानास गेली त्यावरून खान इग्रजाचे गळीं पडून सलूख करून इकडे चाल धरणार म्हणोन बातम्या आल्या जर खान व इग्रज एक जाहाले तर फारच विलग पडेल याकारिता इग्रजाकडील यकत्यारी इद्रसेन आला आहे, हीं कलमें व्हावयाजोगीं व इग्रजासही फार अवघड पडायाजोगीं नाहींत, या कारिता तहाचा कलमें येथून लिहून पाठविला आहेत त्यात जेथवर साधतील तेथवर करून घ्यावा पाटीलबावास सर्व काळजी आहे इतकेंही बोलत असता इग्रज नच ऐकेल तर पाटीलबावानीं तह ठराविला आहे त्याप्रमाणें श्रीमत राजश्री दादासाहेबांस क्षेपानिक्षेप लौकर घ्यावयाचें करावें, व हैदरखानानें सरकाराशीं विरोध केला असतां इग्रजानी अनुकूल होऊन खानाचें पारपत्य करावें व इग्रजानीं परभारा सलूख

---

\+ रफूक-रफाकत=स्नेह

हैदरखानाशीं करू नये हा पक्का करार दस्तऐवजीं घ्यावा, व पादशाहाचें कलम लिहिले आहे तें तिन्ही चागलीं उगवून घ्यावीं +वरकड कलमापैकीं जेथवर साधेल तेथवर साधून घेऊन तह करावा सर्व दौलतेचा भार राजश्री पाटीलबावावर आहे पुढें मागें दोष न पडे असें पाहून करावें या उपर विलब लाऊ नये रा रमजान हे विनती

---

ले ३७४ [ २७९ ] } { श १७०४ श्रावण व १४ ता ६-९-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि हरिपत तात्या यांचे निखाल्सीविषयीच्या बोलण्याचा प्रकार चालला आहे निश्चयात येईल त्याप्रमाणें लिहून पाठवीन साराश स्वामीचे व्यतिरिक्त हें होणार नाहींतसे दिसतें, म्हणून लिहिलें, त्यास सर्वही निखालसतेचे विषय तुम्हाबरोबर सागून पाठविले असता अद्यापिही तुमचे लिहिण्यात दिसते म्हणून लिहिता त्यास उत्तम रीतीनें स्वच्छता होय तें लवकर करून लिहून पाठविणें स्वच्छतेनें कामे होतात, सदेहानें नास यास्तव गेल्या गोष्टी गुदस्त असता सर्वांनीं एकच स्वच्छता परस्परें व्हावी हें चागलें रा छ २७ रमजान हे विनती

---

ले ३७५ [ २९० ] } { श १७० आश्विन शु ३ ता ९-१०-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि सरकारचा व इग्रजाचा तह झाला फराशिसाचे वकिलाशीं राजकारण राखावें कीं तोडावें म्हणून आज्ञा, त्यावरून आज्ञेप्रमाणें राजश्री पाटीलबावाशी बोललों उत्तर झालें कीं वकिलास निरोप देऊ नये, उगाच नाद राखून ठेवावा, एरवीं फराशिसापासून या मागें सरकार उपयोग आजपावेतों कोणता पडला का पुढें पडणार ? तथापि नाद राखावा या अन्वयें उत्तर जालें, या प्रमाणें पाटीलबावाचेंच पत्र घेऊन पाठविलें आहे म्हणून लिहिलें तें कळले त्यास फराशिसाचे वकिलास निरोप देऊ नये, नाद राखून ठेवावा, असें राजश्री पाटीलबावा बोलले ही गोष्ट चागली आहे त्यास निरोप देत नाहीं पाटीलबावानीं दूर-देशीचे विचार मनात आणून सागितले बरें आहे रा छ १ जिलकाद हे विनती

---

+ येथपासून अक्षर नानाचें आहे

ले ३७६ }
[ ३१० ] }

{ श १७०४ आश्विन शु ६
{ ता १२-१०-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनती उपरि मौजे जलालपूर भामोरे येथिल पाटीलकी मुधोजी भोंसले याची व सावलीगड तालुका येविषयींचीं ताकीद पत्रें पाठवावीं या विषयींची आज्ञा, त्यास आज्ञेप्रमाणें राजश्री पाटीलबावास सागितलें व बोललों त्यास सावलीगडाविषयीं पत्रें भोंसले यांकडील वकील येथें आहेत त्याणीं मागितलीं त्याप्रमाणें दिलीं जलालपूर भामोरे यांस भोख गावीं पचाईत नेमून द्यावी जिकडील जमीन ठरेल तिकडे द्यावी या अन्वयें बाळाजी जनार्दन जामगावकर यास पत्र दिले ते पाठविलें आहे म्हणून लिहिले तें कळलें त्यास सावलीगडाविषयी भोंसल्याचे वकिलानीं पत्रें मागितलीं त्याप्रमाणें दिलीं उत्तम केलें जलालपूर व भामोरे याचे पचाइती विषयीं बाळाजी जनार्दन यास पत्र पाठविलें तें पावलें होष्टिन कलकत्याहून काशीस येणार तेथून काल्पीचे सुमारें यावें, यानीं तेथें जावें, भेट व्हावी असें वर्तमान आहे दुसरें दिल्लीस राजकारण करावें, पन्नास लाख रुपये नजर द्यावी असेंही बोलतात, म्हणून लिहिलें, त्यास बारीक रीतीनें शोध करून लिहून पाठवावें पुढें होईल तें वरचेवर लिहित जावें परमेश्वर बुध्य देईल व त्यास बरें दिसतील तें करतील व श्रीमताचें दैवानें जें सिद्धीस जावयाचें तें जाईल रा छ ४ जिलकाद हे विनती

---

ले ३७७ }
[ २५२ ] }

{ श १७०४ आश्विन शु ९
{ ता १५-१०-१७८२

॥ श्री ॥

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनति उपरि राजश्री शिवाजी विठ्ठल याचेविशींचा मजकूर आज्ञेप्रमाणें राजश्री पाटील ज+लों उत्तर झालें जे, त्याचा उरपाड महाल तेव्हडा सोडून द्यावा बापूचे सरदारींचा गलाठा फार आहे यास्तव श्रीमतानीं अगत्य वादानें लिहिलें आहे +त्यापै ची उरपाड सोडून दिली म्हणजे मग आमचाच बोभाट पच महालाचे वाटणीविशींचा सरकारात आल्यास आम्हास ल्याहावें असें उत्तर झालें, म्हणून लिहिलें तें कळलें त्यास पुंरदरचे मुक्कामीं सरजाम्याकडील महालाचा मजकूर बोलण्यात आला तो राजश्री पाटीलबावास ठाऊक आहेच सरकारात तालुका थोडा राहिला, खर्च बेमुबलग, हे अर्थ पाटीलबावाचेही ध्यानात आहेत रा छ ७ जिलकाद हे विनति

---

\+ पुढील काहीं अक्षरें फाटला आहेत

ले ३७८ }
[ २३६ ] }

{ श १७०४ आश्विन शु १४
{ ता १०-१०-१७८२

श्री

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं

विनंति उपरी इंग्रजाच्या तह प्रकरणीं भवती न भवती होऊन निदान पक्ष तह करण्याचीं पत्रें छ २१ रमजानीं मदवारी तुम्हाकडे रवाना केलीं त्यावर दोन तीन रवानग्या तुम्हाकडील आल्या, परंतु त्या रवानगींचीं पत्रें पावल्याचा अद्याप तुमचा जाब आला नाहीं, यावरून वाटतें कीं, पत्रें पावलीं न पावला हें कळत नाहीं याकरिता लिहिलें आहे तरी सदर्हू रवानगी तुम्हा जवळ कोणत्या तारखेस पावली तें लिहून पाठवावें कलमवार पत्रें व निदान पक्ष सुद्धा लिहून पाठविलें होते उत्तर आलें नाहीं त्या मागून दोन रवानग्या केल्या आहेत पावल्याचीं उत्तरें पाठवावीं रा छ १० जिल्काद हे विनंति छ ७ जिल्हेज सुरूसन सलास समानीन मुक्काम परगणे ग्वालेर

---

ले ३७९ }
[ ८८ ] }

{ श १७०४ आश्विन व ५
{ ता २६-१०-१७८२

॥ श्री ॥

श्री

राजा शाहू नरपति हर्ष निधान, माधवराव नारायण मुख्य प्रधानं*

छ मा अनाम देशमुख व देशपांडये पो जालनापूर यांसि माधवराव नारायण प्रधान सुा सलास समानीन मया व अलफ नरहरी रनाळेकर यवनमय होऊन भ्रष्ट जाला, त्याजला प्रायश्चित्ताचा अधिकार नसता शामाचार्य व काहीं प्रभृती ब्राह्मण पैठणकर याणीं शुद्ध केला सबब पैठणीं परस्परें ब्राह्मणाचा तट जाला उपरांतिक जाबीतजंग याजकडील कादार पेशजा आला होता, त्यानें बलात्कारें शुद्ध ब्राह्मणांची व बहिष्कृत ब्राह्मणाची पंक्ति करून एकाकार केला सबब पैठणकर झाडून ब्राह्मण सर्व बहिष्कृत जाले त्यास प्रायश्चित्त द्यावयास सरकारचे कारकून शंकराजी राम व जगराम रायदेव पाठविले त्याणीं झाडून पैठणकर सर्व ब्राह्मणांचीं प्रायश्चित्तें परगण्यासुद्धा केलीं पैठणचा संसर्ग तुम्हास घडला आहे तरि तुम्हीं सर्व ब्राह्मणास ताकीद करून झाडून प्रायश्चित्ते परगण्यासुद्धा उभयता कारकून यांचे विद्यमानें संसर्गानुरूप फडशा करणें जाणिजे छ १८ जिलकाद आज्ञा प्रमाण

लेखन सीमा

---

* ' न ' लिहून दुसऱ्या कागदावर उठविला असता जसा उलटा उठतो तसा मूळ शिक्यात सर्वत्र आहे, तसा वर काढता आला नाहीं हा उलटा 'न' असण्याचें कारण असें पिंगळे यांचे घराण्यात पेशवाई होती ती त्याजकडून काढून भट यास दिली हा बदल तो दर्शविण्याकरितां शाहूनें हें शेवटचें अक्षर ' न ' उलटें वठावें असें ठरविलें

ले १८० [२९६]
श १७०४ कार्तिक शु १३
ता १७ ११ १७८२

श्री

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं

विनंति उपरि आठ महिने या प्रांतीं स्वारी राजश्री पाटीलबावाची राहिल्यामुळें सरकारचे महालचीं स्थिति काहीं राहिली नाहीं, तत्रापि कमाविसदारानीं कस्त त्याची खातर जमा करून परगण्याची जोतपात रयतीस दिलासा देऊन करविली इंग्रजाचे मसलतीचा तर शेवट जाहला आता आबाजी इंगळे बानीकर पुढें उभे राहून सरकारच्या महालात गढीबंद जमीनदाराचें पारपत्य करून, चार रुपये मेळवावे असें निमित्त करून, महाल लुटावे अशा तजविजेंत आहेत त्रिंबकराव नारायण याजकडील महाल चोळणात आले असता पचावळीपासून दहा हजार रुपये अगोदर घेतलेच होते आता विरोट म्हणोन रणोद परगण्याचा गाव आहे तेथें तीन दिवस मोर्चे लावून सत्रा हजार रुपये पाटीलबावाचे व तीन हजार दरबार खर्च एकूण वीस हजार रुपये घेतले त्यावर रणोदकरानीं इंग्रजास रस्त पोंहोचवली हें निमित्य उभें करुन कसबा लुटावा असे केले कमावीसदाराची रदबदल कोण ऐकतो ? रणोद कसब्यावर इंगळे स्वारी करून जातात असें कळले तेंव्हा यादव हरी कमावीसदार याणी तेथील खंडणी ठराविली अबरूची मर्यादा काहीं राहिली नाहीं इंगळे आलियावर नवी सराई शाहाडौरा महतपुर खुटावत परगण्यातिल गढ्याची याद लिहून लाख दोन लाख रुपये मेळवावे असे पाटीलबावास समजविले पाटीलबावानीं मला बोलावून ती याद दाखविली आणि बोलिले कीं, "हे गढीबंद सरकार कयातील गाव सरकारात पैका देत नाहींत, इंग्रजाचे दम्यात गोळी वाजविली याचें पारपत्य करून मवासाचें पारपत्य करावयाचें योजिलें आहे येविशीं तुमचे चित्तात कसे येते ?" त्यावरून विनती केली कीं, "गढीबंद जमीनदाराचा बोभाट कमावीसदारानी सांगावा तेंव्हा पारपत्य करावें ते तर कोणीं बोलले नाहींत, आणि एक गढीचे पारपत्य करू जाता सगळा परगणा बुडतो सरकारचे महालाची खराबी होते अहीर धंदेरे वगैरे गिराशे या प्रांतीं आहेत त्याचे पारपत्य करावे तें न होता सरकारचेंच महाल लुटावे हे ठीक नाहीं" अशी भवती न भवता प्रहरभर दरबारात जहाली शेवट मर्जी खप्पा जहाली रदबदलीची पराकाष्ठा जाली आता मर्जीस येईल तसें करावें, असें बोलून राहुटीस आलो त्यावर भाईची भेट जाली त्याणीही सांगितले कीं, तूर्त इंगळ्याचे नादीं आहेत दूरदशाचा विचार न पाहाता कोणीकडूनही चार रुपये मिळवावे ही बुद्धि जाल्यावर विचार कशाला पुसता ? म्हणोन विस्तारें लिहिलें ते कळलें त्यास सरकार तालुक्यातील गढ्यास मोर्चे लावून रुपये घेणें आणि त्याची रदबदल सरकारचे वकिलानीं करणें तें न ऐकता लोभावरच दृष्टी देऊन रुपये घेणें, सरकारचा तालुका खराब होतो, लौकिकातही एक प्रकार दिसतो, इतक्याही गोष्टी चित्तात येत नाहींत,ही गोष्ट फार वाईट असेंही करता इंग्रजास रस्त पोंहोंचावली अथवा लबाडी कोणीं केली असली तर सरकारचे कमावीसदाराकडून बंदोबस्त करवून चार रुपये गुन्हेगारीचे नजरेचे ठरावून कमावीसदारास सांगावें का, हे रुपये सरकारात

पुण्यास पावते करणे असें करणें थोरपणास चागलें दिसतें असो सरकारचें पत्र येविशीं राजश्री पाटीलबावास पाठविलें आहे, प्रविष्ट करावें काहीं चित्तात येऊन उपद्रव मना जहाला तर बरेंच जहालें, नाहा तर ईश्वरी इच्छा, परतु मर्यादा सोडल्यावर ईश्वरास गोष्ट मानत नाहा असे आहे +रवाना चद्र १० जिल्हेज हे विनता सरकारचीं पत्रें राजश्री पाटीलबावास दोन व राजश्री पाडुरग रघुनाथ याचे नावे एक अशीं पाठविलीं आहेत सरकारचे पत्राचे लाखोटे करून देणें तर द्यावे, अथवा खुलीं देणें हे विनती

---

ले ३८१ } [ १८७ ] } {श १७०४ कार्तिक व ३ {ता २३।११।१७८२

राज+ श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनति उपरि राजश्री पाटील बावाचीं पत्रें येतात कीं, इग्रसेन निरोपाची जलदी करितो, पुण्याहून पत्रें येतात त्यात निश्चय ठरून लिहीत नाहींत, म्हणोन वारवार लिहितात त्यास तुम्हाकडे इग्रजाचा तह करण्याचें कलमबदीचे पत्र पूर्वीं पाठविलें व निदानपक्षही लिहिलाच आहे त्यास मुख्य सरकारचा मुद्दा श्रीमत राजश्री दादासाहेब व साष्टी त्यास साष्टी तर नाहीं त्यास दादासाहेब कुटबसुद्धा इग्रजानीं हवालीं करावे, याप्रमाणें तहनाम्यात ठरावून वरकड कलमापैकीं जेथवर होईल तेथवर करारात आणून आधीं दादा आलियावर मग ठाणीं मुलुख घेणें तो घ्यावा असे जाहालें तरच तह करावा दादाचें कलम मळमळीत लिहिले आहे तसें असल्यास तह करणें ठीक नाहीं चहूकडील दोष मसलतीस येऊन, सरकारात गाडराकडून उदिष्टीन आला त्याचे बोलण्यात दादा व साष्टीही द्यावयाचे होते परतु राजश्री पाटील बावाकडे कलकत्याहून इग्रसेन आला आहे, तेही राजकारण सरकारातच आहे असें जाणून, व नबाब भोसलेही इग्रजाचे तहाविशीं बोलत होते तें न ऐकून उदिष्टिनास निरोप दिला आणि हल्लीं दादा हवालीं करून घेतल्या खेरीज तह केला असता आपले सरकारचे मसलतीमहि काहीं न जाहालें, आणि नबाब भोसलेही काय म्हणतील ? हैदरखानाचा मुद्दा काहींच न जाहाला, तेव्हा खान तो फारच वाईट मानतील§ हे अर्थ पुरते ध्यानात आणावे दुसरे साष्टीचा मुद्दा सरकारचा होत नाहीं व अतरवेद वगैरेही कलमात नुकसान्या हैदरखान षरीक जाहला त्याचें काहींच नाहीं. त्यास करार अमता तोडावे, फराशीस ही येणार त्याचे राजकारण तोडावें, इतक्या गोष्टी कबूल करून दादाचेंही कलम मळमळीत जाहीराणा मात्र तहाचा होऊन हैदरखान उगाच सोबती आहे तो नाहींसा होईल, आणि आपले घरचें खूळ दादा येणार नाहीं बाहाणे हजार

---

+ येथपासून खुद्द नानाचें हस्ताक्षर

§ या वेळीं निजाम अली, हैदर व मराठे असे मिळून इग्रजाविरुद्ध कट करण्याचें ठरत होते तेव्हा हैदरास सोडून तह करणें ठीक नाहीं असा नानाचा भाव इकडे हैदरानें तर इग्रजाचा फार नाश केल्यामुळें त्यास ते ह्या तहातून गाळू लागले

लावतील बिनसल्यास मसलतही फिरोन उभी राहील याकरिता दादासाहेबास इंग्रज कुटुंबा सुद्धा निखालस हवालीं करीत असेल तर तह करावा, नाहीं तर करणें ठीक नाहीं, याप्रमाणें सांगावें तुम्हाकडील पत्रें आलीं त्याचीं उत्तरें मागाहून सविस्तर लिहून पाठवू तुम्हास हा मजकूर जलदीनें कळावयाकरिता हें पत्र पुढें पाठविलें आहे रा छ १७ जिल्हेज हे विनंति पौ छ १० मोहरम सु॥ सलास समानीन मया व अल्फ मु॥ नजीक अटेरी

---

ले ३८२ [१९२] | श १७०४ मार्ग व ७ ता १ १२ १७८

श्री

राजश्री नारोपंत स्वामींचे सेवेशीं

विनंती उपरि राजश्री पाटीलबावाचे पत्रात लिहिले आहे कीं, आधीं सरकारचे किल्ले व ठाणीं व मुलूख सोडावा, उपरांतिक दादासाहेबास स्वाधीन करावे असें इंद्रसेनाशीं करारात आहे, त्याप्रमाणें इंग्रजानीं सरकारचा मुलूख व जागा सोडल्यावर दादासाहेबास कशास ठेवतील ? व तुमचे पत्रात इंग्रज म्हणतात कीं दादासाहेबास स्पष्ट तुमच्या स्वाधीन करावें, यात आमचा लौकिक राहत नाहीं तुमचा आमचा तह जाला म्हणजे तुम्ही आपल्याकडील कोणी मातबर माणूस दादासाहेबाकडे समजुतीस पाठवावें म्हणजे आम्ही त्यास निक्षून सागून तुमचे स्वाधीन होत असें करू यावरून पाटीलबावाशीं बोलिलों कीं, विना दादासाहेब हातीं आल्याखेरीज तह घडावयाचा नाहीं त्यावरून पाटीलबावा बोलले आहेत कीं, सरकारचा तहनामा आलिया उपरांतिक हें बोलणें इंद्रसेनाशीं बोलून जर दादासाहेब हातीं आले तर तहनामा देऊ, नाहीं तर देणार नाहीं म्हणोन लिहिलें, त्यास आधीं सरकारचे किल्ले व ठाणीं मुलूख सोडल्यावर दादासाहेबास कशास ठेवतील, असें पाटीलबावाचे लिहिण्यात, व कोणी गृहस्थ दादासाहेबाकडे पाठवावा, आम्हीही त्यास निक्षूण सांगोन तुमचे स्वाधीन होत असें करू असें इंद्रसेन म्हणतो, त्यास तहाचीं कलमें ठरावात आणावीं तेव्हा ठराव तर जाहला मग अगोदर सरकारचे किल्ले ठाणीं व मुलुख घेऊन मग दादासाहेबाकडे गृहस्थ पाठऊन इंग्रज निक्षूण त्यास सांगोन स्वाधीन होत असें करणार, तें तह ठरल्यावर काय ? दादास सांगणें तें सांगोन हस्तगत होत तें आधीं कां करीनात ? दादासाहेब स्वाधीन होतसें करू म्हणतात, मग अगोदर असें केल्यास काय बाध ? मग किल्ले मुलुख घ्यावा इंग्रजास करणें त्यापक्षीं फळ सारखेच आणि असें न केलें तर मुलूख घेतल्यावर दादास हजार बाहाणे लावितील शेवटीं दुसरीच तऱ्हा पाडतील मग इकडे हैदरखान वगैरे हेही काय करितात कळत नाहीं, आणि दादासाहेबाचें न येणें, मग तह करूनही फळ नाहीं याकरिता आगोदर दादासाहेबास काय सांगणें त्या तऱ्हेनें सांगून स्वाधीन होत असें करा तों पावेतों किल्ले मुलुख आहे तसा असो द्यावा दादासाहेब आले म्हणजे मुलुख किल्लेही घेऊ, असें बोलावें किल्ले मुलूख आगोदर घ्यावे असें इंद्रसेन म्हणतो,

त्यास करारात ठरले तेव्हा घेतल्या दाखलच ठरलें पुढें महिना दो महिन्यात दादासाहेब येतसे किल्ले मुलूख घेतल्यावर करणार त करून दादासाहेब यावे, मग किल्ले मुलुख घ्यावा. यात काहीं तह व बोलणीं १ महिणा ठरला यात उणें होत नाहीं असें असता किल्ले मुलूख घेतल्यावरच दादासाहेब स्वाधीन होताल असेच म्हणू लागला, तर पराछिन्न तह स्वच्छतेनें करीत नाहीं असें समजावें आगोदर स्वाधीन केल्यास निखालस तह असें समजावें सरकारचा मुलुख किल्ले आगोदर आल्यास किफायतच आहे, आल्यास चागले, मग दादासाहेब आले तर काय चिता ? असे आम्ही म्हणावें परतु पुढें पेच आहे याकरिता ते आम्हाच दोन महिने तुम्हाकडे आहे तसा असों द्यावा म्हणतों यात नुकसानी आहे का नाहीं? परतु नुकसानी कबूल करून पुढें दोन महिन्यानीं युक्तीनें स्वाधीन करणार ते दोन महिने ठाणीं मुलूख त्याकडेच असल्याने दादासाहेब स्वाधीन झाले म्हणजे घ्यावा साराश, दादासाहेब स्वाधीन झाल्याखेराज किल्ले मुलूख घेऊ नये लिहिली तोडही चागली याप्रमाणे जाल्यास करावें पुढें+ तरी दादासाहेबास इग्रेज स्वाधीन करण्याचें करारात आलेंच आहे तों पावेतों किल्ले मुलूख त्याकडेच असावा, ही तोड चागली आहे रा। छ १५ मोहरम हे विनती

---

ले ३८३ )
[ १२४ ]}

{श १७०४ मार्गशीर्ष व २
{ता। २१।१२।१७८२

॥ श्री ॥

राजश्रियाविराजात राममान्य राजश्री आपाराव स्वामींचे शेवेशी

पो बाळाजी जनार्दन सा। नमस्कार विनती उपरि येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लिहित जावे विशेष तुम्हीं छ १४ सवाल छ २१।२४ व छ २९ जिलकादचीं पत्रें पाठविलीं ते पावलीं तह प्रकर्णी राजश्री पाटील बावाचें व इंद्रसेनाचें बोलणें जालें त्यातलि मजकूर कलमवदी लिहून पाठविला तो सविस्तर कळला पाटील बावानीं लिहिल्याप्रमाणें तहनामा व डौल शिक्यानशीं लौकर आलें पे॥ येविशींचा मजकूर लिहिला तो कळला त्यास येविशींचे मजकुराचीं पत्रें पाटील बावाचीं ही तीन चार खानग्याचीं आलीं त्यात लिहिलें कीं, "श्रीमत दादासाहेबास इग्रजानीं स्वाधीन करावें असें पक्कें करून घेतलें आहे व येथून कलमाचा याद पाठविली होती त्यापैकीं कलमें बोलून करारात आणिलीं आहेत परतु पूर्वी पारशी नक्कल तहनाम्याची येथें पाठविली, त्याप्रमाणें शिक्का करून तहनामा पाठवावा, व एक डौल शिक्का करून पा॥, शिक्याचा तहनामा इंद्रसेनास *दाखवून येणें-करून त्यास इतबार पुरेल व जावयाची जलदी करणार नाहीं हा तहनामा आम्ही आपल्या जवळ ठेवू, त्यास देणार नाहीं दादासाहेबाचें कलम वगैरे कलमें ठरावात आलीं, त्याप्रमाणें इंद्रसेनाकडून कलम त्याचा तहनामा आणवून मग हा देऊ" असें लिहिलें आणि मुदतीचीं पत्रें पाठविलीं त्यावरून तहनामा शिक्यानशीं व डौल पा। आहे परतु दादा-साहेब यास अगोदर स्वाधीन करून घ्यावे, मग किल्ले मुलुख सरकारचा सरकारात घ्यावा,

---

+ येथून खुद्द नानाचें अक्षर * म्ह० दाखवू

तरच तह करावा याप्रमाणे होत नसल्यास करू नये, म्हणून राजश्री पाटील बावाचे पत्रीं लिहिलें आहे व नारो शिवदेव यास ही विस्तारें करून लिहिले आहे, त्याजवरून तुम्हास सविस्तर कळेल तुम्हीही पाटील बावाशा बोलून अमलात आणावें इग्रजाचे तहाचे काम फार नाजूक व मोटें आहे कोठे कसे पेंच बसतात व पुढें बसतील हे सविस्तर अर्थ मशार निलेचे पत्रीं लिहिले आहेत साराश दादासाहेब स्वाधीन होत असेल तरच [ त ] ह करावा व हैदरखानाचे कलमाचा पर्याय लिहिला आहे हीं दोन कलमें, वरकड साधेल तेथवर, याप्रमाण जहाले तरच करावे नाही तर करू नये मग श्रीमताचे दैव आहे रवाना छ १५ मोहरम बहुत काय लिहिणे लोभ असों दीजे हे विनती पौष शुद्ध ९ रविवार मुक्काम बिलोटी [ नजीक, गोहद ]

---

ले ३८४ } { श १७०४ मार्गशार्ष व २
[ १९१ ] } { ता २१-१२-१७८०

श्री

राजश्री नारोपंत स्वामींचे सेवेशीं

विनति उपरि सरकारातही इग्रजाचें राजकारण होतें त्यावरून ग्गा गाडराने उदिष्टिनास येथें पाठविलें, त्याचे बोलण्यात दादासाहेब व घेतला मुलुख व साष्टीही द्यावयाचा आशय होता, व हैदरखानाचेही मुद्दे बोलणार होता परतु वकील आल्यामुळे चहूकडे सदेह पडले व पाटीलबावाचें लिहिलें आलें कीं, इग्रजाचा तह करणें तर हेष्टिनाकडून इद्रसेन आला आहे, यासच पुण्यास पाठवितो याचे हातून करावा त्यावरून इद्रसेन पाटीलबावाकडे आला हें राजकारण सरकारातच आहे असे समजून उदिष्टिनास निरोप दिला नबाब, भोसले याचेंही बोलणे आजपावेतों आहे की, दादासाहेबास कुटुबसुद्धा व घेतला मुलुख इग्रज देतात, सरकारचे मुलखाचा वसूल इग्रजानीं घेतला आहे तोही द्यावयाचें करू, आमचे अथवा भोसल्याचे विद्यमाने तह जाहल्यास फिरोन इग्रजाना लबाडी केली तर आम्ही तिघे एक यात श्रीमताचें काम फार आहे, असें नबाबाचे बोलणे व भोसल्याकडी लही बोलणें होते हल्लीं तो भोसल्याकडून बळवतराव येथें आले, तेही याप्रमाणें बोलतात परतु येथील विचार कीं सरकारातूनच तह व्हावा याकरिता नबाब, भोसले याकडील बोलण्यात अधीक मुद्दे घालून पाटीलबावाकडे कमी मुद्दे लिहून निदानची याद पाठविली त्यास नबाब, भोसलें याचे हातून तह न झाल्यास ते दोघेही रुष्ट हैदरखान सौबती व कौल करार वचन प्रमाण त्याचा मुद्दा काहीं न होता तह करणें, तेव्हा त्यासही वाईट वाटेल फराशिसाशा दारमदार झाले, या महिन्यात मुसाभुशी भारी सरजामानिशी येणार, त्यास तोडावें इतके प्रकार होऊन सरकारचे मुद्दे तरी खातरखा व्हावें तेही नाहा हे सविस्तर अर्थ पाटीलबावाचे ध्यानात यावे याकरिता लिहिलें आहे आता तह करणे त्यापक्षी दादासाहेब तरी कुटुबसुद्धा स्वाधीन करून घ्यावे तरच तह करावा नाहीं तर दादाचे कलम मळमळीत ठेवून तह करू नये वरकड कलमें साधतील तेथवर साधावा राजश्री पाटीलबावाचें पहिलें

पत्र आले, त्यात दादासाहेब इग्रजाना आमचे स्वाधीन करावे असे पक्के बोलण्यात करून घेतले म्हणोन लिहिले त्यावर दुसरे पत्रातहा आहे परतु तुमचे पत्रात तह झाल्यावर कोणी मातबर दादासाहेबाकडे पाठवावा, आम्ही त्यास सागून तुम्हाकडे येत असे करू, असें इद्र-सेन म्हणतो परतु पाटीलबावा बोलिले का, हे कलम पक्के करून घेऊ हें चागलेंच आहे रा। छ १५ मोहरम हे विनता

---

ले ३८५ }
[ १९१ ]}

{श १७०४ मार्गशीर्ष व ७
{ता २१-१०-१७८२

श्री

राजश्री नानापत स्वामीचे सेवेशीं

निनति उपरि राजश्री पाटील बावानीं दोन तान पत्रे आम्हास लिहिलीं त्यात श्रीमत राजश्री दादासाहेबास इग्रजाना स्वाधीन करावें असे पक्कें करारात आणिले आहे हें पक्कें करून घेऊ तरच तहनामा देऊ नाहीं तर देणार नाहीं, व तुम्हाकडूनही याच अन्वयें पाटीलबावानीं लिहिविलें आणि तहनामा पारशी नकल पाठविली, त्याप्रमाणें शिक्का करून पाठवावा व डौल पाठवावे शिक्याचा तहनामा इद्रसेनास दाखविल्यावर त्यास भरवसा पुरेल मग निदानचीं कलमे लिहून पाठविलीं त्यापैकीं, करारात आणिला त्याचा तपशील लिहिल्याप्रमाणें डौलात करून त्याचा तहनामा कलकत्त्याहून आणवून मग हा देऊ या प्रमाणें पत्रें तीन रवानग्याचा आला त्यावरून पारशी नकलेप्रमाण तहनामा शिक्यानिशीं व डौल शिक्का करून पाठविलीं आहेत परतु सरकार रीतीप्रमाणे तहनामा नाहीं, असो हा ठेवावयाचाच आहे मग चिंता नाहा इद्रसेनास दाखविण्याकरिता आणविला म्हणून पाठविला आहे डौलात भरणे तें पुढे यथापद्धन करावयास येईल परतु श्रीमत रा० दादा-साहेबास स्वाधीन करून मग किल्ले मुलुख ध्यावे असें ठरल तर तह करावयाचा नाहीं त्या पक्षीं करू नये जर इग्रजाचे मनात दादासाहेबास स्वाधीन कराव हें निखालस आहे, त्यापक्षीं अगोदर स्वाधीन करण्यास काय बाध ? जर पुढें इग्रजाचे मनात दादासाहेवास ठेवून लबाडी करणे नाहा तर अगोदर देतील जर लबाडी करणें आहे तर अगोदर देणार नाहींत हीच परीक्षा तहाची आहे मग उगीच अगोदर किल्ले ठाणीं घेऊन चोहोंकडून मनसब्यास विलग पाडून घ्यावें हें ठीक नाहा जर दादासाहेब अगोदर न येता तह करू लागले, तर तहनामा पाठविला हा रद्द म्हणोन सागावें रा। छ १५ मोहरम हे विनती

---

ले ३८६ [ १९० ]

श १७०४ मार्ग व २
ता २१-१२-१७८२

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि तुम्ही छ २४ जिलकादचीं पत्रे पाठविलीं तीं पावली 'पूर्वी राजश्री पाटीलबावा याणीं कलमबदीची याद इग्रजाकडील तहाची ठराविली, त्याप्रमाणें सरकारचा तहनामा शिक्यानशीं आल्यानतर इद्रसेनास तहनामा दाखवून त्याजपासून लिहून घ्यावयाचे जाबसाल पाटीलबावा बोलले कलम

१ हैदरखानानें महमद अलीखान व इग्रज याचा मुलूख घेतला आहे, व पाडाव इग्रजाकडील त्याकडे गेले आहेत, ते सोडून द्यावयाविषयीं सरकारातून हैदरखानास सागावे त्याणे ऐकिल्यास उत्तम, न ऐकल्यास सरकार व इग्रज सामील होऊन हैदर खानाकडील सरकारचा व महमद अलीखान व इग्रज याचा मुलूख सोडून घ्यावा कदाचित् हैदरखान इग्रजाकडे सलुखाचे बोलणे लावील तर इग्रजानीं ऐकू नये हैदरखानाचा तह होणें तो सरकारातून होईल सरकारचा मुलूख व महमद अलीखान इग्रज याचा मुलूख सोडविल्यानतर हैदरखानानें तह केल्यास उत्तम न केल्यास सरकार व इग्रज सामील होऊन हैदरखानाचें पारिपत्य करून त्यांकडील मुलुख सुटेल त्यापैकीं निमे सरकारात घ्यावे व निमे इग्रजानीं घ्यावे

१ श्रीमत राजश्री दादासाहेब यास कुटुबसुद्धा सरकारात स्वाधीन करावें असें आमचें बोलणें याचें उत्तर इद्रसेनाने केलें तें पाटीलबावा याणीं सागितलें कीं, ते म्हणतात, स्पष्ट दादासाहेबास तुमच्या स्वाधीन करावें यात लौकिक आमचा रहात नाहीं यास्तव तुमचा तह झाला म्हणजे तुम्ही आपल्याकडील कोणी मातबर माणूस दादासाहेबाकडे समजुतीस पाठवावे म्हणजे आम्ही त्यास निक्षून सागोन तुमचे स्वाधीन होय असें करू याजवरून पाटील बावानीं उत्तर केलें कीं, बिना दादासाहेब हातीं आल्याखेरीज तह घडावयाचा नाहीं हें स्पष्ट आहे एविशीं मागती आपण इद्रसेनाशीं बोलून दादासाहेब हस्तगत होय तें करावें यावरून पाटीलबावा बोलले आहेत कीं, सरकारचा तहनामा आल्या उपरातीक हें बोलणें इद्रसेनाशा बोलून जर दादासाहेब हातीं आले तर तहनामा देऊ, नाहीं तर देणार नाहीं

१ जहाजाच्या 'अमदरफ्तींत सालाबाद स्त र' (?) इतकें अधिक असावे म्हणून आज्ञा याचें उत्तर पाटीलबावानीं केलें कीं, लिहून घेऊ

१ सरकारचे किल्ले, कोट, शहरें इग्रज सरकारात देतात ते जकिरा रहावे म्हणून आज्ञा. त्याचें उत्तर पाटीलबावानीं केलें कीं, जेथवर साधेल तेथवर करून घेऊ

१ सरकारचा व इंग्रजाचा तह होईल त्याप्रमाणें चालावें असें मबईवाल्याचें पत्र शिक्यानशीं आणून द्यावें म्हणून आज्ञा याचें उत्तर पाटीलबावानीं केले कीं मबईवाल्याचें पत्र शिक्यानशी आणून द्यावयाविशीं इंग्रसेनास बोलून पत्र आणवू,

५

सदरहू पाच कलमाचे जाबसाल इंग्रसेनापासून पक्के करून घेऊन याप्रमाणें कलकत्याचें लिहिलें कपनीच्या मोहोरेनिशीं आल्या उपरातिक सरकारचा तह इंग्रसेनास देऊ याप्रमाणें पाटील बवाचें बोलणे आहे तहपत्र आल्यावर होईल वर्तमान तें लिहीन म्हणोन लिहिलें तें सविस्तर कळलें त्यास सदर्हू पाच कलमापैकीं दोन कलमाचीं उत्तरे आलाहिदा पुरवणी पत्रीं लिहिलीं आहेत त्यात दादासाहेब व हैदरखान याचे कलमाचें उत्तर तपशिलवार लिहिलें आहे त्याप्रमाणें करावे वरकड कलमें तुम्ही लिहिल्याप्रमाणें तहनाम्यात लिहावीं या खेरीज राजश्री पाटीलबावाचे पत्रात कलमें लिहिलीं आहेत, त्यात तहनाम्यात लिहावया जोगतीं कलमे

१ गायकवाडाचीं कलमें तहनाम्यात यथास्थित उगवलीं नाहींत तीं इंग्रजाशीं बोलण्यात अशीं यावीं कीं, गायकवाड याणीं पूर्ववत प्रमाणें सरकारात चालावें त्याचा बदोबस्त होणें तो सरकारातून होईल येविशीं इंग्रजानीं त्यास आश्रा देऊ नये व मदत करू नये म्हणोन लिहिलें, त्यास गायकवाडाकडील कलम पूर्वी कलमबदीचे यादीत लिहिले आहे हल्लीं आपण वर लिहिल्याअन्वयें लिहून घ्यावयाविशीं लिहिलें त्यास लिहिल्याप्रमाणें लिहून घ्यावयास येईल

१ वरकड कलमें श्रीमत कैलासवासी याचे वेळेस तहनामे झाले व हपटेनचे तहात आलीं असतील त्याप्रमाणें दुतर्फा चालावें म्हणोन लिहिलें, त्यास याप्रमाणें तहनाम्यात कलम लिहून घ्यावयास येईल

२

दोन कलमें लिहिलीं हीं चागली आहेत तहनाम्यात लिहून घ्यावीं या खानगीचे कागदपत्रकें सुद्धा चागलें मनन करून लिहिल्याप्रमाणें साभाळून करावें याहून जितकें साधेल तितकें करून घ्यावें रा छ १५ मोहरम हे विनंती

---

ले ३८७ [२३४] (श १७०४ मार्गशीर्ष व २ ता २१।१२।१७८२)

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनति उपरि इंग्रजाचे तह प्रकरणी राजश्रीं पाटीलबाबाचीं व तुमचीं पत्रें येत गेलीं प्रथम रामजी पाटील याजकडे तहनाम्याची याद आली त्याजवर तहनाम्याची नकल फारशी हिंदवी आली आलीकडे पाटीलबावाचीं व तुमचीं पत्रें छ २९ जिलकाद पावेतों आलीं त्यातील सविस्तर अर्थ कळला त्यास रामजीपाटील याजकडे याद आली व

पाटीलबावांचीं व तुमचीं पत्रें आलीं त्यातील कलमा कलमाचा अर्थ पहाता एकास एक मिळत नाहीं यास्तव इस्तकबिलपासून पत्रें आलीं त्याचीं पत्रकें वरून तुम्हास पाहण्यास पाठविलीं आहेत त्यात एकेका प्रकरणाखालीं खानगीचा तपसील कलमावर लिहिला आहे तो पाहिल्या नतर सविस्तर ध्यानात येईल त्यास ज्या खानगींतील सरकार उपयोगी कलम असेल तें तहनाम्यात आणावे एकदा एक प्रकारचें एकदा दुसरे प्रकारचें, त्यातही कित्येक कलमें पाटीलबावाचे पत्रात चागलीं तुमचे पत्रात चागली नाहीत, कित्येक तुमचे पत्रात बरीं असे प्रकार आहेत तहनाम्यासही हिंदवींत व पारशींत बारीक तफावत कोठें मोठीही आहे हें सविस्तर तुम्हास समजावें याकरिता लिहिलें आहे सरकार उपयोगी तें करावे तह प्रकरणीं बहुत पत्रे आज तागायत कलमा कलमाचे अर्थ लिहून तपसीलवार पाठविलीं, त्यातील उपयोगी जाबसाल राजश्री पाटीलबावाशीं व भाईशीं चागले रीतीनें बोलावे नाहीं तर पुढे हें आम्हास कळलें नव्हतें अथवा आम्हीं असें सागितलें होतें असें पुढें म्हणतील मग यात होतें तें त्यात गेलें असें होईल याकरितां लिहिलें आहे रा छ १५ मोहरम हे विनति

---

ले ३८८
[ २४३ ]

श १७०४ मार्गशीर्ष व २
ता २१-१२-१७८२

श्री

राजश्री नानापत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि राजश्री पाटील बावाकडून पारशी कलमबदीची याद आली, त्याप्रमाणें त्यांच्या लिहिल्यावरून पारशी तहनामा शिक्यानशी पाठविला आहे हा इग्रसेनास दाखविल्यावर मागाहून कलमें ठरावात आलीं त्याप्रमाणें तहनामा कलकत्याहून येणें, यास दिवसगत लागेल, याकरिता राजश्री पाटीलबावानीं श्रीमताचे लग्नास जरूर यावें, समागमें इग्रसेनासही घेऊन यावें म्हणजे पाटीलबावानीं इग्रजाचा वकील श्रीमताजवळ आणून तह केला असे लौकिकात चागलें दिसेल, तों पावेतो त्यांचा तहनामाही येईल, व श्रीमत राजश्री दादासाहेब स्वाधीन होण्याचेंही समजेल अवघ्या गोष्टींस चागलें +श्रीमताचे लग्नाचे मुहूर्तांचा निश्चय माघ शुद्ध नवमीचा जाहला आहे लग्नचिठयाही मागाहून येतील रामजी पाटील व सदाशिवपत येथे असता पाटीलबावाचे चित्तात देशीं येऊन देवदर्शन श्रीमताचें दर्शन घ्यावें असें आहे म्हणोन पुसत होते त्यास इग्रेजाचा तह ठरला, तर आतां श्रीमताचे लग्नाचे समारभास आल्यानें फार चागलें आहे रा छ १५ मोहरम हे विनति

---

+ येथपासून खुद्द नानाचे अक्षर

ले ३८९ } [ ९२ ] }

{ श १७०४ मार्गशीर्ष व २ { ता २१-१२-१७८२

श्री

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि तहनाम्यात हैदरखानाचें कलम लिहिलें आहे त्यास हैदरखानास त्या प्रमाणें मान्य झालें तर उत्तमच झालें कदाचित् हैदरखान म्हणू लागेल कीं, सरकारची आमची दोस्ती झाली आहे त्याप्रमाणे काईम असावी, इग्रज आम्ही समजून घेऊ तर हैदरखानास वचन प्रमाण दिले असता खान असें बोलू लागले तर इतका स्नेहाचा लौकिक झाला तो टाकून इग्रज व आपण मिळोन खानावर मसलत करावी, यात लौकिक बाईट होतो व सरकारची पत रहात नाहीं याकरिता इग्रजाशीं करारात यावे कीं, तुमचा आमचा तह झाल्यावर तुमचा व महमदखान अलीचा मुलूख हैदरखानानें घेतला असेल तो सोडून द्यावयाविषया खानास आम्ही सागू ऐकिलें [ तर ] उत्तम आहेच न ऐकिलें तर आम्हास सोईस पडल्यास करारात आले आहे त्याप्रमाणें तुम्ही आम्ही मिळोन खानावर मसलत करू व आम्हास दुसरे मसलतीचे काम पडल्यास व हैदरखानानीं आम्हाशीं सलूक ठेविल्यास, तुम्ही [ व ] खानानीं परस्पर समजून घ्यावें परतु शर्त हे की, पुढें मागें खानानीं सरकाराशीं विरुद्ध केल्यास तुम्ही आम्ही मिळोन खानाच पारपत्य करावें त्याप्रमाणें कलम जरूर लिहून घ्यावें नाहीं तर सरकारास हैदरखान सामील होऊन जितकी मसल्त केली, परस्पर आगत स्वागत स्नेहभाव चालले, नबाब, भोसले वगैरे सर्व ठिकाणीं हैदरखानाशीं वचन प्रमाण मजबूत याचा लौकीक जाला असता, लागलच इग्रजास मिळवून घेऊन खानावर चालून गेले, तेव्हा मराठ्याचा इतबार नाहीं × वाकडी चाल दृष्टीस पडे तोपर्यंत त्यावर मसलत करणें चागले नव्हे यास्तव उगवून लिहिले आहे हे राजश्री पाटीलबावाशीं बोलून इद्रसेनाशीं बोलण्यात खचीत आणून निराळा करार करून घ्यावा ×हैदरखानाचा मुद्दा नाहीं तरी इग्रजापासून आम्ही करून घ्यावा हें खानाशीं वचन प्रमाण जहालें त्याप्रमाणे त्यानें मसल्तही केली, त्यास योग्य तें नाहीं, आणि खान म्हणों लागला कीं बरें तुम्ही तह करावयाचा नवता तो केला, असो, तुमचे सरकारची आमची दोस्ती आहे त्याप्रमाणे असावी, इग्रज मी समजून घेईन असें बोलत असता त्याजवर मसलत करणें हे ठीक दिसणार नाहीं जर त्यानें सरकारशीं विरुद्ध केले तर सरकार इग्रेज मिळून मसल्त करावयाचें कलम ठरविलें ते बरेंच आहे सरकारात विरुद्ध न केल्यास तुम्ही त्याणों समजोन घ्यावें असे असावें कदाचित् इद्रसेन म्हणेल कीं, परभारें समजून घेऊ, मग तह इग्रेजाचा व हैदरखानाचाच होणें तेव्हा परभारें होईल तर याचें उत्तर बोलावें कीं, जेव्हा तह करणें तेव्हा सरकारचे विद्यमानाखेरीज करू नये याचें कारण तुमची आमची दोस्ती हैदरखाना खेरीज झाली, या करता याप्रमाणे बोलून करारात आणावें रोज छ १५ मोहरम हे विनती

---

या पुढील १ ओळ फाटली आहे × येथून अक्षर ना।नाचे हातचें आहे

ले ३९० [१८८]

श १७०४ मार्गशीर्ष व ९
ता २८-१२-१७८२

॥ श्री ॥

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं

विनंती उपरि पांडुरंग रघुनाथ यानीं लिहिले कीं, रामजी पाटील याजकडे याद तहाची गेली होती त्याचीं उत्तरें कलमवार व मागाहून निदानपक्षाची याद कलमवार आली त्याच्या पुरवण्या सविस्तर राजश्री पाटील बावास दाखविल्यावर रात्रौ पाटील बावाचें व भाईचे बोलणें जालें कीं, कलमबंदीच्या यादीचीं उत्तरें आलीं तीं ऐकिलीं त्यात उघडें नाहीं लिहावें तर विषाद येईल या करिता तपशील लावून लिहिले आहे परंतु तह करावयाचें त्याचे विचारास येत नाहींसे दिसते त्यावरून भाईनीं उत्तर केलं कीं रामजी पाटील व दाजी यांची रवानगी करितो असें लिहिलें आहे त्याबराबर एखादी तोड सांगून पाठविली (फाटलें)सांगितले दुसरे दिवशी पाटील बाबा म्हणू लागले कीं, हल्लीं निदानपक्षाची याद आली, त्यात हैदरखानास पंचवास लक्षाचा मुलूख महमद अलीच्या मुलखापैकीं द्यावा व सरकारचीं कलमें लिहिलीं आहेत त्याप्रमाणें तह खानासुद्धां करावा त्यास हैदरखानाचा मुलूख देऊन इंग्रज तह करीतच नाहींत हैदरखानानीं मुलूख घेतला तो सोडून द्यावा, म्हणजे इंग्रज त्याशीं बोलणार नाहींत, हे पर्याय सविस्तर पूर्वी लिहून गेलेच आहेत या उपरि *दाजी व रामजी पाटील येणार तेही पत्राच्याच अन्वयें बोलू लागल्यास इंद्रसेन राहणार नाहीं तह करणें असल्यास पूर्वी कलमबंदीची याद येथून पाठविली आहे त्याप्रमाण तहनामा शिक्यानशीं लिहून व दुसरे डौल शिक्यानशीं सत्वर पाठवावे, म्हणजे शिक्याचा तहनामा इंद्रसेनास दाखऊन त्याचें समाधान करू हल्लीं निदानपक्षाची याद आली, या पैकीं जे जावसाल घडावयाचे आहेत ते तुम्हाशीं बोलतो, त्या अन्वयें लिहून पत्र रवाना करणें त्याप्रमाणे होऊन आल्यास इंद्रसेनाशीं पक्कें करून घेऊन डौलाचे कागदावर तहनामा करून द्यावयास येईल परंतु येथून कलमबंदी याद पाठविली आहे त्याप्रमाणें शिक्यानशीं तहनामा आल्याखेरीज इंद्रसेनास भरवसा पुरत नाहीं कदाचित् मनात संदेह येईल की, कलमबंदीच्या यादीवर शिक्का कसा करून पाठवावा? तर चिंता नाही तो तहनामा येथेंच राहील त्यावरून निदानपक्षाच्या यादीचीं उत्तरें पाटीलबावाकडलि निदान पक्षाची जाला त्याप्रमाणें त्याचींच पत्रें श्रीमंतास घेऊन पाठविलीं आहेत त्यावरून सविस्तर अर्थ ध्यानास येईल, म्हणोन लिहिलें, त्यास तहाचे अर्थ सविस्तर ध्यानात यावे, व चोहींकडील भाव समजावे, व तह करण्याची तोडही पडावी, हे अर्थ लिहिण्यात किती येतील? या करिताच उभयताची रवानगी केली आहे ते येऊन पावलेच असतील त्याच्या बोलण्यावरून सविस्तर कळेल राजश्री पाटलिबावाचीं पत्रें पावलीं त्याचे जाब लिहून पाठविले आहेत निदानपक्ष येथून लिहिला होता त्या पैकीं कलमें करून घडावयाचीं तीं पाटील बावानीं आपल्या पत्रा लिहिलीं आहेत तीं कळलीं त्याचीं उत्तरें पाठविलीं आहेत त्यावरून तुमच्या ध्यानास येतील पूर्वी पाटीलबावाचा पत्रें आलीं त्यात

* सदाशिव दिनकर

श्रीमंत राजश्री दादा साहेबास इग्रजानीं ठेवू नये, आम्हांकडे यावें, असें आहे म्हणोन लिहिलें होतें हल्लीं कलमबदींचें पत्र आलें त्यात सरकारचे किल्ले ठाणीं व मुलूख सोडावा उपरातीक दादासाहेबास हवालीं करावें, असे करारात पक्कें आहे त्याप्रमाणें इग्रजानीं सरकारचा मुलूख सोडल्यावर दादासाहेबास कशास ठेवतील म्हणोन लिहिलें आहे, व तुम्हीं, कलमें व्हावयाचीं लिहिलीं त्यात इद्रसेनाचे बोलणे कीं, दादा साहेबास तुमचे स्वाधीन करावें यात लौकिक आमचा चागला दिसत नाहीं त्यास तुमचा आमचा तह जाल्यावर, तुम्ही मातबर माणूस दादा साहेबाकडे समजुतीस पाठवावा, आम्हीहा त्यास सागून तुमच्या हस्तगत होयसें करू पाटीलबावाही म्हणाले कीं, पक्केपणें हा ठराव करून घेऊ तेव्हा तहनामा देऊ न झाल्यास देणार नाहीं त्यास विना दादासाहेब कुटुब सुद्धा स्वाधीन करून घेतल्याखेरीज तह करणें ठीक नाहीं, व तहनाम्माहा देऊ नये रा छ १० मोहरम हे विनती

---

ले ३९१
[२१४]

श १७०४ मार्गशीर्ष व १२
ता ३१-१२-१७८२

श्री

राजश्री पाटिलबावा गोसावी यासि

आशीर्वाद विनती उपरि आपण छ ७ शवाल व छ २४ व २७ जिलकाद तीन रवानम्याचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं पूर्वीं कलमबदीचे यादीचीं उत्तरें रा० नारो शिवदेव याजकडे आपण पाठविलीं व रामजी जाधव यानीं लिहिलीं तीं पत्रें पावल्यावर हल्लीं आपणाकडून निदानपक्षाची याद कलमवार आली सवीस कलमें लिहिलीं त्या पैकीं कलमें अधिक उणीं काय पडतात, त्याचें बोलणें नारो शिवदेव येथें आले त्यासि बोलून कलमवार पत्रे लिहिलीं आहेत, व मशारनिल्हेहीं लिहिलें त्यावरून सविस्तर कळेल आपल्याकडून दोन रवानग्याचीं पत्रें आला, त्यात तह कर्तव्य किंवा न कर्तव्य या दोहींतून कोणताही स्पष्ट अर्थ दृष्टीस पडत नाहा येथे तर इद्रसेन निरोपाची उतावळी करितो त्यास येथें येऊन आठ नऊ महिने होत आले तह प्रकरणीं बोलणीं होऊन चार महिने झाले याकरितां कलकत्त्याहून हेस्टन याणें इद्रसेनास लिहिलें आहे, तहाचा जाबसाल होत नसला तर उठोन येणें त्यास एक महिन्यात तहनामा पुण्याहून आणवितों असें म्हणोन करार केला आहे त्यास पेशजी तहनाम्याची पारसी कलमबदीची याद पाठविली आहे त्याप्रमाणें तहनामा सरकारचा लिहून त्याजवर शिक्का करून पाठवावा व दुसरे कोरे डौलावर +शिक्का करून पाठवावें म्हणजे इद्रसेनास दाखवून हल्लीं आपण निदानपक्षाची याद लिहून पाठविली आहे, त्याप्रमाणें कलमे करारात आणून कागदावर लिहून द्यावयास येईल, व त्या अन्वयें त्याजपासूनही कपिनीचे मोहोरेनशीं लिहून घेऊ इद्रसेन जावयाची जलदी करितो त्यास शिक्यानिशी तह-

---

+ सही शिक्का केलेला कोरा कागद यावर तहनामा ठरेल त्याप्रमाणें ठरल्यावर लिहावयाच्या

नाम्याची याद येईल ती दाखवून मग हल्लींचे यादीप्रमाणें जाबसाल बोलावयास चार दिवस अधिक आगळे लागले तर चिंता नाहीं निरोपाची जलदी करितो ते करणार नाहीं याद शिक्याची न आलियास त्यास तह होईल असा भरवसा पुरत नाहीं याकरिता पेशजी कलमबंदी याद पारसी पाठविली आहे, त्याप्रमाणेंच लिहून वर शिक्का करून, व दुसरे डौल शिक्यानिशीं, याप्रमाणें दोन पाठवून द्यावीं म्हणजे हल्लीं कलमें लिहिल्याअन्वये इंग्रजाचे आपले जाबसाल परस्पर सुधरून डौलाचे यादावर लिहून त्या पासून लिहून घेऊन मग त्यास द्यावयासि येईल कलमबंदीची याद शिक्यानिशीं येईल ते आह्माजवळ राहाल, म्हणोन विस्तरें लिहिले तें कळलें राजश्री नारो शिवदेव याणींहि सविस्तर पत्रे पाठविलीं, त्यावरून सर्वार्थ समजले त्यास आपले लिहिल्यावरून पेशजी आपणाकडून पारसी याद कलमवार आली त्याप्रमाणे सरकारचा तहनामा शिक्यानिशीं करून पाठविला आहे, व डौलही शिक्या निशीं पाठविले आहेत परंतु बशर्त श्रीमंत राजश्री दादासाहेब कुटुंबासुद्धां इंग्रजानीं स्वाधीन करावे, व वरकड कलमे येथून निदानपक्षाची याद पाठविली होती त्यापैकीं कलमे इंग्रजाशीं बोलण्यात येऊन, हल्लीं लिहून पाठविलीं व याहून जेथवर साधतील ती साधून घेऊन, डौलावर कलमबंदी लिहून अगोदर त्याजपासून कलम त्याचे कंपिनीचे मोहोरेनिशीं व टेथाल कौसलदार याच्या दस्वतइनिशीं तहनामा त्याचा घेऊन उत्तम पक्ष इंद्रसेनाने येथे येऊन द्यावा, नाहीं त्या पक्षीं आपणही तेथें द्यावा इंग्रजाचे तहाचें काम लहान नाहीं, बहुत जपून सांभाळून करावें सविस्तर नारो शिवदेव यास लिहिलें आहे, त्याजवरून कळेल हैदरखानाचे मजकूर सविस्तर नारोपंतास लिहिले आहे, त्याप्रमाणे इंग्रजाशीं बोलून पक्कें करारात आणावें रा छ १५ मोहरम बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हे विनंती पौ छ ९ सफर मुा बिलहेटी नजीक गोहद

---

ले ३९२ [४६२] — श मार्गशीर्ष शु ३ श १७०४ ता ७-१०-१७८०

श्री

दर्शविला नबाब हैदर अलीखा बहादूर ब्यहस्तनसीब जाले, हें ऐकून दिलास बहुत गमगनी व खपगा जाली त्याचा बयान कलमी होऊ सक्त नाहीं लेकिन खाहेश इलाही इलाज काय ? अलम दुनयास हेच राहा व रस्म दरपेश येह लाजम के आ शाहामतपन्हा या मरातबावर नजर देऊन सबर व विवेक करावा, व नबाब मरहुमाप्रमाणें दौलतीचा बंदोबस्त व हुषयारी राखून इकडील येकसु व एकदिलीचा तराक साबिक होता त्या बमोजीब अमलात यावा आज राहा येगानगत यात मातपूरसीचा खिलत आ शाहामतपन्हास पाठविला आहे बतपशील आलाहिदा फर्द पाठविला आहे बाजे मरातब गोविंद नारायण व गणेश केशव दि॥ आनंदराव भिकाजी रास्ते यात इरशाद जाले हे बयान करतील, व सदाकत दस्तगाह नरसिंगराव तमाजी लिहिताल, त्यावरून वाजेह होईल हमेशा खत किताबत पाठवून खुषी जादा करीत जावा ( हैदर मृत्यु पावला ता ७ १२ १७८२ त्यानंतरचें पत्र )

ले ३९३ [ ४५२ ]

पोष शु ६ श १७०४
ता। ८-१-१७८३

श्री

श्रीयासह चिरंजीव राजश्री माधवराव प्रधान यासि प्रती गोपिकाबाई मुक्काम नाशिक अशीर्वाद उपरि येथील कुशल तागायत छ ४ माहे सफर जाणून स्वकीन कुशल वर्तमान ययास्थित असे विशेष तुम्हा पत्र पाठविले तें पावले

" मी लहान, वडीलीं सर्व त्याग करून श्रीक्षेत्रीं वास केला आहे, त्यास सर्व माहित वडिलास, यास्तव कोणे रीतीने चालावे हे सर्व त्याहावयास आज्ञा व्हावी , " म्हणोन लिहिल त्यास सूर्य ग्रहण साधि अन्वयें कृष्ण पक्ष होऊन लोप जाहला होता, तो हर्गी पुण्योदये करुन दुष्टाचा सहार व सुष्टाचे पालग्रहणार्थ तुम्ही या कुळांत जन्म घेऊन पुरदर येथे उदयास आला त्यापक्षा इकडून लिहावयाच कारण दिसत नाहीं परतु मानवी देह आणि तुम्हीं लिहिलें, त्यापेक्षा तूर्त चालावयाचें जे सुचलें ते लिहिले आहे तपसील कलम बदी –

१ प्रात कालचे घटका रात्री उठोन दिशेस जाऊन पादप्रक्षालन मुखप्रक्षालन करून दिवाणखान्यातील श्रीमृत्तिका गणपतीचे दर्शन घेऊन प्रात स्मरणाचे श्लोक म्हणावे नतर सूर्यादयाबरोबर वैद्यानीं येऊन हात पहावा प्रकृतिअन्वये औषध घ्यावें नतर लिहावयास बसावे किल्यात हात फिरवून मग ज्या कागदावर निशाणे +व्हावयाचीं असतील ते लिखिता न्वयच वाचावे ते समयीं जवळ गुरुजा व आणखी एक दोघे सभावित योग्य असताल ते असावे जास्त असो नये येणेप्रमाणे घटिका तान येकूण घटिका कलम १

१ तालिमखान्यात जाऊन दड काढावे दिवसेंदिवस शक्ति अन्वये चढते दड असावे बरोबर समवयी मुले पाच चार सभावितांचीं असावीं व जेठी एक दोघे व नेहमीं विश्वासुख गृहस्थ बरोबर असावयाचे तें असावें खिसमतगार कार्याकारण असावे जेठी यानीं कुस्तीचे डाव शिकवावे नतर समवयी मुलासुद्धा प्रकृतीस जो खुराख मानेल तो नेमेंकरून घेत जावा येणेप्रमाणे घटिका दीड येकूण घटी साडेचार कलम २

१ स्नान करावयाचे समयीं पचाग जोशी वाचून सकल्प सागावा नतर गगाष्टक म्हणावे, सध्या थोडकी, परतु न बोलता करावी तर्पण करावें, उपाध्ये यांणीं पूजा करावी ते समयीं पुराण देवघरात व बाहेर गायन होत असावें आपण तुलशी फुलें माळा वहावीं नतर नित्यदाने देऊन क्षणभर बसावे ते समयीं शास्त्री व वैदिक महान् शिष्ठ आल्यास नमस्कार करून योग्यतेनुरूप उत्थापन देऊन काहीं भाषण करावे नतर उपहार करावयास जावें येणेंप्रमाणे घटी साडेतीन येकूण घटी आठ कलम ३

१ कचेरीस यावे ते समयीं सर्वास देऊन योग्यतेनुरूप नेत्रलाभ व भाषण होत असावें कचेरींत लघु शब्द बोलू नये व गैर नि ही [ ? ] बोलू नये मनुष्यपरीक्षा असावा गैरवाका एखायाने समजाविलेस पक्केपणीं विचार करून अपराध ठरल्यास दुसऱ्याकडून त्यास निषिद्ध

+ निशाणें=शेवटील अक्षरें " आज्ञा प्रमाण " हा अक्षरें सही ऐवजीं घालीत. लिखितान्वयें म्ह० लिखितें समजून ' एक पथ दोकाज ' ह्या न्यायानें

करवावे आपण नेत्र कटाक्ष करून पहावे अपराधानुरूप पारपत्य कराव, परतु सभावित गृहस्थ बहुत दिवस पदरींचा प्रामाणिक अशाने रद्बदली केली असता क्षमा करावी दुसऱ्याचें क्षुद्र काढू नये येणें करून त्याचा अपमान होतो, आणि तो त्याचे मनात दश राहतो, साधल्यानुरूप नाश कराल आणि आपल्यास लघुपणा येइल सन्निधानीं लोभात लघुमनुष्य राखल्यास जे वेळे त्यास ते रुकार देतात, परतु जन लोक वाईट म्हणतात, थोरपणास हानि होती येणेप्रमाणे घटी तीन येकूण घटी अकरा कलम ४॰

१ भोजनाचे पूर्वी सोंवळें जाहले नतर थोरल्या देवघरात जाऊन, फुलें घालून, नमस्कार करून, ब्राह्मणास उदक सोडून, भोजनास बसावे ते समयीं भाषण करणें ते राज सुयज्ञातील ब्राह्मणभोजन प्रकरणीं वगैरे योग्य सर्वास दिसेल तें बोलावें पाक करणार व शिष्य मडळी सुशिक्षित विश्वासुक असतील ते बाळगावे घटी २ येणेंप्रमाणें घटी १३ कलम ५

१ भोजनोत्तर आचमन करून शतपदी करून ताबूल घ्यावा नतर दोन घटिका राजविलास खेळ खेळावे एकादे दिवशीं निद्रा आल्यास घटी अर्ध घटिकानिजावें, येणें प्रमाणें घटी २ येकूण घटी पधरा कलम ६

१ शास्त्री याजवळ विराटपर्वापासून भारतातील चिंतनिका करीत असावी, व वृद्ध मनुष्यें पदरची बहुत दिवशीं व अन्यत्र शहाणे असतील त्याशीं दिल्लीप्रकरणीं व महाराज प्रकरणीं गोष्टी कशा जाहल्या त्या ऐकण्यात असाव्या आपले वडिलाच्या गोष्टी कारभारी यासि एकात स्थळीं विचारीत असावें, व तसबिरा व नकाशे अनेक पहात असावे ते समयीं शाहाणे बुद्धिमान् असतील ते जवळ असावे येणेंप्रमाणें घटिका चार एकूण घटिका १९ कलम ७

१ खर्डे लिहावयास बसावे ते समयीं एक दोन मुलें सभावित गृहस्थाचीं बुद्धिमान् पहावयास असावीं करदन बस्तन गुणाकार भागाकार करावयाचा सराव बहुत असावा गुरुजा याणा विद्याभ्यासाकरिता बोलणें प्राप्त आहे परतु लिहावयाचे जागींच बोलावे तेथें विशेष कोणी असों नये घटी चार एकूण घटिका तेवीस कलम ८

१ लिहिणें जाहलेनतर काहीं उपहार थोडासा मर्जी असल्यास मुलासमवेत घेऊन करावा नतर ताबूल घ्यावा घटी एक एकूण घटिका चोवीस कलम ९

१ घोडीं फेरावयास चार रोजानीं जात जावें ते समयीं बरोबर पटवर्धन मडळी व अन्यत्र सरदार असावे त्याशीं भाषण करणें तें सतोषवृत्तीनें करावें परतु अत्यत लोभही नसावा व विरुद्धही न दाखवावें काहीं अतर जाहल्यास क्षमा होणार नाही असें भय असावें योग्यता बघून त्याशीं भाषण सतोषेंकरून करावें आठा दिवशीं बाग पाहावयास गेल्यास उजिनस तेथें फुलें व फळें जीं आणून पुढें ठेवितील तीं योग्यायोग्य बघून त्यास देववावीं व आपण द्यावयाचीं असतील त्यास आपण देऊन मग यावें ज्या दिवशी स्वारी जावयाची नाहीं त्या दिवशीं कागदपत्र दवलतप्रकरणीं असतील ते कारभारी याणीं समजावीत असावें

ते समयीं कोणी असों नये व गंगाभगीरथी ताई साठी याची भेटी चार रोजीं एक वेळ घेत असावी त्यासच वाड्यात यावयाचा बेत व्हावा नंतर त्यास बहुत संतोषेंकरून बोलावें व मूलपणानें बोलण्याचा डौल दाखवावा वाड्यातच आज रहावें असा आग्रह करून ठेवून घेत जावी दिवाण याणा राजकारणाचे वर्तमान व पुढील योजना करावयाचा विचार करून विनंती करीत असावी त्या समयीं अन्यत्र कोणी असों नये व त्यातील अभिप्राय दुसऱ्यापाशीं निघों नये म्हणजे मसलती असाध्य होत नाहीं बातमी हरतऱ्हेची राखावी म्हणजे मसलतीस बळ बहुत आहे पदरच्या मनुष्याचे चालवावयाचें त्यास जिकीर करू नये एकूण घटी चार एकूण घटिका अठ्ठावीस कलम १०

१ तिरंदाजी करावयास जावें-तेथें बरोबर सरदार व पागे व मानकरी बराबर असल्यास तीर कोण कसे मारताहत ध्यानात असावे व हरएक खेळ पहावयाचे ते सवत्र सम्वेत पहावे येणें प्रमाणें घटिका दोन एकूण घटीका ३० कलम ११

१ दीपदर्शन जाहल्यानंतर संध्येस वस्त्रांतर करून बसावें संध्या जाहलेनंतर स्तोत्र पाठ म्हणावा नंतर पुरुषसूक्त अथवा पवमानातील अध्याय म्हणावे ते समयीं आश्रितानी जवळ असावें नंतर भोजनास जावें भोजन होऊन उठेपर्यंत घटी चार कलम १२

१ भोजनोत्तर तांबूल खावयास दिवाणखान्यात क्षणभर बसून तांबूल घ्यावें नंतर कार्याकारण मंडळी जवळ असावी ते समयीं बातमीदार याणीं वर्तमान गुप्त सांगत असावें व हरएक बातमीचीं पत्रें आलेलीं पहावयाजोगीं असतील तीं पहावीं बाकीचीं पत्रें विश्वासूक मनुष्य कोण असेल त्याजकडे काम योजावें, त्यांणीं सांगावें व त्यावर ही बातमी प्रमाण अथवा अप्रमाण सांगतात याची चौकशी असावा नंतर निद्रेस जावें येणेंप्रमाणें घटी तीन एकूण घटिका सात कलम १३

एकूण कलमें तेरा लिहिलीं आहेत, तीं ध्यानीं आणोन चालल्यास उपयोगीं पडतील. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद

---

ले ३९४ [ २७० ] — पौष व ३ शके १७०४ ता २१ १-१७८३

श्री

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं

विनंती उपरि इंपटनानें पुरंदरास येऊन सरकारशीं तह केला त्यास आम्ही उणें काय केलें, असें राजश्री पाटीलबावा बोलले म्हणोन लिहिलें, त्यास हल्लीं पाटीलबावाचे विद्यमानें इंद्रसेन बोलत आहे, त्याची कलमबंदीची याद आली त्यास व इंपटनचे तहाचे कलमबंदीस कमी काय याचा तपशील पेशजी विस्तरें करून लिहून पाठविला आहे, त्यावरून कळलेंच असेल, व हल्लींही लिहिलें आहे कलम

१ महमद अलीखानाचे मुलकाची सरकारची चौथ तहनाम्यात लिहून घ्यावा म्हणोन लिहिलें होतें तें घडत नाही

१ साष्टींचा वारसा ठेविला होता तो तुटला
१ चदावरचे राज्य भोंसल्याचें म्हणजे स्वराज्य ते पूर्ववत् प्रमाणें त्याचे त्याजकडे असावे तें घडत नाहीं +
१ गायकवाडाकडील मागाल ऐवज बुडाला
१ अतरवेदचें कलम
१ दुसरे टोपीकराशीं स्नेह न करणें
—
६

याप्रमाणें इपटनाचे तहास व हल्लींचे तहास क्रमी स्थूलमानें लिहिले आहे किरकोळ सुद्धा पूर्वी लिहिण्यात आलेंच आहे हे बहुत वेळ लिहिले गेलेंच आहे त्यावरून ध्यानात आलेंच असेल, रा॥ छ १५ मोहरम हे विनंती

---

ले ३९५ [२८४] — पौष व ३ श १७०४ ता २१-१-१७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशी

विनति उपरि फरासिसाचे पातशाहाकडून मुसा त्यांशी मुतिण वकील आला त्यावें बोलणें जालें हा मजकूर पूर्वी लिहिलाच आहे त्यास वकिलाच्या बोलण्यात चोवीसावे जिल्कादा पासून दोहों महिन्याना सहा हजार फरासिसाचा जमाव ... फुलचरीस येईल, हैदरखानास सामिल होऊन चेनापट्टणाकडील इंग्रजाचें पारपत्य करून मुक ... येता अस बोलणे होत त्यास पावणे तीन महिने होत आले हैदरखानाकडीलही पत्रें आली ... त्यात फरासिसाकडील जाहजें नजीक आला, लौकरच येऊन पोचताल, असें लिहिले होते ... तर सवावर दबाव व मोठेंच काम आहे प्रस्तुत मुबईस तीन जहाजें ... मातबार, वरतें दोन हजार माणूस विलायती अशीं मुबईस येऊन दाखल जाहलीं ... वकिलाच्या बोलण्यात फरासीस आम्ही येऊनच देणार नाहा फरासिसाचे वकिलासमवेत घेऊन ... ण्यात आम्हापुढे इंग्रजाचा सरजाम टिकू पावणार नाहा, अशा बोलणीं आहेत ... कलम ९, येण्याचे दिवसहा थोडे राहिले आहेत रा छ १७ सफर हे विनंती

---

ले ३९६ [२९५] — पौष व ३ श १७०४ ता २१-१-१७८३

तेथ रामजी पाटाल आहेत त्यास येविशींचे कळू नये हें पूर्वी लिहिले होतें व आता मागती लिहावयाचे कारण विस्तारें पाडुरग रघुनाथ यांणीं लिहिले ते कळले त्यास पूर्वी लिहिलेल्यापासून कागद तो दाखवितच नाहीं, व मजकूरही विशेष बोलत नाहीं मसलतीवर कायम असावे, पुढें मसलत करावी, येविशीं राजश्री पाटालबावास थोरपण देऊनच बोलत असतो आलीकडे इग्रजाशा दारमदार जहाला, फौज निरोप मागणार, गोसाव्याची तारीख बद करणार हें लिहिले आहे, तेव्हा मसलत अगदाच नासणार असे जाणोन हा मजकूर रामजी पाटाल याशीं बोलण्यात आला खरा कीं रामजी पाटालानाही लिहावे कीं मसलत करावी, जमाव फुटू देऊ नये, असें समजोन बोल्ला पाडुरगपत येथें लिहितात असे रामजी पाटील लिहिताल हे समजले नव्हतें या उपरि ये गोष्टीचा बदोबस्त होईल पाडुरग रघुनाथ यांणीं ऱ्च पक्के लिहित जावे रा छ १७ सफर हे विनती

---

ले ३९७ }
| ३३१ ]

{माघ शु ९ श १७८४
{ता १०-२-१७८३

॥ श्री ॥

नेमणूक † लग्न श्रीमत राजश्री रावसाहेब सुरूसन सलास समानीन मया व अलफ कामे नेमून सागितलीं —

[ १ ] अक्षतेस सोईरे व गृहस्थ व वैदिक व पडित व मातबर सरकारकून व सरदार व शिलेदार व सस्थानिक वगैरे सर्वांस अक्षत समारभाने फिरोन करावी देखील वाणी उदमी सर्वांस द्यावी

१ गृहस्थ मातबर समारभानें फिरावयास कसबा देखील जुनाकोट, सोमवार, मगळवार, पेठेंत अक्षत करावयासि —

१ नीळकठराव गोविंद १ महिपतराव साठे

२

१ आदितवार व वेताळ पेठ व भवानी पेठ व गज पेंठ —

१ पाडुरगराव बाबूराव १ गणपतराव कोल्टकर

२

१ बुधवार व शुक्रवार व नारायण पेठ व सदाशिव पेंठ—रास्ते

---

† ही नेमणूक यादी आम्हास रा० रा० काशिनाथ कृष्ण लेले हल्ली वस्ती इदूर याजकडून मिळाली हिचे बद किती ते सागता येत नाहीं ही त्रुटित आहे उपलब्ध बद आहेत ते १ २२ पर्यंत बहुतेक शाबूत आहेत २३ वा बद गाहाळ झाला आहे २० व्या बदात मजकूर पुरा झालेला नाहा, याजवरून आणखीं काहीं बद असावेत असें होते त्या प्रकरणाची दुसरा प्रत कोणास मिळल्यास ती आम्हाकडे पाठवावी, तिचा फार उपयोग होईल

१ शनवार पेठ व मेहुणपुरा व हशमपुरा —

१ अमृतराव १ बाळाजीनाईक भिडे

—

२

१ फौजेचे अक्षतेस —

१ आपा १ बाजीपंत

—

२

१ पर दरबारचे गृहस्थास —

१ माधवराव सदाशिव १ बळवंतराव जिवाजी

१ मातबर सर कारकून १ पंतसचिव १ पंतप्रतिनिधी १ मंत्री

१ अमात्यपंत

अक्षतेस —

१ बाळाजी जनार्दन १ * *

१ सोइऱ्याकडे नित्याची अक्षत —

१ हरीपंत १ पानशी

—

२

वाजंत्री, कर्णेकरी, व तासेमर्फेवाले, व गाडदी, चोपदार, भालदार, व ढालाईत व ईटेकरी खासबारदार वगैरे शागिर्दपेशा हत्ती, घोडी, राऊत वगैरे सरंजाम उपाध्ये अक्षतेचे वाटयासहित

[ २ ] सभेंत मातबर गृहस्थ व सरदार व शिलेदार वगैरे येताल त्याचा आदरमान चांगला करावा नाच रंग दिवस रात्र सभेंत बसून चालवावा

१ अमृतराव विश्वनाथ १ विसाजी कृष्ण १ मल्हार धोंडदेव

१ रघुनाथ सदाशिव घाणेकर

[ ३ ] सोइरे व गृहस्थ व भिक्षुक यास भोजनास व फराळास व नाच पहावयासि व पुण्याहवाचन व सीमंतपूजन व वाङनिश्चय व लग्नसमयीं व वरातसमयीं बोलावण्याचें काम सर्वोत्तम शंकर याजकडे दररोज भोजनाचें प्रथम आमंत्रण करावयाचें त्यांत मातबराचे घरीं यानीं जावें वरकडाचे घरीं ज्याचेकडे बोलावण्याची नेमणूक केली आहे त्यानी जात जावें जे दिवशीं भोजनास येणार त्यास व त्याचे ब्राह्मणास ओळखोन घ्यावयासि दरवाज्यावर माहीतगार बसवावा आले कोण, नाहीं कोण याचा झाडा पहावा कोणास विसरू नये

१ सोयरे लोकास विठ्ठलराव मोरेश्वर व मोरो विश्वनाथ भावे, हरी जिवाजी यानीं बोलवावें, त्यास —

कारकून शागिर्दपेशा

१ गृहस्थाचे आमत्रणास देखील सरकारकुन --

२ रामचद्र इच्छराम व सखाराम गगाधर १ नारो बापूजी पोक्षे
कारकून दि॥ पागा हुजूर
शागिर्द

---

१ भिक्षुक पडित व वैदिक व सस्थानिक व देव वगैरे याचे बोलावणें नि॥ रामशास्त्री व दादो हरी मराठे -

कारकून शागिर्द

[ ४ ] सोयरे याजकडे नित्य लग्नात जितके न्यावयाचे त्याची नावनिशी दाखवून योग्यायोग्य पुसून आमत्रणें करून, जमा करून, भोजनास व फराळास नेत जावे वाड्यात भोजनास बोलावण्याचे होईल तेव्हा वाड्यात आणावें

१ सरदार, शिलेदार, व मराठे, मुसलमान अली बहादूर वगैरे यास सोयरे याजकडे भोजनास व फराळास जमा करून न्यावें व वाड्यात भोजनास फराळास बोलावणे ते समयीं बोलवावें या कामास बाजी गोविंद बर्वे वगैरे

वकील, सस्थानीक-माधवराव सदाशिव

[ ५ ] तेल अर्गजा लावण्याचें काम गृहस्थ व सोयरे लोक यास सभेंत स्नानाची सूचना करून बोलवावें येतील त्या समयीं पूर्वी रागोळी घालून चौरग माडून ठेवावे तेथे आदरें करून अभ्यगास घालोन उच तेल व अर्गजा योग्यायोग्य पाहून लावीत जावा उच उटणें केशर कस्तुरीचें वगैरे करणें तें पुसोन करीत जावें नि॥ हरी जिवाजी बर्वे

| | |
|---|---|
| साहित्य | तेल लावणारे न्हावी व खिज |
| तेल, अर्गजा | मतगार वगैरे चागले कसबी |
| केशर वगैरे उटण्यास | असतलि त्यांजकडून लावावें |
| वाटया रुप्याच्या | हलक्या हातानें |
| चौरग व पाट | न्हावी |
| | खिजमतगार |

[ ६ ] स्नानाचें पाणी व प्यावयाचें पाणी तयार करावयाचें काम नि॥ गगाधरराव गोविंद

उष्ण पाणी तापवून स्नानास येतलि त्यास देत जावें अभ्यग करतील त्यास आग्रहें करून अधिक देत जावें जसा समुदाय होत जाईल तशी तरतूद पाण्याची राखावी

प्यावयाचे पाणी गाळून शीतल करावें वेळा, वाळा, कापूर, लावून उदवून सिद्ध करावें सर्वांस भोजन समयीं व फराळ समयीं देत जावें पहिल्यानें मागाहून असें दोन वेळ

बोभाट पडू नये भोजनोत्तर आचवावयासि उष्ण पाणी व हातास लावावयासि साखर व दात कोरावयासि लवगा याप्रमाणे देत जावे जे सोंवळे ल्हावयाचे वेळेस पाय धुणारे असतील त्यास बोटे घालवावे त्याजवर पाट ठेवून पाणी देत जावें

साहित्यास असामी
कारकून
शागिद
ब्राह्मण
रखवालीस प्यादे

——

पगतीतून लहान भाड्याने चिखल न होता पाणी वाढावे रुप्याच्या कासड्या, तांबे, पचपात्रे, मातबराम समयोचित पाणी प्यावयासि द्यावयाकरिता सिद्ध असो द्यावीं प्रयोजन लागेल तसे पाणी देत जावे भाडा पाणी ग्यालियावर माघारीं घ्यावीं

साहित्य

भाडीं, कढया, हाडे, गगाळे, घागरा व तपेला व लोटे, तांबे व वोळरू व रुप्याचा भाडा

कुभार काम व बुरुड काम व खाद्या पाणा गाळावयासि व झाकावयासि वगैरे साखर बुवट व लवगा तबकें सुद्धां व काड्या दात कोरावयाच्या सिद्ध असाव्या, व केळीचे फाळके

——

[ ७ ] भोजनास व फराळास गृहस्थ सोवळे होऊन येताल त्यास योग्यायोग्य पाहून पाटावर बसवण्याचें काम लक्ष्मण बल्लाळ आपटे याजकडे, व सोवळीं, व शाला कोणाम समयास द्यावयाचे प्रयोजन लागल्यास कोतवाल आणून ठेवावीं

[ ८ ] गध अक्षत उगाळून लावण्याचें काम जनार्दन मुकुद याजकडे व बाबाजी लबोदर

केशरी गध अर्काचे व मध्यम ऐशीं दोन प्रकारचा चागलीं, रगदार कपाळा लावावयासि, व अगास लावण्यास केशर व अर्गजा वगैरे सुवासिक एक व साधें पाढरे एक व गुलाबी चदनाचें व कृष्णागराचें याप्रमाणे चागला उगाळावीं केशरी गधात केशराची कसर राहू नये व अक्षता उच कस्तुरीची व मध्यम कस्तुरीची ऐशा दोन कराव्या गध-अक्षत खासा मध्यम असामी पाहून लावीत जावी उभे खोडानें गध उगाळावें

गध लावणारे चागले कुशळ चौकस माणूस असावे त्याणी साखळीने कपाळा लावावे वाकडे गध लागू नये व अक्षत लावते समयीं नाकास धक्का न लागता कपाळाचा मध्य पाहून लहान मोठी अक्षत ओघळ न येता वाटोळी लावावी, व गध उभे आडवे ज्यास जसे पाहिजे तसें लावावे कोणी मातबर असतील त्याचेपुढें गध व अक्षता ठेवात जावी व हातास लावण्याचें गध देते समया भागीरथीचा गुलाब वाटींत पुढे ठेवीत जावा गध अक्षता लावणार याणीं नखे काढून बोटें चागलीं करून लावावें

## साहित्य व सामान.

| साहित्यास | साहित्य |
|---|---|
| कारकून<br>शागिर्द ब्राह्मण<br>चौकीस प्यादे | केशर कस्तुरी वगैरे आणून चौकशान खर्च करावा शिल्केस सामान अथवा गंध राहाल ते जपोन दुसरे दिवसास राखीत जावें<br>ताम्हने वाट्या व माखळ्या व टिळे सोन्याचे व रुप्याचे व ताब्याचा भाडा<br>सहाणा व खोडे<br>वातरजाडा बाराक बुवट गंध पुसावयास व रुमाल शेल्याचे |

[ ९ ] उदबत्या भोजन समयीं लावीत जाव्या खासे पंगतीस उदबत्तीचीं घरें व झाडें रुप्याचीं असतील ता लावावीं वरकड जागा सोंगटीं मांडावीं व फराळास भातबर गृहस्थ बसल्यास उदबत्या लावाव्या भोजन जहालियावर सोंगटा धुवून ठेवावीं नि।। विसाजी राम बर्वे

| कारकून वगैरे | |
|---|---|
| कारकून अजनवेलकर* | उदबत्याचीं घरे व झाड रुप्याचीं व |
| प्यादे रखवालीस वगैरे | सोंगटा लाकडी वगैरे |

[ १० ] स्वयपाक वाड्यात सोइरे व गृहस्थ भोजनास येतील त्याचा सिद्ध करीत जावा त्याची तरतूद

किता

१ भात साधा दोन प्रकारचा खांसा व मध्यम

१ साकरभात व वाग्याचा वगैरे दररोज सरासरी दोन करीत जावे

१ वरण तुरीचें

१ सावारीं दोन प्रकारचीं

१ आमटी दोन प्रकारची

१ लोणचें दहा प्रकारचें चिरून, व साखरेचे लोणचें

१ कढी

१ सारे दोन प्रकारचा

१ भाज्या दहा बारा प्रकारच्या कराव्या त्यात एकदोन प्रकार तोंडला परवरे वगैरे मागाहून उष्ण व सगळीं वागीं वगैरे उष्ण वाढावीं

१ क्षीर वळवटे दोन प्रकारचीं दररोज दोन प्रकारच्या निरानिराळ्या

१ पूर्णपोळ्या सपीठाच्या

१ पक्वान्नें घिवर फेण्या वगैरे तीनचार प्रकार दररोज

१ वडे साधे व वाटल्या डाळीचे कडि वडे

१ तूप साजूक फार चागलें व मध्यम

१ मठ्ठा व चरखा व शिरखंड, अंबरस

१ खिचडी ओले हारभरे यांचे डाळींची वगैरे प्रत्यहीं एक प्रकारची

१ पापड, साडगे व फेण्या व तिळवडे व चिकवड्या मीरगोंडे बोंडें मेक्याच्या काचऱ्या, या प्रमाणे तळून

---

सदर्हू प्रमाणें साहित्य आचारी चागले शहाणे लावून स्वयपाक चागला करावा पात्राचा अदमास पुसोन घेऊन दोन प्रहरात भोजनें होत अशी तजवीज करावी स्वयपाक भाज्या वगैरे उष्ण रसाच्या लोणचीं भाज्या एक सारख्या हारीनें वाटोळ्या वाढाव्या एकास एक लावू नये आबटी, साबारें, वरण, क्षीर वगैरे याचे थेंबटे मध्यें पाड़ नयेत वाढते समयीं गडबड न करिता चतुराईनें वाढावे हें काम चिंतो विश्वनाथ व मोरो विश्वनाथ भावे व वाकनीस यांणीं करावें

वाढावयास असामी

१ दफनरचे कारकून

१ वाड्यातील मडळी

१ शागिर्द नवे ठेवावे

तूप वाढावयास पाडुरग बाबूराव याजकडील शहाणे वाढणारे यांनीं रुप्याचे तोटीच्या कासड्यांनीं वाढावें

सदर्हु बदोबस्त अताजी मल्हार वाक्नीस याणा राखावा, कमी पडल्यास मशार निल्हेस पुसावे दोन अडीच प्रहरा सोयऱ्यांकडे भोजनाचें जाहल्यास अगोदर वाड्यात फराळास घालावे भोजनाचें तिकडे होईल जे दिवशीं रात्रौ सोयऱ्यांकडे भोजनाचें होईल, ते दिवशीं दोन प्रहरीं भोजनाच वाड्यात होईल

[ ११ ] विडे बाधावयाचे काम नि।। केशवराव बल्लाळ केतकर

खाशीं पानें कमावीसदारांकडून आण विलीं आहेत तीं माफजतीनें राखावीं वर कड पानाची तरतूद जाहली न जाहली पाहत जावी व खरेदी ही करावी

सुपारी फुलबर्डा वगैरे चागली पाहून धुवावी त्यापैकीं तबकात मोकळी घाला वयाची त्यास केशराचें पाणी देऊन, गुलाब घालून, रगदार करावी व काहीं रोठा सुपारीचें फूल पाडून ठेवावें व चिकणी सुपारी दुरुस्ती व खुषबोईदार करून ठेवीत जावी

विडे बाधणें ते हिरवे खर्ची पानाचा व बाजूचा सात पानाचा बाधावा पिकल्या पत्या बाजूच्या सात पानाच्या सुपारीचे पानाची गुडी उभी घालून भरदार चागल्या बावाच्या कुलपी विडे केळीचीं पानें लावून दहा पानाचा एक व बारा पानाचा त्यात गगेरी दोन पानें घालीत जावीं त्यास दुका डीची खूण करावी या प्रमाणें कुलपी विडे धुतली सुपारी घालून चुना नेमस्त दुसरे पानास न लागे असा घालून बाधावे बाधणार चांगले चौकस लावून डौलदार बांधावे सुपारी

पानें कळीचीं गगेरी व रामटेकीं तबकात घालावीं तीं रुमालानीं पुसून चागला निवडून नीट करून ठेवून देत जावीं व काहीं पानें सोनेरी वर्ख लावून तयार करावीं ज्या दिवशीं जसे विडे लागतील तशी तरतूद करीत जावी देखील ब्राह्मण भोजन व बायकांकडील १

चुना केशरा व साधा पाढरा सफेत खासा सभेंत तबकात ठेवण्याकरिता करावा १

## साहित्यास व साहित्य

साहित्यास कारकून वगैरे

१ कारकून
१ ढलाईत
१ प्यादे
१ शिंदे पोरगे व खिजमतगार
१ भोई
१ कामाठी

—

साहित्य

१ सुपारा, कात, आबाडा तसलमातीस आणावी कालचा खर्च आज समजावून चिठ्ठी घेत जावी
१ चुना पारनेर व रेवदडा व धोडपे पैकीं
१ कुभार काम व बुरूड काम
१ नगारे याचे पूड व घागरी व खाद्या व अडकिते व सुऱ्या, कातऱ्या वगैरे
१ चुना, सुपारी व रगण्यास केशर व गुलाब

—

[ १२ ] विडे सभेंत वाटावयाचे काम, पिकल्या पव्या व कुलपी विडे व हिरवे विडे व मोकळीं पानें व सुपारी व चुना या प्रकारें पुढें ठेवून ठेवणे व वाटणें या कामास दिवस रात्र हजीर राहून विडे ज्यास जसे देणें तसे यथायोग्य पाहून देत जावे वावगा खर्च करू नये चौकशीनें वाटावे

## साहित्यास.

१ + + – + पानसी
१ कारकून नि॥ तोफखाना व पोषाख.
१ खिजमतगार
१ प्यादे

—

## साहित्य.

तबके व डबे व पानदानें व चुनाळ रुपे सोन्याचे

सरपोस व बस्ते

लग्नापूर्वी पुण्याहवाचन व वाग्निश्चय व सीमतपूजन समयीं विडे देणें ते सगळी सुपारी व पानें देत जावीं सभेंत विडे खाणारे आहेत त्यास विडे देत जावे

—

[ १३ ] विड्याचे सामान लवगा, जायफळे वगैरे वाटण्याचें काम यशवतराव पातनास याजकडे साधे सामान व रुपेरी व सोनेरा असे रोजचे खर्चाचे अजमासे कारखान्यातून आणून निराळें दास्तान करून बदोबस्ताने ठेवावे मजालस होत जाईल तसे समयोचित माणूस पाहून वाटात जावे मातबरापुढें चौफुले भरून ठेवीत जावे व सर्वास खिचडी करून वाटावे पिस्ते व बदाम चौफुल्यात असावे नेहमीं जपून करावें

| साहित्यास | साहित्य |
|---|---|
| कारकून पोशाखा | तबके व चौफुले व सरपोस |
| खिजमतगार इतबारी | |
| प्यादे | |
| कारकून जिन्नस कारखान्यातून आणावा त्याचा झाडा राखावा | |

[ १४ ] खुषबोई गुलाब व अत्तर सभेंत वाटावयाचें काम निसबत त्रिबक महिपतराव चिटणीस गुलाब व अत्तरे उच व म यम खर्चाचे अजमासें रोजचे रोज कारखान्यातून आणून निराळे दास्तान करून बदोबस्तानें ठेवावें मजालस होत जाईल तसे समयोचित माणूस पाहून वाटीत जावें मातबरापुढे अत्तर गुलाब ठेवीत जावा वावगा खर्च करू नये रात्रदिवस जपून चौकशाने करावें

| साहित्यास | साहित्य |
|---|---|
| कारकून पोशाखा | तबकें व गुलाबदाण्या व अत्तरदाण्या सोन्या रुप्यान्या सरपोस वगैरे सामान लागेल ते रग केशरी वगैरे खासगी कडून आणवून प्रयोजन लागेल ते समयास टाकीत जावा |
| खिजमतगार इतबारी | |
| चौकशी प्यादे | |

## कामें निसबत खासगी

[ १५ ] कोशिंबिरा वाटून वाढावयाचें काम चागल्या कोशिंबिरा वीस प्रकारच्या व निखट चटण्या चागल्या बारीक वाटून रुचिकर कराव्या व निंबें चिरून पचामृत, रायता व भरतें दोन आदिकरून पचवीस तीस प्रकार करावे एक दुसरी चमत्कारिक कोशिं

[ १६ ] पाट माडावयाचें काम पगतीस एके सुतानें पाट सारखे माडावे, त्यात खासे पगतास रुप्याचे फुल्याचे वगैरे चागले थोर एकसारखे पाहून बसावयास व जागा असेल तसे टेकावयास माडावे

याप्रमाणें भोजनास व फराळास दोन्ही

बिरा करावी विचारून वाढावी मीठ धुऊन पांढरें बारीक करावें व वाटणारे चौकस शहाणे असावे त्याणीं वाटाव्या हारीने एक एकास न लागता हिरव्या, पिवळ्या, लाल, काळ्या वगैरे रंगाचे अनुक्रमाने मध्य शेवटे न पडता गलबल न करिता वाटोळ्या वाढाव्या हात धुऊन मग दुसरी कोशिंबिर वाढीत जावी

सदाशिवभट नानल चौकशीस

कारकून नि॥ खासगी

ब्राह्मण

साहित्य कोशिंबिरीचे व उपसाहित्य भांडीं व पाटे वरवटे कोठींतून घ्यावे पान पत्रावळी व खादीचे रुमाल वगैरे लागेल तें

---

जागा मांडावे सायंकाळा पाट धुवावे त्यातून फराळाचे पंगतास मांडावे लागताल ते ओल्याने पुसून मग मांडावे भोजनोत्तर आंचवण्याचे जागा मातबर गृहस्थास बसावयास शेपन्नास पाट समुदाय पाहून मांडात जावे वेंटे करून वोट्यावर मांडावे

कारकून नि॥ खासगी

शागिर्द

कामाठी

रखवालास प्यादे

रुमाल खादीचे पाट पुसावयास

पाट कोठींतून व जवाहार खान्याकडून वगैरे फल्याचे असताल तिकडून आणवण्याची तरतूद करावी, व गृहस्थाकडाल

---

[ १७ ] रांगोळी घालावयाचे काम चांगले ठशाचीं रुदाळ रांगोळ्या असताल ता आणि त्याणा रांगोळी भोजन समया व फराळ समया घालावा खासे पंगतीस रस्ते व पात्राची जागा कुशादं राखावा गुलाल रंगदार असेल तो घालावा नित्य तऱ्हे तऱ्हेची रांगोळा घालात जावी अभ्यंगाचे जागा व बायकाकडे भोजनसमयीं व फराळसमयीं वगैरे जेथें काम पडेल तेथें जपोन घालीत जावी रांगोळी हिरवी, पांढरा, गुलाला, वगैरे तऱ्हे तऱ्हेची गौंडे याणा घालावी

फराळाचा कारखाना साहित्य

| किता | किता |
| --- | --- |
| १ लोणचीं पांच प्रकारचीं व पापड सांडगे | १ खारीक व खोबरें व खजूर व बदाम व पिस्ते व नारळ व मेवा वगैरे |
| १ कोशिंबिरा दहा प्रकारच्या | १ मेवा मिठाई |
| १ पक्वान्नें व लाडू | १ दहीं व दूध |
| १ पोहे आंबेमोहोर बारीक भात व खानदेशातून नवे पोहे आणवून व भात बरास लाह्या | १ तूप साजूक व मध्यम |
| | १ मुरांबे |
| | १ ह रो रा [२] |

---

गौंडे

साहित्य गुलाल व शिरगोळा कोळंबीं मडकी भरून व सुतळी वगैरे

याप्रमाणे साहित्य प्रतिदिवशी सोइरे व गृहस्थ फराळास येताल त्यास रांगोळ्या घालवून समया, पाट मांडून, आदरपूर्वक

[ १९ ] आतशबाजीशें काम नळे चद्र जोती व हवया व झाडे तऱ्हेतऱ्हेचीं वगैरे दारूचें काम तयार करावयासि कोठातील सामान व कमावीसरदाराकडील सामान घेऊन कसबी कारागीर लावून शिरा दारू चागली व कसब चागले या तऱ्हेची तयार करावी धूर होऊ नये सोयरे याचे मडपात पुरुष व बायका रात्रींचें जाणें येणे पडेल तेथें दारू-काम लागेल तसें समयोचित लावीत जावें झाडें लावण्याची कोठें कशीं तीं पुसून लावावीं दारू कामाच्या पाव्या वाटेनें दुरूनच चालावाव्या रखवाली चागली चौकशानें करावी खर्च होईल तो रोजचे रोज फर्डी समजवावा या कामास रस्त्यानूत नेहमींच जागा जागा दारू नेऊन लावीत जावी पाटी रस्त्यातून फिरवू नये व गोडी दारू लावीत जावी तारा फटाका वगैरे मिरवणुकेंत दारू नसावी वरकड प्रकार थोरली दारू बाहेर होईल त्यात करावे

कारकून नि॥ खासगी, प्यादे

कामाठी व बेगारी

बुरूडकाम पाव्या वगैरे

दागिने व झाडे तऱ्हेतऱ्हेचीं करणें तीं पुसून करावीं

---

[ २१ ] सडासमार्जनाचें काम पहाटेस उठोन झाडसारवण करावे केर जेथें पडेल तेथून वरचेवर जपून काढीत जावा भोजनाची जागा ताजे शेणानें सारवीत जावी फार चिखल पाडू नये याप्रमाणें बदोबस्त राखावा

कारकून

साहित्ये यथास्थित करून, योग्यायोग्य पाहून तसतसें फराळास घालावें जपून यथास्थित वाढावें फराळास बाहेर द्यावयाची परवानगी येईल तसें समजोन देत जावें बदोबस्त चागला राखावा

कारकून

रखवालीस माणसे माणसे

शागिर्द वाढणार

भांडा, कुभारकाम, बुरूडकाम वगैरे साहित्य

[ २० ] नक्षत्रमाळा व बाग चागले तऱ्हेदार कागदी करावे व मडपात कदिलें कागदी शोभार्थ लावावीं आत दिवा लावू नये व फाणूस लावावे त्यात मेणबत्या लावाव्या व कारज्याजवळाल फुलझाडे कागदी व मेणाचीं करावीं कांहीं फुलझाडें बागातून आणून मांडावीं व कारज्यात पाणी समयाचे समयास जपून घालीत जावें फवारे रुप्याचे व ताब्याचे मजालस पाहून लावीत जावे व मेणाचा बाग करावा

कारकून

गवड

कामाठी

फवारे वगैरे साहित्य लागेल तें

---

[ २२ ] शाकभाज्या चागल्या दहा पद्रा प्रकारच्या दररोज पाहिजेत त्यास सरकारचे बागातून ज्या होतील त्या कराव्या व हरभरा व वाटाणा आमटीस करावा कमावीसदाराकडील शाकभाजी व पानें येतील तीं माफजतीनें राखावीं आला न आलीं तरतुदींत असावे व भोंवताले गावीं बागाईत

कामाठी बेगारा
भांडा व केरसुण्या वगैरे

[ २३ ] बागातील बगले व कारजा व बैठका नीट करण्याच्या आहेत त्या नीट करून तयार कराव्या १

नगारखान्याचे काम साधे करविले आहे त्याप्रमाणे जलदीन तरतूद करून तयार करावे दोहीं कडील १

आहे तेथे माणसें पाठवून शोध करावा भाजी पानें मिळतील तीं आणवावा वाड्यात भाजी व ब्राह्मण भोजनाकडे व पाने केळाचीं वाड्यात रोजचे रोज सावधगिरीने जपोन देत जावीं बोभाट पडू नये काम सरबागे याजकडे १

[ २४ ] सभेंत मजालशीस दिवसास उदबत्याचीं झाडे रात्रौ उदबत्याचा झाडे व मोमबत्या लावणें तशा पाहून लावीत जाव्या झाडें मोमबत्याचीं लावणे तीं पुसून लावावा

| साहित्य करणारे | सामान |
|---|---|
| १ गौडे | १ उदबत्याचीं झाडे व मोमबत्याचीं घरें व झाडें रुप्याची वगैरे |
| १ प्यादे रखवालीस | १ उदबत्या व आगरबत्या व मोमबत्या |
| २ | |

रोषणाई

[ २५ ] कचेरात मडपात समया नाचाचे जागा थोर जोड्या लावित जाव्या वरकड मजालसींत समया सारख्या जोड्या, त्याचे खालीं पराता व तबकें, पितळ्या ठेऊन, एक सुतानें, मध्यें सारखी जागा उजेडाचा सुमार पाहून राखून, माडीत जाव्या वाती सफेत शेल्याच्या घालाव्या तेल निवळ असेल ते बुधल्या चागल्या घेऊन त्याणीं घालावे दिवसापूर्वी सिद्धता करून वेळेस आणून जेथले तेथें कसबी दिवटे हिंदुस्थानी व चागले देशचे शिरा असतील त्याजकडून गलबल न पडता माडवीत जावे गूल वरचेवर काढावे मजालसींतून फिरण्यास दिवटे पोशाखी

[ २६ ] भोजनाचे समयी समया खाशाचे पगतीस दोन पात्राआड एक, व वरकड पगतीस चार पात्राआड एक, याप्रमाणे उजळ समया वाती उजळ घालून चागल्या कोरड्या न राहता भिजऊन तेल निवळ पात्रे असेल तें घालून पात्रावर न पडता तजविजीने झाऱ्याना समयावर घालाव गुल्दानानीं गूल काढावे व खासेपगतीत समया मध्यच एक उच एक नीच अशा असो नयेत रुप्याच्या समया खासे पगतास माडाव्या त्याजवर तेल रुप्याचे झाऱ्यानीं घालावे पगतींतून तेलवात पहाण्यास शहाणे कारकून व शागिर्द चौकस असतील ते फिरत जावे याप्रमाणें

असावे मजालस पाहून जे समयीं बुधल्या व गुलदानें रुप्याचीं लागतील तेव्हा घेत जावीं नाचासमयीं कसबी दिवटे दोहींकडे उभे करावे मागें पुढें नाचण्याचें पाऊल पडेल तसे मागें पुढे मशाल धरीत जावी गूल खालीं पडू नये, व कसबिणीस लागू नये याप्रमाणे करावे १

जागाजागा मंडपात व दिवाणखान्यात व मंडपाचे देवळ्यात व इतर देवळ्यांचे वाटात व जागाजागां कारखान्यात वगैरे समया, कंदिलें, हिलाल दिवेलावणीं जेथे जसे पाहिजे तसें पाहून लावीत जावें सारी रात्र कोणते जागा असावयाचे त्याचा बंदोबस्त तसा राखावा १

शेगड्या रुप्याच्या व ताब्याच्या व कोळसडी दहा सिद्ध करून ठेवीत जाव्या भोजनसमयीं प्रयोजन लागेल तशा मांडाव्या भोजनसमयीं व फराळसमया प्रयोजन लागेल तसें पाहून समया मांडीत जाव्या १

बायकांचे जेवण्यास व फराळास व मजालसास सदहू अन्वयें समया लावाव्या बोभाट पाडू नये १

लवेस हिलाल दिवट्या जातील ते आले गेले वरचेवर पहात जावे तेलाचा बंदोबस्त राखावा

सोयऱ्यांचे मंडपात पुरुष व बायका रात्रीचे जाण्या येण्यास हिलाल, दिवट्या अगोदर बातमा राखोन सिद्ध करून ठेवाव्या बाहेर निघनाच बरोबर चालावे हिलाल, मशाल जेथे जशा वरणे तशा वाटेने जपोन धरवीत जाव्या व रस्त्यात हिलाल पुरावे तेलाची बेगमी करावी बंदोबस्त राखावा कोणाचे अंगावर गूल पाडू नये १

## साहित्यास व साहित्य •

कारकून दिवटे असामी

१ जगदीश गणेश
कारकून
दिवटे
देसचे देखील सरकार
हिंदुस्थानी

१ त्रिंबक उद्धव व रामचंद्र विरेश्वर
शागिर्द
कामाठी बेगारी
प्यादे रखवालीस

---

## असामी व साहित्य

समया थोर, मध्यम व लहान चाव्यांच्या मिळोन मांडाव्या त्याचा बेत पाहून त्याप्रमाणे

बुधल्या समेत तोट्या नळ्या
चर्मी रंगदार
माध्या चर्मी
पितळी

कंदिलें, दिवे लावणी
तबकें, पितळ्या व पराता व शेगड्या
लोटे ताब्याचे व हांडे व गुलदानें व तपेलीं व झाऱ्या
समया व बुधल्या व झाऱ्या व गुलदाने रुप्याचीं

शेले वगैरे उतारा सनगे स्वच्छ वातीस व खाद्या

नवघण, दोऱ्या, सुतळी व विळ्या पोताच्या व पहारा, गीर्धा चर्मी व कोळसे वगैरे लागेल ते

—

हिलाल, कोळ्या सुद्धा व दुखाखी तेल व चिंधडे व पोत व पलिते तसल मातीस घेत जावे

कालचा खर्च आज समजावून चिठी घेत जावी

—

[ २७ ] रोषणाई कडाल कारखान्याची तयारी

१ गवई नटवे वगैरे कळवंतीणाचे ताफे याची हजेरी राखावी मिषे वगैरे चौकशीने देवावे चागले ताफे असतील ते मजालसींत रात्रदिवस हजिर राखावे नाच चागला यथायोग्य करावा बायकाकडे ताफे लागतील तसे पाठवावे या कामास

१ रघुनाथ सदाशिव

१ कारकून दफ्तराकडील

—

१ चिटको मल्हार वैद्य

प्यादे व ढालाईत

—

कसबा ताफे नामी बाहेरून आणवण्याचे त्याची तरतुद आले न आले हे चिटको मल्हार याणा पहात जावें

[ २८ ] वाजत्रा व कणकर्णी व बाके व रणसिंगे याची हजेरा राखावी अक्षतेस व आमत्रणास व सोयऱ्याचे मडपात जाण्या येण्यास देखील बायकाकडे ताफे लागताल तसे पाठवावे व पालछत्रें व आबदागिरे व बाग व नक्षत्रमाळा माफजतीनें राखाव्या जिकडे नेणें आणणें पडेल तिकडे नेत आणीत जाव्या माणसें कसबी पोषाखी असावीं

बापूजी आनदराव

प्यादे

बेगारी

—

कारकून हजेरी राखुन

शिध्याचे कामास

आफदागिरे

—

[ २९ ] सोयऱ्याचे घरीं जाण्या येण्या समयीं वाजत्री व कणकरा व तासेमर्फ व गाडदी व शागिर्दपेशा हत्ती, घोडीं, राऊत, साडणी, हिलाल, दिवटे, आतषबाजा सर्व सरजाम करीत जावा रात्रदिवस फार चागलें जपून बदोबस्त राखावा

१ बाळाजापत ठोसर

१ राघो विश्वनाथ गोडबोल

मालदार व चोपदार

—

१ विसाजा आपाजा

लबेचे कामास प्यादे व जासूद व टालाईत

—

हत्ती, घोडीं याचे सामान न साडणीचें सामान व खासबारदार याचे बदुकीचे गलेफ वगैरे याची तरतूद जहाली न जहाली पहावी

## बायकाकडील साहित्यास

[ ३० ] विडे व अत्तर खुषबोई व रुख वत वगैरे साहित्य पहावे व लुगडीं व खण मागतील तसे आणून द्यावे व भोजनास व फराळास बायकास आमन्त्रण करावें आल्या न आल्या पहावे जे समयी जे काम पडेल तें नेहमीं सावधगिरीने जपोन करावें

महादाजी बल्लाळ साठे

रामचद्र नाईक पराजपे याजकडे लुगडा व खण साभाळून देणे हें काम

कारकून

खिजमतगार

जासूद व प्यादे

शागिर्द

---

[ ३१ ] मिरवणुकेच साहित्य सोयरे याजकडे जाणे येणे समया वाजन्त्री व कण्री व पाल्छत्रे व नक्षत्रमाळा व बाग कागदी व हिलाल दिवटे आतषबाजी व तासे, मर्फे, हत्ता, घोडीं, पालख्या व गुलाल व पायघड्याचे सामान याप्रमाणे नेहमीं जपोन तरतूद करावी सावधगिरीने बदोबस्त चागला राखावा

१ बाळाजी वामन दामले

१ कारकून

मालदार व चोपदार

प्यादे व जासूद

खासबारदार

---

सदर्हू प्रमाणे बदोबस्त राखावयाची यादी महादजी बल्लाळ याजवळ लिहून दिला आहे त्या यादीवर वहिवाट करावयाची मखलासी लिहिली आहे त्याप्रमाणें

खाशा वाड्यात महादाजी बल्लाळ व मल्हारनिल्हेकडील कारकून याणा बदोबस्ताने करावें रामचद्र नाईक पराजपे याणीं माहित गारीनें सागत जावें

नवरीचे मडपात रामचद्र नाईक याणीं कामकाज बदोबस्तानें करावें १

[ ३२ ] मडप जागा जागा घालणें त्यास लाकडें खासगीकडील वगैरे सरजाम फराशखान्याकडील सामान व बाहेरून आणविले आहे त्याचा तरतूद राखून अवघा सरजाम करून बेताप्रमाणें पसती-योग्य सिद्ध करावे

१ सर्वोत्तम ठाकर

१ बाळाजी कृष्ण ठोसर याजकडील कारकून व शागिर्दपेशाचे लोक कारकून

---

१ सखाराम विश्वनाथ साने लोकसुद्धा

हशमी लोक

बेगारी

साहित्य जे लागेल ते

---

## पत्रावळी व केळीची पान व द्रोण याचे कारखाने

[ ३३ ] पत्रावळींचा कारखाना गावग ावचे गुरव आणविले आहेत त्यास बेगारी

[ ३४ ] केळीचीं पानें नीट करावीं व द्रोण केळीचे चागले दोहों काड्याचे नीक

याजकडून रानातून पाने आणवून पत्रावळी चागल्या सरकारचे वाड्यात थावया योग्य करवाव्या व कमावीसदार याजकडील वगैरे पत्रावळी येतील त्या जमा करून माफ जतीनें ठेवाव्या जिकडे द्यावयाच्या लिव्या येतील तिकडे देत जाव्या कर्बेळाचीं पानें वाळलीं आणविला आहेत तीं बिगारी वगैरे यास समजोन देत जावीं खर्च चौकशीने जपोन करावा

१ रामचद्र नारायण प्रा पुणे

कारकून पो। मजकूर

प्यादे रखवालीस

---

द्रोण केळीचे चागले आणविले आहेत ते ब्राह्मणभोजनाकडे द्यावे भरतीस ओलीं पाने बेगारी याजकडून आणवून द्रोण करावयास द्यावा

दार लावावे व पत्रावळा भरतीस घेऊन नीट करून भोजन समयीं व फराळा समयीं पुरुषाकडे व बायकाकडे दिवस रात्र समयां जपून माडीत जावे खासे पगतीस पाने चागलीं थोर माडावीं फाटकीं, डागीळ असू नयेत व द्रोण दरपानास दहा बारा पर्यंत माडावे फराळाकडे ल्हान पाने व हा पत्रावळी व द्रोण लागतील तर्से माडीत जावे

रामचद्र हरा देवधर वगैरे कारकून नि॥ दफतर एकबेर्जी जासूद व प्यादे

सुऱ्या, कातऱ्या कोळवीं, वगैरे साहित्य व भोंस

शागिर्द

---

## सोयरे लोक व मातबर सरदार व शिलेदार वगैरे याचे परामृषाचीं कामे

[ ३५ ] नबाब भोंसले होळकर वगैरे मातबर शिलेदार सरकारकून मराठे मुसलमान यासि आमत्रणें करावा भोजनास व नाच पहावयासी सोयरे याजकडे व वाड्यांत योग्या योग्य पाहून न्यावे बोलवावे व सिधे पाठवावे बाहेरून येतलि त्यांचे जागेची सोय करून द्यावी

१ कृष्णराव बळवत

१ बाजी गोविंद

१ राघो बापूजी

१ धोंडो मल्हार

१ माधव रामचद्र

---

[ ३६ ] सोयरे बाहेरून येतलि व गांवातलि यांसि सिधा पाठवावा बाहेरून येतील त्यांचे बिराडाची सोय करून द्यावी व भोजनास व फराळास व नाचास वगैरे बोलवावें सोयरे याजकडे भोजनास नित्य जमा करून नेत जावे या कामास

१ विठ्ठलराव मोरेश्वर

१ हरी जीवाजी

१ कारकून

१ जासूद

१ प्यादे

प्यादे व जासूद
चोपदार व भालदार
कामाठी व बेगारी

[ ३७ ] भिक्षुक व वैदिक व थार पंडित व अग्निहोत्रा व देव चिंचवड वगैरे संस्थानिक ब्राम्हण येतील त्यांस शिधा वगैरे निसबत बाळाजी राम लेले

कारकून
प्यादे
जासूद
कामाठी
बिगारा वगैरे

बाहेरील संस्थानिक वगैरेचे व चिंचवडकर येतील त्यास जाग्याची सोय करून द्यावी व शिधा व फराळास पोहोंचवावें

कामाठा

[ ३८ ] मामलेदार व हशम गाडदी वगैरे शागिर्दपेशा व कारखान्याचे लोक यासि सिधा द्यावयाचा नि॥ महादजी बल्लाळ गुरुजी

[ ३९ ] संस्थानिक वकाल वगैरे यासि शिधा व फराळास पाठवाव व भोजनास सोयऱ्याकडे व वाड्यांत बोलवावें व नाचास बोलवावें निसबत माधवराव सदाशिव व जाग्याचा सोय करून द्यावी

कारकून
प्यादे
जासूद
कामाठी वगैरे

[ ४० ] ब्राम्हणभोजनाचे काम —स्थळ सयपाकास व भोजनास सिद्ध करावे सामोग्री कोठींतून न्यावी व भाडीं कोठीपैकीं व बाहेरील गृहस्थांकडील जमा करविलीं आहेत, त्यापैकी न्यावीं आचारी ब्राम्हण खटपटे लावून सयपाक सिद्ध करावा भात, वरण दोन तीन भाज्या व साबारे व आवळेगाजराचें लोणचे व कढी व पुरणपोळ्या व तूप याप्रमाणें भोजनास घालाव व भोजन जहालियावर उष्टीं काढून समार्जन करावे समुदाय पाहून सयपाक करावा वाढणारास निराळा करवा त्यात तीन भाज्या व कढी व साबारें या प्रमाणे करून सर्वास भोजन घालात जावें सयपाक उरेल तो वावगा वाटू नये मराठे लोक शागिद पेशा वगैरे एक एक दिवस उरेल तसा पुसून देत जावा सामुग्रा खर्च होईल तो रोजचे रोज समजावावा

१ रामचद्र नारायण प्रात पुणें | कारकून प्रात मजकूर

साहित्यास

किल्लेहाय व तालुकेहाय व हुजूर हशमाचे कारकून सर्वोत्तम शकर याणीं जमा करून द्रोण करावे, व ब्राम्हणास वाढावे गोविंद राम आपटे व गोविंद हरी देवधर यानीं महालचे कारकून जमा करून न्यावे

भोजन दक्षणा द्यावयासि

१ उपाध्ये | १ कारकून फडणिशीकडील
गध देशपाडे यानीं पिंजरीचें लावावें

तूप पोतदार यानीं वाढाव

पत्रावळी देशमुख पुणें यानीं मांडाव्या

खरकटीं भाडा महादजी नारायण यांणीं घासावीं

रखवालीस प्यादे व बेगारी

पागाचे व शिलेदाराचे कारकून व शिलेदार कारकून व सरकारचे कारखान्यांकडील कारकून वाढावयास घेऊन जावे

पक्वान्नें बुंदीचे लाडू खासगीकडून आणून वाढावे

---

[ ४१ ] शिध्याच्या चिठ्या द्यावयाच काम सोयरे लोक व शिलेदार व मातबर सरदार व शागीर्दपेशा व भिक्षुक वगैरे यासि सिधा द्यावयाची परवानगी ज्याकडे कामें नेमिलीं आहेत तिकडून येत जाईल, त्याप्रमाणे कोठींचा शिरस्ता उत्तम, मध्यम, कनिष्ठ तीन प्रतींचा पाहून ज्यास जसा द्यावयाचा तसा प्रकार करून सिधा, दाणा, वैरण, पानपत्रावळ, दूध, भाजी, सर्पण, आदीकरून ज्यास जसें द्यावयाचें तसें समजोन चौकशीनें देत जावे

१ त्रिंबक विनायक

१ गोपाळ महादेव फडणिसीकडील

कारकून प्रात जुन्नर

शागिर्दपेशा वगैरे

| | | |
|---|---|---|
| चोपदार • | मालदार | दिवटे |
| ढलाईत | प्यादे | जासूद |

---

कारकून शिलेदार

---

## किरकोळ कामें

[ ४२ ] पालख्या गृहस्थाच्या व सरदारांच्या जमा कराव्या सोयरे लोक पुण्यास आणावयास, व पुण्यास बायका वगैरे मंडपात जाण्या येण्यास, व शिवाय ब्राम्हण वैदिक पंडित × × त जाव्या आलीं गेलीं बरेचवर पहात जावीं बोभाट पाडू नये व कोणाचे सामानास तसनस होऊ नये या कामास

२ काशी त्रिंबक दाडेकर व यादो सुकदेव यांचे चिरजीव

[ ४३ ] शहरचे रस्ते झाडवून चागले करावे त्यांत सोयरे यांजकडे जावयाचा रस्ता फार चागला राखावा वाटेंत धोंडे, माती, लाकडे, चिखल, केर पडेल तो झाडून काढवून रोजचे रोज रस्ता झाडीत जावा त्या रस्त्यातील × × × + स चाकरी करून जावें दिवसाचे त्यांणीं व चाभार व गाडवें व गाडे व कावाडे वगैरें यांसि फिरू देऊ नये हें काम कोतवाल घासीराम याजकडे

प्यादे, जासूद, ढलाईत

---

[ ४४ ] पखाला जमा करून छिडकाव मडपा पुढे व दरवाज्या बाहेर व सोयरे याचे मडपाचे रस्त्यास करावा

श्रीनिवास नरशी कारकून

प्यादे

सकेकरी व पखाली पागाचे वगैरे

[ ४६ ] शेण गावातील गौळी याजकडील व सरकरचे यष्टीचे गुराचे व तोफखान्या कडील व बाहेरील नाक्यावरील जमा करून छकड्यावर घालून, वाड्याजवळ दररोज आणून ठेवाव जिकडे मागतील तिकडे देत जावे

१ कारकून चिमणाजी बल्लाळ

प्यादे

छकडे तोफखान्याकडील वगैरे व बिगारींचे गाडे

---

[ ४८ ] मडपाचे पडदे व बिछाने याची रखवाली करावी हिलाल व दिवटे व आतशबाजीचे काम लागेल ते समयीं माडवावर माणसें चढवून × ×

हरी बल्लाळ यास विचारून चिठ्या लिहून रवाना करीत जाव्या कारकून पाठविण्याचे तेथें पाठवावें बेगारी गावगन्नाचे आणविले आहेत ते आले न आले पहावे हजेरा राखावी शिधा चौकशीनें देवीत जावा जिकडे परवानगी होईल तिकडे कामकाजास देत जावें काम पाहून रिकामे जहाले म्हणजे माघारे आणवीत जावे सारे बिगारी याचें बिराड एक जागा असावें चाकरीस वाड्याजवळ नेहमीं रात्रंदिवस असावे

१ नारो महादेव गद्रे सरदार

[ ४ ] उष्टा पुरुषा कडील व बायका कडील भोजनाचा व फराळाचीं काढावीं चागल्या भुया सावडून सारवून स्वच्छ करावे पुरुषाचे पगतीस वाढण वाढते समयीं भाताचीं शिते वगैरे पडतील ता काढात जावीं वरचेवर जपोन काढावा

१ कारकून कृष्णाजी नारायण लिमये

ब्राह्मण व शागीर्द

केरसुण्या वगैरे साहित्य

---

[ ४७ ] कचेरी मडपाचे देवडावर सोयरे व गृहस्थ व शिलेदार वगैरे येतील ते ओळखून पाहून आत घेत जावे त्यास धक्का लागू नये वावगे माणस आत शिरू नये असा बदोबस्त नेहमीं

१ आबाजी विश्वनाथ आठवले,

कारकून व प्यादे

---

माणूस पाहून खिजमतगार मात्र घेत जावे इतर जिलबींचें माणूस घेऊ नये शिलेदार वगैरे घेणें ते बाजी गोविंद याजकडील * *

बाहेरील मातबरांचे घरची [ भांडीं ] जमा करून आणावी आणि भोजन-शालेकडे वगैरे जिकडे द्यावयाची परवनगी होईल तिकडे तसलमातास द्यावीं झाडा चागला राखावा ज्याच भाडे त्याची वरती खूण असावी बदलू नयत व गहाळ होऊ नयेत, ऐसा बदोबस्त करावा कल्हई ज्यास करावयाची असेल त्यास करावी या कामास

१ भिकाजी विश्वनाथ जकाते प्रांत पुणें

कारकून निसबत मजकूर

१ नारो नरसी कारकून याणीं नारो महादेव सागतील त्या प्रमाणे वर्तावे
रखवालीस प्यादे

—

कुभार काम व बुरूड काम बेगाराचे बुरूड व कुभार येतील त्यास सामान देऊन दागीने तयार करवावे बेगारी वेठे सुद्धा हजेरी चागली राखावी शिधा देवीत जावा जो दागीना उत्पन्न होईल तो रोजचे रोज समजावावा कमाविसदाराकडील सामान येईल ते माफजतीने ठेवावे जिकडाल चिठ्या येताल तिकडे सामान देत जावा ब्राह्मण भोजन आदि करून बोभाट कोणी कडील पाडू नये या कामास

प्यादे
कामाठी

—

फरासखान्याचे दरोगे याणा मभेंतील बिछाने व जागजागा दिवाणखाने यांतील व बायकाकडील आदि करून हमेशा जपून ज्या समयीं जसे ज्या जागां पाहिजेत तसे घालून सिद्ध करीत जावे फिरोन जमा करावयाचे असेल ते जमा करावें पखे मजालसी समया वारा घालावयासि दाडीचे फरासाजवळ देऊन उभे करावे विड्याचे पानाच्या चुन पट्या वगैरे बिछान्यावरील केर वरचेवर काढावा मजालसींतून फरास फिरणें ते व पोषाख असावे

कारकून
फरास
प्यादे चौकशीस

— —

ले ९८ | [ २८ ]

{ माघ शु १० श १७०४
{ ता ११-२ १७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनति उपरा हैदरखान वारले तेव्हा इग्रेज शेर होतील, हैदरखानाचे चिरजीव टिपु आहेत त्याचा दाब व कर्तृत्व कसें पडेल कळत नाहीं याकरिता इग्रजाचा तह लवकर पक्का व्हावा याउपर विलब लागू नये एखादा पेंच बसल्यास वाईट पडेल याकरितां सूचना लिहिली आहे एके प्रकारे सर्वांचीं वचनेही +उगविला हे बहुत एकातीं राजश्री पाटील बावास सागावें रा छ ८ रोविल हे विनति

+ हैदर वारल्यामुळें कोणास काहीं माघारें घ्यावे न लागता आपापलीं बोलणीं उगवून घेण्यास सवड सापडली असा भाव

———

ले ३९९
[ ३१३ ]

माघ व ९ श १७०४
ता २५ २-१७८३

श्री

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशी

विनंती उपरि तुम्ही छ २७ सरकारचीं पत्रें पाठविला तो पावला लिहिले वर्तमान सविस्तर कळले उत्तरें अलाहिदा लिहिलीं आहेत त्यावरून कळेल पुढें होईल तें बरोबर लिहून पाठवित जावें अंटेर घेऊन ग्वालेर शहरात अमल बसल्याचा वगैरे मजकूर लिहिला तो कळला दिल्लीकडील सरदार आगरेयास आले गोहदकरांचीं त्यांचीं राजकारणे होतात म्हणोन कळलें त्यास येविशींची सावधगिरी असावी रवाना छ २० रबिलावल हे विनंती

---

ले ४००
[ १९५ ]

माघ व ९ श १७०४
ता २५ २ १७८३

श्री

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशी

विनंती उपरि पूर्वी तहनामा पाठविला, ते समयीं हैदरखानाचे कलमाचे तीन पर्याय लिहिले होते कीं, हैदरखानानें कराराप्रमाणें इंग्रजाचा व महमद अलीखानाचा मुलुख सोडून सरकारांत ही तहानेंच चालेल [ तर ] बरेंच झाले, दुसरा पक्ष सरकारचा व इंग्रजांचा तह झाला असतां हैदरखानानीं सरकाराशीं विरोध न केला आणि इंग्रजाची मसलत केला तर इंग्रजानींच खानाची मसलत करावी, सरकारातून मसलत करिता येणार नाहीं, तिसरा पक्ष सरकारचा व इंग्रजाचा तह झाला यामुळें हैदरखानाना सरकारशीं बिघाड केला तर सरकार व इंग्रज मिळोन मसलत करावयाचें कलम लिहिलें ते चांगलें आहे, म्हणून विस्तारें येथून लिहिले होते त्याचे उत्तर लिहिलेत कीं ते पत्रच राजश्री पाटिलबावास बजिन्नस दाखविलें उत्तरें झालीं कीं, सरकारचा व इंग्रजाचा तह जाहालियावर हैदरखानानीं तहाप्रमाणें इंग्रजांचा व महमद अलीचा मुलूख सोडून देऊन सरकारातही तहानेंच चालल्यास बरच जाहले इंग्रजही त्याशीं बोलणार नाहींत दुसरा पक्ष सरकाचा व इंग्रजाचा तह झाला असता हैदरखानाने सरकाराशीं विरोध न केला आणि इंग्रजानींच खानाचा मसलत करावी, त्यास गोष्ट इंग्रज स्पष्ट ऐकत नाहा, येविशींची भवति न भवती विस्तरयुक्त लिहिला हैदरखानाचे कलमाचा पर्याय येथून लिहिला असता दुसरीच तऱ्हा लिहिण्यात आली यावरून कांहीं समजत नाहीं येविशींचा निश्चय तुम्ही बोलला त्याप्रमाणे इंग्रसेनास सागू याचें उत्तर केले का, याचा निश्चय आमच्यानें सांगवत नाहीं लिहून पाठवून उत्तर येईल त्याप्रमाणें विनंती करू याचे उत्तर पाटीलबवाना केलें कीं, पत्राचा जाब येण्यास दोन अडीच महिने लागतील तों पावेतों इंग्रसेन राहत नाहा त्यापक्षीं निरोप द्यावा लागेल याचें उत्तर शेवटीं केलें कीं, श्रीमंताचे दौलतीची काळजी आपल्यास नाहीं अशी नाहीं जें आपल्यास

चांगल दिसेल तें करावें म्हणोन विस्तरे करून लिहिल त कळल त्यास कराराप्रमाणें इग्रज व महमद अलीखान याचा मुलुख व पाडाव सोडून देऊन सरकारातही तहानें चालेल तर बरेंच जालें हें कलम व न चालल्यास दोघानी मिळून मसलत करावी हें ( कलम ) करारात आणलें आहे तें चागलेंच आहे कदाचित हैदरखानाना सरकारशीं स्नेह राखून इग्रजाची मसलत केली याचा पर्याय लिहिला होता, तो समजूनच लिहिला होता परतु हल्लीं हैदरखान वारले तेव्हा सर्वांचींच वचनें उगवलीं, तेव्हा याच कलमावर तूट खावी असें नाहीं श्रीमत राजश्री दादासाहेब यास कुटुब सुद्धा स्वाधीन इग्रजाना करावें आणि वरकड कलमा पैकीं पेशजी लिहिण्यात आलीं व जेथवर साधतील तेथवर साधून घेऊन लवकर तह करावा या उपर विलब लावू नये रवाना छ २२ रबिलावल हे विनती

---

ले ४०१ }
[ १९८ ] }

{ माघ व ९ श १७०४
{ ता २५ २-१७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशी

विनती उपरि हैदरखान वारले, त्याचे चिरंजिवास मातमपुरशींचा वस्त्रे पाठविलीं, हा मजकूर पेशजा लिहिलाच होता पुत्रही पराक्रमा आहे परतु हैदरखानाचा दाब इग्रजावर मातबर होता, यामुळे इग्रज खानास वचकत होते खान वारल्यावर इग्रजानीं तिहीं कडे तीन टोळ्या करूनं त्याच्या मुलखात पाय शिरकाविला एक टोळी बिदनुराकडे येऊन बिदनूर सस्थान मोठें ते इग्रजानीं हस्तगत केले थोडा थोडा कदम पुढे टाकीत चालिले म्हणोन बातमीचा पत्रे आलीं त्यावरून वर्तमान कळावयाकरिता लिहिलें आहे इद्रसेन पाटीलबावाजवळ आहे तो हेरींना पासून आला मुकयार आहे या करिता सरकारचा तह पेशजी लिहिल्याप्रमाणें या उपर दिवसगत न लागता दादासाहेब कुटुबसुद्धा हस्तगत करून घेऊन पक्का तह लौवर व्हावा या उपर विलब लाऊ नये रा॥ छ २२ रबिलावल हे विनती

---

ल ४०२ }
[ २४० ] }

{ माघ व ९श १७०४
{ ता २५-२-१७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनति उपरि श्रीमत राजश्री रावसाहेब याचे लग्नाचा निश्चय माघ शुद्ध नवमीस झाल्याचा वगैरे पत्रे पेशजी लिहून पाठविलीं होतीं त्याजवरून कळलेंच असेल त्यावर माघ शुद्ध नवमीस इदुवारीं श्रीमताचे लग्न जाहलें महाराज राजश्री छत्रपतीस्वामी साताऱ्याहून लग्नसमारभास आले समारभ चागला जाहला पाटीलबावास वर्तमान कळण्याकरिता लिहिलें आहे नबाबाचे पुत्र येणार होते ते समारभाचे समयीं येऊन पोंहोचले नाहींत मागाहून आले

नबाबाचा व भोंसाचे लेक यहतिशामतजंग याची लढाई निर्मळेवर भारी जाहली त्यावर यहतिशामतजंगाने आपले आईस नबाबाकडे पाठवून अ ना य घेऊन हात बांधोन येऊन नबाबास भेटला, या उपर त्यास कसें ठेवितात तें पहावे निर्मळ व काहीं जहागिरी त्याकडे ठेवावी असें आतून करारा आहे पुढें होईल तें लिहून पाठवू परंतु ही मसलत त्यांची जाहली रा छ २२ रोवल हे ० विनंति

---

ले ४०३ } { फाल्गुन शु श १७०४
[ २४५ ] } { ता ६-३-१७८३

॥ श्री ॥

राजश्री नारोपंत स्वामींचे सेवेशीं

विनंति उपरि छ २६ सफरचा पत्रें पाठविलीं तीं पावलीं राजश्री पांडुरंग रघुनाथ यांचीं पत्रें पुरवण्यासुद्धां सहा आलीं तीं पाठविली आहेत त्यावरून विदित होईल राजश्री अबोजी इंगळे यांचे गावचे महजराविशीं रामजी पाटील विनंती करतील त्यास आज्ञा व्हावी कीं, गुदस्त महालकरी याजपासून पैका घेतला व सालमजकुरीं अतस्ते घेतलीं आहेत तीं यावीं आणि रुपया घेतला आहे त्याच्या यादी कमाविसदाराकडून आणविल्यास येतील तो जाबसाल आलियावर पत्राची आज्ञा होणे तर व्हावी, म्हणून लिहिलें तें कळलें त्यास पांडुरंगपंतांचीं पत्रें पाठविल्याप्रमाणे पावलीं उत्तरें आलाहिदा लिहिलीं आहेत त्यावरून कळेल अबोजी +इंगळे यांचे महजराविषयींचा मजकूर लिहिला या अन्वये रामजीपाटील याशीं बोलतो रा छ २ रविलाखर हे विनंति

---

ले ४०४ } {फाल्गुन शु ११ श १७०४
[ १९० ] } {ता १३।३।१७८३

श्री

राजश्री नारोपंत स्वामींचे सेवेशीं

विनंती उपरि तुम्हीं छ १९ रविलावल मुक्काम नजीक ग्वालेर येथील पत्रे पाठविलीं तीं पावलीं लिहिलें वर्तमान सविस्तर कळलें इंग्रजाचा तह करणें त्याविशी श्रीमंत दादासाहेबाचें कलम पक्के करून घेऊन मग तहनामा हवालीं करावा अशी आज्ञा या अन्वये बोलत असता हैदरखान मेल्याचे वर्तमान आले त्यावरून तहनामा हवालीं करावा, येविशीं राजश्री पाटिलबावानीं आग्रहे करुन सांगितलें आम्हीं उत्तर केले कीं, वन्याची आज्ञा अशी नाहा, व तुमचे लिहिण्यात ही अस नाहा, तेव्हा तहनामा कसा यावा? त्याजवर राजश्री आपाजी राम दाभोळकर व राघोजीपंत गुरुजी यांस मध्यस्तीस घातले

---

* निर्मळचे जहागीरदार धौंशे याचें व निजामअलीचें वाकडे पडून धौंशानीं बंड केलें होतें मराठ्यांनीं निजाम अलीचा मदत केली

+ इंगळे महालुंग्याचे यान्या गावच्या महजराची भानगड काय होती तें समजत नाहीं

परंतु आम्हा ऐकिलें नाहा पाटीलबावाचें ह्मणणे ज, हैदरखान वारले या उपर ओढण ठीक नाहीं दादाचे कलम नीट करून देऊ, असा कागद श्रीमतास लिहून देतों तहनामा या नाहीं तर इग्रसेनास निरोप देतों मग जें होणें त होईल आम्ही इकडील तोंडावर आहों तिकडे सभाळणे तसें सभाळावे परतु आम्हास आज्ञा नाहीं कबूल कसें करावें ? शेवटची गोष्ट निग्रह करून तहनामा आम्हापासून घ्यावा असा डोल दिसतो आज्ञा येईल तशी वर्तणूक करू म्हणून तपशिले करून लिहिलें ते कळलें त्यास तुम्हा उत्तरें प्रत्युत्तरें ठीकच केलीं त्याणीं आम्हास लिहिलें त्या भरोंशावर तहनामा पाठविला त्याणीं लिहि याप्रमाणे निभवाव हें उचीत पहिलें लिहिणें काय ? हल्लीं बोलतात काय ? असो परतु हैदरखान मृत्यु पावले हेही निमित्य ज लें त्या पक्षीं पाटिलबावा म्हणतात कीं दस्तऐवजी कागद लिहून देतों तो कागद लिहून घेऊन, आम्हास वण्याची आज्ञा नाहीं परतु आपण मागतात त्या अर्थीं देतो ज्यात श्रीमताचे दौलतीचें कल्याण ता गोष्ट करावी इतके सागून दस्तऐवज लिहून घेऊन त्याजकडील तहनामा आपले जवळ घेऊन मग इकडील तहनामा हवाली करणें येवढे थोर सरदार, पाहिल्यानें लिहिलें काय ? हल्लीं निग्रह करून घेणार ही रीत नव्हे असो पक्की बळकटी करून घेउन करावें रा॥ छ ९ रा खर हे विनंती

---

ले ४०४ [ ७ ] फाल्गुन व १२ श १७०४ ता॥ ३०-३-१७८३

आम्हीं तुम्हास द रे वी सा हून पत्र पाठविले त्याचें उत्तर तुम्हीं पाठविलें ते आम्हास गुडलूरचे मुकामीं छ १४ रविलाखरीं पावले तें वाचून बहूत खुशाल जाहलों तुम्ही हमेशा दोस्त फराशिमाचे आहा आम्हास आमचे खावदानीं बहूत फौज व सरजाम देऊन या प्राता पाठविलें कारण इग्रजास तबी करून मारून काढावा आमचे खावदाचा आम्हास हुकूम आहे कीं, हिंदुस्थानातील सरदार आहेत त्याचा मुलूख व किल्ले इग्रजाना घेतले आहेत ते त्याजपासून घेऊन ज्याचे त्यास द्यावे आम्ही तुम्हास लिहिलें आहे हें खरें मानावें यांत तफावत पडणार नाहीं मुसामुतणि याणीं मुसा बर्णेत याज समागमे पत्रें पाठविलीं तीं सर्व पावला ता पाहून बहुत खुषी झाली कीं तुम्हीं इग्रजा समागमें सला करीत नाहीं तुम्हा खरें जाणावें कीं आता तिकडे यावयाची मोसम नाहीं मोसम आला म्हणजे आम्हीं बहुत मजबुदी सरजामानिशी तिकडे येतों तुम्ही आम्ही मिळोन इग्रजास खस्त करोन टाकू आम्ही आपला फौज व दारूगोळा सारा तयार केला आहे थोडक्याच दिवसात आम्ही आपल्या शत्रूवर चालून चेनापटणावर जातो आमचा दुस्मान आहे त्याशीं लढाई करून तबी करून जलद तुम्हास वर्तमान लिहून पाठवितों जे इग्रजास सामील होतील त्या सुद्धा तबी श्रीमत व आम्ही मिळून केली जाईल तुम्हींही इग्रजाशीं लढाई करावी मुसामुतीण याणीं आम्हास लिहिलें कीं, श्रीमत राजश्री माधवराव साहेब याची शादी झाली आमचे

तेर्फेने मुबारखबाजी करावी म्हणोन मुसामुताण यास लिहिले आहे आमचा व श्रीमत कैलासवासी बाळाजीराव यांची व आमची बहुत दोस्ती होती कोलैनल मुसामुताण तुम्हां पाशीं आहेत ते इतबारी पातशाहाचे व वजीराचे व आमचे आहेत जे आपणास सांगावयाचें असेल तें याजवळ सांगावें याजला जे सांगणें ते तुम्हाजवळ सांगतील तुमचे जबाबास आम्ही बहुत उमेदवार आहो ईश्वर तुम्हास फत्ते देऊ छ २६ रविलाखर सन सल्लास समानीन

---

ले ४०५ } [ २८७ ] चैत्र शु - श १७०५ } ता ४-४-१७८

॥ श्री ॥

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनति उपरि हैदरखान वारल्याच वर्तमान प्रथम इग्रजाचे घरीं आले मागाहून पुण्याहून बातमीचीं पत्रे आला छ ६ रविलाखरा टिपूचे पत्र आवास आलें त्यावरून अप्रमाण कसे मानावे ? वर्तमान तथ्य आहे आहे असें असता स्वामींनीं न लिहिले यावरून पाटीलबावा बोलले जे, एवढें थोरले वर्तमान श्रीमताना लिहिले नाहीं अपूर्व आहे म्हणोन लिहिलें ते कळले त्यास खान वारल्याचा बातमी येथेंही आला व खानाकडील नूरमहमद खान येथे आहेत त्यास लिहिले आलें परतु आपले वकीलाचे लिहिलें आलें नव्हते या मागें एक दोन वेळा अशींच वर्तमाने आलीं परतु तीं मिथ्या जाहलीं, यास्तव लिहिलें नाहीं वकीलाचे लिहिलें आले त्यावरून पेशजी तुम्हास लिहिले आहे त्यावरून कळलेंच असेल टिपूचे †पत्र पाटीलबावास नसेल, नूरमहमदखानानीं लिहिले असेल त्यास बिना सरकारचे वकीलाचे पत्र आलियाखेरीज क्सें लिहावे म्हणून लिहिलें नाहीं नाहीं तर येवढें वर्तमान लिहावयासि विलब न होता एक एक वर्तमान येथें असे ही उठले होते कीं त्याहावयास खातरजमा न होई वकीलाचीं पत्रे आलियावर खातरजमा जाली तेव्हां लिहून पाठविले रा छ १ जोवल हे विनति

---

ले ४०६ } [ २९७ ] चैत्र शु ७ श १७०५ } ता ४ ४ १७८

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनती उपरि इग्रजाकडलि तहनामा यादी प्रमाणें लिहून पाठवावा व एक डौल शिक्का करून पाठवावें नवा कलमें बोलण्यावर आलीं त्याप्रमाणे व श्रीमत राजश्री दादासाहेबास अगोदर घ्यावयाचे पक्के करू तेव्हा नवा कलमें बोलण्यात आणलीं तें डौलात भरून त्याप्रमाणें इद्रसेनाकडून कलकत्याचा तहनामा आणवून तो घेऊन मग डौल भरून तयार केलेला देऊ यादीप्रमाणें येईल तो देणार नाहीं म्हणोन तीन खानग्यांचीं पत्रें राजश्री पाटीलबावाचीं

† येथपासून खुद्द नानाच अक्षर आहे

व तुमचा आला होता व पूर्वीपासून श्रीमताचे घरचा विश्वास शिंद्याचे लिहिण्यावर व बोलण्यावर का सरकार कामावर अथवा मर्यादेत अतर घडणार नाहीं असे जाणोन तहनामा व डौल पाठविले व तह करावयाविषयींही लिहिले त्यास राजश्री पाटीलबावाचे लष्करातून चार पाच ठिकाणीं लिहिलीं आलीं कीं, सरकारचे वकिलावर जबरदस्ती करून तहनामा घेऊन इग्रजास दिल्हा तुम्ही तो मोघम—परतु भोंसले, होळकर व हैदरखानाकडील वकिलानीं वगैरे विस्तारे त्यास लिहिले त्यावरून अपूर्व वाटले तहनामा व डौल विश्वासाने पाठविलें असता असें न घडावे व हा लौकिकही करावयाचा नव्हता तह करणे खराच लिहिलीं पुसलीं ही आलीं गेलीं, तेव्हा अशी गोष्ट बाहेर दिसिवणें यात काय ध्यानात आणले असेल ते असो थोर आहेत त्याचे लिहिणें बोलणेंचे प्रमाण असते व त्या विश्वासावरच मोठीं कामें होत असतात व ज्या मर्यादा आहेत, त्या चालविल्या असता कल्याण होते असो जे याचे थोरपणास चागलें दिसलं असेल ते केले असेल श्रीमत राजश्री दादासाहेब पूर्वी हरी बाबाजीचा नाश करून निघोन गेले त्यावर राजश्री पाटीलबावाचीं बोलणीं झालीं कीं, दादासाहेब कुटुबासुद्धा सरकारात आणून हवालीं करीन येविषयीं शर्तीचीं बोलणीं चिमापा व तुम्हाजवळ जालीं होतीं त्याचें स्मरण तुम्हास असेल त्या निश्चयावरून हल्लीं ईश्वरे तसे घडावयास आणिलें आहे दादासाहेबाचा बदोबस्त होणे कठिण आहे एखादा फितूर कीं दगा केल्याने दौलतीसच पेंच बसावयाचा याकरिता दादासाहेब कुटुबासुद्धा येथ पाठवून द्यावे हेंच बरे यात असें होईल कीं, ज्यांजपासून गेले त्यानीं आणून सरकारात दिल्हे यात निमित्यही पुढे मागे राहत नाहीं येविशीं राजश्री पाटीलबोवाशा बोलून पक्के करून घ्यावे आणि लिहून पाठवावे रा छ १ जैावल हे विनती

---

ले ४०८ [ १९८ ] — चैत्र शु ३श १७०५ ता। ४-४-१७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशी

विनता उपरि श्रीमत राजश्री दादासाहेब यास इग्रजानीं हवाला कराव, याप्रमाणें पक्का ठराव राजश्री पाटीलबावानीं करून घेऊन मग तहनामा सरकारचा पाटीलबावानीं इग्रजास दिल्हा व इग्रजांचा आपणापाशीं घेऊन दादासाहेबास आणावयाकरितां राजश्री केसोपतास पाठविलें त्यास दादासाहेब त्याजपाशी येतील आल्यावर येथेच आम्हाकडे पाठवितील कदाचित् दादासाहेब येते समयीं वाटेनें एखादी गलबल नेली अथवा हरतऱ्हा करून निघोन गेल्यास फार विलग पडेल याकरिता येविशाचा बदोबस्त चागला असावा व केलाही असेल परतु सूचली गोष्ट लिहिली आहे का कीं त्याची रीतभात व बोलण्याची प्रमाणिकता सर्व माहीत आहे व पूर्वी अनभवासही आली* आहे तेव्हा याचा बदोबस्त चागला

---

* पूर्वी दादास शिंदे बुंदेलखडी नेत असता ते नजर चुकवून पळून सुरतेस इग्रजाकडे गेले होते + येथून खुद्द नानाचें अक्षर

असावा साराश पाटीलबावापाशीं सुरक्षित येऊन पोहोंचून येथे येत असें घडावें मध्येंच निघोन गेले तर विलग पडेल कोणे गोष्टीविशा विश्वासावर जाऊ नये रा छ १ जमादिलावल हे विनती

---

ले ४०८ } [ १९९ ] }  { चैत्र शु ३रा १७०५ { ता ८-४-१७८३

॥ श्री ॥

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशा

विनता उपरि राजश्री पाटीलबावा म्हणू लागले कीं, इग्रजांचा तह झाला त्याचा कपू मबईत रिकामा बसला आहे, त्यास पुढें सरकार व इग्रज मिळून हैदरखानावर मसलत करावयाची त्याची तरतूद एव्हा पासून होउन योजना घडावी इग्रसेन म्हणतो जे, तुम्हास गरज असल्यास कपू ठेवू, नाहीं तर कलकत्त्यास बलावून घेऊ म्हणोन लिहिले त्यास येथून खानास लिहून पाठवू त्याना महमद अलीखानाचा व इग्रजाचा मुलुख सोडून सरकारचे दोस्तात राहिले तर बरेंच जालें, ऐकिले नाही तर त्याजवर मसलत करावी लागेल तेव्हा कपू उपयोगा पडेल याजकरिता तूर्त आहे तेथे असा द्यावा + टिपूनें न ऐकिलें तर सरकार व इग्रज मिळून मसलत करावयाचे करारातच आहे, त्या पक्षी कपू असावा हें बरे येथून लिहून जाईल त्याप्रमाणें त्यानीं सामील व्हावें हा पुढील मनसबा आहे आधीं सरकारचा मुलुख किल्ले ठाणीं येतील, श्रीमत राजश्री दादासाहेब कुटुब सुद्धां मेतील, तदनतर खानास लिहून न ऐकिलें तर मसलत करावयाची ती होईल रा। छ १ जे।। वल हे विनती

---

ले ४०९ } [ २१७ ] }  { चैत्र शु ५ रा १७०५ { ता ८-४-१७८३

राज

राजश्री पाटिलबावा गोसावी यासि

आशार्वाद विनती उपरि राजश्री नारो शिवदेव यास तिकडे जाउन बहुत दिवस जाले, व त्याचे घरींही अडचणी आहेत, यास्तव मशारनिलेनीं येण्याविशीं एक दोन वेळा लिहिलें परतु इग्रजाचे तहाचा जाबसाल होत होता याजकरिता त्यास येण्याविशीं लिहीलें नाही आता तहही जाला त्यास मशारनिलेस इकडे रवाना करावें रा। छ १ जावल बहुत काय लिहिणे लोभ असों दीजे हे विनती

ले ४११ [२०१] — चैत्र व ९ श १७०५ ता २५-४-१७८३

॥ श्री ॥

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनती उपरि सुरतेस श्रीमत राजश्री दादासाहेबास इग्रज खर्चास देत होते ते हल्लीं देत नाहींत व इग्रजाचा तह जाला हे चित्तात आणून चोहीकडे राजकारणें दादासाहेब यांचीं चालीस लागलीं टिपू, नबाब, भोसले वगैरे याजकडेही कारकून रवाना केले याप्रमाणें बातम्या येतात त्यास दादासाहेबास इग्रजानीं स्वाधीन करावे असे करारातच आहे राजश्री पाटील बावाचे स्वाधीन जाल्यास सरकारात हवालीं करतील, परतु मध्येंच कोठे निघून गेले तर ठीक नाहीं याचा बदोबस्त जरूर करावा इग्रजाची अटकही नाहीं पाच सात कोस जातात येतात असें आहे याकरिता लिहिलें आहे मध्येच निघोन गेले तर इग्रज म्हणतील, आम्हीं काय करावें आणि तह तर जाला मुद्दा हातचा गेला असें होईल याचा बदोबस्त चागला करावा रा। छ २२ जमादिलावल हे विनती

---

ले ४१२ [३१०] — चैत्र व ९ श १७०५ ता २५-४-१७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनती उपरि राजश्री पाटीलबावानीं इग्रजाशीं सलूख करून परस्परे तहनामे दिले घेतले इकडे तों फराशीस भारी सरजामानिशीं आले टिपूनीं बिदनूर प्रांतीं हगाम केला या उपर उलटून फराशीस आपण एक होउन चेनापटण घेतले तर मसलत भारी पडेल दक्षणेंत इग्रजाचें मकाण सुरत मुबई खेरीज नाहीं करनाटक निवैर टिपू फराशीस एक. तेव्हा कसा कल बसेल न कळे यास्तव याची तजवीज पाटीलबावास,काय ठरवितात, मनसबा कसा करावा येविशा एकातीं चार घटका निवळ बोलोन, पक्का मनसबा काय सागतात तो लेहून पाठवावा इग्रजाचा तह ठरला हा एके प्रकारे ये समयीं बरा होता त्यास हल्लीं भारी सरजामानशीं फराशीस आले ते व टिपू एक, त्यात दुसरे मातबर कोण कोण मिळतील, अशा तिडणी आहेत यात कसा कल बसेल, याकरता याचा पुर्ता विचार करून लिहून पाठवावें रवाना छ २२ जमादिलावल हे विनती

---

ले ४१३ [३०९] — चैत्र व ९ श १७०५ ता २५-४-१७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनती उपरि राजश्री पाटीलबावा म्हणतील कीं, टिपूशीं सलूख केल्याप्रमाणें बोलावें ऐकिल्यास उत्तम नच ऐकेल तर आपलें वचन क्रिया उगवली मग इग्रजाची

कुमक करावी यांत सरकारचा नफा आहे ऐशास यांत एक पेंच आहे कोणता म्हणाल तर सरकारातून फौजा पाठवणें व कुमक करणें हें कांहीं बरसातींत घडत नाहीं दसरा झालिया वरील तजवीज दसऱ्यास साहा महिने अवकाश टिपू सरजाम सुद्धां पाऊसकाळ न म्हणता लढाईस मबजूद फरासीसही भारी जमाव सुद्धां आल दोघेहा मजबूद श्रीमताचा सलूख झाला हें समजलें आहे, तेऱ्हा फुरसत पडू न देतां चेनापट्टणावर जातात इग्रजी जमाव व कलकत्ते व असफुदौला कडील तालुक्यांतील व अतरवेद, सुरत, मुबई आदिकरून दौलतीचा लढाईचा सरजाम व मातबर सरदार व गोरे जमायत चेनापट्टणास जमलीं तेथें मोठाच लढाई पडेल न जाणों, चेनापट्टण घेतलें तर सारा जमाव निकड करून कामास येईल दुसरीकडे निघून जावयास ठिकाण नाहीं हा जमाव पेंचात आला असता पुढें इग्रजापाशीं कांहीं नाहा असें जाणावें आणि टोपीकरांचा पल्लाही लाब बरें काय चिंता आहे, वरीस दोन वर्षे दम खाऊन मजबूतपणें पुढें करणें तें करू, असेंही कौन्सिलात इग्रज ठरवितील तेऱ्हा टिपू व फरासीस जबरदस्त कर्नाटक निरवैर जालें नजर मुबई सुरतेवर ठेवतील किंवा काय मनसबा करतील हें क्यासात येत नाहीं असें जाल्यास भारी तिढण पडेल फरासीस दहा बारा हजार गोरा उतरला, तेऱ्हा याचें आश्चर्य नाहीं घडू शके विलायतेस फरासास व वलदज व पुर्तकेश तिघे टोपावाले एक झाले आहेत असें ऐकितो श्रीमतांचे दौलतीचें ओझें पाटालबावावर यास्तव याचें पूर्तेपणीं मनन करून पाटीलबावानीं ल्याहावें खुलासा उत्तरें लौकर यावीं रा छ २२ जमादिलावल हे विनती

---

ले ४१४
[२३५]

चैत्र व ९ श १७०५
ता २५ ४ १७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनंति उपरि इग्रजाशीं सलुख तुह्मासुद्धा आम्हीं केला त्याप्रमाणें तुम्ही ऐकावें हें उत्तम, हें साफ टिपूशीं बोलावें की न बोलावें इकडून आदी काय पडदा पळायास केला नाहीं नबाब बाहदुरासुद्धां इग्रजाशीं सलुख केला याचा तपशील मागाहून पक्कें ठरल्यावर लिहून पाठवू, ऐशा पाटील्बावाचीं पत्रें आलीं, इतकाच मजकूर सागितला लौकिकात सलुखाचा गलबा सपूर्ण झाला आम्ही मात्र टिपूस लिहिलें नाहीं सदरीं लिहिल्याप्रमाणें बोललों पुढे स्पष्ट बोलावें किंवा दुसरें कांहीं सांगून नाद ठेवावयाची तजवीज करून ठरावून त्यांशीं कसें बोलावें हें पाटील्बावास पुसून लिहून पाठवावें तूर्त समेट करावयाच्या युक्तीनें टिपूशीं बोलावें म्हणतील तर फराशिसाचे व टिपूचे दारमदार झाले, त्यावरून फराशीस आले बिदनूर घेतल्याच दाखल तेऱ्हां हें बोलणें त्यांस गोड लागणार नाहीं चेनापट्टण कदाचित घेतलें तर मग तों नजर ठिकाणींच राहणार नाहीं

इग्रजाशीं तह जाहाला हे वर्तमान फराशिसांकडील वकील मुसामुताण यास परभारें समजलें, त्यावरून वकील येऊन निरोप मागू लागला, तेव्हां त्याशीं टिपूस जितका मजकूर कळविला तितकाच वकालाशीं बोलण्यात आणिला पुढें फराशिसासीं कसें बोलावें, राजकारण राखावें किंवा तोडावें, याचा विचार पाटीलबावास पुसून लिहून पाठवावा इग्रजाचा तह जाहाला असता फराशिसाचा वकील रहात नाहीं मुसा- भुसी भारी सरजामानिशीं आला, तेव्हा मनसबा कसा पडेल कळत नाहीं र॥ छ २२ जमादिलावल हे विनंति

---

ले ४१५ ⎫
[ २१३ ]⎭

⎧चत्र व ११ श १७०५
⎩ता २७-४ १७८३

श्री

सेवेसीं आज्ञाधारक गोविंद राम कृतानेक विज्ञापना ऐसिजे ता छ २४ जमादिलावर मुक्काम पुणें पावेतों साहेबाचे कृपेकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असो विशेष राजश्री नारो शिवदेव यानीं श्रीमत राजश्री नाना स्वामीस पत्र पाठविलें कीं, गोविंद राम यानीं पुण्याहून पाटलिबावास पत्रें लिहिलीं कीं खासा नबाब पुण्यास येणार, हैदरखान मेला, पाठीमागे टिपूवर इग्रजाची मसलत, या समयीं त्याचा उपराळा न केला तर इग्रज त्याची दौलत घेऊन पुढेंही चाल करतील याचा इतबार नाहीं, या करता सरकार व नबाब याणीं टिपूची कुमक करून इग्रजाचा रेंच मोडावा टिपूचाही पैगाम आहे कीं खानाचा काळ जाला, या समयीं आमची कुमक करावी मुसा भुसी फरासीस आपले जमावासुद्धा टिपूजवळ येऊन पोंहोंचला एक वकीलही पुण्यास आला आहे पचवीस लक्ष रुपये तूर्त फौजेस मदत खर्च ध्यावा याप्रमाणें आतून नूरमहमदखानाचे विद्यमानें ठराव होऊन सरकारची दहा बारा हजार फौज मिरज्कर, रास्ते वगैर मिळाले तिकडे रवाना होणार, तर्तूद होते नबाबासही काहीं द्यावें आणि आपले कुमकेस न्यावें याप्रमाणें टिपूचे घाट आहेत नबाब हीच मसलत बोलावयाकरिता पुण्यास येतात येविशीं येथीलही कारभारी याचे समत आहे आपले हातून इग्रजाचा तह झाला नाहीं हें मुख्य साऱ्याच्या पोटात आहे, या करिता सारे एक होऊन टिपूची कुमक करावी याप्रमाणें विचार होतात कदाचित् त्याची कुमक न केली आणि शिंद्यांनीं तह केला हाच सिद्धीस न्यावा तर इग्रज त्याच्या लगामीं राहिले दुसरे श्रीमत राजश्री दादासाहेबास आपले बगलेंत ठेवणार, उपरातिक म्हणतील तसें ऐकावें कदाचित् मसलतीमुळें देशीं बोलाविलें तर इग्रजाचीं पलटणें बरोबर घेऊन मातबर जमावानिशीं येणार तेव्हा स्वइच्छा व्यवहार होईल तेंही ठीक नाहीं यास्तव तूर्त नूरमहमदखानाचे विद्यमानें ठराव होतो त्याप्रमाणे पैका घेऊन टिपूकडे फौज रवाना करावी पर्जन्यकाळ जवळ आला, दोन महिने दरम्यान आहेत, इतक्यात फौजेची तयारी होऊन फौज रवाना करावयास मासपक्ष पाहिजे, त्यावर सरदार व येथून जाईल त्याणीं तुगभद्रा

तीरीं छावणी करावी, इकडे पाटीलबावास लिहून पाठवावयासि येईल का, तुम्हीं टिपूचे मसलतीस फौज रवाना करावयासि लिहिलें त्यावरून दहा हजार बारा हजार फौज रवाना केली, परंतु दरम्यान बरसात आली आहे, याकरितां छावणी तुंगभद्रा तीरीं होऊन बादवरसात चुकवून अर्थ ध्यानास येताल तो पावेतों सरकारचे किल्ले कोट मुलूक इंग्रजाकडून सरकारात यावयाचे व दादासाहेब यावयाचे याचें काय होते तेंही समजेल ज्यात सरकारचा नफा आडळेल तशासारखे डौल धरावयासि येतील असे विचार एकातात होतात फौज अवश्यमेव टिपूचे कुमकेस रवाना होते यात संदेह नाहीं याप्रमाणें गोविंद राम याचीं पत्रें पुण्याहून श्रीमंत राजश्री पाटीलबावास आलीं त्यातील मजकूर सदर्हू प्रमाणें पाटील बावानीं आम्हास सागितला म्हणोन मशारनिल्हेचीं पत्रें सरकारात आलीं, तीं नाना स्वामींनीं मजला दाखविलीं, त्यावरून त्या पत्रातील मालुमात वरून सेवेशीं विनंतीपत्र लिहिलें आहे, ध्यानास येईल ऐसियास रास्ते व परशरामभाऊ याजकडील दहा हजार फौज टिपूचे कुमकेस पाठविणार म्हणोन बाजार वदता ऐकिल्यावरून मात्र लिहिलें होतें मागाहून शोध पहाताना हे वर्तमान मिथ्या म्हणोन सेवेशीं विनंती लिहिली होती वरकड मजकूर मालुमातील प्रमाणे मीं ऐकलेंही नाहीं, आणि सेवेशींही लिहिलें नाहीं असे असता हा मजकूर येथें लिहून आला, त्यावरून सेवेशीं विनंती लिहिली असो साहेबाचे सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले ४१६ [ २६९ ]

चैत्र व १२ श १७०५ ता २८-४-१७८३

॥ श्री ॥

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं

विनंति उपरि रामजी पाटलास पाठवावा हा निश्चय ठरल्यावर राजश्री पाटीलबावानीं राजश्री आपाजीराम यास व मजला बोलावून सागितलें जे, पुण्याहून गोविंद राम व रामजी पाटलाकडून कारकून याचीं पत्रें आलीं त्यात त्याणीं लिहिलें आहे कीं, नबाब पुण्यास येणार व टिपूचे कुमकेस रास्ते मिरजकर वगैरे मिळोन दहा हजार फौज सरकारची जाणार याप्रमाणें लिहिलें आहे व इंग्रजाचे घरीं बातमी आली त्याणींही सागोन पाठविले त्यास तह जहाला असता टिपूचे कुमकेस फौज जाणार हें ठीक कीं काय ? पंचवीस लक्ष रुपये तूर्त सरकारचे फौजेस मदत खर्च घ्यावा याप्रमाणें नूर महमदखानाचे विद्यमानें ठराव जहाला आहे त्याप्रमाणें पैका घेऊन फौज तिकडे रवाना करावी इकडे टिपूचे मसलतीस फौज रवाना केली असें लिहून दोहोंकडे नाद राहून फौजेची छावणी तुंगभद्रातिरीं करवावी चातुर्मास्यात चोहोंकडील विचार ध्यानात आणून पुढें पहावें तसें करावें याप्रमाणें विचार होतात त्यास आधीं टिपूजवळ फौज गेल्याखेरीज पैका तो देईल हें घडणें जरूर त्यातही दिल्हा तर ही गोष्ट लपणार नाहीं मग दोहोंकडे नाद कसे रहातील ? जें होणें तें विचा

रून व्हावें तशाच मर्जी असल्यास त्यासारखा विचार करावा लागेल यास्तव रामजा जाधव यास पाठवितो टिपून इग्रज [ व ] महमदअल्लाखानाचा मुलूख सोडून देऊन खलष तोडावा न ऐकल्यास इग्रजानीं ताण बसविलाच आहे इकडून सरकारची फौज पाठवून मुलूख सोडवावयास लागावें येविशा दोन तान खानग्या केल्या असता अद्याप उत्तर देखिल येत नाहीं असो, हल्लीं तोच मजकूर रामजी जाधव याजबरोबर सागोन पाठवितों ते राजश्रा नाना यासि बोलताल पूर्वी पत्रे पाठविल्यावरून नर महमदखानाशीं बोलोन त्याचीं पत्रे टिपूकडे जाऊन उत्तरे आला असतील तेहा कळतील कदाचित् बोलले नसले तर मशारनिन्हे त्याशीं बोल्ताल या कामा करताच यास पाठवितों याप्रमाणें बोलणे जहाले म्हणोन लिहिलें तें सविस्तर कळलें त्यास नबाब आपले जागा आहेत त्याचे पुण्यास यावयाचे येथे तर काहीं समजण्यात नाहा टिपूचे कुमकेस मिरजकर व रास्ते मिळोन वगैरे दहा हजार फौज सरकारची जाणार म्हणून लिहिलें त्यास मिरजकर तर लग्नास निरोप घेऊन गेले रास्ते येथें आहेत इकडे तह होत असता फौज टिपूचे कुमकेस पाठवावयाचें कसे घडेल ? व पचवीस लक्ष रुपये सरकारचे फौजेस टिपूनें मदत खर्च देणे हेंही घडणें कळलेच आहे सरकारचे खडणीचे रुपये कराराप्रमाणें सालोसालचे कोठें येतात, तेव्हां हे देईल ? असो, फौज कुमकेस टिपूचे पाठवून इकडे लिहावें का, मसलतीस पाठविली, तेव्हा दोन्ही नाद कसे रहातात , म्हणोन लिहिले त्यास फौज पाठवायाची सभूतही येथे नाही, तेव्हा जाते कोठून ? टिपूनें कराराप्रमाणें इग्रज [ व ] महमद अल्लीखानाचा मुलूख सोडून देणें व पाडाव सोडून देणें हें न ऐकल्यास मसलत करण्याचे विचार त्यास बरसात आली इतक्यात टिपूचा उत्तरें येणें आहेत तें आल्यावर समजेल त्यासारखा विचार कराराप्रमाणें टिपूनें न ऐकल्यास बाजबरसात टिपूवर मसल्त करणें प्राप्त त्यास सरकारचा प्रकार तर पैक्याची ओढ सरकारात कोणे प्रकारची हे सर्व ध्यानातच आहे होळकराविशींचा प्रकार पेशजी किती वेळ विस्तरें करून लिहून पाठविला, परतु त्या पत्राचीं उत्तरेंच येत नाहींत या वरून काय समजावें ? छ १७ मजकुरीं खानगी केली त्यांत साराच तपशील उलगडून लिहून पाठविला आहे या उपरि पत्राचे उत्तरास विलब नसावा लिहून पाठविले आहे त्याप्रमाणें परिछिन्न पाटीलबावानीं बाईस सागोन पाठवावें कीं, चार महाल तुम्हाकडे आहेत, त्यापैका डौलाचे खर्चापुरता ऐवज ठेवून बाकी ऐवज सरदारीकडे पाठवून द्यावा व वरकड महाल रदकर्ज सुद्धा तुकोजाबावाकडील महालकरी आहेत त्याची वहिवाट ते करतील मसलतामुळें चार रुपये अधिकआगळे घेऊन सरकार काम करतील यास अडथळा बाईचा नसावा याप्रमाणें साफ सागोन पाठवावें आणि अमलात यावें पत्राचें उत्तर लवकर पाठवावें, तुम्हीं दुसरे लिहिलें की, रामजी जाधव याचा खानगी करतों, कराराप्रमाणे टिपूनें इग्रज [ व ] महमदअल्लाचा मुलूख व पाडाव न सोडल्यास इग्रजानीं ताण बसविलाच आहे इकडून सरकारचा फौज पाठवून मुलूख सोडवावयास लागावें येविशा दोन तीन खानग्या केल्या असता अद्याप उत्तरें देखील येत नाहींत असो हल्लीं तो मजकूर रामजी पाटलाबरा

बर सांगोन पाठवितों, ते नानाशीं बोलतील म्हणोन लिहिलें त्यास टिपूनेंच इंग्रजास ताण दिला बिदनूर जुरतीनें घेऊन इंग्रज हत्यारें ठेवून कौल घेऊन बाहेर निघाले ते कैद केले येविशींचे वर्तमानाचीं पत्रें पेशजी रवाना केलीं त्यावरून सविस्तर कळलेंच असेल तेव्हा इंग्रज व महमदअलीचा मुलुख व पाडाव सोडणें कळलेंच आहे तथापि पेशजी पाटीलबावांनीं लिहिल्यावरून नूरमहमद खानाशीं बोलून पत्रें टिपूस पाठविलीं आहेत त्याचा उत्तरें कशीं येतात पहावें पत्रें पाठविलीं असता उत्तरें देखाल येत नाहींत म्हणोन लिहिलें, त्यास कोणत्या पत्राचीं उत्तरें जाण्याची राहिलीं ? जीं पत्रें येतात त्याची रवानगी वरचेवर उत्तरें लिहून करीतच आहों व जहाला मजकूर तोंही वरचेवर लिहित असतों झाडून मजकूर जमा धरून उत्तरें जातात तिकडून पत्रें येतात त्यातच मजकूर जमा न धरता उत्तरें येतात तेव्हा पत्र पावलें कोणते, न पावलें कोणतें हेंही समजत नाहीं रा छ १५ जमादिलाखर हे विनंती

---

ले ४१७ [२२८] — वैशाख शु ११ श १७०५ ता ११ ५ १७८३

श्री

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं

विनंति उपरि तुम्ही छ २१ रबिलाखर व छ ६ जमादिलावलचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं लिहिलें वर्तमान सविस्तर कळलें उत्तरें अलाहिदा लिहिलीं आहेत त्यावरून कळेल प्रस्तुत ग्वालेर किल्यास तोफा लाविल्या आहेत, मोचेही चालतात, शहरांत अमल पाटीलबावांचा आहेच, किल्ला मात्र लढतो तो ही लवकरच सुटेल, किल्या खालीं बदलगड होता तो घेतला म्हणोन लिहिलें तें कळलें उत्तम आहे ग्वालेर तालुक्यांत राजश्री शिवाजी विठ्ठल यांचा सरंजाम आहे तो त्यांकडे चालवावा असा करार आहे, त्या प्रमाणे त्याचा त्यांकडे दिला असल्यास बरेंच झालें नाहीं तर द्यावा रवाना छ ९ जमादिलाखर हे विनंति राजश्री पाटीलबावाचीं पत्रें आलीं त्याचीं उत्तरें पाठविलीं आहेत प्रविष्ट करावा हे विनंति

---

ले ४१८ [३४४] — वैशाख शु १३ श १७०५ ता १४-५-१७८३

॥ श्री ॥

राजश्री आपाजीराम स्वामींचे सेवेशीं

विनंती उपरि इंद्रसेन येऊन तह पक्का जाला उमदा माणूस प्रमाणिक आहे या करितां दोन लक्षाची जागीर द्यावयास करार केला आहे त्याप्रमाणें सुरत अठ्ठाविशींत दोन लक्षाचे ज्यागिरीच्या सनदा इंद्रसेनाचे नावें पाठवून द्याव्या, म्हणोन सांगितलें, त्यावरून विनंती लिहिली आहे, म्हणोन विस्तारें लिहिलें त्यास वकिलास जागीर द्यावयाचा करार,

मागें तह जाले, परतु कोठें केला नाहीं उदिधीन साधी सुद्धा बोलत होता, परतु इद्रसन आल्यामुळ यास निरोप दिल्हा त्यास साष्टीचेंही त्याच्याने जाले नाहीं असो, पाटीलबावानीं लिहिल्यावरून गायकवाडाचे मुलखापैका सरकार ऐवजाशिवाय लाख रुपयाची जागीर द्यावयाचें बोलून लिहून पाठवावें म्हणोन लिहून पाठविलें आहे

गुजराथ दरोबस्त सुटली व सरकारचे किल्ले कोट, सरकारात आले म्हणजे शिवाजी विठ्ठल व त्रिंबक नारायण व आनदराव गोपाळ वगैरे सर्वही स्वामींस लिहिताल व विनती करताल परतु सरकार ओढगस्तींत कांहीं अर्थ राहिला नाहीं त्यापक्षीं याचा विचार करून करणें ते करावें सरकार चाकरी करून दाखवावी, आणि करतील असा अर्थ पहता तूर्त शिवाजी विठ्ठल मात्र आहेत वरकडानीं सरजाम खावून असावें इतकाच अर्थ आहे सुचली विनता लिहिली आहे, म्हणोन लिहिलें त्यास मुलूख किल्ले सरकारात आल्यावर समजून करणें तें केलें जाईल तुम्हीं लिहिलें हाच विचार येथील आहे

रवाना छ १२ जमादिलाखर हे विनंती

---

ले ४१९ }
[ २९७ ] }

{वैशाख व १२ श १७०५
{ता २७-५-१७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि टिपूनें इग्रज व महमद अलीखानाचा मुलूख सोडून द्यावा याप्रमाणें टिपूस सांगोन पाठवावें त्याणें एकिल्यास उत्तम न ऐकिल्यास सरकार व इग्रेज मिळोन मसलत करावी याप्रमाणें तहनाम्यांत कलम लिहिलें आहे त्यास इग्रेज शेर जहाले आणि बिदनूर घेतलें म्हणोन तिकडे वर्तमान गेल्यावरून टिपूचे मसलतीस फौज लौकर जावी, म्हणोन पाटीलबावानीं दोन तीन वेळ लिहिलें त्यावर टिपूनें जुरतानें बिदनूर घेतल्याची बातमी आली ती मागाहून लिहून पाठविली तीं पत्रें पावल्यापूर्वींच रामजी पाटलाचे येण्याची तजवीज करून रवानगी केली याचें कारण असें असेल कीं, रामजीपाटलाचे मनांतून इकडे येणें, त्यास कांहीं तरी बहाणा असावा याकरता हीं साधनें आबा चिटणिसाचे विद्यमानें लावून निघणें होय असें केल, व गोविंदपत व रामजी पाटलाचे कारकून येथें आहेत त्यास रामजी पाटलानें असेंही लिहिलें असेल, कीं तुम्हीं हरतऱ्हेनें बनावून वर्तमान लिहून पाठवावे म्हणजे आमचें येणें तिकडे होईल असेंही लिहून पाठविलें असेलसें वाटतें त्यावरून त्याणीं लिहिल असेल एऱ्हवीं उगेच वांहा नसता असें विना सुचने वेगळ कांहीं लिहवणार नाहीं तस्मात् सूचना आहे याचा तुम्हीही बारकाईनें शोध करून लिहून पाठवावें इद्रसेनानेंही फौज टिपूचे कुमकेस जाते म्हणोन पाटीलबावाकडे सागोन पाठविलें त्यास येथें ही गोष्ट नसतां इग्रेज लटकें सांगून पाठविणार नाहींत इग्रेजाकडील बोलण्याचे

मध्यस्त रामजी पाटलांनीं ममतेंत घेतले असतील, त्यांणीं पाटीलबावाजवळ बनावणी केली असेल रा छ २५ जमादिलाखर हे विनंती

---

ले ४२० }
[ २५४ ] }

{ वैशाख व १२ श १७०५
{ ता २७-५-१७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनति उपरि राजश्री पांडुरंग रघुनाथ याणीं छ ७ जमादिलावलचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं लिहिलें वर्तमान सविस्तर कळलें पुढे होईल वर्तमान तें वरचेवर लिहून पाठवित जावे ग्वालेर किल्यास उरवाई कडून तोफांची मारागिरा व मोर्चेही लाविले आहेत, सुरुंग ही चालतो, म्हणून पेशजी लिहिलें होतें त्यावर प्रस्तुत तो सुरुंग उडविला त्यावर उरवाईचा बुरुज तिन हिसे पडला हल्लीं आणखी दोन तीन सुरुंग चालविले आहेत तोफांची मारगिरा सुरू आहे खासास्वारी मोर्च्यावर जात असत्ये, म्हणून लिहिलें तें कळलें त्यास उरवाई बुरुज तिन हिस्से उडाल्यावरून त्यासही विचारच पडला असेल आणखी सुरुंग लाविले त्यापक्षीं घाबरे होऊन सूत्र लावतील असेंहा वाटते पुढें वरचेवर वर्तमान लिहीत जावे रा छ २५ जमादिलाखर हे बिनती

---

ले ४२१ }
[ २९९ ] }

{ वैशाख व १२ श १७०५
{ ता २७ ५ १७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनति उपरि पूर्वी रकारनामक पुण्यात असतां दाब व पराक्रम आणखीच होता येथें आल्यानतर एक दिवसही सरकार उपयोगाची गोष्ट बोल्ले नाहींत उलटे येथील रंगात हमरंग होऊन तहनामा देते समयीं आमचा व पाटीलबावाचा तट पडला ते समयीं बोलले जे, तेथील प्रसग मी पाहून आलो तेथे अगदीं पोकळ आहे, येथे वकाल मात्र बोहून बिक तात त्यावर तहाचा शेवट जाहला तो पूर्वी सविस्तर लिहिलाच आहे तह झाल्यावर रकार नामकास कोण पुसतो ? येथे काल हरण करीत होते, परतु मोठी क्षित मागती पुण्यांत जाऊन कारभार करावा पैका मिळवावा याकरिता आबा चिटणीसाचें साधन केलें होतें साप्रत प्रसग पाहून आबाना पुण्यास मशारनिल्हेस पाठवावें असें सिद्ध केले त्यावर भाईस सल्लाह विचारिली भाईचे मनात त्यास पाठवू नये परतु गोष्ट सिद्ध झाल्यावर नाहीं म्हटल्यास काय सदेह येईल ? त्यामुळे समत देणें प्राप्त झालें आम्हावर तहनाम्यामुळें गैर मर्जी जहाली, तेव्हापासून मशारनिल्हेस मोठा सतोष जहाला आलीकडे रवानगी सिद्ध जहाली तेव्हां कोणकोणापाशीं आमच्या वलगनाही जहाल्या आहेत असो, या उपर इकडील वर्त-

मानाचा पत्रें येतील त्यात अर्थ गोड असेल तितका त्यास कळविल्यास चिंता नाहीं कचें पक्के मात्र त्याशीं बोलण्यात येऊ नये व त्यास समजू नये म्हणोन विस्तारें करून लिहिलें तें सविस्तर कळलें त्यास येथून जातें समया बोलले कीं, मा येथें काय बोलून दाखवू ? तेथे गेल्यावर पाटीलबावाशीं बोलून खामखा सरकारच्या मर्जीनरूप काम करून दाखवितों याप्रमाणें बहुत खातरजमेनें बोलले तेथें गेल्यावर काहींच घडलें नाहीं असो, जें त्याच्या उचितास आलें ते त्याणीं केलें हल्लीं येथें येणार आल्यावर समजूनच घडणे तें घडेल उगाच वल्गनाही केल्या असल्या तरी काय होणार ? असो, तुमचें लक्ष यथास्थित आहे त्यापक्षीं चिंता नाहीं रामजी पाटील खातरजमेने बोलले असता काहीं घडलें नाहीं, तेंव्हा त्याचेंही स्वरूप समजलें + रामजी पाटील काल येथें आले बोलणे जहाल्यावर समजले तुम्हास येण्याविशा पूर्वीं पत्र पाठविलें त्याबरून उद्योग केलाच असेल, रवाना छ २५ जमादिलाखर हे विनती

---

ले ४२२
[ २९८ ]

वैशाख व १२ श १७०५
ता २७ ५ १७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनति उपरि इंग्रजाचा व सरकारचा तह होऊन परस्परें तहनामे दिले घेतले याचा लौकिकही चोहींकडे जाला इकडे टिपूनें अर्काटाकडे फौज व भारा सरजाम चेनापट्टणकर इंग्रेजाचे तोंडावर ठेवून आपण येऊन बिदनूर घेतलें आत इंग्रेज गोरे एक हजार व साडे तीन हजार कवाइती माणूस किल्यात होतें तें धरून तेथील जनराल सुद्धा कैद केले, या मुळें गर्वही जाला त्यात मुसाभुसी फराशीस भारी जमावानसीं गुडलूर बदरास येऊन दाखल जाला पुढें आपणही तिकडे जाऊन फराशास व आपण एक होऊन चेनपट्टणावर जाऊन चेनापट्टण घ्यावें हा इरादा होता त्यास सरकारचा इंग्रेजाचा तह जाला हें वर्तमान कळलें यावरून बल्हारी गुती येथें आपण छावणी करणार खाशा टिपूबरोबर ही सरजाम भारी आहे कदाचित श्रीमताकडून कसें होईल या करिता आपण छावणी इकडे करून मुसाभुसी व आपला सरजाम अर्काटावर आहे तो एक करून चेनापट्टनावर मसलत करणार निजाम अल्ली खान याणींही एक वकील मातबर मुसाभुसीकडे पाठविला आहे हैदरखानाचा वकील तों नबाबाजवळ आहेच सरकारचा इंग्रेजाचा तह जाला, तेंव्हा टिपूस भरवसा सरकारचा मोठा होता तो तुटला तव्हा नबाब, टिपू, फराशीस एकत्र होतील किंवा कसें घडेल समजत नाहीं चोहीकडून एक प्रकार मसलत दिसते हल्लीं मुसाभुसी याचें पत्र आम्हास आले त्याची नक्कल राजश्री पाटीलबावास पहावयास पाठविली आहे. पुढें मसलतीचा विचार कसा हें सविस्तर बोलून पाठवावें रा। छ २५ जमादिलाखर हे विनती

---

+ येथपासून नानाचें अक्षर

ले ४२३ } [ २०३ ] }

{ ज्येष्ठ शु ४ श १७०५ { ता। ४-६ १७८३

॥ श्री ॥

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि श्रीमत राजश्री दादा साहेबाच्या कारकुनाबरोबर मुद्याची याद आली ती तुम्हीं क्लमवार पत्रीं लिहिली ती कळली तिचा तपशील पाटीलबावानीं लावून उत्तरें केलीं कीं, पैका आम्हापाशीं कशाचा ? नित्य कर्ज घेऊन भक्षावे अशी अवस्था आहे सरजामाचा प्रकार म्हणाल तर आज घडत नाहीं तुम्हीं येथें यावें पोटपाण्याची बेगमी थोडी बहुत घडेल तीस बत्तीस तोफा आहेत इतक्यास बैल मिळावयाचे नाहींत तोफा साऱ्या भडोजेस टाकाव्या दोन चार बराबर आणाव्या धनीपणाचा कायदा तर आपण धनीच आहेत, त्या पक्षीं याचे पुसणें काय ? याप्रमाणें भवती न भवती चालली आहे परतु असा विचार आहे कीं, लाख रुपये पावेतों खर्चास द्यावे आणि बोलण्या चालण्यात त्याची अधीक आगळा खातरजमा करून कोणतेही प्रकारें उज्जनास आणावे म्हणोन लिहिलें त्यास जाजता मुद्दे ऐकावयाचे नाहींत ऐकू नयेत जर करिता इकडे गोदातीरीं रहाण्यास येऊच लागले तर पाटीलबावानीं इग्रजांचे तहात करार केला आहे त्याच धोरणानें घडेल येविशीं पेशजीं लिहून पाठविलेंच आहे, त्यावरून कळेलच रा। छ ३ रजब हे विनती

---

ले ४२४ } [ २०४ ] }

{ ज्येष्ठ व ७ शके १७०५ { ता। १६-६-१७८३

॥ श्री ॥

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशीं

विनती उपरि राजश्री केसो अनत य.नीं सुरतेहून पत्र पाठविलें कीं, श्रीमत राजश्री दादासाहेबानीं आपणाकडे राजकारण येण्याविशीं लाविलें आहे त्यास राजश्री पाटीलबावानींही मला हेच आज्ञा केली कीं, श्रीमत आपणाकडे जात असल्यास उत्तम आहे त्याची खातरजमा न होय तर उज्जनीस जावें त्यास आपणाकडे येत असले तर यात पाटीलबावास सतोष आहे लौकर जाणें होय तर करावें नाहीं तर याचीं राजकारणें होऊ लागलीं आहेत याप्रमाणें लिहून आलें व राजश्री रामजी पाटील याचेंही बोलणें कीं, दादासाहेब इकडे आल्यास पाटीलबावासही सतोष आहे तेव्हा उपेक्षा केली तर कोणी कडे निघोन जातील कळत नाहीं याजकरिता त्याची खातरजमा करून आणावयास राजश्री हरीपत, होळकर, रास्ते, पाडुरगराव यास पाठवावयाचें केलें तुम्हास कळावें म्हणोन लिहिलें आहे राजश्री पाटीलबावास पत्रें लिहिलीं आहेत प्रविष्ट करावीं रा। छ १५ रजब हे विनती

---

ले ४२७ }
[२७१] }

{ ज्येष्ठ व २ श १७०५
{ ता १६-५-१७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनंती उपरि मुसाबुशी फाराशीस भारी सरजामानिशीं गुडलूर बंदरास येऊन दाखल जहाला त्याचे पत्र आम्हास आलें त्यातील मजकूर कळण्याकरिता नक्कल पत्राची करून तुम्हाकडे पाहण्याकरिता पाठविली त्याजवरून सविस्तर कळलेंच असेल टिपूमिया यास येथून लिहून गेले आहे याप्रमाणें त्याणें ऐकिल्यास उत्तम न ऐकिल्यास मसलत करणें प्राप्त, तेव्हा त्याची तर्तूद श्रावण भाद्रपदमास पावेतों जहाली पाहिजे त्यास होळकर मातबर सरदार, त्याचे घरीं बखेडा, त्याचा बदोबस्त होऊन फौज सुद्धा मसलतीवर मुतवजे केले पाहिजेत ऐशास होळकराचे बखेडेयाचे बदोबस्ताविशीं पेशजी किती वेळा लिहून पाठविलें, परतु बदोबस्त होऊन आला नाहीं त्यास याउपर पेशजी लिहिल्याप्रमाणे लवकर बदोबस्त होऊन यावा, म्हणजे मसलतीस उपयोगी पडेल * पूर्वी लिहिल्याअन्वयें गगाजलनिर्मळ अहि ल्याबाईस सागोन राजश्री तुकोजीबावाकडील महालकरी आहे, त्याची वहिवाट रदकर्जाचे महाल सुद्धा तुकोजीबाबानीं करावी त्यास बाईकडील अडथळा नसावा याप्रमाणे राजश्री पाटीलबावानी बाईस सामून उत्तर पाठवावें म्हणजे यानकडून भारी फौज ठेवून मसलतीवर घालवू सरकार कामाचा उपयोग जाणून लवकर करावें आता अवकाश राहिला नाहीं मागें पत्रे गेलीं त्याचीं उत्तरेंच येत नाहींत अपूर्व आहे रा। छ १५ रजब हे विनती

---

ले ४२८ }
[१६५X] }

{ ज्येष्ठ व २ श १७०५
{ ता १६-५-१७८३

॥ श्री ॥

राजेश्री आपाजीराम स्वामींचे सेवेशी

विनती उपरि तुम्हीं छ ११ जमादिलाखरचें पत्र पाठविलें तें पावलें धुळपानीं इग्रजाचे तराडियासि लढाई देऊन धरून नलीं त्याविशीं इद्रसेनास मुबईकरानें वर्तमान लिहून पाठविलें त्यानें राजश्री पाटीलबावास सागोन पाठविलें त्यावरून पाटीलबावानीं स्वामींस पत्र लिहिलें आहे व पाडुरग रघुनाथ याणींही सविस्तर लिहिलें आहे त्यास कराराप्रमाणें गोष्टी अमलात याव्या धुळपास ताकिद होऊन तराडीं माघारीं देवावीं म्हणून विस्तारें करून लिहिलें तें सविस्तर कळलें त्यास †धुळपानीं तराडीं वरील सरदार व लोक-

---

* येथ पासून खुद्द नानाचें अक्षर X जुना ले २११ वर हच हें पत्र आहे

† आनदराव धुळप म्हणून पेशव्याच्या आरमाराचे सरदार विजयदुर्ग जि॥ रत्नागिरी येथें असत वरील लढाई रत्नागिरीचे नजीकच झाली असें विविधज्ञान विस्तारात धुळपाचा पवाडा प्रसिद्ध झाला आहे त्यावरून होतें 'रेंजर' नावाचें इग्रजाचें लढाऊ तारू या वेळीं धुळपाच्या तडाक्यांत सापडलें होतें

सुद्धा दस्त केला ते तह जाला त्यापक्षा सोडून द्यावयाचा त्यात मुबैकराचे पत्रही आलें त्यावरून तेव्हाच घुळपास लिहून सोडून दिल्हा राजश्री पाटालबावास उत्तर लिहिले आहे रवाना छ १५ रज्जब हे विनती

---

ले ४२७ [२१०] | आषाढ शु ५ श १७०५ ता ४-७-१७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशी

विनति उपरि इग्रजाचे तराडीं मुबईहून बिदनुराकडे जात होता, त्यावर इग्रजाकडील मातबर सरदार होता त्यास तीं तराडा घुळपाना सरदारासुद्धा पाडाव करून आणलीं त्यावि शीं सरकारातून मुबैकराचे पत्र आलें कीं सरकारचा आमचा दोस्ता त्या पक्षीं तराडा वराल सरदार व लोक सुद्धा सोडून देवावीं त्यावरून तराडा सरदार व लोक सुद्धा घुळपास लिहून सोडवून देविला वर्तमान तुम्हास कळावयाकरिता लिहिलें आहे तरांड्यावरील इग्रजाकडील लोकानीं ल्ढाई मातबर दिला धुळपानाही चागला लढाई देऊन दस्त केलें परतु तह जाला त्या पक्षा सोडून देविले रा छ ३ साबान हें विनता

---

ले ४२८ [२८१] | आश्विन शु ? श १७०५ ता २८-९-१७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनता उपरि इद्रसेनास निदान एक लक्षाची जागार गायकवाडाचे जागिरा पैका सरकार ऐवजा शिवाय द्यावयाचे बोलून लिहून पाठवणें म्हणोन आज्ञा, त्यास आज्ञेप्रमाणें राजश्री पाटालबावांशीं बोलला व त्यास पत्र होते तें दिलें उत्तर झालें कीं, इद्रसेनाचें मनो गत राखिल्यास सरकार उपयोगीच आहे, याजकरिता त्याशीं बालून दाड लक्ष रुपये वसुली जागा त्यास लावून द्यावी याप्रमाणे ठराव जाला आहे गायकवाडाचे मुलखापैका जागीर लावून देतो म्हटल्यास ठीक दिसत नाहा याजकरिता इद्रसेनास सरकार तालुक्यापैकीं दीड लाख रुपयाची वसुला जागा लावून द्यावी त्याच मोबदला गायकवाडापासून सरकारात घेतल्यास चिता नाहीं, असे म्हणतात म्हणोन लिहिले तें कळलें त्यास पूर्वी श्रीमत कैला- वासी याचे वेळेस तह झाले, व अलीकडे हेस्टिनाचे विद्यमानें पुरदरचे मुक्कामी तह झाला तेव्हा त्यास सरकारातून जागार दिला नाहीं, व चाल्हा नाहीं हल्लीं पाटीलबावा इद्रसेनास जागीर द्यावयाचे तुम्हा जवळ बोलले, त्यास सरकारचा मुद्दा साष्टीचा तसाच राहिला उदीष्टीन येथे आला होता त्याचे म्हणण्यात साष्टीचेहा बोलणें होते परतु पाटील बावाचें लिहिलें आलें, यावरून इद्रसेन सरकारचे नफे अधिक करील असें जाणून उदीष्टिनास

निरोप दिला इद्रसेनाचें बोलणें होऊन तह ठरला, त्यात साष्टीचे कलम अगदींच राहिलें तेव्हा सरकारचे नफे ते इद्रसेनाने काय केले ? तथापि पाटीबावानीं जागीर द्यावयाचें लिहिलें, बरें आहे परतु कलकत्याहून पाच कलमाचा करार होऊन यावयाचा आहे तो आला म्हणजे दीड लक्षाची जाहीर द्यावयाची सनद पाठवून देऊ रा। छ १ जिलकाद हें विनती

---

ले, ४२९ [२८१] — आश्विन शु २ श १७०५ ता २८-९-१७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशी

विनती उपरि पचवसि हजाराची वरात पाठविली ती पावली राजश्री पाटीलबावास दाखविली उत्तर अद्याप आले नाहीं पन्नास हजाराचे वरातेची कृपा जाली असती तर लोकाचे निमे देण्यापासून मुक्त होतों आणखी पचवीस हजाराचे वरातेविषयीं आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत म्हणोन लिहिले, त्यास तूर्त पचवीस देविले आहेत हे वसूल करून घ्यावे, आणि लिहून पाठवावे पुढें बाकीचाही ऐवज देविला जाईल रा। छ १ जिलकाद हे विनती

---

ले ४३० [ २७३ ] — आश्विन शु २ श १७०५ ता २८-९-१७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामीचे सेवेशी

विनती उपरि राजश्री विनायक विठ्ठल बऱ्हाणपूरचे कमावीसदार यास ताकिदी-विषयीं आज्ञा त्यास आज्ञेप्रमाणें राजश्री पाटीलबावाशी बोललो त्यानींही कमावीसदारास ताकीद केली परतु शहरचे मामलतीची घालमेल होणार यामुळे विनोबाशीं निक्षून बोलतां येत नाहीं मामलतीचा ठराव झालाच असेल श्रीमताचे लग्नाचे पन्नास हजार रुपयाचें कापड आलें बाकी वीस हजार रुपयाचें कापड येणे तसेंच राहिले आहे त्यास द्यावयाचें असलियास निक्षून कमावीसदारास ताकीद करून देवावें, नाहीं तर नाहीं म्हणून सागावें या प्रमाणें राजश्री पाटीलबावाशीं बोलून उत्तर होईल तें लिहून पाठवावें फर्मासी कापडाची पाच हजाराची वरात त्या प्रमाणें एक हजार रुपये पावले बाकी राहिले त्याची ताकीद करवावी रा। छ १ जिल्काद हे विनती

---

ले ४३१ [ २०८ ] — आश्विन शु २ श १७०५ ता २८-९-१७८३

श्री

राजश्री नारोपत स्वामींचे सेवेशीं

विनती उपरि दादासाहेबास तिकडे न्यावयास मसलत वकीलाची, असा बाबाच्या मनात सदेह येऊन आम्हावर मर्जी ठीक नाहीं, केवळ रामजी पाटील याचीं पत्रे येतीं तर बावास खरें न वाटते त्याबरावर दुसरे गृहस्थाचे पत्र मुकाबल्याचें होते त्यावरून खरें वाटले-

दादासाहेब तिकडे गेल्यामुळे मर्जी खट्टी आहे आम्हावर रोष बहुत आहे रामजी पाटलाचें जाणें राजश्री दाजीबा व गोविंदराव दि॥ कृष्णराव रास्ते याचे घरीं आहे दुसरें राघोपंत गुरुजी त्याचेच आहेत रामजी पाटलाचे पत्राबरोबर त्यांचींही पत्रे येत असतात म्हणोन व विशिखाचे बोलण्यात भाव निघाले कीं सांबास तिकडे घेऊन गेले, आता होळकर वगैरे एक गट होऊन मागती पुरंदरचे मसलती सारखा प्रसंग घडतो फिरून आमचें साधन करीत फिराल थोडक्याच दिवसात प्रत्ययास येईल म्हणून बोलण्यातील मजकूर विस्तारें लिहिला तो सर्व कळला त्यास श्रीमंत दादासाहेब इकडे येणार हे पूर्वीं अगोदरच पाटील बावास लिहिलें आहे असें असता, तुम्हीं लिहिल्यावरून इकडे आणावयाचे केले असें म्हणतात असो यथून लिहितात त्याप्रमाणें बोलतात हें लिहिणे प्रमाण मानू नये येखादे गोष्टीचा पक्का शोध लावून मग बोलावें विशिखाचे बोलण्यातील अर्थ लिहिला, त्यास पुढें मागें तसा प्रसंग जाल्यास पाटीलबावासच साभाळावें लागेल दादा साहेबाचा भरवसा कोणीही मानीत नाहींत भलतेकडेच जातील याकरितां आणावयाचे केलें परिणाम ईश्वराधीन आहे र॥ छ १ जिल्काद हे विनंती

---

ले ४३२ }
[ ३२९ ]}

{आश्विन शु ५ श १७०५
{ता॥ १-१०-१७८३

श्री

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशी

विनंति उपरि तुम्हा छ ४ रमजानचीं पत्रें व राजश्री पाटीलबावाचीं पत्रे पाठविलीं ता पावलीं ग्वालेर किल्ला घेतला आठ पधरा रोज येथेंच राहून किल्याचा बंदोबस्त जाल्यावर पुढें कोणती मसलत करनात ते लिहून पाठवीन जेनाबादचे कमावासदारास ताकीदपत्र घेऊन पाठविले आहे व त्याप्रमाणे ऐवज द्यावा, तेथें कोणी रजबद केलीयास सूट देऊ नये पाटीलबावाचें निक्षून बोलणे आहे लग्नाचा वस्त्रे भाई वगैरे यास आलीं राजश्री माधवराव गंगाधर यास आलीं नवतीं यास्तव बावानीं त्यास वस्त्रें देऊन सरकारचीं वस्त्रें देतों म्हणून बोलले म्हणून लिहिलें तें व श्रीमंत दादासाहेब इकडे आले येविशीं राजश्री पाटीलबावाचें बोलणें जालें त्याचा मजकूर लिहिला तो सर्व कळला व राजश्री रामजी जाधव यानीं पाटीलबावास पत्र लिहिलें होते त्यातील मजकूर व त्याजवर पाटीलबावाचें बोलणें जालें त्याचा विस्तारें करून मजकूर लिहिला तो सर्व कळला त्यास ग्वालेर घेतली आतां पुढें मसलत कोणती आहे तें लिहून पाठवावें जेनाबादचे कमावासदारास ऐवजाविशींचें पत्र पाठविलें तें पावलें राजश्री शिवरामपंत थथे याजकडे पाठविलें आहे ते ऐवज घेतील नाहा तर होईल तें लिहून पाठवू सूट देऊ नये म्हणोन लिहिले, उत्तम आहे माधवराव गंगाधर यास श्रीमंताचे लग्नाचीं वस्त्रें सरकारचीं आला नव्हतीं त्यावरून पाटीलबावानीं येथें त्यास वस्त्रें सरकारचीं म्हणून दिल्हीं म्हणोन लिहिलें त्यास सरकारचीं वस्त्रें ज्यानीं अहेर केले त्यास दिल्हीं, त्याज बराबर राजश्री दाजी गंगाधर यांस दिल्हीं र॥ छ ४ जिल्काद हे विनंति

---

ले ४३३ }
[ ३३० ] }

{कार्तिक व १२ श १७०५
{ता। २१-११-१७८३

श्री लक्ष्मीकांत

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री नारोपतनाना स्वामींचे सेवेशीं

पोष्य कृष्णाजी तानदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील तागायत छ २५ माहे जिल्हेज पावेतों मुक्काम महतपूर कुशलरूप जाणून स्वकीय कुशळ लखन करीत गेलें पाहिजे विशेष बहुत दिवस झाले कृपा पत्र येऊन संतोष होत नाहीं, तर सविस्तर लिहून सांभाळीत गेलें पाहिजे विशेष प्रां। महतपूर सरकार चंदेरी येथील जाबसालविशी पूर्वी आपण पत्रें श्रीमंत राजश्री पाटीलबावास लिहिलीं व राजश्री पांडुरंगपंत बापूस लिहिलीं तीं पत्रे आम्हीं रवाना केलीं परंतु लष्करें दूर गेलीं करेराचे मुक्कामपर्यंत चिरंजीव राजश्री केसोपंत महतपुराहून गेले पुढें मार्ग चालेना तेव्हा परतोन आले पत्रें रवाना केलीं माहालीं आलियावर तहशील करावी, त्यास तेथील जमीनदारांनीं हरामखोरी केली केसोपंताशीं करार केला कीं महतपुरास जातों ऐसें बोलोन परभारें लष्करात गेले आम्हाकडे आले नाहींत पूर्वी महालची तहशील राजश्री यादवराव हरीनीं नेली त्यास सर्व कसबें जमीदाराचीं आहेत तरी येविशीं श्रीमंत राजश्री पाटीलबावास पत्र लिहून पाठवावें आणि जमीनदार तेथें गेले आहेत त्याजला ताकीद निक्षून करून महालीं येऊन अम्मल सुरळीत चालेल तें करावें श्रीमंतानीं आमचे पासून रसद दहा बारा हजार घेतले आम्हास महालाचा ऐवज पैसा एक आला नाहीं, तरी पत्रें लिहून पाठवावीं आपलेकडील राजश्री पांडुरंगपंत बापू आहेत त्याजला पत्र लिहून तपसीलवार द्यावें म्हणजे ते जाबसाल करून घेऊन पाठवितील श्रीमंत पाटीलबावास पत्रें चांगलीं लिहून पाठवावीं ज्या गोष्टीनें आमचा ऐवज उगवे तें करावें आपण मन घातल्यास कार्य होऊन येईल यानंतर आपण पत्र राजश्री केसोपंत निा गोपाळ सभाजी याजबरोबर पाठविलें तें पावलें आपले भराशियावर जाहागिरीची खेडीं आहेत त्याचा बंदोबस्त करितों कारकून आमचे तर्फेचा पाठवितों आपण निक्षून पत्र राजश्री पांडुरंगपंतास लिहोन दिल्हें पाहिजे कीं महतपूरचे जमीदार तुम्हापाशीं आले आहेत त्यासि दबावून सांगणें कीं, कृष्णाजीपंत याणीं सरकारात पंधरा हजार दोन सालची रसद दिली आहे त्याचे रुपयाची निशा दें, नाहीं तरी तुमची अबरू राहणार नाहीं ऐसें पत्र निक्षूण राजश्री पांडुरंगपंतास कृपा करून लिहोन दिल्हीं पाहिजेत कृपा लोभ असों दिजे हे विनंती *

---

आजपर्यंत सालबाईच्या तहा संबंधें नानाफडणीस व त्याचे हस्तक याजमध्यें पत्रव्यवहार प्रसिद्ध होत आला तो रा अंताजीपंत हर्डीकर व गोविंद रामचंद्र केळकर वस्ती महाड यानीं मोठ्या मेहनतीने मिळवून आम्हाकडे पाठविला ह्या तहा संबंधें आणखीही पत्रे मशारनिल्हेनीं पाठविलेलीं आम्हाकडे शिल्लक आहेत पण ता बहुतेक त्याच त्या मजकुराचीं असल्यामुळे तूर्त तीं प्रसिद्ध करण्याचे तहकूब केलें आहे स का स

ले ४३४ [ २८० ]

कार्तिक व १४ श १७०५
ता २३-११-१७८३

श्री

राजश्री नारोपंत स्वामींचे सेवेशीं

विनंती उपरि

पाटीलबावाचें मत कीं, नारो गणेश यास होळकराचे कारभारातून काढावें बाईनीं व आपण एक होऊन मसलत करावी येविषयींचा मजकूर लिहिला तो सर्व कळला त्यास नारो गणश यास कारभारात न घालणें हें पूर्वींच जालें असतें तर असतें आता कसें होईल! पूर्वीं पाटीलबावाचीं पत्रें आलीं कीं, कळेल तशी खातरजमा होळकराची करावी त्यावरून केली ती त्याणीं निभावावी

पाटीलबावा व इंग्रज देशीं आले तर होळकराचे याचे खटे मीठे प्रसंग होत चालले आहेत तेथे आम्हावर वृत्ति कशा होतील न कळे, म्हणून लिहिलें तें कळलें त्यास पाटीलबावाचें व इंग्रजाचें येणें काय म्हणून होणार? आल्यास ईश्वरी इच्छेनें घडेल तें खरें थोरपणा आहे तेथें वाकडें होणार नाहीं

रा छ २७ जिल्हेज हे विनंती पो छ ९ मोहरम सुा आर्बा समानीन मुा शाहाजानपूर

---

ले ४३५ [ ४०७ ]

शके १७०५
सन १७८३

श्री

कापशीकर घोरपडे याजबद्दल

यादी कापशीकर घोरपडे यांची वंशावळ मूळपुरुष हे उदेपूरचे राणे याच्या घराण्यांतील एक पुरुष दक्षिणदेशीं येऊन विजापूरपादशाहींत येऊन रोजगार करून राहिले त्याणीं जाबेची, व बागीची व भाळवणीची, व नहावीची पाटीलकी मिळवून पादशाही रोजगार करून पाचचार डोई गुदरल्या नंतर श्रीशिवछत्रपति शककर्ते महाराज यांणीं राज्यास आरंभ केला त्या समयीं घोरपडे याचा पुरुष म्हाळोजी हे छत्रपति पाशीं पांचशे स्वारानिशीं चाकरीस राहिले काहीं दिवसांनीं महाराज याचे ज्येष्ठ पुत्र संभाजी महाराज हे पन्हाळ्या वर होते म्हाळोजी घोरपडे यास स्वारासुद्धा पन्हाळ्यास छत्रपतींनीं पन्हाळकिल्याची सरनोबती देऊन संभाजी महाराज याजपाशीं ठेविलें होतें पुढें शिवाजी महाराज याचा शके १६०२ रौद्रनाम संवत्सरे चैत्र शुद्ध १५ रविवारीं रायगडीं काळ जहाला नंतर संभाजी महाराज याणीं म्हाळोजीबुवा घोरपडे यास पन्हाळ्यास ठेवून आपण रायगडास गेले धाकटे बंधु राजाराम साहेब यांस नजर बंदींत ठेवून आपण सात वर्षें राज्य केलें संगमेश्वरीं महाराज असता अवरंगजेब पादशहा याजकडील सरदार इखलासखां

सभाजी महाराज यास धरिलें त्या समया गर्दी जहाली, त्यांत म्हाळोजीबावा घोरपडे ठार झाले त्यास तिघे पुत्र ज्येष्ठ सताजी घोरपडे, दुसरे बहीरजी घोरपडे व तिसरे मालोजी घोरपडे हे त्रिवर्ग मिळून राजाराम साहेब याजकडे फौजे सुद्धा रायगडास गेले तेथें महाराज याणीं काजकाम सांगितलें, कृपा संपादन केली पुढें विशाळगड मुक्कामाहून पादशाहाच्या फौजेवर छत्रपतींनीं स्वारीस पाठविलें सताजी घोरपडे जाऊन पादशहाच्या फौजेवर छापा घालून पादशाहाच्या डेऱ्याचे कळस घेऊन येऊन महाराजा पुढें ठेविले त्या समयीं छत्रपतींनीं तिघा भावास किताबती दिल्या सताजी बावा यास ममलकतमदार, बहीरजी घोरपडे यास हिंदूराव व मालोजी यास अमिरुल उमराव अशा किताबती देऊन बहुमान केला सताजी बावास सेनापती दिली शके १६१० पुढे राजाराम साहेब छत्रपति चंदीस गेले मोंगलाई फौजेवर वेढा भूदरगडास पडला, सबब सताजी घोरपडे सेनापति यास वेढा उठविण्याची आज्ञा झाली, त्यावरुन सेनापती याणीं लढाया मारून वेढा उठविला नतर कर्नाटकातून स्वारी देशीं आली तेव्हा छत्रपतींची मर्जी प्रसन्न होऊन कुटुंब ठेवावयास भूधरगड घोरपडे यास दिला पुढें राजारामसाहेब याचा काळ शके १६२१ सात जाहला पुढें सेनापती फौजबद मुलुकात स्वाऱ्या शिकाऱ्या करीत असता म्हसवडकर माने याणीं दगा करून विश्वासानें सताजी घोरपडे यास मारिला शके १६३५ नतर सेनापती याच्या ज्येष्ठपत्नीचे पुत्र पिराजी घोरपडे हे शिवाजी महाराजांकडे पन्हाळे मुक्कामीं आले, त्याणीं शातवन करून सेनापतीचीं वस्त्रें दिलीं शके १६३७ नतर तेही स्वामिसेवा करीत असतां स्वामी कार्यावर मौजे हलकर्णी कसबा नूल या ठाण्यावर पडले शके १६५० त्याचे पुत्र राणोजी घोरपडे हे लहान पाचसहा वर्षांचे होते, आणि पिराजी घोरपडे याची सापत्न मातुश्री द्वारकाबाईसाहेब याणीं नातू राणोजी यास घेऊन करवीरीं सभाजी महाराज छत्रपति याजकडे येऊन भेटली महाराज कृपावत होऊन सेनापतीचीं वस्त्रें दिलीं हें शके १६८५ कापशी मुक्कामीं जहालें त्याजवर राणोजी घोरपडे याचा काळ शके १७०५ सालीं जहाला त्यास स्त्रिया दोन पुत्र सुमारें नऊ याचा तपशील

४ ज्येष्ठ पत्नी लक्ष्मीबाई

१ ज्येष्ठ पुत्र सुबराव — २ रे सखारामबाबा

३ रे नारायणराव — ४ थे द्वारकोजीराव

या पैकीं तिघाचा नष्टांश नारायणराव घोरपडे यास पुत्र चार, राणोजी ऊर्फ मुरारराव दुसरे सभाजीराव, तिसरे दिनकरराव व चवथे सभाजीराव ऊर्फ सुबराव यास दत्तक दिले, ते सांप्रत आहेत मुरारराव यास पुत्र एक, त्याचें नाव नारायणराव, दोघाचा नष्टांश

५ कनिष्ट पत्नी अंबिकाबाई यास पुत्र

१ सताजीबाबा सर्वांत ज्येष्ठ — २ म्हाळोजीबाबा

३ पिराजीबाबा — ४ राघोजीबाबा, ५ जयराम

६

ले ४३६ }
[ १३८ ]

{ भाद्रपद व ४ श १७०६
{ ता ३-९-१७८४

॥ श्री ॥

राजश्री गोविंद रावजी गोसावी यासि—

शिक्का फारशी

छ अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य-स्नो राव रंभाजी जयवत निंबाळकर दडवत विनती उपरी येथील कुशळ ता छ १७ माहे सव्वाल मुक्काम भागानगर जाणून वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री नरसिंगराव घाटगे टेभुर्णीकर हे येथे आले याणीं आपलें वर्तमान सागितले जे, राजश्री आनदराव घाटगे याचे हातें चाकरी व परगणे मनकूरचे कामकाज घेऊन नोकरी आपण करार केली म्हणून त्यास आनदराव सरकार चाकरास दुरुस्त नाहा यास्तव राजश्री नरसिंगराव घाटगे हे चागले मनुष्य जवामर्द, सरकार चाकरीस दुरुस्त, असे जाणून नवाब मुषरुलमुल्क बहादूर याचे अनुमते ठरले जे सरकार उपयोगा आहेत, याचाच बदोबस्त करावा. त्याजवरून प्रगणे टेभुणी पैकीं देहे एकूणीस तनखा रुपये १७५०० साडे सतरा हजार सदर-हूची सनद राव मशारनिले याचे नावें करून दिल्हा आहे तर प्रा मजकूरचा जागारीचा अमल याचे सुपुर्द करुन यावा तुम्हाकडील कारकून प्रगणे मजकुरा ठेविला तो घेऊन जावा सन ११९३ सालीं चाकरीस न आले सबब नजर पाच हजार ठरविली ते रुपये खरीप रब्बी झाडा करून घ्यावे याप्रमाणे ठरलें आहे त्यास मुदतीप्रमाणें सदर्हु ऐवज घ्यावा येविशीं दौला बहादूर व राजश्री सोयराजीपत याणा आपणास पत्रे लिहिलीं आहेत, तर नरसिंगराव घाटगे याचा अमल दाखल करून घ्यावा फिरुन बोभाट येऊ न यावा याचे भाऊबद याशीं कटकट करतील तर त्यास ताकीद निक्षून करावी हे काम सरकार किफायतीचे व मनुष्य बहुत चागला ऐस समजून केलें आहे तर दरम्यान तुम्हाकडून घालमेल न व्हावी तालुकियास स्वराज्याचा उपसर्ग बहुत लागून प्रगणा खराब जाहला याजकारिता स्वराज्या-कडील बदोबस्त चागला करून यावा तैसेच करमाळियाकडीलही काहीं उपद्रव न यावा म्हणून राजश्री शामराव व चडीदासपत यास ताकीद करावी मशारनिलेपासून करारनामा लेहून घेतला त्याची नक्कल पहावयास पाठविली आहे हें काम जवा म नु द [ मर्द ? ] बाळा बहादर [ ? ] सोयराजीपत याच्या आमच्या विचारे जाहालें असें यात घाल्मेल न व्हावी लिहिल्याप्रमाणें कामाचा बदोबस्त करून यावा रा छ १७ सव्वाल हे विनती सन ११९४

---

ले ४३७ }
[ ४३० ]

{ चैत्र शु ३ श १७०७
{ ता ११-४-१७८५

श्री

सन ११९४ फसली सन १७८४ इसवी फेरिस्त नबर ८

स्वास्तिश्री राज्याभिषेक शके १११ विश्वावसुनाम सवत्सरे चैत्र शुद्ध ३ तृतीया इदुवासरे

क्षत्रियकुलावतंस श्री राजा शिवछत्रपति याणी राजमान्य राजश्री परशराम रामचद्र यास आज्ञा केली ऐशीजे मनोळा तालुक्याचे पाच लक्ष रुपयाच्या निशेपैका आळते तालुका याजवरि दरसाल पन्नास हजार रुपये उसनेवारी तीन साले यावयाचा करार हस्तेबदाची यादी करून दिली आहे सदर्हू ऐवजास उगवणीस वेदशास्त्र सपन्न राजश्री बाळ जोशीराव व राजश्री शिवराव परशराम मुतालिक सचिव व गुडो दामोदर याचा कतबा दिला आहे त्या प्रमाणे सालोसाल यावे न पावल्यास तालुका देहे १६ सोळा जमाबदी गावगन्ना गावकर याच्या गुजारतीने ठरावून तालुका ठाणे सुद्धा कमावीस खरेदीसिबदी राजश्री केसो सदा शिव सदर्हू पाच लक्षाचे बाकीचे सावकार याच्या स्वाधीन करून देणेची आज्ञा होईल इस्तकबिल चैत्र सन खमस समानीन तागायत सन सम्मान समानीन चैत्रमास तीन सालात दीड लक्ष रुपयाची पुरवणी करून यावी तीन साले भरल्या नतर सदर्हू तालुक्यास साव-काराचा सबध नाही जाणिजे बहुत काय लिहिणे

मोर्तब बारसुरू सुद्रबार समत सुद्रबार

ले ४३८ }
[ ४३९ ] }

{ चैत्र शु ६ श १७०७
{ ता १४-४ १७८५

श्री

सन ११९४ फ सन १७८४ इ फेरिस्त नबर ९

यादी राजमडळाकडून राजश्री परशराम रामचद्र याजकडे मनोळा तालुका वगैरे सोडविणे बद्दल राजश्री केसो सदाशिव याजकडून रुपये पाचलक्ष कर्ज घेऊन निशा करविली, त्यासि मामलत तालुका मनोळी वगैरे देऊन ऐवज नेमणूक करून दिला सुरुसन खमस समानीन मया व अल्फ

मनोळी तालुक्यापैकी रुपये ३,५०,००० साडेतीनलक्ष व मनोती व व्याज पाचलक्ष रुपयाचे एकदर मनोळी तालुक्याकडून ऐवज पुरवणी करून घ्यावी ऐवज फिटल्या नतर ठाणी सुद्धा तालुका हुजूर यावा

सदरहू निशापैकी दरसाल आळते तालुका याजवर पन्नास हजार रुपये तीन साले घ्यावयाचा करार करून हस्तेबदीची यादी करून दिली आहे सदरहू ऐवजास उगवणास वेद शास्त्र सपन्न राजश्री बाळाजोशीराव व शिव राव परशराम मुतालिक सचिव व गुडो दामोदर याचा कतबा दिला आहे त्याप्रमाणे सालोसाल घ्यावा न पावल्यास तालुका देहे १६ सोळा जमाबदी गावकर याच्या गुजार-तीने ठरावून तालुका ठाणी सुद्धा कमावीस खरेदी शिबदी तुमच्या स्वाधीन करून देण्याची आज्ञा होईल यायिषयी परशराम रामचद्र याच्या नावे सदरहू मजकुराचे पत्र दिले आहे कलम

एकूण कलमे दोन येणेंप्रमाणे पाच लक्ष रुपये कर्ज देऊन मामलतीविशीं करारमदार करून ऐवज लावून दिला असे सदर्हूप्रमाणे ऐवज फडशा होईपर्यंत सुरळीत चालेल मामलतीस तोसीस लागणार नाहीं आफत फितूर मातबर पडून मामलत दिगर जाहल्यास हिशेबीं राहील तो ऐवज सरकारांतून फडशा होईल सदर्हू पाच लक्ष रुपये हप्तेबदी सालमजकूर चैत्रापासून तीन चैत्र दरसालीना एक लक्ष सदसष्ट हजार रुपये द्यावयाचा करार, त्यासि प्रथम हप्ता पावल्यानतर मनोळीचें ठाणें अविंदाकडून अपाय जाहल्यास सदर्हू एक लक्ष सदसष्ट हजार रुपयेची उगवणी त्रिवर्ग मशारनिल्हे याच्या विद्यमानें व्याजमनोती सुद्धा उगवणी करून देविली जाईल छ ४ माहे जमादिलाखर मोर्तब

---

ले ४३९ }
[ १५६ ] }

धा। छ २० जावल सीत

{ फाल्गुन व १ श १७०७
{ ता। ७–३–१७८६

॥ श्री ॥

राजश्री अमृतराव स्वामींचे सेवेशीं—

विनती उपरि तुम्ही छ ६ जा॥वलचें पत्र पाठविलें तें पावलें मालीट इंग्रज आज श्रीमताचे दर्शनास आला होता आगोदर त्यानीं कचेरीस यावें, नतर श्रीमतांनीं यावें, असा बेत करून भेठ जाली मालीटास मात्र भेटले, नजराणा केला त्याची याद पाठविली आहे मालीट पर्वतीचे रमण्यातच राहिला आहे बायका वगैरे वाड्यात राहिले म्हणोन लिहिलें तें कळलें त्यास बेत अगोदर त्यानीं यावें, नतर श्रीमतानीं यावें, असा करून भेट करविली उत्तम केलें नजराण्याची यादी पाहिली पुण्यातील नेमणुकेचे फौजेस रोजमरा वाटावयाचें लिहिलें त्यास एक दुमाही व दोन आठवडे द्यावे रा। छ १४ जा॥वल हें विनती

---

ले ४४० }
[ ४८२ ] }

{ ज्येष्ठ व १४ शके १७०९
{ ता। १४-६ १७८७

श्री

आज्ञापत्र राजश्री पतप्रधान ताहा मोकदम देहाये पैकीं पारनेर भिसूर सुरुसन समान समानीन मया व अलफ राजश्री नारायणराव ढमढेरे याजकडे फौजेचे बेगमीस सरजाम परगणे मजकूर पैकीं मोकास बाबेचे गाव बि॥ —

| | | |
|---|---|---|
| ॥ प्रा। पारनेर निंमे | १ मौजे बाबुर्डी गुमट | १ मौजे आपधूप |
| १ ,, डोंगरगण | १ ,, निंबलक | १ ,, गटेवाडी |
| १ ,, दहिठण गुजाल | १ ,, टाकळी | १ ,, हिवरें बाजार |
| १ ,, मुगसी | १ ,, हमीदपूर | १ ,, भोंदरे |
| १ ,, गाजदीपूर | १ ,, करनूळ खोरें | १ ,, दळवें खुर्द |
| १ ,, जाबगांव | १ ,, घाणेगांव | १ ,, हिवरें कोर्डा |
| १ ,, नोंदूर पठार | १ ,, घोत्रें खुर्द | १ ,, वडगांव बावळी |

| | | |
|---|---|---|
| १ ,, शाहजापूर | १ ,, पाडळी | १ ,, पिंपळगाव रोठा [?] |
| १ ,, शिरोळें आडबई | १ ,, भोईरें खुद | १ ,, करनूळहोर |
| १ ,, हिंगणगाव | १ ,, निंबगाव धाणा | १ ,, भडगांव |
| १ ,, भोईरें बुद्रुक | १ ,, कालकुद | १ ,, घोत्रे बुद्रुक |
| १ ,, निंबगाव धाणा | १ ,, ढोंकी | —— |
| —— | —— | ११ |
| ११॥ | १२ | |

३४॥

एकूण साडे चौतीस गावचा अमल पेशजी पासोन चालत आहे, त्याप्रमाणे करार असे तर मा॥रनिलेचे कमावासदाराशीं रुजू राहून देहाये मा॥र चे मोकासबाबेचा अमल व जकात सुदामत चालत आल्या प्रो सुरळीत देणें, जाणिजे छ २७ साबान

---

ले ४४१ [ ३३९ ]

पौष व १ श १७१० ता १२-१-१७८९

॥ श्री ॥

पै॥ छ २९ रबिलाखर ऊर्फ पौषमास मु॥ श्रीमथुरा सुरुसन तिसा समानीन

राजश्रीयाविराजीत राजमान्य राजश्री आपाजाराम स्वामींचे सेवेशीं पोष्य हरि बल्लाळ सा॥ नमस्कार विनती उपरि येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशळ लिहीत जावें विशेष तुम्ही छ ८ व छ २२ रविलावरचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं राजश्री अली बहादूर याची व पाटीलबावाची भेट झाली नतर अली बहादूर याची रवानगी दिल्लीस केल्याबद्दलचा मजकूर पेशजी लिहिला आहे, त्यावरून कळेल म्हणोन * गुलाम कादर यास मोरचेमध्यें कोंडून लढाई चालली होती तों मागाहून अली बहादर याची रवानगी फौज सुद्धा केली दरमजल हे जाऊन पोंचले नतर पाहिली फौज व हे एक होऊन त्यास जकड बसविली मार्गशीर्ष वद्य षष्ठीस लढाईची निकड केली तो दोन हजार फौजेनिशीं पळोन गेला बातमी कळताच फौज पाठीमागें गेली तेव्हा दहा कोसावर गुलाम कादराशीं गाठ घालून लढाई जाली त्यास शिकस्त केला त्याजकडील कारभारीही आणिले त्या शिवाय तोफा हत्ती वगैरे आणिलीं त्याची याद आलाहिदा आहे त्यावरून कळेल, म्हणोन लिहिलें तें सविस्तर कळलें त्यास अली बहादर याची भेट होऊन दिल्लीस रवानगी केल्याचा मजकूर पेशजीं लिहिला त्यावरून सविस्तर कळलें साप्रत गुलाम कादर याची व अली बहादर यांची सरकारची फौज सुद्धा लढाई होऊन गुलाम कादर कारभारी सुद्धा शिकस्त सापडले,

* या शब्दापुढील शब्द फाटले आहेत

ही मोठाच गोष्ट जहाली श्रीमंतांचें दैव थोर आहे वरकड वर्तमान सविस्तर श्रीमंताचे पत्रावरून कळेल + राजश्री पाटीलबावानीं इतके दिवस मेहनत केली त्याचे सार्थक ईश्वरे केलें मोठी फत्ते जहाली सदैव वर्तमान लिहीत जावें रा। छ १५ रबिलाखर बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती

---

ले ४४२ [ ४०० ]

पौष १७१०
जानेवारी १७८९

श्री

यादी गुलामकादरा बरोबर बदवे आणिले त्यांची नावनिशी –

| | | |
|---|---|---|
| १ गुलामकादर | १ सतारखान गुजर | १ इसब रोहिला, |
| १ मन्यारसिंग | १ जोरदस्तखान | १ जिसुक ब्राह्मण बिलास रायाचा |
| १ नाजरखोजा | १ हसन रोहिला | |
| १ बिलासराय दिवाण | १ मनुलाल ब्राह्मण | १ याकुदखोजा |
| | | ३ |
| १ कुसलाफरोडा | १ इजब रोहिला | |
| १ हमीमबुअलीखा | १ घासी गार्डवान | ८० तोफा सुमार |
| १ नजीम रोहिला | १ कुतबीखवास | २२ हत्ती नग |
| | | ० उट घोडा याची गणती आली नाहीं |
| ७ | ७ | |

---

ले ४४३ [ ४०१ ]

अधिक आषाढ शु ८ श १७१२
ता। २०–५–१७९०

श्री

यादी छ - सव्वाल मुक्काम नजीक पाटण येथें लढाई इसमालबेगाचे लढाईत शिलेदार हुजुरात पैकीं ठार, जखमी सुा तिसैन मया व अल्फ बद्दल यादी

३६१ खासे व स्वार

३०९ जखमी

| | |
|---|---|
| ७२ तरवारीचे | ३४ भाल्याच |
| ९ बर्चीचे | ६ तिराचे |
| १५७ गोळीचे | ३१ गोळ्याचे व दगडाचे |
| २३८ | ७१ |

३०९

---

+ येथपासून खुद्द खाशाचें अक्षर आहे

  ५८ ठार

३६१
१७३ घोडा
  १०४ जखमी ६९ ठार

  १७३

५३४

( ग्वालेर दरबार पत्रें भाग ३ ले ९६ येथें हाच कागद आहे )

---

ले ४४४ [ ४०७ ]

{श १७१२
{ता। १७९०

श्री

यादी इसमायल बेग याजकडे महाल सु॥ तिसेन मया व अल्फ

| | | |
|---|---|---|
| १ परगणें झझर | १ परगणें इंदोर निमकसार | १ परगणें हुशी |
| १ ,, बसईबानसूर | १ ,, राता | १ ,, नाहारझाल |
| १ तालुके पाटोवा | १ ,, खैरथळ | १ ,, रोहतक |
| १ परगणें दादरातहा | १ ,, नूरनगर | १ ,, पतियाबाद व शिरसाबाद |
| १ , बोरी | १ ,, पाटोधी | १ ,, दुडावर |
| १ ,, रेवाडी | १ ,, दादरी | १ ,, नगीना मे॥नगर |
| १ ,, पूर | १ ,, हिसार | १ ,, झवानावट पोंकरा |
| १ ,, कोटकासम | १ , ववल | १ ,, तिजारा |
| १ ,, महीम | १ ,, काठी | १ ,, साकरस |
| १ ,, दुशाख तुशाम | १ ,, कानोड | १ ,, रसघन |
| १ ,, इसमायलपूर | १ ,, रताय | १ ,, टावरेघोरा |
| १ ,, गिमेट | १ ++++डया | १ ,, तावडू |
| १ ,, सवारणपूर | १ ,, नानाळ | १ ,, कोटफुळी |
| | १ ,, बोहोदा | |
| १ , भौझालडी | १ ,, हरसोली | |
| १ ,, लाहोरा | १ ,, निमराणा | |
| १५ | १६ | १३ |

४४

ले ४४५ }
[ ३४५ ] }

{ कार्तिक व ९ श १७१२
{ ता ३०-११-१७९०

॥ श्री ॥

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री आपाजीराम स्वामींचे सेवेशीं

पो बाळाजी जनार्दन सा नमस्कार विनति उपरि येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लिहित जावें विशेष छ ११ मोहरमचे पत्र पाठविलें ते पावलें राजश्री पाटीलबावा डेरे दाखल जहाले, सरदाराकडील फौजा पुढें गेल्या होत्या त्यानीं साबर वगैरे ठाणीं घेऊन अजमेरीस गेले, शहर घेऊन किल्यास मोर्चे लाविले, मारवाड्याचा जमाव मेडत्यावर जाला होता, तेथून लढाईच्या इरायानें पुढें पाच कोस आले,सरदाराकडीलही फौजा चालून गेल्या, त्याची याची लढाई मातबर जाली, त्यात श्रीमताचे प्रतापें करून मारवाड्याचा मोड होऊन सरदारास यश आलें, तोफा पाडाव आल्या, मेडत्यात ठाणें बसविलें, गंगाराम भंडारी व आलियार बेगखान मेडत्यात होते त्यास धरिलें म्हणोन विस्तारें लिहिलें तें सर्व कळलें त्यास सरदाराकडील फौजानीं अजमेरच्या मोर्च्याचा बदोबस्त राखून राठोड चालून आले त्याजवर जाऊन लढाई मारली, त्यात राठोड मोडले, सरदाराचे फौजेस यश श्रीमताचे प्रतापें करून आलें, [ ही ] मोठी गोष्ट जहाली येणेंकरून राठोडावर दाब चागला बसला पाटीलबावा डेरे दाखल जहाले उत्तम आहे पुढें काय होईल तें लिहून पाठवावें गंगाराम भंडारी व अलियारबेग याचें काय केलें व अजमेरीस मोर्चे बसले आहेत तिकडील वर्तमान काय, हें सविस्तर लिहावें रा छ २२ रावल बहुत काय लिहिणे लोभ असों दीजे हे विनंती

पैा छ २४ रविलाखर ऊर्फ मार्गशीर्ष वद्य ११ मुा मारवाड नजीक कृष्णगड शुक्रवार.

---

ले ४४६ }
[ १६० ] }

{ वैशाख शु २ स १७१३
{ ता ५-५-१७९१

॥ श्री ॥

पै छ १७ माहे रमजान सन १२००

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री गोविंदरावजी स्वामींचे सेवेशीं–

पोष्य बळवतराव भवानीशकर कृतानेक साष्टांग नमस्कार विनती उपरि येथील कुशळ तागाईत छ १ माहे रमजान मुक्काम हुमनाबाद जाणोन स्वकीय कुशळ लिहीत जावें विशेष श्रीमत महाराज यजमान साहेबीं राजश्री तात्या यांजकडे फौज सुद्धा रवाना केलें तेव्हां आज्ञा हेच कीं, तात्याची व हजरतीची भेट होणार त्या पूर्वी तात्याजवळ जाऊन पोंहचावें, त्यांचे विचारें नबाब बदेगान अल्लीची भेट व्हावी त्यास लोकाचे स म जो त्या स [ समजुतीस ? ] चार दिवस अधीक बाशीमावर लागले यात तात्याची व हजरतीची भेट होऊन मसलहत प्रकरणीं बोलणें होऊन तात्या याची स्वारी पुढें कृष्णा उतरून गेली त्यास त्वरेनें तात्यांजवळ जाऊन पोंहचण्यास मार्ग हुमनाबादेचा नीट जाणून येथपर्यंत येणें

जाहाले त्यास नाट मागे येता हजरतीची स्वारी मध्यतरीं आहे, पृथक भेटाचें तों प्रयोजन नाहींच इक्डील बाजेकरा [ ? ] व या दौलतीची कळकळ तात्यास व आपणास आहेच तात्या यांचे व हजरतीचे भेटाचे प्रसगीं इकडील मतलब उगाविलेच असतील प्रत्येक आम्हास काय बोलावयाचें आहे त्यास मार्ग जवळून तेव्हा परस्पर जाणें हें चागलें किंवा वीस पचवीस कोश असताना एक दिवस राहून सरासरी भेट घेऊन जावें जैशी येविशीं करीन [ ? ] सल्लाह असेल त्याप्रमाणें सूचना व्हावी हा मार्ग सोडून जावें तरि दिवसगत लागेल वासना तो तात्याजवळ सत्वर जावें हेच व यजमानाची आज्ञा याचप्रमाणें सर्वात्मना यजमानाचा विश्वास आपले ठायीं तेव्हा उचित प्रकार जो असेल तोच आपण लिहीतील येविशींची विनती तात्या यास लिहिली आहे या उपरि जाण्यास दिवस बहुत थोडके राहिले पत्राचीं उत्तरें सत्वर यावीं त त्याप्रमाणें येथून घडण्यात येईल बहुत काय लिहिणें लोभाचा वृद्धि कीजे हे विनती ( * गोविंदराव काळ )

---

ले ४४७ [ १९५ ] — पौ छ २७ रमजान — वैशाख शु ११श १७१३ ता १४-५-१७९१

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गोविंदराव+ स्वामींचे सेवेशीं—

पो। परशराम रामचद्र नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जावे विशेष—तुम्ही दु कि त्ता [ ? ] पत्रें पाठविलीं तीं पावला लिहिला मजकूर आपले व राजश्री गोविंदराव बापू यांचे पत्रावरून सविस्तर कळला याचप्रमाणें वरचेवर तिकडील इग्रजाकडील व टिपूकडील वर्तमान लिहून कळवीत जावें इकडील मजकूर तरि आम्ही धारवाडचा बदोबस्त करून तुगभद्रा पार होऊन दक्षणतीरास आल्यानतर मायेकोंडा व होदेगिरें व सतीवनूर बे चेनागिरी ठाणीं घेऊन नजीक रामागिरी येथील मुक्कामास गेल्याचें वगैरे वर्तमान तपशीलवार राजश्री गोविंदराव बापू* याचे पत्रा लिहिलें आहे त्याजवरून सर्व मजकूर कळेल छ १० रमजान बहुत काय लिहिणें लोभ असो यावा हे विनती

---

ले ४४८ [ ४४३ ] — आश्विन शु ११श १७१३ ता २८-९-१७९१

श्री

नक्कल

राजश्री बळवतराव महादेव कमाविसदार परगणे आमझरें गोसावी यासि

छ अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नेहाकित महादजी शिंदे दडवत सुरुसन इसन्ने तिस्सैन मयां व अलफ बद्दल देणें विनायक महादेव व नारोकृष्ण कारकून निसबत

---

* गोविंदराव काळे + गोविंदराव पिंगळे

बक्षी यांसि वेतने जातास व मुदबखचे रोजमुरे व शागिर्दपेशा वगैरे बाबत तागाइत सन इहाद्दे तिस्सैन अखेर सालबद्दल करारचिठ्या येणेप्रमाणें रुपये

८०८० वेतनें व शागिर्दपेशा वगैरे दरसाल रुपये १८२० प्रमाणे इस्तकाबिल छ १७ सफकर सन सब्बां तागाईत सन इहिद्दे तिस्सैन अखेर साल, माहे ५४८१८

आकार ८२८० रुपये

२१४॥ मुदबखबद्दल वगैरे सालिना ७०२ रुपये प्रमाणे इस्तकबिल छ ९ जमादिलाखर सन इहिद्दे तागाईत छ १७ सवाल एकंदर साल माहे ३८२०

रुपये

४३९। दफ्दरखर्च निसबत बक्षी खाते कागद व समया ११७ खाते उंट नफर १ एकूण रुपये

१६४९॥। चदीं व लागवड घाडे यांस व उंटास इस्तकाबिल सन तिस्सेन तागाईत सन इहिदे तिस्सैन दुसाला — रुपये

१४ । सारवान व मसालची याचे हिशेबाबद्दल — रुपये

१४३। खाते तेल दीपास व मशालेस रुपये

१०९२०

पैकीं आदा पातशाई महाल पैका परगणे आपाजी राम फडणीस रुपये ८५०० बाकी देणे रुपये ५४९० पैकी परगणे बडोदें वगैरे महाल येथील सन सल्लास तिस्सैनचे रब्बाचे ऐवजीं वरात लावून दिली रुपये २७४० बाकी देण ते रुपये २७५०

एकूण दोन हजार सातशें पन्नास रुपये तुम्हाकडून देविले असत तरि परगणे मजकूर येथील पेस्तरसाल सन सल्लास तिस्सैनचे रब्बीचे एवजा सदर्हू सत्तावीसशे पन्नास रुपये ज्येष्ठ शु० १५ पूणिमा शके १७१५ पर्यंतचे मित्तास मशार निल्हेस उज्जनचलनी आदा करून कबज घेणे जाणिजे छ ९ माहे मोहरम बहुत काय लिहिणे हे विनंती मोर्तबसूद

---

ले ४८९ [ ४०८ ] — मार्गशीर्ष शु ८ श १७१४ ता २१-११ १७९२

श्री

याद

१ सन खमस खमसैन मय्या व अल्लफ शालिवान शके १६७६ म्हणजे राज्याभिषेक शके ८१ सालीं श्रींचे व कैलासवासी श्रीमन्महाराज शंभुछत्रपति महाराजाचे दर्शन घेऊन सावनूरकर नबाब साहेब याच्या प्रांतात जाऊन लढाई करावी असा बेत पुणें

मुक्कामा ठरवून श्रीमत बाळाजी बाजीराव पंडित प्रधान उर्फ नानासाहेब व सदाशिव चिमणाजी पंडित ऊर्फ भाऊसाहेब हे फौजे सुद्धा पुण्याहून दरकूच निघाल्यावर पंडित प्रधान यानीं महाराज सरकारात विनतीपत्रें देऊन वकील पाठविले नतर किते पन्हाळ्याहून महाराज सरकारची खासास्वारी व खाशामहालच्या स्वाऱ्या करवीरीं येऊन दाखल जहाल्या, व पंडितप्रधान याची स्वारी कऱ्हाडनजीक येऊन पोहोचली तेथून कूच दरकूच पंडितप्रधान याची स्वारी फौजेसुद्धा निघून कसबा बावडे तर्फ हवेली नजीक कोल्हापूर श्रीपचगगा तीरास मुक्काम जहाला दुसरे दिवशीं महाराज सरकारची खासास्वारी हत्तीच्या अंबारीत होऊन कोश दीडकोश श्रीपचगगेच्या ऐलतीरास महाराज सरकारचे डेरे दिले होते त्या डेऱ्यात दाखल जहाल्यावर पंडितप्रधान याजकडील तोफखाना सुरू जहाला व पंडितप्रधान महाराज सरकारच्या डेऱ्यानजीक आल्यावर पायउतारा होऊन डेऱ्याच्या दरवाज्यात हात जोडून हातावर रुमाल घालून महाराज सरकारच्या सदरेनजीक येताच महाराज सरकारानीं पंडितप्रधान याच्या आंगावर चादर भरगच्ची पंडितप्रतिनिधी याजकडून घातल्यावर दोन्ही हातावरील रुमाल काढून महाराज सरकारचे पायांवर मस्तक ठेवून नतर जोहार केल्यावर बसावें म्हणून आज्ञा जहाल्यावर सदरेनजीक पंडितप्रधान मर्यादेप्रमाणें बसून आपल्याकडील सरदार व मानकरी याजकडून सरकारास जोहार करवून दर्शनें करविलीं नतर महाराज सरकारची खासास्वारी हत्तीच्या हौद्यात जहाल्यावर पंडितप्रधान व सदाशिवराव भाऊ ऊर्फ भाऊ साहेब खवासखान्यात बसून उभयता पंडित यांहीं मोचलें आपले हातात घेऊन महाराज सरकारावर उडविण्यास प्रारंभ केल्यावर, महाराज सरकारची खासास्वारी देशरव करवीरास येण्याविषयीं जहाली कलम

२ पंडितप्रधान यांहीं आपल्याकडील सरदार व मानकरी वगैरे फौजेचे लोक यासी अगोदरच सूचना केला होती कीं, महाराज सरकारची खासास्वारी हत्तीच्या हौद्यात होऊन देशरव जहाल्यावर तुम्हीं दोहों बाजूस कोरबदीनें उभें राहून महाराज सरकारास जोहार करावा कलम

३ महाराज सरकारची खासास्वारी देशरव जहाली ते समयीं महाराज सरकारचा जरीपटका आघाडीस व पेशव्याचा जरीपटका पिछाडीस याच अन्वयें महाराज सरकारच्या नोबती पाठीमागें पेशवे याची नोबत झडत होती कलम

४ सावनूरकर नबाबसाहेब याचा व पेशवे याचा तह होऊन पेशवे सरकारची स्वारी पुण्यास दाखल जहाल्यावर पुढें शके १६८४ साली श्रीमन्महाराज मातुश्री जिजाबाई साहेब याची स्वारी पुण्यास घेऊन गेले ते समयीं पंडित प्रधान पेशवे श्रीजेजुरी मुक्कामीं येऊन दर्शन घेतले

सदर पद्धती प्रमाणें घेऊन श्रीमन्महाराज श्री जिजाबाई साहेब याची स्वारी पुणें मुक्कामीं घेऊन गेले, आणि राहण्यास निराळा वाडा दिला होता,_ तेथें नित्य पंडित प्रधान यांणीं कुटुंब सुद्धा येऊन दर्शन घेत होते, आणि मेजवानी वगैरे मानमर्यादा वर लिहिल्या प्रमाणें केली आहे प्रतिनिधी व अमात्य व सेनापती हमेषा करवीरास येतात त्यात महाराज

सरकारची स्वारी सामोरा जाऊन चादर घालून तिकडून सत्कार व नजराणा होऊन आणखेचा पाठ आहे हा प्रसिद्ध आहे राजश्री गणपराव गायकवाड समशेर बहाद्दर सेनाखासगील याचे पूर्वज कधीं महाराज सरकारांत आले याचा दाखला दप्तरा नाहीं, व महाराजसरकारची स्वारी बडोदे प्राती गेलेला दाखला नाहीं त्यास मदरीं अष्टप्रधान याच्या पद्धती प्रमाणें व्हावें व महाराज सरकारातून सत्कार सदर्हू प्रमाणें व्हावा असें वाटतें, यासी हरकत दिसत नाहीं

५ सन अशरीन मय्यातैन व अल्लफ सन १८१९ इसवी शके १७४१ सालीं महाराजसरकारातून तीळशर्करेचीं आज्ञापत्रें " राजमान्य राजश्री " म्हणून सादर झालीं आहेत त्याचा तपशील

१ आनंदराव गायकवाड सेनाखासगील
१ सयाजीराव गायकवाड समशेर बहाद्दर
१ जयसिंगराव गायक्वाड
३

येणें प्रमाणें आज्ञापत्रें गेल्याचा दाखला चिटणीसीकडे आहे

६ गायकवाड याचे पूर्वज पिलाजीराव गायक्वाड रहाणार मौजे + + काहीं कारणपरत्वें घरातून निघून तळेगावीं खंडेराव दाभाडे याजपाशीं येऊन राहिले पुढें दाभाडे यासि कर्ते पाहून कैलासवासी श्रीमन्महाराज शाहू छत्रपति याणीं शके १६३५ सालीं सेनापतीचीं वस्त्रें दिलीं नतर पिलाजी गायक्वाड याचे पुत्र दमाजी गायकवाड हे कर्ते सबब त्यासि कैलासवासी श्रीमन्महाराज शाहु छत्रपति याहीं शके १६३५ समशेर बहाद्दर हा किताब देऊन वाढविलें पुढें गुजराथ वगैरे गायक्वाड याच्या ताब्यात येऊन आजवर त्याच्या वशात गुजराथ प्रांत चालत आहे

७ सन सल्लास तिस्सैन मय्या व अल्लफ सन १७९२ इसवी शालीवाहन शके १७१४ परिधावी नामसवत्सरे गोविंदराव गायक्वाड यास सेना खासगील पदाची वस्त्रें फत्तेसिंग गायक्वाड वारल्यानतर पुण्यास जाऊन श्रीमत पेशवे याजपाशीं दोन अडीच वर्षे राहिल्यावर रावजी आप्पाजी सातारचे सुभेदार याच्या मार्फत प्रयागजी याचे नातू फत्तेसिंग गायक्वाड याजवळ बडोदे मुक्कामीं होते, त्याची खातरी करून त्याणीं नजर वगैरेची खातरी पेशवे सरकारात दिल्यावर श्रीमंत सवाईमाधवराव पडित प्रधान याणीं कैलासवासी श्रीमन्महाराज राजश्री शाहूछत्रपति सातारकर याच्या सेवेशीं विनतीपत्र लिहून गोविंदराव गायक्वाड यास सेना खासगील पदाचीं वस्त्रें व आज्ञापत्र आणून पुणें मुक्कामीं दिलीं, आणि शके मजकुरीं मार्गशीर्ष शुद्ध ८ रोजीं गायक्वाड याणीं रावजी आप्पाजी यास आपल्या दौलतीचे कारभाराचीं वस्त्रें दिलीं नतर श्रीमत पेशवे याचा निरोप घेऊन मशारनिल्हे गायकवाड गुजराथप्रांतीं निघून गेले त्यास पुत्र व कन्या —

१ वडील स्त्री सौभाग्यवती गहिनाबाई यास सतान नाहीं

१ दुसरी स्त्री सौभाग्यवती सोंदराबाई यासि पुत्र आनदराव गायकवाड अवलिया होते

१ तिसरी स्त्री सौभाग्यवती अन्नपुर्णाबाई यास पुत्र फत्तेसिंगराव गायकवाड

१ चवथी स्त्री सौभाग्यवती गयाबाई याम पुत्र व कन्या

१ सयाजिराव गायकवाड याचा वश गादीवर आहे

१ वडील स्त्री सौभाग्यवती चिमाबाई याच्या पोटीं पुत्र

१ गणपतराव गायकवाड समशेरबहाद्दर सेनाखासगील

१ दुसरे आप्पासाहेब गायकवाड

१ तिसरे दादासाहेब गायकवाड

१ चवथे नानासाहेब गायकवाड

---

४

कन्या ( सयाजीरावाच्या )

१ वडील कन्या सौभाग्यवती वजूबाई दत्तवाडकर घोरपडे यान्या घरीं दिली आहे

१ दुसरी कन्या सौभाग्यवती (बायजाबाई) देवासकर कदम याच्या घरी दिली आहे

१ तिसरा कन्या सौभाग्यवती रडुबाई निरखीकर कदम याच्या घरीं दिली आहे

१ चवथी कन्या सौभाग्यवती ( गगाबाई ) खानवलकर यांच्या घरीं दिली आहे

१ दुसरी स्त्री सौभाग्यवती गिरजाबाई यास कन्या एक शिर्के कुठरेकर याच्या घरीं दिली आहे त्यास पुत्र सतान नाहीं *

---

ले ४५० [ ४३५ ]

मार्गशीर्ष शु १२ श १७१४
२५ ११ १७९२

श्री

सन १२०२ फ० सन १७९२ इ० फेरिस्त नबत १९ पैकीं

करारनामा सुजा अनवत हजूर दस्तगाह अज्जम लेप्टनेंट उलियम टामस साडीफोर्ड कारपरदाज आजतर्फ इशमतपन्हा अज्जम हनराबल मेजर जनराल राबर्ट आबरकाबी प्रसिदेन्त गोवर्नदोर जनरालें जजिरे मुबई व अज्जम बाळाजा राम सरलष्कर आजतर्फ श्रीमन्महाराज राजश्री शिवाजीराजे छत्रपति तख्त कोल्हापूर या तर्फे दरम्यान हरदू तर्फेनें सरकारच्या कुलअखतियारानिशीं एक्बाल पन्हाह हनराबल सरकार कपनीचें कर्ज श्रीमन्महाराज राजे याजकडून देणें, त्याच्या फैसल्या बाबे व जजिरे मुबई येथील सरकारचे पन्हाहांतील बेपारी यास इमजी

स्थान कबूल करून कुलिअख्तियार पाठवितील तेव्हा सरकार कपनी तर्फेनें निशाणी व शिका होईल

---

* हा कागद मोडककृत कोल्हापुरच्या इ त ले ७ येथें आहे

मदर्हू कलमें हनराबल मेजर जनराल राबर्ट आबरक्राबी प्रसिदेन्त गोवर्नदोर जनरल जजिरे मुबई या तर्फेंना अज्जम लेप्टनेन्ट उलियम टामस साडीफोर्ड कारपरदाज व श्रीमन्महाराज राजे कोल्हापूर या तर्फेनें अज्जम बाळाजीराम सरलष्कर या दरम्यान जजिरे मुबईच्या मुक्कामीं करार जहाले आहेत इग्रजी तारीख २५ माहे नवबर सन १७९२ छ १० माहे रबिलाखर सुम्सन सल्लास तिस्सैन मया व अल्फ

बाळाजाराम मामले लष्कर हुजूरच्या आज्ञेवरून करारनामा लिहिला असे

---

ले ४५१ } [ ४३६ ] }

{मार्गशीर्ष शु १०श १७१४ {ता ०५-११-१७९२

सन १२०२ फसली सन १७९२ इ तालिक फे० न० १९ पैकी

करारनामा सुजात आतबत उरदस्तगाह अज्जम लेप्टनेन्ट उलियम साडीफोर्ड कारपरदाज अजतर्फ हिशमत पन्हाह अज्जम हनराबल मेजर जनराल राबर्ट आबरक्राबी प्रसिदेत गोवर्नदोर जनराल जजिरे मुम्बइ व अज्जम बाळाजीराम सरलष्कर आजतर्फ श्रीमन्महाराज राजश्री शिवाजी राजे छत्रपति तक्त कोल्हापूर या दरम्यान हरदू तर्फेने सरकारच्या कुल् अख्तियारानिशीं एकबाल पन्हाह हनराबल व सरकार कपनीचें कर्ज श्रीमन्महाराज राजे याजकडून देणें, त्याच्या फैसल्या बाबे व जजिरे मुबई एथील सरकारचे बेपारी यास इग्रजी सन १७८५ पासून माल्वणच्या आरमाराने नुकसान केलें असे त्याच्या फैसल्या बाबे, तपशील जलेबमोजीब करार केला आहे बितपशील —

१ जे दोस्ती अजकदा मूळ आयाम पासून हनराबल कपनी व श्रीमन्महाराज राजे कोल्हापूर या दरम्यान चालत आली आहे ते फेर मोहकम करून तर्फेने दरम्यान कज्जिया चालत असे तो हीं कलमें कबूल जहाल्यावर फैसला होईल

२ श्रीमन्महाराज राजे कोल्हापूर करार करितात का, त्याहीं अज्जम मिस्तर ब्रूम याजशीं करार केला होता त्यापैकीं बाकी हनराबल सरकार कपनीचें कर्ज देणें असेल ते तिहीं दफातीनें द्यावे पाहिल्या दफाताचा ऐवज तारीख १ माहे जानेवारी सन १७९३ ते दिवशीं आदा करावा व दिगर दफातींचा ऐवज आदा होय तव पावेतों तो दरसालच्या जानेवारी महिन्याच्या १ ले तारखेस देत जावा, म्हणजे तारीख १ माहे जानेवारी सन १७९५ ते दिवशीं कुल् फैसला होईल

३ सदर्हू कर्ज श्रीमन्महाराज राजे कोल्हापूर याजकडून सरकार कपनीस देणे त्यास बियार साले गुजरलीं व व्याज चढलें सबब कीं, त्याच्यानीं राज्यावर मुदत कसाला गुजरला, त्यामुळें त्याच्यानीं व्याज द्यावयास ताकद नाहीं म्हणून हनराबल कपनीकडेस आज तरी किल्लेबतबनी दरख्यास्त करितात कीं, व्याज माफ करावें, त्यास व्याज द्यावयाची हिम्मत राहिली नाहीं याजकारिता कबूल केलें जात आहे, जे सदर्हू कराराप्रमाणें श्रीमन्महाराज आपलें इमान राखून ऐवज आदा करतील तरि व्याजाचा दावा करणार नाहीं

४ श्रीमन्महाराज राजे कोल्हापूर करार करितात कीं, त्याच्या आरमाराकडून बेपारी-

यासि नुकसान इग्रजी सन १७८५ पासून जहालें आहे त्याचा यादी दाखली बयाज इग्रजी तारीख ३१ जुलई सन १७९२ पावेतों करून हिशमत पन्हाह अज्जम मेजर जनराल राबर्ट आबरक्राबी प्रसिदेन्त गोवर्नदोर जनराल मुबई यासि श्रीमन्महाराज राजे याजकडे पाठविलीं आहे, त्याचा ऐवज द्यावयाकरिता करार करितात कीं, तूर्त अज्जम बाळाजी राम सरलष्कर याजबरोबर रुपये वीस हजार पाठविले आहेत हे द्यावे व दिगर पचवीस हजार रुपये चहू दफातीने द्यावे म्हणून करार केला असे त्याचा तपशील पहिली दफाती तारीख १ मार्च सन १७९३ व दिगर तीन दफातींचा ऐवज दरसाल मार्च महिन्याच्या १ ल्या तारखेस देत जावा जबलग सदर्हू पस्तीस हजार रुपये फैसला होई तव पावेतो द्यावे ऐवजात व्यापारी याचे कुल् नुक्सान फैसला होईल

५ सदर्हू कलमे करारात आणून त्याजवरी श्रीमन्महाराज राजे कोल्हापूर या तर्फेनीं अज्जम बाळाजी राम याहीं खुद् आपली निशाणी व महाराज याजकडून या कामाकरिता शिक्का याजकडेस दिला असे तो शिक्का करून द्यावयास अख्तियारकुल् असे याकरिता मशारनिल्हे बाळाजीराम याणीं या कारारावरी निशाणी महाराजाचा शिक्का केला, म्हणजे हा करार श्रीमन्महाराज राजे याजकडूनच बहाल व मोहकम जहाला व एकबालपन्हाह सरकार कपनी तर्फेनें ज्या वक्तीं हा करार दाहद बगाल येथील शामत व अवलीमर्तबत हनराबल यरेल कार्नेलवालीस नैट आफ धी ग्याडर बहादूर गवरनर जनराल हिंदुस्थान कबूल करून कुलिअखत्यार पाठवितील, तेव्हा सरकार कपनी तर्फेनीं निशाणी व शिक्का होईल

सदर्हू कलमे हनरेबल मेजर जनराल राबर्ट आबरक्राबी प्रसिदेत गोवर्नदोर जनराल जजिरे मुबई या तर्फेने अज्जम लेफ्टनेन्ट उलियम टामस साडीफोर्ड कारफरदाज व श्रीमन्महाराज राजे कोल्हापूरकर या तर्फेनीं अज्जम बाळाजी राम सरलष्कर या दरम्यान जजिरे मुबईच्या मुक्कामीं करार जहाले असत इग्रजी तारीख २५ माहे नवबर सन १७९२ इ छ १० माहे रविलाखर सुरुसन सल्लास तिस्सेन मया व अल्फ बाळाजीराम मामलेसर लष्कर, हुजूरच्या आज्ञेवरून करार लिहिलें असे

---

ले ४५२ }
[ ४३४ ] }

{मार्गशीर्ष शु १२ श १७१४
{ता २५-११-१७९२

सन १२०२ फ सन १७९२ इ

नकल फेरिस्त नबर १९

करारनामा सुजा आतवत हनूर दस्तगाह अजम लेफ्टनेंट उलियम टामस साडीफोर्ड कारपरदाज अजतर्फ हशमत पन्हाह हनराबल मेजर जनराल राबर्ट आबरक्राबी प्रसिदेन्त गोवर्नदोर जनराल जजिरे मुबई व अज्जम बाळाजी राम सर लष्कर अजतर्फ श्रीमन्महाराज शिवाजी राजे छत्रपति तक्त कोल्हापूर यां दरम्यान हरदू तर्फेनें सरकारचे कुल् अख्तियारानिशीं एकबाल पन्हाह हनराबल सरकार कपनीचें कर्ज श्रीमन्महाराज राजे याजकडून देणें•

---

* हा व खालील कागद बहुतेक एकाच मतलबाचे आहेत

त्याच्या फैसल्या बाबे व जजिरे मुबई एथाल सरकारचे पन्हाताल बेपारी यास इग्रजी सन १७८५ पासून मालवणच्या आरमाराने नुकसान केलें असे, त्याच्या फैसल्या बाबे तपशील जेले बमोजीब करार कलमेंत आहे बितपशील कलम

१ जे दोस्ती आनकदी मूळ आयम पासून हनराबल कपनी व श्रीमन्महाराज राजे कोल्हापूर या दरम्यान चालत आली आहेत ते फेर महकूब करून तर्फेनें दरम्यानें कज्जिया चालत असे तो हीं कलमें कबूल झाल्यावर फैसल होईल कलम

२ श्रीमन्महाराज राजे कोल्हापूर करार करितात कीं त्याहीं अज्जम मिस्तर ब्रूम याजशीं करार केला होता त्या पैकीं बाकी हनराबल सरकार कपनीचे कर्ज देणें असेल ते तिहीं दफातीनें द्यावें पहिल्या दफातीचा ऐवज तारीख छ १ माहे जानेवारी सन १७९३ ते दिवशीं आदा करावा व दिगर दफातींचा ऐवज आदा होय तों पावेतों दरसालच्या जानेवारी महिन्याच्या १ ले तारखेस देत जावा म्हणजे तारीख १ जानेवारी सन १७९५ ते दिवशीं कुल् फैसल होईल

३ सदर्हू कर्ज श्रीमन्महाराज राजे कोल्हापूर याजकडून सरकार कपनीस देणें त्यास बिसयार सालें गुजरलीं व व्याज चढले सबब कीं, त्यांच्या राज्यावर बहुत मुदत कसाला गुजरला त्या मुळें त्याच्यानें व्याज द्यावयाची ताकद नाहीं म्हणून हनराबल कपनी कडेस अजतरीक मेहेरबानी दरखवास्त करितात कीं व्याज माफ करावें त्यास व्याज द्यावयाची हिम्मत राहिली नाही, या करिता कबूल केलें जात आहे जे, अगर सदर्हू कराराप्रमाणें श्रीमन्महाराज राजे आपलें इनाम राखून ऐवज आदा करतील तरि व्याजाचा दावा करणार नाहीं

४ श्रीमन्महाराज राजे कोल्हापूर करार करितात कीं, त्याच्या आरमाराकडून बेपारी यास नुकसानी इग्रजी सन १७८५ पासून जहाले आहे त्याची याददास्तबमा व्याज इग्रजी तारीख ३१ जुलई सन १७९२ पावेतों करून हशमत पन्हाह अज्जम मेजर जनरल राबर्ट आबरक्राबी प्रसिदेन्त गोवर्नदोर जनरल जजिरे मुबई याहीं श्रीमन्महाराज राजे याजकडे पाठविली आहे, त्याचा ऐवज द्यावयाकरिता करार करितात कीं तूर्त अज्जम बाळाजी रामया हमराह रुपये वीस हजार पाठविले आहेत ते घ्यावे व दिगर पास्तिस हजार रुपये चहू दफातींनीं द्यावे म्हणून करार केला असे त्याचा तपशील पहिली दफात तारीख १ मार्च सन १७९३ व दिगर तीन दफातींचा ऐवज दरसाल मार्च महिन्याचे १ तारिखेस देत जावा जबलग सदर्हू पास्तिस हजार रुपयाचा फैसला होय तव पावेतों ह्या ऐवजात बेपारी याचे कुलनुकसान फैसल होईल कलम

५ सदर्हू दफातींचा ऐवज आदा व्हावा त्याच्या जामिनीकरिता व या पुढें इग्रजी कौली तराडी यास श्रीमन्महाराज राजे याच्या आरमाराकडून इजा न पोंहचावी याविषयीं सरकार कपनीची निशा पुरली पाहिजे, म्हणून श्रीमन्महाराज राजे करार करितात कीं,

जजिरे मालवणास इग्रजाही फैतारी घालावी त्या फैतारीवरि इग्रजी निशाण उडेल जव पावेतों सदर्हू दावे फैसल होत ते तव अगर त्या बाद इग्रजाच्या हातील का फैतारी ठेवावी वरत्या बाबे इग्रजाच्या अख्त्यार असे या शिवाय श्रीमन्महाराज राजे क्बूल कारितात कीं, अगर इग्रजास दरकार पडल्यास कोल्हापुरात आपण जेथें रहातात त्या जागीं फैतारीस जागा द्यावी व त्या हरदु फेतूऱ्यात जे शिपाई लोक सरकार इग्रजाकडून रहातील त्यास अनुका अडीश्री श्रीमन्महाराज राजे देतील जेथ पावेतो सदर्हू कलमे कुल अमलात येत तव पावेतों

६ सदर्हू कलमें करारात आणून त्याजवरि श्रीमन्महाराज राजे कोल्हापूर या तर्फेनीं अज्जम बाळाजीराम याणीं खुद्द आपली निशाणी व महाराजाकडून या कामाकरिता शिक्का त्याजकडेस दिला असे तो शिक्का करून द्यावयासि त्यास अख्त्यार कुल् असे याजकरिता मशार-निल्हे बाळाजीराम याहीं या करारावरि निशाणी करून महाराजाचा शिक्का केला म्हणजे हा करार श्रीमन्महाराज राजे याजकडूनच बहाल व मोहकम जहाला व एकबालपन्हाह सरकार कपनी तर्फेनीं ज्या वक्तीं हा कररदाद बगाल येथील शहामत व अवलीमर्तबत रैट हनराबल येरल कार्नवालीस नैट आफ धी ग्यारडर बहादूर गवर्नर जनरल हिंदुस्थान कबूल करून कुल् अख्तियार पाठवितील, तेव्हा सरकार कपनी तर्फेनीं निशाणी व शिक्का होईल

सदर्हू कलमें हनराबल मेजर जनराल राबर्ट आबरक्राबी प्रसिदेन्त गोवर्नदोर जनराल जजिरे मुबई या तर्फेने अज्जम लेप्टनेन्ट उलियम टाम्स सार्डी फोर्डकारपरदाज व श्रीमन्महाराज राजे कोल्हापूर यात तर्फेनीं आज्जम बाळाजी राम सरलष्कर या दरम्यान जजिरे मुबइच्या मुक्कामीं करार जहाला आहे ते इग्रजी तारख २५ माहे नवेंबर सन १७९२ छ० १० माहे रबिलाखर सुरुसन सलास तिस्सैन मया व अल्फ बाळाजी राम मामले लष्कर हुजूरच्या आज्ञेवरून करारनामा लिहिला असे

---

ले ४५३ } [ ४३७ ]

{ आषाढ व ८ श १७१५ ता २९-७-१७९३

श्री

सन १२०३ फ सन १७९३ इ नकल फेरिस्त न० २९

यादी खेमसावत भोसले सरदेसाई प्रात कुडाळ व महालानिहाय याजकडे जाबसाल करवीरकर महाराज याजकडून उलगडून घ्यावयाचे सुरूसन आर्बातिस्सैन मय्या व अलफ कलमें बितपशील

| | |
|---|---|
| सन सम्मानात महाराजांची स्वारी घाटा खालीं जाऊन सावताकडील किल्ले कोट प्रात घेतला आहे तो सरजामसुद्धां माघारा द्यावा ५ किल्लेकोट | लढाई खेरीज किल्यावरील वगैरे तोफा व जकीरा व चीजवस्त जरा बाजरा जे जे असेल तें माघारें द्यावें कलम ० वाजवी खर्च द्यावायाजोगा असेल तो |

१ तालुका गर्वगड व दरे वगैरे निसबत कमळजाबाई भोसली

१ ठाणें तुकरवाडी

१ किल्ले नरसिंहगड

१ किल्ले भरतगड

१ कोटानिवर्ती

५

१ मुलूक घेतला असेल तो दरोबस्त माघारा द्यावा

६

एकूण सहा कलमाचें कलम सदहू प्रमाणे उभयताकडील कारकुनाच्या हवालीं व्हावा सन सम्मान समानीन व तिस्सा समानीन दुसालांत पाडाव व पाडाव लोकापासून कतबे घेतले आहेत व कुळापासून कतबे घेतले आहेत त्यापैकी कांहीं वसूलही घेतला आहे, त्यास वसूल घेतला असेल तो घेतलाच बाकी घेणें राहिले असेल तो घेऊ नये त्याचे रोखे राहिले असतील ते माघारे घ्यावे व रोखे घेऊन वसुलात आले नाहींत असेहा रोखे असतील ते माघारे घ्यावे व लढाई तील वगैरे सरदार व कारकून व पाडाव लोक व चाकरमाने व रयत सोमसावत सुद्धा अटकेत असतील ते सोडून द्यावे व कोणापासून जामीन कतबे घेतले असल्यास माघारे द्यावे

सदहू पैकीं पाडाव वगैरे सोडले असतील ते जाऊन बाकी राहिले असतील ते सोडून द्यावे व रोखे कतबे माघारी सावताकडे द्यावे सोमसावत माजगावकर यास अटकेंत ठेऊन त्याजपासून तीन हजार रुपये खड करार करून तो ऐवज जगदेवराव नाईक निंबाळकर यास तैनातींत लावून दिला आहे त्यास मशार मजुरा देऊ बाकी जकिरा वगैरे जरा बाजरा माघारे सावतास देवावें

माल मजकुरीं सनतिस्सैनात वसूल व खड पुरोई व कुळें धरून नेऊन त्याजपासून ऐवज घेतला असेल तो व कुळापासून कतबे घेतले असतील ते माघारे द्यावे मुलुकातील साल मजकुरीं वसूल पडला असेल तो ते नेमणुकी प्रमाणें शिबदी किल्याची व महाल सबबी खर्च रुजुवातीनें वजा करून बाकी राहील तो ऐवज सावतास माघारा द्यावा कलम १

सन तिस्सैनात कलम ठरलें त्यास सल्लास अखेर चार सालें त्यास चोहों सालाची जमा महाराजाकडील व सावताकडील कारकून याच्या गुजारतीने वाजवी ठरेल त्यात शिबदी खर्च वगैरे वाजवी आला असेल तो वजा करून बाकी ऐवज निघेल तो महाराजाकडून सावतास देवावा

कर्यात पाटगांव येथील चौकी नरसिंह गड निसबत सावताकडील पुरातन पासून राहते त्याप्रमाणें दाखला पाहून ठेवावी

कलम १

सुवामत पासून चौकी असेल त्याप्रमाणें असावी समानगड प्रातातून व हेरलेवाडीहून घन श्याम यशवत हेरे तालुक्यात स्वारी करून दगा करितात त्यास त्याणीं दगा करू नये या प्रमाणें महाराजास विनती करून बदोबस्त करावा कलम १

सदहू प्रमाणें बदोबस्त करावा

निल्हे याणीं तीन हजार रुपये घेऊन ज्यास्ती दोन हजार रुपये मागतात ते मागू नये पहिल्या तीन हजार रुपयाचा रोखा जगदेवराव नाईक याणा घेतला असेल तो माघारा द्यावा कलम १

सदर्हू प्रमाणे कलमाचा फडशा जहाला असे

एकूण सात कलमाचा फडशा सदहू लिहिले प्रमाणें करून देवावा छ २० जिल्हेज सुरुसन आर्बातिस्सेन मया व अल्फ

---

ले ४५४ [ १३० ] — मार्गशीर्ष शु १२ श १७१६ ता ४-१२-१७९४

पौा छ १४ जमादिलावल ॥ श्री ॥

विनती विज्ञापना दौलानीं कम [ काल ? ] ठाण्यास आम्हास बोलाविल्यावरून छ ७ जमादिलावल सोमवारा गेलों येकातीं बैठक होऊन दौलाचे बोलण्यात आले कीं, मीर आलम याजकडून पत्रें आली आहेत छ २९ माहे रा खरीं श्रीमतानीं मीर आलम व राजाजी यासि बोलाविल्यावरून गेले दरबार जाला मदारुल महाम व परशराम पडत व अप्पा बळवत व चिंतामणराव फडके व गोविंदराव भगवत सदर्हू इसमे होतीं श्रीमतानीं मदारुल महाम यास आज्ञा केली कीं, याशीं बोलावें त्यावरून मदारुल महाम याणीं बोलण्यास आरभ केला याप्रमाणें इबरत सदरीं आणून बोलण्यातील मजकूर लिहिला तें पत्रच मीरआलम याचें दौलानीं आम्हास वाचून दाखविलें याचा तपशाल आलाहिदा पुरवणी पत्रीं विनती लिहिली आहे, त्यावरून ध्यानात येईल रा छ १० माहे जमादिलावल हे विज्ञापना

---

ले ४५५ [ १०७ ] — मार्गशीर्ष व ७ १७१६ ता १३-१२-१७९४

॥ श्री ॥

विनती विज्ञापना मीर पोलाद अली सिकदर जाहा नबाबाचे पुत्र यानीं मजला सागून पाठविले कीं, नबाब व श्रीमत उभयता निफाला येणे ठीक नाहीं जर तुम्हीं म्हणाल तर मी या कामात येता मुषरूलमुल्क यास सागून नबाबाची मर्जी घेतों म्हणोन निरोप याचे उत्तर त्यास दिल्ह कीं, आपण या कामात यावे असा आम्हाकडून पैगाम आपल्याकडे नाहीं हीं गोष्ट जाहिरींत येईल ते वेळेस आम्हाकडून स्पष्ट उत्तर होईल का, याजकरिता आमचे नाव तुम्हीं घेऊ नये याचा जबाब त्यानीं दिल्हा कीं, तुमचें बोलण आहे असे मी

कसें म्हणेन ? जर तुम्हाकडून काहा असते तर बोलतो काहींच नाहीं याजकरिता तुमचें घेणार नाहा जर मर्जी हुजूरचा असली तर मी शोध करून पाहतों याप्रमाणें पुसतों परंतु माझे विद्यमान जाबसाल करावा असे तुम्हीं करार करून सांगावे तेव्हा त्यास म्हटलें कीं, मुषरूलमुल्क या गोष्टीवर राजी होणार नाहीं, याजकरितां तुम्हीं हे करू नये मुषीराची मर्जी ही घेतली होत असल्यास करावे मला मान्य, नबाबाची परवानगी ही देववितों, ऐसें त्याचे म्हणणें आहे तुम्हीं हो म्हटलें म्हणजे उदईक जाहार दारीनें तुम्हाकडे कोण गृहस्थ बोलावयासि पाठवितों तेव्हा त्यास उत्तर दिलें जे दौलाचे समते हें आपलें बोलणें त्यास श्रीमतास या गोष्टीची विनंती लिहितों तेथून उत्तर आलियावर काय आज्ञा येईल तसें सांगेन, म्हणोन यास जबाब देऊन खुटविलें विनतीही लिहिली आहे आज्ञा येईल त्याप्रमाणें करीन रा। छ १९ जमादिलोवल हे विज्ञापना

---

ले ४५६ }
[ ४८६ ] } { ता १६-१२-१७९४
{ मार्गशीर्ष व १० श १७१६

श्रीगजानन प्रसन्न

छ २४ जमादिलावल

यादी सर च्यार्लिस वार मालीट इंग्रज वकील कलकत्तेकर याजकडील उट जरूर पचवीस सुरत प्रांत गुजराथ येथून पुणियासि येत आहेत यासि जकातीचा उपसर्ग न लागता पुणियासि येऊ देणें म्हणोन रहदारीचे सुरुसन खमस तिसैन

सदर्हूप्रमाणें रहदारीचे दस्तक देवावे देणें छ २२ जमादिलोवल सन खमस तिसैन मार्गशार्ष

---

ले ४५७ सन १७९५ पूर्वी
[ ४५३ ]

श्री

*स्वति श्री मदमंदाकिनी संदोह संपूरिता शेष जटामंडल परिलसच्छिव चरण द्वंद्व-निर्द्वंद्व-भजनासादित-समस्त-पुमर्थ-सार्थसार्थकीकृत-निज-वंशावतारेषु, पूर्व पूर्व-धन्य राजन्य-मुर्धन्याचरित-धर्माचरण-प्रचारण-चातुरी-धुरीणेषु, सौजन्य सिंधुषु, श्री महाराजाधिराज महाराणा श्रीमद्भीमसिंहनृपवर्येषु, ¶श्रीमन्माधवराय नारायण पंडित प्रधान-विहिताशीराशय

---

* हें पत्र व पुढील बरींच पत्रें रा० रा० त्रिंबकराव जीवनराव चिटणीस याजकडून अस्सल मिळालीं काहा सोनेरी रुपेरी वेलबुट्टीच्या कागदावर लिहिलेलीं आहेत पेशव्याच्या चिटणीसाचे त्रिंबकराव हे वंशज होत त्यानीं होऊन हे कागद आम्हांकडे प्रसिद्ध होण्याकरिता दिले ह्या बद्दल आम्हीं त्याची स्तुती करून आभार मानितों

¶ यावरून हें पत्र उदेपूरचे राणे भीमसिंग यास सवाई माधवराव याणीं लिहिलें आहे असे होतें हा बहुधा पाठविण्याच्या पत्राचा मसुदा असावा

समुल्लसतु †पौषकृष्ण बधि श्री मत्त्रिलोचन कृपया परिवारा क्षमिणो वय भवदाय शमाहेश्च मानमाशास्महे विशेषस्तु मौजे बाडी परगणे मेवाडायग्राम श्रीराणाजीभिरस्मत्पूर्वजौ गद्युपनामक विष्णु महादेव सदाशिव महादेवाख्यावुभौ भ्रातरौ एकत्र स्थितिमतौ, तयोर्ज्येष्ठो विष्णु महादेव इति तन्नाम पुरस्कारेण दत्त तदनतर विष्णु महादेवो सदाशिव महादेवस्य पुत्रो रघुनाथरावश्च उभौ विभक्तौ जातौ तदानीमेतद्ग्रामस्योपभोग उभाभ्या समेन वर्तव्य इतिनिश्चये जातेपि एकविंशतिमवत्सरपयत गणपतराय-विष्णुना एकेनैव सपूर्णग्रामस्योपभोग कृत अस्माकमर्धांशो न दत्तेति सदाशिव रघुनाथैर्निवेदित अत अधुना यावत्सवत्सर पर्यंत सपूर्ण ग्रामस्योपभोग यथा गणपतराय-विष्णुना कृतस्तथा वर्तमान एकविंशति सवत्सरपर्यंत सदाशिव रघुनाथ सपूर्ण ग्रामस्यानुभव करिष्यति अग्रे उभावपि समानविभागाभ्यामनु भविष्यत गणपतराय विष्ण्वनुयाय्यवरोध करिष्यतिचेच्छ्रामद्भि शिक्षणीय -

---

ले ४५८ [ १२९ ]  ता २१-२-१७९५ फाल्गुन शु २ श १७१६

श्री

विनती उपरि छ १ माहे षाबान सिद्दी इमामखान यांस दौलानीं पाठविल्या वरून प्रात कालचे प्रहर दिवसास आले पत्राचा जबाब आला कीं नाहीं म्हणून पुशिले आला नाहीं, येईल ऐसें उत्तर केलें नतर कितेक अदेशाचे बोलणें बोलत होते तृतीय प्रहर जाला अद्याप पत्रे आलीं नाहींत म्हणाले आलियावर सागून पाठऊ तेव्हा बोलिले कीं, पत्रें आलीं म्हणजे आपणच चलावें उत्तम म्हणोन सागितलें नतर बोलिले कीं, कदाचित् सायकाळ पर्यंत जबाब न आल्यास आपण दौलाकडे चलावें, चार गोष्टी बोलण्यात याव्या म्हणजे ते नवाबास मुक्काम करण्या-विषयीं अर्ज करितील तेव्हा त्यास म्हटलें जे, पत्राचा जबाब आलिया वेगळ काय बोलावे ? जबाब येईल तेव्हां येऊ कूच करणें अथवा मुक्काम याविशीं आम्ही कांहींच म्हणत नाहीं, आणि म्हणणारही नाहीं जशी तुम्हास सल्लाह वाटेल तसें करावें आमचा प्रतिबध किमपि तुम्हास नाहीं पत्राचा जबाब तुम्हास पावे तों पर्यंत नबाबाचा मुक्काम तेथेंच असावा, अशी खावदाची आज्ञाही आम्हास आली नाहीं मग कूच अथवा मुक्काम याविशीं काय म्हणून तुम्हास सागावे ? तुम्हास सल्लाह दिसेल तसें करावें आमचे बोलण्याची प्रतीक्षा करू नये तेव्हा ते म्हणाले का, कूच करा अथवा मुक्काम हें आपण म्हणों नये परन्तु दौलाचें आपलें बोलणें होईल कूच मुक्कामाचे बोलण्या वेगळें आणखी बोलणे नाही कीं काय ? फैसल्याचा ठराव वगैरे अदेशाचीं बोलणीं होतील त्यातच कूच मुक्कामाचा प्रकार हें ते समजतील याजकरिता पत्र आले अथवा न आलें तरी चलावें म्हणोन बोलले तृतीय प्रहर आता जाला सायकाळीं सागू म्हणून बोलिलों तेव्हा म्हणाले उत्तम आहे आता येथून जा ये कशास करू ? मी सायकाळ पर्यंत येथेंच असतों बरोबरच येईन ऐसें म्हणोन येथेंच राहिले साय-

---

† ह्या शब्दापुढें तिथि घालण्याकरिता जागा टाकिली आहे

काळ जाला तो पर्यंत पत्राची प्रतीक्षा केली पत्राचें उत्तर नाहा, तेव्हा सध्या भोजन केलें इतक्यात दौलाची येक चिठ्ठी चोपदार घेऊन सिद्दीकडे आला चिठ्ठी त्यानीं पाहून चोपदारास बसावयास सागितले मग काय चिठ्ठींत होतें हे समजलें नाहा रावजी येतात किंवा कसें ऐसें लिहिलें असेलसें वाटतें आम्ही भोजन करून सहा घटका रात्रीं दौलाकडे गेलो सिद्दी इमामखानहा बरोबर होते तेथें बोलणे जालें त्याचा त॥ आलाहिदा लिहिला असे र॥ छ ३ षाबान हे विनतीर

---

ले ४५९ } [ ५९ ] }

{ता॥ ११ ३ १७९५ { फाल्गुन व ५ श १७१६

## खर्ड्याच्या लढाईचा पवाडा

हिंदुस्थान गुजराथ सोडून शिदा दखनेत आला ॥ हुकुम केला बादशाहानें त्याला ॥ ध्रुपद ॥ मजल दरमजल नर्मदा उतरून आले पार ॥ धरला दखनचा सुमार ॥ बेगुबेग येऊनि पाणी घेतले गगातीर ॥ फौज होती चाळीस हजार ॥ मनीं मनसुबा करुनी चढले बालेघाटावर ॥ धरला त्र्यंकाजी तस्कर ॥ मग कित्येकासा जरब पोचली मरून झाले चूर ॥ पळाले पुढ पाळेकर ॥ तेथुन जलदिनें कूच करुनी दाखल तुळजापुर ॥ आले दखनात झाले जाहिर ॥ दखनदेशा अंबा भवानी दैवत अनिवार ॥ देविसी केला नमस्कार ॥ चाल धुमाळीं ॥ दिले तुळजापुर सोडुनी ॥ गेले चंद्रभागा उतरुनी ॥ खबर ऐकिली श्रीमतानीं ॥ दोन कोस आले चालुनी ॥ भेटले हाडपसराच्या रांना ॥ नेमिली पुण्याची छावणी ॥ जवळ पेठ आहे भवानी ॥ मुक्काम वानवडीवर केला ॥ हुकूम केला बादशाहानें त्याला ॥ १ ॥

सहा चार महिने तिथें गुजरले पुण्यास येउनी ॥ मनसुबा बहू सबळ करुनी ॥ नबाबासी पत्र लिहिले फार फार अर्जीनी ॥ खर्चीं द्या आम्हास पाठवूनी ॥ जासुदजोड्या केल्या रवाना पोंचल्या जाउनी ॥ पत्र टाकिले मुजरे करूनी ॥ नबाब बहादर मशरनमुलख एक मसलत करूनी ॥ पत्र पाहिले त्यानीं ॥ वाचुन परगण्यावर चिठ्या नेमिल्या समय सम पाहुनी ॥ नगदा ऐवज दिला लावूनी ॥ पासष्ट लाख रुपये पोंचले नाहीं भरले मना दखनचा हिशेब घेऊ भरूनी ॥ चाल धुमाळी ॥ ऐसे करणे भगवताला ॥ हिंदुस्थान ज्याने काबिज केला ॥ परतुन दखनमधी आला ॥ पुणें शहरीं काळ झाला ॥ खबर कळला नबाबाला ॥ नबाब बेदरावरा आला ॥ खरे खोटे भासे लोकाला ॥ तक्तीं दवलतराव स्थापिला ॥ हुकुम केला बादशाहानें त्याला ॥ हिंदुस्थान सोडून० ॥ २ ॥

नबाबानें पत्र लिहिले श्रीमत नानासी ॥ शिवाय दवलतराव बापुसी ॥ पासष्ट लाख रुपये आम्हीं कर्ज दिलें शिंद्यासी ॥ लवकर द्या आमचे आम्हांसी ॥ आटोकाट सरदार मिळोनी बसले मनसुब्यासा ॥ क्रोध आला दवलतरावासी ॥ तुम्हीं बसून रहा पुणें शहरीं हुकूम करा आम्हासा ॥ पाहुनि घेतों नबाबासी ॥ तमाम फौजा मिळोनि दिले रोजमुरे

त्यासी ॥ बोलाविले जिऊबा दादासा ॥ तिथे जेवत असला तुर इथें या तुम्हा पाणा पियासी ॥ घेऊनि देवजा गवळ्यासी ॥ चाल धुमाळी ॥ घेऊनि लवकर पोचले ॥ श्रीमत पुण्याबाहेर निघाले ॥ मुळामुठावर डेरे दिले ॥ बावन उमरावर मिळाले ॥ एकदर बसूनि मनसुबे केले ॥ भोसले ते हि लवकर आले ॥ शिंदे आघाडीस घातले ॥ येऊन सिनेवर शह दिला ॥ हुकुम० हिंदुस्थान० ॥ ३ ॥

बेदर सोडून नबाब लोकर बाहेर निघाले ॥ अमिर उमराव समे घेतले ॥ चला चला म्हणून लवकर धारुरावर आले ॥ पुण्याकडे झेडे फिरविले ॥ तेथुन जलदिनें कूच करूनि बाजरानदावर आले ॥ फिरगी आघाडीस घातले ॥ शेक्सलाची करू कदुरी मशीरन बोलले ॥ पेशवे थरथरा कापु लागले ॥ पासष्ट लाखाचा मुल्लख मागता तेही विसरून गेले ॥ स्वप्नीं नबाब दिसू लागले ॥ साडीवरती साडी फिरता डाक्वाले बसविले ॥ वरचेवर बातमी आणऊ लागले ॥ चाल धु० ॥ घाट उतरले मोहोरीचा ॥ मार्ग धरिला पुण्याचा ॥ एकच गट करून फौजेचा ॥ माळ चढले नायगावाचा ॥ तक [ ला ? ] वा आला तिकडून पेशव्याचा ॥ निश्चय केला यानीं झुजाचा ॥ धडाधड बार सुटे तोफेचा ॥ मुसा रहिमुनचा† मोरचा तुडवला ॥ हुकूम० हिंदु० ॥ ४ ॥

नबाबाने मोरचा तुडविला कळलें श्रीमताला ॥ अजुरदे जाले बहु मनाला ॥ अमीर सारे बोलावूनी आणिले डेऱ्याला ॥ वक्त हा बुडायाचा आला ॥ नाना फडणीस एक मसूदी तर्क त्यानें काढिला ॥ बोलाविलें जिउबा दादाला ॥ तुम्ही आघाडीस असता मनसुबा कसा नाहा कळाला ॥ नबाब गफलतीने आला ॥ तीच विरशरी धरून सज्या फौजा आघाडिला ॥ चुरस लागली तेव्हा शिंद्याला ॥ भिवराव पानसे तोफखाना त्याचे हवालीं केला ॥ फिरगी लोक तैनातीला ॥ चाल धु० ॥ पेशव्यानीं विचरणा रोखन सज्या फौजा पुढे देऊन ॥ रास्त्याना एक अलग करून ॥ फडक्यानीं तवाफरा* बाधुन ॥ राजे बहादर नाम निशाण ॥ फौजा नानाच्या आध्यान ॥ तेथें मिळाले अष्टप्रधान ॥ हौद्याशा हौदा भिडुनी गेला ॥ हुकूम केला ॥ ५ ॥

करून स्वारी तयार नबाब जरदा अबारींत ॥ बेगम्यापुढें हुजुरात ॥ त्याची उमेदवारी पेशवे सर करू सहजात ॥ बाधली राडानीं हिंमत ॥ मशरल मुलुख

---

† मुसा रहिमान हा पेशव्याचा आरब सरदार होता

* तराफरा=तवातोबरा ? पूर्वी प्रत्येक घोडेस्वाराने मुलुखगिरीवर जाते वेळा एक तवा व एक तोबरा इतकी सामुग्री तरी जवळ बाळगावी असा प्रघात असे त्यावरून तवा-तोबरा म्हणजे मुलुखगिरीस लागणाऱ्या वस्तु याचा समाहार झाला फरा म्हणजे शिपायाची राग असा अर्थ आहे, पण मग ‘तरा’ शब्दाचा उलगडा चागला होत नाहीं

त्याचे मसुदी राजा नेमिवत ।। झाडुन फौजा त्याच्या अंकित ।। रोशनाखा पर बिनावाले नबाबाच्या हुकुमात ॥ भरअमल दोन्ही दळात माहित ॥ इस्मालखा दनी पठाण गारदी त्याचे सगत ॥ नामा करवळ आहे हुजुरात ॥ फाजलखा रोहिले खासि बारा हजार जमात ॥ जबुरे जोडुन उटावर [ त ] ॥ चा० धु० ॥ नबाबानें हल्ला केली ॥ फौज लोणिचा माळ चढली ॥ दोन्ही दळें उभीं ठाकला ॥ नामा सरदार आसदअली ॥ तोफ खान्याला शिलक दिली ॥ देवडी मार जेव्हा बसविली ॥ पेशव्याची मागें फौज हटविली ॥ फिरुन खरनदीवर मुक्काम केला ॥ हुकूम केला० हिंदु० ॥ ६ ॥

रातोरात आणून तोफखाना जोडिला जिउबा दादाना ॥ लोणीगारमाळ पसरुनि ॥ एकापरीस एक शिपाई रागडा हिंदुस्थानी ॥ दोन कपु फिरगाणी ॥ मन्याबापु भोसले परशरामभाऊ आज्ञा घेऊनी ॥ एक मोरचा त्यानीं रोंखुनी ॥ भवानराव प्रतिनिधी आले †अनूपान भोगुनी ॥ एक मोरचा त्यानीं रोंखुनी ॥ चौकोसाची लाबण पडली कोणात नाहीं कोणी ॥ ×बहिऱ्यामधीं फौज गेली मिसळुनि ॥ चाल धुमा० ॥ तोफेचा एकच वर्षला कहर ॥ गगनीं लागुनि गेला धूर मायसी पारख [ ले ] *लेंकुर ॥ नबाबासी कळुनि आला फितूर ॥ मजल काय [?] सुटेल तोफेचा बार ॥ पाचजण निवडले रणशूर ॥ मुसा रहिमुचें बुडविलें लष्कर ॥ रमणा बहुत तिथें मातला ॥ हुकुम केला बादशाहानें त्याला ॥ हिंदु० ॥ ७ ॥

लालखान वजिरखान ह्यानीं रणात घोडीं घातलीं ॥ परशरामभाऊसीं जखम चढविली ॥ दाजीसाहेब येथ शामजगास स्वारी केली ॥ पठाणी लोक सग हाटेली ॥ कटाव करीत चालले जेव्हां तिराचे मार बसविली ॥ भोसल्यानें गर्दबाण उडविली ॥ वजिरखानासी बाण लागता हौद्यांत जान सोडिली ॥ लालखाची सुद नाहीं लागली ॥ बाळासाहेब ठार जहाले वस्त शान §पडली ॥ खनाखना लव्हा गर्द उडाली ॥ भलेभले सरदार ह्यानीं बहिरींत तोंडे घातलीं ॥ आबारी नबाबानें फिरविली ॥ चाल धु० ॥ लोक लोक झाले चथत ॥ नबाबमशरलमुलुक हौद्यात ॥ आनदराव किल्ला ठेवा नजरेंत ॥ हावाई लाविली किल्यात ॥ नबाबदाखल सुल्तान दुर्गात ॥ बुणगे आले शिवपट्टणा भोंवत ॥ वेढा काय शिंवाचा पडला ॥ हुकूम केला बादशाहानें त्याला ॥ हिंदु० ॥ ८ ॥

---

† अनुपान भोगून-ह्याचा अर्थ स्पष्ट कळत नाहीं

× बहिंऱ्यामधी-तोफाच्या आवाजामुळें बधिरपणा आला त्यात किंवा खोंडा, दरी, नळी ?

* मूळात ' मायशी पारख लेंकर ' असे आहे त्याचा ' आई म्हणून तिलाच लेंकराची पारख, ओळख राहिली-बाकी सर्व धुदी झाली, ' असा निर्वाह करता येईल परतु वर दिलेलाच पाठ असावा असें वृत्तावरून होते व त्याचा अर्थही बरा होतो पारखलें=परकें झालें, त्याची ओळख बुजाली

§ ' वस्तशैन्य ' असे मूळात आहे कदाचित् ' मस्तसैना ' असेही होईल

खरनदीवर दिले मोरचे किल्याशा रोंखून ॥ फौज नबाबाची घेऊन ॥ जिउवा-दादा श्रीमताशीं बोले अर्ज करून ॥ नबाबास क्षणांत घेइन लुटून ॥ लुटल्यावाचून कारण नाहीं बसा शद्द देऊन ॥ नाना करील तेंच प्रमाण ॥ बेदड्यासी हुकूम टाका रस्ते बद करून ॥ रुपयाशेर तेव्हा मिळेना अन्न ॥ पाण्यावाचुनि फौज तरसली नबबानें ऐकून ॥ सल्यास धाडिले गोविंद किसन ॥ चाल घु० ॥ गोविंद किसन आले परतून ॥ नबाबासि वर्तमान सुचबून मशीरल मुलूख दिले पाठवून ॥ पेशव्यानीं टाकिले कैद करून ॥ जसा सापळ्यात व्याघ्र कोंडून ॥ नबाबासि नानाचे वचन ॥ खातरजमा झाली येथुन ॥ अवघा चिंतेचा विकल्प उडाला ॥ हुकुम केला बादशहाने त्याला ॥ हिंदुस्थान गुजराथ सोडुन शिंदा दखनात आला ॥ ९ ॥

शके १७१६ आनदनाम सवत्सर ॥ फाल्गुन वद्य ६ षष्ठी बुधवार ॥ किल्यामधिं येऊनि नबाबासि आठवला विचार ॥ द्यावी निंबाळकरासि जहागीर ॥ नबाब बोलता हजर विश्वासराव बापु सुपेकर ॥ आणविले आपासाहेब निंबाळकर ॥ भेट घेऊनिया [ करा ] कुचाचा विचार ॥ किल्यामधीं सदर ज्याहा बाहादर ॥ शके १७१७ राक्षसनाम सवत्सरे ॥ चैत्र पौर्णिमा शुक्रवार ॥ दळभार घेऊन नबाब बाजरानदीच्या वर ॥ सगे होते निंबाळकर ॥ चाल घुमाळी ॥ कनिया अखेर त्या वेळेस ॥ नबाब गेले भागानगरास ॥ श्रीमत पोंचलें थेट पुण्यास ॥ गैबिचे देणें भुजग आयास ॥ कादरभाई चाकरु दिले बिनीस ॥ त्यानीं जाऊन गांठिलें हारदास ॥ रामछद गातो मजलसीला ॥ हुकूम केला बादशाहानें त्याला ॥ हिंदुस्थान गुजराथ सोडुन शिंदा दखनात आला ॥ हुकूम केला बादशहानें त्याला ॥१०॥+

ले ४६० } [ ५४ ] } श्री {ता ११-३ १७९५ {फाल्गुन व ५ श १७१६

यादी श्रीमत महाराज राजश्री सवाई माधवराव साहेब याची स्वारी मोगलावर खर्ड्यापर्यंत गेली त्याचे मुक्कामाचा ऽ तपशील —

१ प्रथम श्रीमताची स्वारी निघोन मुहूर्तानें गारपिरावर डेरे दाखल झाले

१ तेथोन कूच करून थेउरचे मुक्कामास मुळामुठा नदीचे कडेस मुक्काम झाला आजमासें कोस ५ तेथें मकरसंक्रमण झालें

१ तेथोन पुढें कूच होऊन मौजे नादेड [ व ] करखाब गावामधीं नदी मुळा मुठा, तेथें मुक्काम जाहला कोश सात

१ तेथोन पुढें कूच होऊन मौजे पारगाव साळूमाळूचें म्हणतात व वाळकी [ या ] मधीं नदी मुळामुठा व भीमेचा सगम झाला आहे, तेथें मुक्काम जाहला कोश सात. लष्कर आघाडी पिछाडी दोन कोश तळ पडत होता

---

+ हा पोवाडा रा रा कृष्णाजी रघुनाथ केळकर याजकडून आम्हास मिळाला

ऽ ही याद आम्हास देलवडी ता० भिमथडी येथील इनामदार श्री० रावजी पुणेकर याजकडून रा० रा० तु० शाळिग्राम याणी मिळवून दिली हींत जीं स्थलाची नावें आलीं आहेत तीं जशीं मुळात दिसलीं दिलीं आहेत कोठें फरक असल्यास आमचे मित्र आम्हास कळवितील

१ तेथोन पुढे मौजे माडवगणावरून मौजे काष्टा [ व ] तादळी [ या ] दोहा गावचे मधी घोडनदावर मुक्काम झाला अजमासे कोश आठ श्रीमत व शिंदे व होळ कर याचा मुक्काम सरासरी तान कोश पडला होता

१ तेथोन पुढे मौजे आडळगावावर मुक्काम झाला कोश सात लष्करचा तळ लाबी रुदी सदहूप्रमाणे कोश तीन असे पाणी वोढयाचे [ ओढा ] पूर्वेस वाहतो

१ तेथोन पुढे मौजे भोसेगावापाशीं डोगराची खिंड आहे ता खिंड उतरून मौज मिरजगावावरून पूर्वेस नागलवाडी व सिगवी [ या ] मधा नदी सीना [ इज ] वर श्रीमताचा मुक्काम झाला मिरजगावावर होळकर उतरले खाडवी कोंबळावर शिंदे होते एकूण अजमासें तळ चार कोश होता आपा साहेब व भाऊ साहेब वगैरे झाडून लो क पा ळ [ ? ] याचे लष्कर उतरले होते मु ॥ कोश ९

१ तेथोन पुढें कूच होऊन फकराबाद धानोरे तेथें मु॥ झाला श्रीमताची खाशी स्वारी रत्नापुरात राहिली मधी खडकत गावावर जिऊबा दादा भेटले त्याणा आपली फौज व पलटणें वगैरे दाखविलीं तो गाव मौजे खडक्त, तेथून पुढे दोन कोशावर फक- राबाद धानोरे एकूण दोन गावे दरम्यान मधी विंचलना नदीवर मु॥ झाला तेथें मौजे कउडगाव येथे भोसले येऊन मिळाले त्याचा भेट होऊन नतर फकराबाद धानोरेवर मु॥ झाला कोश - लष्करची आघाडी पिछाडी सुमारें ५ कोशाचा तळ पडला होता तेथें हुताशनी झाली दुसरे दिवशीं धुळवडी तेथें खेळून प्रहर रात्र पिछलीचे सुमारास सड्या फौजा तयार होऊन आपासाहेब व भाऊसाहेब व बाबा फडके व जिऊबादादा व होळकर व भोसले ऐसे सडे तयार होऊन नबाबाचे तोंडावर मौजे बावीवरून मौजे घोडेगावावर गेले तेथें पहिले दिवशीं मोगलावर जाऊन उभे राहिले मोगल नबाब मोहोरीचा घाट खर्ड्याचे उत्तरेस आहे तो बालेघाट उतरून तळगसी घाटावर खरनदीवर मु॥ झाला होता तिक डील फौज तिसरे प्रहरीं चालून आली त्याची याची गोळागोळा होऊन ते परत माघारे मु॥ स गेले श्रीमताकडील स्वाऱ्या माघाऱ्या फिरोन घोडेगावचे रानातच मुक्काम झाला तेथे मुक्कामाखालीं गाव [ होते ते ] घोडेगावचे उत्तरेस ठाणें पिंपळगाव तेथे शिंदे [ व ] जिऊबादादा राहिले व बाबा फडके व आपासाहेब व भाऊसाहब व होळकर व भोसले एसे घोडेगावचे रानात दक्षिणेचे आगें बाघेगाव आहे तेथपर्यंत राहिले अजमासें चार कोशाचे आत

१ पुढें दुसरे दिवशीं नबाबाचें कूच होऊन वाकीगाव खरनदीच्या कडेस खरड्या- पासोन पश्चिमेस अदमासें दोन कोश आहे, तेथें नबाबाचा मुक्काम झाला ते दिवशा श्रीमताकडील सड्या स्वाऱ्या तयार होऊन फकराबाद धानोऱ्याहून रवाना नबाबाचे तोंडा- वर जाऊन, गोळागोळा होऊन, सध्याकाळीं माघारे फिरून घोडेगावापाशीं दक्षिणेस मौजे नाणजेवर व चोभेवाडी वर मु॥ झाला तिसरे दिवशीं नबाब कूच करून पराड्याचे सुमारें चालले आघाडीस राजे रावरभा व टूलेखान व आशद अलीखान व च ड व ले आणखीं वगैरे फौजा ऐसे आघाडीस बिनीवर चालले होते मध्यें बुणगे घालून पिछाडीस खासे

नवाबाचा स्वारी झाडून फौजासुद्धा येत होते ता इतक्यात श्रीमतान्या फाजा आपा साहेब व भाऊसाहेब व भोसले व होळकर ऐसे उजवे बाजूस दक्षिणेचे आग तरडगांवचे रानात टेकडीवर सरजामसुद्धा उभे राहिले होते खालीं ल्वणात उत्तरेकडाल बाजूस बाबा फडके हुजुरातसुद्धा जरीपटका घेऊन उभे होते टेकडीवर तोफा नवाबाच बुणग्यावर लावावयास आणल्या होत्या त्याहा पश्चिमेकडून येत होत्या तों जिउबादादा फौज पलटणें तोफखाना घेऊन उत्तरेकडून नवाबाचे खासे स्वाराचे तोंडावर उभे होते इताकियात पेंढारी याना बुणग्यावर तोंड लाविले तेव्हा नवाबाकडील आघाडान्या फौजा डठल्या तो पेंढारी लुटारी निघोन गेले नवाबाकडील फोजाची उठावणी झाली ती येऊन आपा साहेब व भाऊसाहेब टेकडीवर उभे होते त्यानवर आघाडी आला, तो इकडून आपासाहेब व भाऊसाहेब यानीं उठावणी केली तेव्हा दोहींदळांची चक्मक होऊन गर्दी झाली ते वेळेस भाऊसाहेबास कपाळावर जखम लागला तो उत्तरेकडून जिउबादादा फौज तोफखाना घेऊन येऊन पोहोचलें त्याणीं तरडगावचे रानात रणटेंकडी म्हणतात त्या टेंकडीवर नवाबाकडील फौजेचा जमाव होता, त्याजवर उत्तरेकडून तोफा लाविल्या व श्रीमताकडील बारगार झाडून जमा होऊन करोली सुरू झाली, व भोसले याणीं दक्षिणेकडून बाणाचा मार केला ऐशी ल्डाई प्रहर दीड प्रहर झाला तों दोन प्रहरचे सुमारास मोगलाकडील लाल्खान पठाण यास छातीत गोळी लागून तो ठार झाला, व आवातर मोगलाचे फौजेची धूळधाणी होऊन मागाल सहा घटका दिवस आदमासें राहताना मोगलाचा मोड झाला तेव्हा मोगलाच्या फौजा खर-ड्याचे दक्षिणेस डोंगराची खिंड आहे, त्या खिंडींत अस्तमानीं शिरल्या त्याचे पिठावर श्रीमतान्या फौजा जाऊन चहूकडोन मोगल वेढून ता रात्र सरून मागील दोन घटका रात्र राहताना मोगल खर्ड्याजवळ आणून घातला पेंढारी लुटारा यानीं आगाडीस काहीं मोंगलाची लुटालूट केली हें वर्तमान श्रीमतास कळतांच मोगलास पाण्याच्या पखाली मिठाचे छकडे असें काहीं पाठविले म्हणोन सागतात आणि साडणास्वार पाठवून श्रीमतानीं आपले फौजेत ताकीद केली कीं, मोगल बुडवू नये, राखावयाचा आहे हे वर्तमान ऐकून श्रीमताच्या फौजा माघाऱ्या फकराबाद थानोऱ्यावर आल्या दक्षणेकडील चिंचपूर ब गी याचें [ व ] देवकराचें चिंचपूर असे दोन्ही गावावर भोंसले व होळकर राहिले बाबा फडके व आपासाहेब व भाऊसाहेब बोरलेगावचे रानात राहिले व जिउ-बादादा घोडेगावचे रानात राहिले दुसरे दिवशीं श्रीमताचा मुा रत्नापुराहून फकराबा-देवर नवाब मोडल्याचें वर्तमान ऐकून, कूच करून, मौजे पिंपरखेडें व गीरवलीगाव काहा जमळेगावचें रान एकून तीन गावावर श्रीमताचा मुा विंचरना नदावर जाला तेथून भाऊसाहेबाचे समाचारास श्रीमत बोरलेगाव बेलवडाचे रानात आले तेथे भाऊसाहेब होते तेथे समाचार घेऊन रत्नापुरावर माघारे गेले कोश ३ तेथून भाऊसाहेब जखमी म्हणून नाणजगावावर मुा केला तेथें नबाबाकडील रावरभा भाऊसाहेबाचे समाचारास आले पुढें सल्याचें बोलणें लागून सकेत ठरला इतक्यात दोन तीन रोजात नवाब यास खर्ड्यात

पाणी व वैरणीचा फार तोटा म्हणून खर्ड्यांतून कूच करून खर्ड्याचे पूर्वेस देवगाव [व] आब, दोन्हीं गावावर मुा करून राहिले तेव्हा श्रीमताकडील फौजा नबाबाचे पिछावर आणखा गेल्या त्या फौजेचा मुा शेलगाव कोश २ तेथें झाला मग नबाबाकडील सल्याचे बोलणे ठरवून तह झाला सरकारचे कागदपत्र उलगडून दिले तेव्हा श्रीमताचें म्हणणें मोगलास झालें कीं, तुमचे आमचे कागदोपत्रीं ठराव झाल्याप्रमाणें हस्तगत होई तोपर्यंत तुम्हाकडील मेसरील मुलुख ओलीस द्यावा तेव्हा मोगलानें खर्ड्याचे मुक्कामींहून मेसरील मुलुख यास गोविंदराव काळे याचे जिमतीस देऊन गोविंदराव काळे हे मेसरील मुलुख यास रत्नारपुचे मुा श्रीमताजवळ [येऊन] हजर केलें नतर नवाब कूच करून विटेचे घाटानें जावयास पुढे नळी वडगाव बालेघाटाखालीं आहे त्या वडगावावरून घाट चढून, घाटात जोतीबाची वाडी आहे, तिजवरून बालेघाट चढून घाटावर विटेगाव आहे त्या गावावर मुा झाला कोश ४ तेथून कूच करून कल्याणरायाचे वाशीवरून पुढें कळबास गेले तेथोन पुढें मातीची गढी म्हणोन गाव आहे, त्या गावावरून पुढें भालकी गाव आहे, तेथे मुा करून पुढें मैलार गाव आहे तेथें मुक्काम करून पुढें बेदरास गेले बेदरावर चार रोज मुा करून हैदराबादेस गेले —कलम

१ पुढें श्रीमताकडील फौजा शेलगावात होत्या त्या नबाब कूच करून गेल्यावर श्रीमताकडिल फौजा शेलगावावरून कूच करून सगमेश्वर गाव तेथें खरनदीचा व सीनेचा सगम झाला आहे, तो गाव सगमेश्वर तेथें मुा झाला अदमासें कोश ४

१ श्रीमताचा मुा रत्नापुरावर होता तेथोन कूच करून मौजे आव्हाटी गाव सीनेच्या कडेस आहे तेथें येउन श्रीमताचा मुा झाला तेथें फौजा साऱ्या येऊन मिळाल्या तेथें सरकारची भेट होउन हजेरी झाली मग श्रीमत व सर्व फौजा मिळोन कूच करून पराड्याचा किल्ला पाहून मुा पश्चिमेस झाला कोश ५ पाच

१ तेथोन पुढे कूच करून कारली मुगावावरून सोनारीवर मुा झाला कोश ५ पाच

१ तेथोन कूच करून रुईदुधीवर मुा झाला कोश ६

१ तेथोन कूच करून अजनडोहावर मुा झाला कोश ६

१ तेथोन कूच करून सिद्धटेकानजीक भीमानदीवर मुा झाला कोश अजमासें ७

१ तेथोन कूच करून मौजे आलेगावावरून खारेवाडीवर मु॥ झाला गारदौंडें-पर्यंत आघाडी होती श्रीमताचा मु॥ खारेवाडीवर गारदौंडेपासून पूर्वेस खारेवाडी कोशावर आहे, तेथें मु॥ श्रीमताचा झाला खारेवाडी लहान गाव म्हणोन मोठे गावचे नाव लाविलें परतु शोध घेता खारेवाडीवर मु॥ होता कोश ७

१ तेथोन कूच करून गारदौंडचे दक्षिणेस पावकोशीवर रस्ताच आहे, त्या मार्गानें स्वारी दौंडचे पलीकडून मौजे नानगाव इ त व ळ न [ ? ] दोन गावावर मु॥ भीमातीरीं झाला कोश ६

१ तेथोन पुढें कूच होउन देलवडीस आले तेथें राघूजी टकले याची मेजवानी

आपासाहेब व भाऊसाहेब यांणीं घेऊन पुढें टेकचे खावगावावर मु॥ झाला नदी मुळा मुठा कोश ८

१ तेथोन कूच करून थेऊर कोलवडीवर मु॥ झाला मधीं नदी मुळामुठा कोश ६

१ तेथोन स्वारा पुण्यास दाखल झाली कोश ५

स्मरणाचीं कलमें लिहिलीं त्याचीं उत्तरें

१ जिऊबादादा निजबत शिंदे हे मिरजगावचे पूर्वेस गाव खडकत आहे तेथें येऊन भेटले व फौज दाखविली असें म्हणतात

१ सड्या फौजा [ याचा ] पहिले दिवशीं घोडेगावावर मु॥ झाला दुसरें दिवशीं मौजे नाणजेवर मु॥ होऊन फाल्गुन वद्य ५ समारंभ तेथें झाला ते रान मौजे नाणज व चोंभिवाडीवर रंगपंचमी झाली

१ भाऊसाहेबाचे समाचारास श्रीमंत आले ते गावचे नाव बोरलेगाव बेलवडीचे रानांत

१ मसराल मुलूख यास गोविंदराव काळे घेऊन रत्नापुरचे मुक्कामीं आले

१ नबाब खर्ड्यास गेल्यानंतर सरकारच्या फौजा कोणकोणत्या गावावर राहिल्या आहेत तें सदरीं झाडून मुक्कामाचीं गावें लिहिलींच आहेत

१ नबाब खर्ड्याहून गेल्यावर मुगीचे घाटाने गेले नाहींत, विंटेचे घाटानें गेले, तो मजकूर सदरीं लिहिला आहे

१ या गावचा मु॥ दुसऱ्या गावावर गेला तो तळ कितीक लांब पडत होता म्हणोन आज्ञा त्यास शिंदे, होळकर, भोसले, आपासाहेब व भाऊसाहेब, वगैरे निरनिराळे उतरत होते, तेव्हा पाच चार कोशपर्यंत तळ पडत होता

१ गारदौंडेस पाच्छाई जादे होते म्हणून श्रीमंताची स्वारी गेली नाहीं दौंडेच्या पलीकडून अर्धा कोशाचे छाव्यानें स्वारी गेली नवबदी नगारे वाजले नाहींत म्हणोन परस्परां सांगतात

१ सरकारच्या फौजा नबाबाच्या पिच्छावर गेल्या त्याचे मुक्काम व कोश सदरीं कळलेच आहेत खर्ड्यापासून दक्षणेस चार कोश सुमारें गेल्या होत्या तथून माघारें फिरल्या

१ स्वारी पुण्याहून जाता येता मुक्कामाचे कोश किती ते सदर मुक्कामाचे लिहिलेच आहेत

---

ले ८६२ }
[ १३७ ] }

{ता २७-८-१७९५
{अधिक भाद्रपद शु १२ श १७१७ ?

श्री

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री भाऊ स्वामींचे सेवेशीं—पो गोविंदराव कृष्ण सा। नमस्कार विनंती उपरी येथील कुशळ जाणून स्वकीय लिहीत असावें विशेष इक

डील वर्तमान सांप्रत श्रीमंताचे पत्रीं विस्तारें लिहिले आहे, त्यावरून कळेल साडणी स्वाराची रवानगी येथून छ ९ सफरीं केली सरकारचे व आपल्या कडील पत्राचे जाब नवाबाकडील पारशी पत्रें व आपले पत्राचीं उत्तरें रवाना केला आहेत साडणी स्वार पोहोंचून पत्रें प्रविष्ट होतील, पावल्याचें उत्तर यावें साडणी स्वाराबरोबर पत्र पाठविलीं त्याचे उत्तर लव कर यावें म्हणजे पुढले चालीचा मार्ग समजेल राजश्री गोविंदराव बोलतील त्याजवरून ध्यानात येईल रा॥ छ ११ माहे मफर बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हें विनंती

---

ले ४५२ }
[ ४४९ ] }

{ ता। ७ १२ १७९५
{ कार्तिक व ११ श १७१७

श्री

( छ २४ जमादिलोवल सीत तिसैन मया व अल्लफ १२०५ फसली कार्तिक वा ११ सोमवार शके १७१७ राक्षस नाम संवत्सरे तारीख ८ दिसेंबर १७९५ इसवी )

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाबूराव स्वामींचे सेवेशीं, पो। बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंती उपरि येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष-श्रीमंत रावसाहेब यांचे शरीरीं किंचित् वायूची भावना पाच-सात दिवस होऊन गणपतीचे दिवाणखान्याचे दुमजल्यावरून कारंजाचे आगें सगी फरषावर जामिनास आले उजवे मांडीस जखम भारी होऊन दातास जरब बसली तर्बीब वैद्य व देवी मानवी वगैरे उपाय बहुत जाले परंतु गुणास न येता तिसरे दिवशीं सायंकाळीं कैलासवास केला ही गोष्ट मोठी वाईट जाली ईश्वरइच्छेस उपाय नाहीं श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति स्वामी व श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेब यांचीं समधानाचीं पत्रें येतील म्हणोन प्रतीक्षा होती हल्लीं इकडून, विनंती पत्रें पाठविलीं आहेत प्रविष्ट करावीं पुढे राज्याचा बंदोबस्त राहून, स्वामी सेवा घडली पाहिजे, येविशींची विनंती करून पुढील कर्तव्याचे विचाराची आज्ञापत्रें घेऊन पाठवावीं रवाना छ २४ जमादिलोवल बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती पैवस्ती छ २५ जमादिलोवल

* ह्या तजविजीवरून खालील यशोदाबाईच्या नावचे आज्ञापत्र लिहिलें गेलें असें दिसतें

---

ले ४६३ }
[ ४४८ ] }

{ श १७१७
{ सन १७९५

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके १२१ राक्षसनाम संवत्सरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी यांणीं गंगाभागिर्थी यशवदाबाई प्रधान यांसि आज्ञा केली ऐसीजे माधवराव पंडित प्रधान तुमचे भ्रतार यास अकालीं कैलासवास प्राप्त जहाला, पोटीं पुत्र नाहीं, पुढें पेशवाईचे पदाचा कारभार चालोन बंदोबस्त जहाला पाहिजे, त्यास तुमचे वंशा-

तील रघुनाथ बाजीराव याचे पुत्र आहेत त्याताल तुम्हास पुत्र देऊन पदाधिकारी करावा, तर पेशजी रघुनाथराव याजपासून अनन्वित गोष्ट घडली, त्या वेळचे सरदार व मुत्सदी याचा पूर्व द्वेष स्मरोन राज्यात बखेडा पडेल व शास्त्रविरुद्ध पडतें, व पेशजी कैलासवासी बाळाजी बाजीराव याणीं स्वामिसेवा एकनिष्ठपणे केली, एतदर्थी त्याचे वशाचें नाव पुढे चालावें, याजकरिता तुमचे भ्रताराचे नाव गोत्रजाताल दत्तपत्र तुम्हास देऊन, पेशवाईचे पदास अधिकारी करोन, कारभार राजश्री बाळाजी जनार्दन याणीं करावा असें महाराजाचे मर्जीस येऊन, तुम्हास पुत्र घेण्याविषयीं हे आज्ञापत्र सादर केले असे तरि गोत्रजातील दत्तपुत्र तुम्हीं घेऊन हुजूर विनती करणें

---

ले ४६४ } [ ४८८ ] } — { ता। १०-६-१७९७ { ज्येष्ठ व १ श १७१९

श्री

राजश्री काविरी राजे सस्थान बो म रा ज पा ळे गोसावी यासि—

छ अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य—स्नेहाक्ति बाजीराव रघुनाथ प्रधान आशीर्वाद उपरी येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशळ लिहीत ज।णें विशेष चिरजीव राजश्री चिमाजीआपा याचे लग्नाचा निश्चय जेष्ठ वद्य नवमीस केला आहे, तरि तुम्ही लग्नसमारभास निघून येणें जाणिजे छ १४ जिल्हेज सुरसन समान तिसैन मया व अल्फ बहुत काय लिहिणें [ लेखन सीमा ]

---

ले ४५५ } [ ४५५ ] } — { ता। ५-६-१७९८ { ज्येष्ठ व ७ श १७२०

श्री

पै।। छ १७ रविलोवल सन तिसा तिसैन श्रावण

अपत्य अलीबहादूर चरणावरि मस्तक ठेवून विज्ञापना तागाईत छ १९ जिल्हेज मुक्काम न दी लो ज नजीक काळींजर येथें साहेबाचे प्रतापें करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असें विशेष पागा हिम्मत राजश्री उमाजी वाघ याचे पागेचे बेगमीस घोडपचे जहागिरीचे गाव आहेत तेथिल अमल भोसले नागपूरकर व नबाब निजामअलीखा बहादूर याजकडील मामलेदार सुरळीतपणे देत नाहीत त्यास मशारनिल्हे पागे सुद्धा आम्हाजवळ सरकार चाकरीवर आहेत, याकरिता सेवेशीं विनती लिहिली आहे तरि उभयता सरकारातून ताकीद होऊन मामलेदार सुरळीतपणें वाजबी अमल पागेचे गावचा देत ते आज्ञा जाहली पा।हिजे सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

ले ४६६ }
[ ४५४ ] }

{ ता ४-११-१७९८
{ आश्विन व ११ श १७२०

श्री

पौ छ १२ जिलकाद सन तिसा तिसैन चैत्रमास

श्रीमत महाराज राजश्री बाजीराव पंडित प्रधान साहेब गोसावी-यासि

छ सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित मुतुरामालिंग विजय रघुनाथ सेतुपति कृतानेक दंडवत विनंती येथाल कुशल तागाईत छ २५ जमादिलोवर पावेतों यथास्थित असे विशेष श्रीरामेश्वर क्षेत्र येथील राज्य दंडिशें वर्षें आमचे वडिलावडिलीं करीत आले पुढें इंग्रजाचा जोर पडला, तेव्हा खंडणी दरसाल पाचलक्षच कर द्यावयाचा करार केला देत होतों पुढें जास्ती मागावयास लागले सात लक्ष दिल्हे तसे दहा पाच वर्षें लोटलीं त्या उपरि नऊ लक्ष घेतले मग राज्यलोभ प्राप्त होऊन, क्षेत्रीं रामनाथ दूर किल्ला आहे तेथें फितूर करून, किल्ला घेऊन, आम्हास धरून, त्रिचनापल्लीचे किल्यात नेऊन कैदेंत ठेविलें मुलुख सर्व जप्त केला पाच वर्षें झाली हल्लीं आमचे वकील राजश्री श्रीनिवास नारायण यास आपणांकडे पाठविलें जे, श्रीमंतास विनंति करून, इंग्रेजांशीं बोलून, आमची मोकळीक करावी म्हणून पाठविलें ते बातमी त्याला कळून आम्हास जास्ती बंदोबस्त केला पत्रें देखील लिहिता नयेसें झालें हें पत्र बहुत संकटानें लिहिलें आहे वकील मजकुरासही पाठविलें आहे तरि धर्मसंस्थान देवब्राह्मणभूयिष्ठ आहे उत्तरेस काशी, दक्षिणेस रामेश्वर, हे दोन्ही पुण्यक्षेत्रें नीचानीं आक्रमिलीं आहेत आपण धर्मस्थापना करणार, देवब्राह्मणप्रतिपालक, दुष्टनिग्रह, शिष्टप्रतिपालक हिम सेतुपर्यंत आपला पराक्रमप्रताप चालतो यास्तव विनंतीपत्र लिहिलें आहे वकिलासही सनिधानास पाठविलें आहे इंग्रजांशीं पक्केपणें बोलून पूर्ववत् प्रकार मुलुखसुद्धा आमची स्थापना करून, राज्य आमचे स्वाधीन करून, इंग्रजास खंडणी द्यावयाचा करार करून दिल्हा त्याप्रमाणें त्यांची खंडणी सालोसाल देत जाऊं आपणास नजर द्यावयाचे प्रसंगास वकील मजकूर विनंती करतील, त्याप्रमाणें बोलून, करार होऊन, जें ठरेल त्यास सावकारी हमी देऊन खातरजमा करूं राज्यीं आम्हास स्थापना करून यथाप्रकार राज्य आमचे स्वाधीन जालेवरि ऐवजाचा भरणा करून यास अंतर सहसा होणार नाहीं नक्रानें गजास धरिलें तेव्हा भगवतानें धावा करून रक्षिल्याप्रमाणें आम्हास जीवापासून सोडवून कीर्ति घेतली पाहिजे इत पर हरएक प्रसंगास आमचे कारभारी मोकळे आहेत ते पत्रें लिहून पाठवितील तें मान्य करून, कार्यभाग करून देऊन चालविलें पाहिजे सुज्ञाप्रति विशेष काय लिहिणें कृपा निरंतर असू द्यावी हे विनंति

सही

---

ले ४५७ }
[४९१ ] }

{ भाद्रपद व ४ शके १७२१
{ ता १७-९ सन १७९९

श्रीगजानन

श्रीमत कैलासवासा भाऊसाहेब^ माडवगाहून निघोन पाडळीच्या मुक्कामास स्वारी आली तेथून माझे नावे आज्ञापत्र व दोन जासूदजोड्या करवीराकडील दीनचर्येचा बातमी समजण्याकरिता पाठविले तेथपासून बातमा दीनचर्येची ज्या ज्या कारणाचा पाहिजे ती ता बातमी स्वारा सुरापूर व ग्येलबुर्गे वगैरे प्रात फिरून भाद्रपदमासी एक वर्षानीं पन्हणदुडावर फोजसुद्धा मुक्काम झाला तेथपर्यंत बातमा पोचविली कैलासवासा बाळासाहेब यानीं पाच चार वेळा मिरजेहून लिहून पाठविले का नारो हरी याजकडून बातमी करवीर प्रकरणी जशी पाहिजे तशी आला मलाही मिरजेहून श्री कैलासवासी बाळासाहेब याची आज्ञा बातमा लिहिणेविशा जाहलीच होती परतु करवीरकराचा व कैलासवासी भाऊसाहेब याचा पहिलेपणापासून वेरत्वाचा प्रकार फार वाढलेला, याजमुळें तिकडे बातमा लिहिण्याचा मोठाच आदेशा तिकडे बातमी लिहितों असे समजल्यावर पारिपत्यास उशीर नाहा पेशजीं कैलासवासी भाऊसाहेब माडवगणास राहिले, हे करवीरकराना मनात आणून आगळीक केला भूधरगडचा किल्ला फितूर करून घेतला करवीरकर महाराज याची स्वारी तामगावास येऊन वाड्याचा वगैरे फारच नाश केला याजमुळेंच मोठा बद्ध कटाक्ष पडला मी हें काहा मनात न आणिता उमेदवारीच्या भावें कैलासवासीची फत्ते जाहल्यास माझे सेवेची बूज होइल, यास्तव लिहीतच गेला करवीर [ कर ] फाजसुद्धा वेदगगा दुधगगा या नद्या उतरून हमीदवाड्यावर मुक्काम आला उभयताचे सैन्यास चार कोसाची तफावत राहिली दरम्यान नदी नाहीं कैलासवासीच्या फौजेंत खर्चाचा गवगवा पडून पाढरे मडळी शिलेदार काहा फितूर होता हें वर्तमान वरचेवर दररोज लिहीतच गेलों करवीरकराना छापा घालावा ही मसलत करून दोन वेळा उद्योग केला एक दिवस निघाले तो काहीं अपशकुन जहाला, यामुळें राहिले दुसरे दिवशीं आणखा उद्योग करून निघाले, तों पर्जन्य आला असे दोन वेळा दोन प्रकार झाले मग छाप्याचा मसलत राहिला नतर भाद्रपद वद्य ३ शके १७२१ इदुवारीं अस्तमाना भोजन करून महाराज कचेरीचे डेऱ्यात येऊन बसले तमाम मानकरी व शिलेदार व रत्नाकरपत वगैरे यास बोलावून लढाईचा मसलत उदईक मगळवारा चालून जावें तिकडील फौज आल्यास लढाई द्यावी न आल्यास गोटावर चालोन घ्यावें असें सर्वांचे विचार ठरून लष्करात ताकीद झाली कीं, प्रात काळीं सूर्योदयास भोजन करून लढाईच्या तयारीनें निशाणाबरोबर चालते व्हावें याप्रमाणे बेत झाल्यावर कचेरी बर्खास्त झाली इतके होईजे पर्यंत मी त्याचे डेऱ्यातच होतों नतर आपले राहुटीस येऊन जाहला मजकूर कैलासवासीकडे लिहून पाठविला पेशजीं छाप्याचा मजकूर दोन वेळा लिहिला होता तसे झाल नाहीं बेफाम राहू नये सावधगिरी

^परशुराम भाऊ पटवधन

पक्की असावी करवीरकर प्रात:काळीं भोजन करून फौजेची तयारी करून निघाले मी आपले राहुटीस भोजन करून निघालो स्वारी प्रात:काळच्या तास दिवसास चालती जहाला मी स्वारीबरोबरच निघालों आणखी प्रात:काळीं निघाल्याचें वर्तमान लिहून पाठविले ती चिट्टी प्रहर दिवसास जाऊन पोंचली, तोंपर्यंत तिकडील फौजेंत काहीं तयारीची हालचाल नव्हती तोफखान्याचे बैल चरावयास गेले होते व शिलेदार लोकाचे धरणे बसलें होते बातमीची चिठ्ठी पोंचल्यावर तोफाचे बैल आणविले व शिलेदारास काहीं खर्चास दिलें व काहीं देतों म्हणून उठविले मग तयारीची गडबड जहाली करवीरकराची स्वारी फौजेसुद्धा दोन प्रहरचे सुमारें निपाणी नजीक गेले तेथें चार घटका दम खाऊन चालते झाले निपाणाच्या पुढें पाव कोस जाऊन उभे राहिले कैलासवासीच्या लष्करात तयारी होऊन कैलासवासी आपासाहेब व दाजी साहेब उभयता दोन टोळ्यानिशीं दोहीकडे चालते झाले पुढे एक ओढा होता त्यात काहीं गाडद व पायदळ घालून * * ^ तोफाची मारगिरी चाललीच होती करवीर कराकडील पायदळाने नेट करून ओढ्यातील पायदळावर चालून घेतलें परस्पर गोळागोळी होऊन तिकडील पायदळाचा मोड जहाला सुमारे शभर माणूस जाया जखमी झाले व पचवीस तीस सुमारें ठार झालें बाकी सर्व पळून गेले करवीरकराच्या पायदळाने तोफाशीं गाठ घातला तोफा पाडाव जाहल्या आपासाहेबांच्या मोकाबल्यावर रत्नाकर आपा राजाज्ञा व हैबतराव गायकवाड वगैरे शिलेदार होते आपासाहेब फौजसुद्धा पुढें चालून आले करवीरकाराची फौज पुढें जाहली लढाईचे तोंड लागलें करवीरकाराकडील धुळोजी पाढरे हे शभर दीडशे घोड्याचे सरदार होते, ते ठार जहाले व रायाजी जाधव पागेकडील सरदार हे घोड्याखालीं आले तेथें पाव घटका झटपट चागलीच जहाली ते समयीं करवीरकराच्या फौजेत थोडीशी गलबल होऊन निशाणाचा हत्ती माघारा फिरला हें वर्तमान महाराज पाठीमागे जवळच होते त्याजवळ सुमारे तीनशें लोक चागले होते त्यानीं पुढे गलबल जहाली हें पाहून, नेट करून पुढें आले नतर फिरून सावर बसला लढाई होतच होती इतक्यात आपासाहेब याच्या डाव्या हातास दडाजवळ गोळी लागली त्यामुळें काहींसे घयाळ झाले परतु शूरत्वाचे अभिमानानें दम धरून पुढें चाल न करिता जाग्यावर उभे राहिले यामुळें दाजीसाहेब याचा व महाराज याजकडील फौजेचा लढाईचा समय आला इतक्यात दाजीसाहेब याजकडील फौज उधळली त्या फौजेंत काहीं फितूर होते त्याजमुळें असें झालें नतर रत्नाकरपत आपा व हैबतराव गायकवाड यानीं त्या उधळलेल्या फौजेचा पाठलाग केला नाहीं इकडे लढाईस सुरवात होत होती तेव्हा महाराज याजकडील दोन्ही टोळ्या एकत्र होऊन आपासाहेब याजवर येण्याचा रोख धरिला हें आपासाहेब यानीं पाहून काहीं माघारे हटले परतु दोन चार वेळा माघारे उलटोन पाठीवरील फौज थोपून राहून थोडे थोडे हटत माघारे सरले ते जवळच अमलझरी म्हणून लहानसें खेडें होतें त्याचे आसऱ्यास जाऊन उभे राहिले करवीरकराची फौज पाठीवर होती ती गावानजीक उभी राहिली उभयता फौजास गाव दरम्यान जाहला मग

कोणा कोणावर चालून घेतलें नाहीं जाग्यावर उभे होते नतर रत्नाकरपत याचा रोख इकडे येण्याचा होता तो त्यानीं मोडून भाऊसाहेबाचे गोटाकडे जाण्याचा रोख धारिला सायकाळचा दिवस तीन चार घटका होता राजमडलकराचा फौज गोटाकडे गेली दाजीसाहेब फौजेसुद्धा निघाले ते गोटाकडे न जाता परभारेंच निघोन गेले आपासाहेब याच्या चितात मागें बुणग्यात भाऊसाहेब होते ते निघून गेलेच असताल हें मनात आणून अमलझरीवरून तेही परभारे निघोन फौजे सुद्धा चालते जहाले राजमडळकराचे फौजेने पाठलाग केला नाहीं लढाई बिघडली भाऊसाहेब मागे बुणग्यात होते राजमडळकराचा फौज गोटाकडे आली हे पाहून जवळची मडळी भाऊबद व शिलेदार नागो शामजी वगैरे लोक निघाले जाग्यावर हत्ती एक व दोन तोफा व निशाण होते शागीर्दपेशा सुद्धा निघाले ते समयीं भाऊसाहेब यास घेऊन जाते तर निभावयाजोगा समय होता परतु कोणास धार धरणे जहाले नाहा आपापले जाव घेऊन निघोन गेले जवळ कोणी एक दमाचा मनुष्य राहिला नाहीं इतक्यात राजमडळचे फौजेनें वेढा घालून गोटात शिरले भाऊसाहेब खाशा घोड्यावर नसले होते तसेच एकाएकीं निघोन चालले गोटात राज मडळकराची फौज शिरली इतक्यात हैबतराव गायकवाड हे गोटाकडे जात होते, त्यानीं भाऊसाहेब ओळखिले नाहा, परतु सुभानराव बागुल म्हणून शिलेदार येलगुरकर हे पेशजीं कैलासवासीपाशीं काहा दिवस चाकरीस होते ते पुढे इकडून चाकरी सोडून राजमड ळींत गायकवाडाचे पथकांत चाकरीस राहिले, त्यानीं ओळखिले आणि गाइकवाड यास सागितले नतर त्याजकडील लोक जाऊन गाठ घातली मानेवर वार टाकिला त्या जख मेने घायाळ होऊन हातात पट्टा होता त्या पट्टयाने पाच चार असामावर वार करून जखमी केले इतक्यात दहावीस असामानीं गाठून आणखी वार कानानजीक दोहो बाजूस दोन हलके केले तेणे करुन फारच घायाळ होऊन घोड्याखालीं आले, हे तिकडील स्वारानीं पाहून जवळ येऊन पाही तो निर्जीव होऊन पडले जीव होता न होता ही भ्रात तेव्हा गाइकवाड यानीं पडदेले व हातातील पट्टा कैलासवासींचा घेऊन आपले जवळ ठेविला आणि आपले बारगिराचे घोड्यावर पुढे देऊन महाराजाकडे पाठवून दिले हैबतराव आपण गोटाकडे लुटीस गेले नतर मागून सरजेराव घाटगे आले त्याची व बारगिराची गाठ पडली बारगिरास बोलले कीं, महाराजानीं भाऊसाहेबास आणावयास मला पाठविलें असें सागून बारगीर याचे घोड्यावरून आपले घोड्यावर घेऊन महाराजाकडे आले बारगीर माघारा गेला महाराज उभे होते तेथे पुढे येऊन घाटगे उभे राहिले कैलासवासी यास महारा जानीं पाहिलें आपण पाडाव करून आणिले म्हणून सागितलें श्रीमताचे पदरचे मोठे सरदार पाडाव जाहले जीव होता किंवा नाहीं हा चितात अंदेशा न आणिता वैरत्वाचा भाव चित्तात आणून, त्यात तर मोठीच फत्ते जाहली तो हर्ष मोठा, देहभान राहिलें नाहीं सरजेराव घाटगे यास आज्ञा झाली कीं, मूर्दा घोड्यावरून खालीं ढकलून देणें त्यानीं आज्ञेप्रमाणें केलें जवळ खासबारदार होते, त्यास आज्ञा झाली कीं, मारून टाकणें त्याजवरून खासबारदार यानीं जवळ जाऊन पाहिलें तों जीव नाहीं मग त्यानीं वार टाकिला नाहीं

करवीरकरानीं केवळ वेडेपणाच केला इतक्यात सायंकाळचा अर्ध घटका दिवस राहिला मी तेथें जवळच होतों महाराज प्रेत सोडून पुढें पाव कोश जाऊन बैठक केली तोफांचे बार करविले साखरा वाटल्या खुशाली जाहली मी प्रेताजवळ दोन प्यादे बसवून त्या जवळच होता करवारास व पन्हाळ्यास वगैरे किल्लोकिल्लीं व वाकिलास तमाम पत्रें फत्ते झाल्याचीं रवाना झालीं घाटगे यानीं बक्षिसाचा आड घालून भूधरगडच्या किल्ल्याची सनद घेतली त्याच बैठकेस दोन चार घटकानीं हैबतराव गाइकवाड लुटीस गेलेले माघारे आले महाराजाची भेट घेऊन जाला मजकूर कळविला त्या वेळेस घाटगे समक्ष होते त्याच बैठकेस लबाड झाल भूदरगडच्या किल्ल्याची सनद घेतला होती ती माघारा घेतली इतके होई जेपर्यंत म यरात्र झाली थोडीशी मर्जी स्थिर जाहली नतर दहनाचा विचार भाऊराव जोशी यास सागितला त्याना आज्ञा घेऊन सागतों, म्हणून सागितलें त्याची वाट दोन तीन घटका पाहिली त्यानीं विचारिलें नाहीं नतर सरजेराव घाडगे यास सागितले त्यानींही विचारले नाहीं मग प्रीतिराव चव्हाण व बचाजीपत देऊळकर उभयता त्या मडळींतून उठोन बाहेर आले त्याचा गाठ घेतली आणि त्यास काहीं दरबार खर्च कबूल करून मजकूर सागितला त्याना विनती करून आज्ञा घेऊन देतो म्हणून महाराजाकडे गेले विनती केला त्याजवर महाराजाचें त्या मडळाचें खलबत दोन घटका जहाल परवानगी द्यावी न द्यावी हेंच मनात परतु चव्हाण याचा नेट चागला पडला नतर त्यानीं मला सुचविले मग मा पुढें जाऊन महाराजास विनती केली कीं, सरकारचा मनोदय पूर्ण झाला यश आलें कैलास वासाचें प्रेत आपणाकडे पाडाव आले त्यास अग्निसस्कार जाहला पाहिजे हे महाराजाचे लौकिकाला चागले मीं मिरजकर बाळासाहेब याजकडून आपणा अवळ आहे त्यास मला भूषण व यश हें सर्वपरी चागलें तेव्हा महाराज चव्हाण यास बोलले कीं, नारोपत काय म्हणतात? ते समयीं चव्हाण यांनीं उत्तर केलें कीं, त्याजकडे सेवकपणा, त्याना विनती करावी, महाराजानीं आज्ञा द्यावी, हे उत्तम आहे त्याजवर दहन करावे म्हनोन आज्ञा झाली जोशीराव जवळच होते त्यास महाराजानीं सागितलें कीं, नारोपत याजकडे काय साहित्य लागेल तें देणे त्याना आज्ञा म्हणोन त्याजवर ते निघून हमीदवाड्यास आपले गोटास बुणग्यात निघोन गेले फिरोन त्याची माझी गाठ पडली नाहीं व मलाही त्याचे साहित्याचे कारण नाहीं इतकें होईजेपर्यंत अडीच प्रहर रात्र जाहली नतर प्रेताजवळ आलो, कोरी पासोडी घोडीवर घडीस होती ती काढून त्यात प्रेत घालून घोडीवर पुढें घेऊन निघालों डोंगर कटारीची वाट खचरट, त्यात थोडा थोडा पाऊस पडत होता तसेच हलके हलके पहाटेच्या तीन घटका रात्रास हमीदवाड्यावर लष्करच्या मुक्कामास चार प्रहर दिवस चार प्रहर रात्र आठ प्रहराचा ताण बसला चार पाच कोश आलों बचाजीपत देऊळकर महाराजाकडील मुतसदी यानीं कारकून व प्यादे गावात जळणाचे शोधास पाठविले त्यानीं घरात शिरून जळण जेथें सापडलें तेथें काढिले साऱ्या गांवांत दोन मोटा गोवऱ्या सापडल्या लाकूड तो अगदींच नाहीं गांव लहान, त्यात लष्करचा मुक्काम पधरा वीस रोज होता जळण अगदीं राहिलें नाहीं इतक्यात सूर्योदय जाला महाराज त्या दिवशीं गोटास

आले नाहात बुणग्यांस कूच करून येण्याची आज्ञा झाली त्याप्रमाणे कूच जाहालें रत्नाकर पत याचे गोटांत लाकडें तीस चाळीस भारे होता, तीं जाग्यावरच राहिलीं तेथें गावचे लोक लाकडें नेतील म्हणून चार प्यादे बसविले आणि बचाजीपत देऊळकर यास सामून यशवतराव घाटगे याचे पागेचे पधरा असामी मोतदार आणून सारीं लाकडें गावानजीक तळे आहे तेथें नेलीं दहनाची जागा तळ्यावरच नेमिली गावातून जोशी पाच सात असामी वगैरे भिक्षुक होते त्यास बलावून आणून काहीं तुळशी काष्टे मिळविला व गोमुत्र आणविले शेला दहा रुपयाचा व चदन दोन वडे व सुवर्ण दोन मासे तुकडे नऊ व तेल व कापूर वगैरे लष्करातच जिन्नस घेतला ब्राम्हण गावचे जोशी चार असामी आणून प्रेत तळ्यावर दहनाचे जागीं नेले मत्राग्नीचा विचार व्हावा हा हेतु होता परतु समयास ब्राह्मण चागला मिळाला नाहा गावचे जोशी होते ते केवळ ढ मग तसेच भडाग्नि देऊन दहन केले त्या दिवशीं हमीदवाड्यास मुक्काम केला दुसरे दिवशीं प्रात काळीं गावचे जोशी व मी स्नाने करून अस्थि काढिल्या व रक्षा एक बैलभर झाली ती कृष्णेंत नेऊन टाकावी म्हणोन उद्योग केला परतु मध्यतरीं वेदगगा व दुधगगा या नद्यास पाणी भर आले होतें नाव टोम्रा तेथे काहींच नाहीं मग ती रक्षा तेथें त्या गगेंत विसर्जन करोन माघारे हमीदवाड्यास निघोन आलो नतर अस्थि मिरजेस रवाना करावयाच्या त्यास ब्राह्मण मिळेना तेव्हा श्रीमत हरबा अण्णा पटवर्धन याजकडील ब्राह्मण लष्करवाल्यानीं उटे, हत्ती देऊन बेगारीस आणिला होता, तो अगदीं लुटलेला, नेसावयास पचा चार हात मात्र होता मग त्या ब्राह्मणाचा सरजाम चर्मी जोडा एक व पासोडी एक व डोईस बाधाव यास पचा एक व दोन रुपये खर्चास देऊन त्याजबरोबर चार असामी प्यादे दिले आणि रवानगी केली मार्गाची माहिती नाहीं, तेव्हा टिपण लिहून दिलें आणि रवानगी केली कोंगजोळा इचलकरजी तेथून कुरुदवाड तेथून मिरज याप्रमाणें सागितल त्याप्रमाणें अस्थि मिरजेस पोचल्या पत्राचें उत्तर कैलासवासी बाळासाहेब यानीं मला लिहिलें होतें कीं, दहनास वगैरे खर्च काय जाहला असेल त्याची याद पाठवून देणें ऐवज पाठवून देऊ याप्र माणे लिहिलें परतु मी याद पाठविली नाहीं कारण कैलासवासी भाऊसाहेब याचे चौघे पुत्र, शिवाय भाई मडळी बहुत आप्त पदरची मडळी थोर थोर वगैरे कित्येक लहान मोठे इतके असोन अतकाळच्या समयास जवळ कोणीच नाहीं नारो हरी करदीकर याचा जन्मा तरींचा योग उभा राहिला अशा पुण्यश्लोकाचे देहास हात लागून अतकाळची सेवा जी पुत्राचे हातून व्हावयाची ती माझे हातून घडली अशी सेवा हजारों रुपये खर्च केल्यानें घडावयाची नाहीं ते घडली मोठाच अलभ्य लाभ झाला शेवटींचा अतकाळसमयाचा पुत्र नारो हरी असे विश्वतोमुखी जाहलें कैलासवासीचा काळ उत्तम प्रकारचा जाहाला कसा म्हणाल तर आमरणात क्षात्र धर्म करून श्रीमताची पेशवे याची सेवा चाकरी केली शूरास जसें मरण धारातीर्थी यावें तसें आलें तो प्राणी सूर्यमडळ भेदून उत्तम लोकास जातो त्यास पुन जन्म नाहीं श्रीगणपति आराध्य त्याची केवळ नि सीम भक्ति अगारकी चतुर्थी

व्रतदिवस एक पत्ना व्रत दिगत कीर्ति ज्याची प्रदोष समय, त्याकालीं देह विसर्जन झालें हमीदव्राड्यावरचा मारा विधि आटोपून मग करवारकराच्या लष्करात गेलों याप्रमाणे मजकूर जाहाला पुढ करवीरास वेढा कैलासवासी आपासाहेब यानीं दिला व वेढा उठला तो मजकूर अलाहिदा आहे कळाव

---

[ ८५८ } माघ व ५ शके १७२१
१०१ ले ] } ता १४-२-१८००

॥ श्री ॥

सेवेशीं धोंडो गोविंद गोडबोले कृतानेक साष्टागनमस्कार विज्ञापना ता माघ वद्य ५ तृतीयप्रहर पावेतो सुखरूप असों विशेष-राजश्री पतप्रतिनिधी व चंदनवदनकर व साताराकर यास निक्षूण ताकीद झाली प॥ वारवार तेंच लिहितोस हें काय ! असे कदाचित् म [ना] त येईल त्यास स्वामींची स्वारी त्या प्रांतीं जाऊन माझा अम्मल सुरळीत चालण्याविशीं ताकीद होणे यात मला भूषण बहुत आहे स्वामींचें साहाजिक भाषण परतु सेवकास महाभूषण याजकरिता वारवार विनती लिहितों हेही स्वामींचे ध्यानात आहेच रास्ते यास आरब दूर करण्याविशा ताकीद जाहला म्हणोन कळलें फार सताष जाहला क्षेत्राचा उपद्रव गेला राघोपत सफरे म्हणून कोणी कन्हाडे गृहस्थ पूर्वी बाबूराव केशव याचे पदरचे त्यानीं सालगुदस्त बडात पुण्यास येऊन सातहजार रुपये भरून कन्हाडची मामलत केली तेव्हा ते गोषी याजकरिता मशारनिलेस धरून वैराटगडास आटकेंत ठेविले आहेत याविशीं रा चितोपत देशमुखास माहीत पुर्तेपणें आहे व सेवेशीं विनतीही केली आहे त्यास त्याचा चार रुपये खड ठरावयाचा तो दरम्यान वो रा वैजनाथ भट मामाचें बोलणें पडेल व पडते त्यात भाव यांस उगेंच कैद केले, दोष नाहीं याजकरिता त्यास सोडून द्यावें याप्रमाणे झालें त्यास मी आक्षेप घेतला सरकारचे अपराधी अटकाविले आहेत त्यास परवानगी सरकारची ते पक्षीं परवानगी शिवाय सोडता येत नाहीत तेव्हा इकडे निरुपाय जाणोन वेदमूर्ति रा मामा सरकारात विनती करून मशारनिलेस सोडवावयाचा उद्योग करतील व चालला आहे सरकारातून ते गृहस्थ सुटल्यास सरकारचे चार रुपये मात्र येणार नाहींत परतु बोलणें बोलतील ते मात्र मध्येंच रुपये खातील आणि अपराध पक्का याजकरिता त्यास मुक्ततेची परमाणगी नच व्हावी कदाचित् सरकारचा खड देऊन सुटत असिल्यास मग नीटच आहे माझा ज्वर परिहारला पधरा दिवशीं पूर्ववत शक्ति येईल सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले ४०९ } [ ३३३ ] }

{श १७२२ सन १८००

श्री

वशावळ घोरपडे मुळ पुरुष म्हालोजीराव याचे चिरजीवानीं करवीरकर महाराजाचे पदरीं राहून, कामकाजे करून पदें तिघानीं तीन व सरजाम इनाम पाच पाच गांव स्वपराक्रमानें ज्याचे त्यानें मेळविले

वडील सताजाराव घोरपडे यास सेनापति पद देऊन इनाम गांव पाच दिल्हे

१ बहिरजाराव यास हिंदुराव हें पद देऊन इनाम पाच गाव दिल्हे

१ मालोजीराव यास अमरिुल उमराव हें पद देऊन इनाम गांव पाच दिल्हे

—

३

यासि सरजाम

सेनापतीस कापशी सरजाम १ हिंदुराव यास गजेंद्रगड सरजाम १ अमिरुल उमराव यास आजरें सरजाम १

पौ अमिरुल उमराव याचे घराण्याची वशावळ मूळ पुरुष

मालोजीराव याचा पुत्र शिवराव यास पुत्र ४

१ येशवतराव याचे पोटीं

१ शिवराव यास मुरारराव याजकडे दत्त दिला

१ व्यकटराव यास पुत्र नाहीं

—

२

३ केदारजीराव यांचे पोटीं

१ रामचद्रराव

१ खडेराव

१ काशीराव.

—

३

रायचद्रराव याचे पोटीं

१ मालोजी

१ आबा

—

२

२ मानोजी याचे पोटीं

१ येशवतराव

१ खडेराव

—

२

येशवतराव याचे पोटीं

१ मालोजीराव

१ नरसिंगराव

—

२

खडेराव याचे पोटीं

१ शिवराव

१ भुजंगराव.

—

२

४ जनकोजीराव यांचे

० नकल

—

०

*वाटणी न झाल्याचे सरदार लिहून दिले असामी १७ पौ शिंदे व होळकर व भोंसले सेनासाहेब सुभा व भोंसले अक्कलकोटकर या चार असाम्या सरदार याच्या वाटण्याच नाहींत परंतु याचे पोटी सरदार आहेत त्याच्या वाटण्या आहेत बाकी असामी १३ पैकीं गुतीकर व गजेंद्रगडकर व कापशीकर घोरपडे हे घरभाऊ सबब ३

बाकी असामी

१ नाईक फलटणकर
१ देऊळगांवकर जाधवराव
१ मालोजीराजे घोरपडे
१ घाटगे सर्जेराव
१ अमरसिंग जाधवराव
१ शिर्के
१ तोरगळकर सेना खासखेल
१ घाटगे बुदकर
१ डफळे जतकर
१ पाले सावजनकर

१०

वाटण्या जाल्याचे सर
१ आटोळे १ भाप दार असामी
१ दाभाडे तळेगावकर १ दरेकर
१ पवार १ ढमढेरे तळेगां बाडे
१ खटावकर महाराज १ पुर ंकर
१ अबीरर १ वाघमारे तलेसग दरे
१ माने म्हसवडकर १ बोकील ७२
कोरेगावकर
१ विश्वासराव चिंतामण पागे
१ खंडेराव वाकडे १ केरोजी काळे
१ जाधवराव वाघोलीकर व वाडीकर
१ भोइटे नसिराबादकर १ वायबर
१ शितोळे न्हावीकर वगैरे १ शेलार
१ पान्से १ पटवर्धन १ रणनवरे
१ मोरे सरलष्कर १ चव्हाण अठपाडीकर
१ रामदुर्गकर १ वाबळे
१ सदाशिव माणकेश्वर
१ गोडसे वडूथकर १ बारामतीकर
१ देवकाते

३०

---

* येथपासून पुढील मजकुराचा घोरपडे यांच्या वंशावळीशी संबंध फारसा दिसत नाहीं पण दोन्ही यादी एकाच कागदावर असल्यामुळे त्या एकत्र दिल्या आहेत ही वाटणी कोठील व कसली तें समजत नाहीं

ले ४७०
[१४५]

शके १७२०
सुमारे सन १८००

श्री

श्रीमत राजश्री पतप्रधान स्वामाचे सेवेशीं—

पो भवानी शकर हैबतराव कृतानेक नमस्कार विनती उपरी येथील कूशळ जाणोन स्वकीय कूशळ लेखन करीत असले पाहिजे विशेष-आपण पत्र पा ते पावले प्रात वाई येथे ब्राह्मण ज्ञातात कोणी कन्येचे रुा घेऊन विवाह करू नये, जो कन्येचा ऐवज घेईल त्याजपासून दुप्पट व जो देईल त्याने कन्येचे बापास रुा दिल्हे असतील तितके, व मध्यस्ती करून पैका घेईल तो ऐवज त्याजपासून सरकारात घेतला जाईल या प्रमाणे ब्राह्मण ज्ञातीस व जमीदार व धर्माधिकारी व उपाध्ये व जोशी व पा कुळकर्णी, यास निक्षूण ताकीद केली असता आज्ञेप्रमाणें वर्तणूक न करीत, त्याजपासोन सदर्हूप्रमाणे ऐवज घेऊन काहा खर्चाची सुबाब न लाविता हिशेबीं जमा करावी, म्हणोन लिहिले ऐशास प्रात वाई येथील गाव बहुत इनामी दुमाले आहेत तेथें आमचा रोखा पत्र चालत नाहीं वसुली गाव व वाई क्षेत्र व देशमुख व देशपाडये वगैरे सरकारचे पत्राअन्वये आणवून ताकीद करितों कळले पाहिजे बहुत काय लिहेण लोभ असो दिल्हा पाहिजे हे विनती

ले ४७१
[४४४]

मागशीर्ष शु १२ शके १७२३
ता १६-१२-१८०१

श्री

श्री राजा शाहू छ-
त्रपति प्रौड प्रताप पुरदर
आनदराव गायकवाड सेना
खासखेल समशेर ब
हादर

तैनातजाबता शिलेदार जदीद येकाडे कारकून कृष्णाजी अनत असामी १ तैनात बार माही नक्की शिरस्ता सुरूसन इसन्ने मय्यातैन व अलफ रुपये

६०० जातीस
१०० शागीर्दपेशाबद्दल

———
७००

एकूण असामी एक यास तैनात बारमाही नक्की शिक्का रुपये सातशें करार केले असत पैकीं नाणे बट्टावगैरे व दरबारखर्च वजा होऊन बाकी तैनातेचे कबज शाईचे मार्गे पावेल. चाकरी इमानेइतबारें करावी हजेरीस घोडें तिनशावर किमतीचे लागेल लढाईत घोडें

निशाणापुढे पडीत जहाल्यास दाखला पाहून किंमत पाचाचे मते ठरेल ती दिल्ही जाईल लुटींत नगारा, निशाण, नौबत, ढाल पालखी, व हत्ता, खजिना, व तोफा सापडेल ते सरकारांत दाखल करावे चाकरीचा तेरीख छ ८ साबान सन मजकूर पासून चालू असे जाणिजे छ ९ माहे साबान मोर्तबसूद

---

ले ४७२ [ १२१ ] — माघ शु १३ श १७२३ ता १५-२-१८०२

॥ श्री ॥

राजश्री पतप्रधान गोसावी यासि

छ सकळ गुणालकरण अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्ने॥ आनद राव गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादर दडवत विनती येथील कुशळ जाणून स्वकाये कुशळ लिहित असलें पाहिजे विशेष कानोजी गायकवाड याणा बदमामली करून बखेडा बहुत केला यास्तव समस्त सरदार याचा एकदील करून कानोजीराव यास कैदेत ठेऊन दौलतचा बदोबस्त केला हे वर्तमान आपणास कळावें म्हणोन लिहिले आहे मागाहून सविस्तर लिहून पाठवू स्वामीचे प्रतापे बखेडखोराचें पारपत्य करून बदोबस्त केला आज छ मारींच बदोबस्त झाला मागाहून सविस्तर विनति लिहितों रा छ ११ रमजान याज उपरि मी चाकरानें ल्याहावे आ [ ? ] इष्ट नाहीं वडिलांनीं चाकरी करिता हा काल काहाडिलें याच अन्वयें माझी हीच न वे रा आहे एकदा खावदाचे पाये व रि न पाहावे तो सुदीन वरकड आणिक नाहीं बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनती शिक्का

---

ले ४७३ [ १८६ ] — माघ शु ९ श १७२३ ता ११-२-१८०२

॥ श्री ॥

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री कृष्णराव नारायण स्वामी गोसावी यांसि पोष्य बाजीराव रघुनाथ प्रधान नमस्कार विनती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें विशेष शहर सातारा येथील बदोबस्तास चिरजीव राजश्री त्र्यबकराव माहिपत पुरदरे याजकडील सरंजामी पतकाचे स्वार एकशें पाठविले असत तर याजकडील एकशें स्वार घोडे राऊत चागला पाहून गणती घेऊन चाकरी घेत जाणें जाणिजे चद्र ७ सवाल सु॥ इसने मया तैन व अलफ बहुत काय लिहिणें हे विनती

---

ले ४७४ }
[ ३९ ] }

{ श्रावण शु १३ श १७२४
{ ता ११-८-१८०२

॥ श्री ॥

वेदशास्त्रसपन्न राजश्री रामचद्र दीक्षित व लक्ष्मीनारायण दीक्षित गोसावा यासि—

सकल—गुणालकरण अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्ने॥ येशवत राव होळकर दडवत विनती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित असावें विशेष आपण पत्र पाठविलें ते पावले खानदेश प्राता खासा स्वारी आल्यावर पुढे राजश्री फत्तेसिंगराव माने वगैरे फौजा या प्रातीं रवाना जाल्या जनवार्ता सैन्याचा उपद्रव यामुळें कायगाव टोकें प्रवरासगम तीर स्थळी क्षेत्राची जागा, ब्राह्मणास भय उत्पन्न जालें साल गु॥ क्षेत्र कायगाव पेंढारी याणीं लुटले त्यामुळें भय अधिक प्राप्त जालें त्यावरून क्षेत्रस्थ ब्राह्मण श्रीफल घेऊन मान्याच्या भेटीस पुण्यस्थभीं गेले त्यानींही अभय दिलें जे आम्हास येविशीं सुभेदार साहेबाची आज्ञा आहे जे, क्षेत्रास उपसर्ग होऊ नये त्यावरून सर्वास सतोष जाला हलीं राजश्री नबाब ⁑ अमीरुद्दौले फौजेसुद्धा कसबे गाडापूर येथें आबडाकडे स्वारी जाणार त्याजकडील उपसर्ग क्षेत्रास किमपि लागला नाही माने याणीं खात्री केली त्याप्रमाणें अनुभवास सर्वांच्या आलें पूर्वापार कैलासवासी थोरले सुभेदारापासून ×या स्थलाचा अभिमान आहेच त्याप्रमाणें साभाळ करूनच आम्हाकडील गाडापूर परगण्यातील तीन गाव नेवास परगण्यातील एक गाव ऐकूण चार गाव आहेत आज पांच सहा वर्षें पायमालीनें खराब जाली त्यास त्याचे व तीरस्थळीचें सरक्षण घडावें याकरिता नबाबास पत्र दिल्हे पाहिजे म्हणोन विस्तारें लिहिलें तें कळलें ऐशियास तुम्हाकडील लक्ष्मण उमाजी याजबराबर राजश्री अमीरुद्दौले याजला पत्र पाठविलें आहे, हें त्याजकडेस पावतें करावें गावास उपद्रव देणार नाहींत सर्वदा पत्र पाठऊन तोषवीत जावें रा छ ११ रबिलाकर सु॥ सल्लास मैयातैन व अल्लफ बहुत काय लिहिणें हे विनती मोर्तसुद

---

ले. ४७५ }
[ ४९७ ] }

{ श १७२५
{ स १८०३

श्री सद्गुरु प्रसन्न

यादी दास्त बेरीज बादशाई हिंदुस्थान अवरगजेब कारकीर्दींचे जमाबदी रुपये रुधि रोद्गारी सवत्सरे पुणेचे मोहिमेस गेले असता कुपणी सरकार तर्फे जेनरल वलजली बाहादूर याणीं ठराव केला बेरीज

---

* यशवतराव होळकर ⁑ यशवतरावाचे पदरचा पठाण सरदार अमीरखां

× मल्हारराव होळकर

तपशील

शहाजहानाबाद ऊफ दिल्ली

| | |
|---|---|
| २८६७८३७५ | सुभे शहाजहानाबाद ऊर्फ दिल्ली परगणे २२६ सरकार |
| २४५४६९९५ | सुभे अकबराबाद ऊर्फ आग्रे सरकार १४, महाल २६८ |
| १३७५९००० | अजमेर ऊर्फ मारवाड सरकार ७, परगणे १२३ |
| ९४०१५२५ | इला [ह] बाद ऊर्फ प्रयाग सरकार १६, परगणे २४७ |
| ९५१८२५० | सुभे बेदर ऊर्फ पैठण सरकार ८, महाल २४० |
| ६६१३५०० | सुभे अयोध्या सरकार ५, परगणे १२७ |
| १०२६२५०० | सुभे उडाया ऊर्फ जगनाथ सरकार १५ परगणे १३२ |
| ११५७२५०० | सुभे डाका ऊफ बगाला सरकार ७, परगणे १०९ |
| १४५२४७५० | सुभे अमदाबद ऊर्फ गुजराथ सरकार ९, परगणे ८८ |
| २३७४२५० | सुभा ठाठा ऊर्फ सिंद सरकार ४, परगणे ५७ |
| ६११६३७५ | मुल्तान सरकार ३, महाल ९६ सि |
| २२३३४२५० | लाहोर ऊर्फ पैजाबाद सरकार ५, परगणे २१६ |
| ३१५७१२५ | कासमेर महाल ४६ सि |
| ३१६३००० | काबूल सरकार ८ परगणे ९८ सि |
| १९२२६७५० | सुभा माळवा ऊर्फ उज्जनी सरकार १२, परगणे ३०३० |
| ३८६५००० | सुभे केदार महाल ५०, सि |
| १०७४३५०२ | सुभा अवरंगाबाद सरकार १२, महाल १३६ |
| ५७०४०२३ | सुभा बराणपूर सरकार ६, परगणे १३६ |
| ७५०४५६५ | सुभे बेदर सरकार १२, महाल १३६ |
| ११२५०००० | सुभे इलजपूर वराड सरकार ५, परगणे २१ |
| ४६९७६६५१८२ | सुभे विजापूर सरकार १८, परगणे २८१ |
| ५७७३६५२६८१० | सुभे हैदराबाज सरकार ४२, परगणे ४०५ |
| ३३१००९४१२८१२ | |

तपशील शाई ५७ बेरीज

| | |
|---|---|
| १२४२२०९१६ | राव पतप्रधान |
| ३४६७३३०४८७ | नबाब अली निजाम बहादूर |
| १२३५७८७०९८१ | इंग्रज बहादूर |
| १६३०१५०० | आबदाअली |
| ३२२३४९८३८४ | सीक वगैरे चिलर |
| ३३१००९४१२८१२ | |

सरकार राव पंडित प्रधान रुपये

| सरकार | निसबत |
|---|---|
| ८७२२९९१५ | ३०९९१००० |

सरकार राव प्रधान अमल रुपये

८७२२९९१५

तपशाल

| | |
|---|---|
| ८५०२८७५ | सुभे शहाजहानाबाद ऊर्फ दिल्ली |
| १२१७३९९० | सुभे अकबराबाद ऊर्फ आगर |
| १३००००० | अजमेर ऊर्फ मारवाड |
| १६००००० | सुभे उडाया ऊफ जगन्नाथ |
| १९२२६७०० | सुभे माळवा ऊर्फ उज्जनी |
| ६५७५००० | सुभे वराड |
| ५५३८४२३ | सुभे बऱ्हाणपूर |
| ३०००००० | सुभे लाव्होर |
| ११९०० ०१ | सुभे विजापूर |
| १०५९८७५० | सुभे आमदाबाद |
| ५२ २५२२ | सुभे औरंगाबाद |
| ३००००० | सुभे बेदर |
| ८७२२९९१५ | |

तपसील

खालसात अमल कुल

| | |
|---|---|
| ४८०००० | परगणे पुण्या |
| १६०७५३ | परगणे सिवनेर |
| ३५०००० | विजयदुर्ग |
| ४७९३५ | बारसी |
| १२५००० | सोलापूर |
| ३९३७४ | आईरवाडी |
| २३२१५७ | कुक ( म? ) रखेड |
| १५५००० | एरडोल |
| ४०००० | नेवासा |
| २५००० | बेदूर [ वोनूर ? ] |
| १८००० | पारनेरी |
| ३१२४३० | हवेली सगमनेर |
| ९२६३५ | कुमारगाव |

रुपये

| | |
|---|---|
| २६४३९ | हवेला जुनेर |
| ९५०११९ | इदापूर |
| ११०७२५ | सुपे |
| १२००० | सासष्ट पिंपळगांव |
| २१००० | वतर नारायणगाव |
| १५००० | वाई |
| ८००० | खतराबावदान ( ? ) |
| २५००० | प्रतापगड |
| १८००० | सिहगड |
| ३२००० | लोहगड व इस कालेगड |
| २०००० | पेठागाव |
| १५००० | केनेल |
| ३१५००० | बागलाण |

७५३५० नासाक
६४३५६ आकोळनेर
३५१७५ कोपरगाव
२४६७१३ रत्नागिरी
१८५०० भैरवगड
६४००० वदन
१९५०० चदन
९००० चाकण

२६१०८९८

३५००० त्रिंबकगड
७२५००० सुभे वमई
६०४००० कल्याण भिवंडी सुवर्णदुर्ग
१३५७९६ अजनवेला
४५६९३ रेवदंडा
५५००० पाली
१६००० करनाळा
२४००० पेलार
६०००० रायगड
३००० पुरधरगड

३५१०७२९

६१२१६२७

दफेसुभे गुजराथ

११५०००० आमदाबाद
१५३६००० सुरत अठ्ठाविशी
५२५००० जंबुसर ( जेबुरपुर )
१७५००० हकूनआर
१०२००० आसावा
१४४००० बलसाडे
८०००० सुरत हवेली
५०९००० फुटमहाल

१५३६०००

२६८६०००

बेरीज पट्टा

१३२५००० सुभे झांशी
२५०००० आला [ म ? ] णपन महाल
१५४२५०० बुंदेलखंड
८५०००० सागर
४८०००० कालिपी
२१२५०० गडमंडल

१५४२५००

७५००० जळगाव
१००००० बादामी

कर्नाटक

२२५००० बागडकोट
५२००० केरूर
५०००० नदवाडीगी
१५६००० बेळगाव शहापूर
२८००० खानापूर
३४५७०७५॥ सावनूर वगैरे टिपु सुलतान याजकडून आले ते
१०६९४२२ सावनूर
३९७५६३॥।≈ धारवाड
४७६९८९ हुबेरगी
१६०६५४८७ ज्यालीहाळ
६६७९००८३ नवलगुंद
१३४६३३८१० हावनूर
२०६७१३८२ गदग
७५७३५८१० जुनें हुबळी
६१५१३८४ बकापूर
५४३६३८४ कलघटकी
५२१३५८२ मिश्रीकोटी
५२८६९०८१० कितूर

३४५७०७५८८

१८५००० देशमुखी
 ११०००० गगथडा
 ७५००० बालाघाट
 १८५०००

१४००००० गाइक्वाडनजर
४८२८५००

१५१५०० खडणा
 ८५००० सुरापूर
 १६५०० तपवाल
 ५०००० कनाल
 १५१५००
४११९२७५८८

एकूण कुल १७७५५७०२८८ रुपये

फौज मरजामीस नेमणुकीस दिला रुपये

९५००००० मल्हारराव होळकर याशी स्वार
 ४३२००० आबाड
 १३५००० राउता
 ३९४००० नदुरबार
 १७५००० महेश्वर
 ७५०००० रामपूर कि ला ट रका वैगेरे
 २५४००० रामपूर किल्ला
 २९६००० द इ फ क पूर
 ४८१००० जाहगीरात माल्यो
 २५७००० चादवड
 ३१७४०००

२२००० हजारास जहागीर
२९५००० सुलतानपूर
४१५००० इदाजारत
३०५००० रामपूरत
३१२००० सिरोंज
२८६००० सैद
 ३५००० विजेनगर
४६७०००० हिंदुस्थान पैक समाईक वैगेरे
६३१८०००

९५०००००

४५००००० अनदराव पवार वैगेरे स्वार १५००० सि
२०२५२८३ माळवा (?) परगणे घारवाड वैगेरे पटवर्धन मडळी
११४२४४४ चिंतामणराव पाडुरग व गगाधरराव गोविंद स्वार ३००० सि
 ३२०००० सरकार मिरज
 १३०००० मगळवेढें
 ९०००० ऐनापूर
 ६०००० करकभा
 ३०००० भुसा
 १०५००० शाहापूर
 ३३००० तेरदळ
 १८६३१३ लक्ष्मेश्वर
 ९५४३१३

६९९९५ नवे हुबळी
४०३१३ ब्याहट्टी
३९८६३ ताडस
१८००० हेबळीपरगणे परड
१९९६० जुनेहुबळी पैकीं खर्च खडणी १८८१३१
१८८१३१

११४२४४४

६३८८३९ परशराम रामचद्र यास स्वार १५०० याशी

| | |
|---|---|
| ३२००० तासगाव करयात | ३३००० तेरदळ |
| २८००० बरडोल | ५६००० यादवाड |
| १२००० येकसब | ११३३७३ कुदगोल |
| १५००० अनवलें | १०२९६६ मुळगुद |
| १०५००० गोकाक | १२५०० भरतकुणकी |
| ८०००० जमखडी | ५५०० पुलताब |
| | ६३८८३९ |

२४४००० कुरुदवाडकर रघुनाथराव स्वार ३००

| | |
|---|---|
| ३०००० कुरुदवाड | ४५००० मईदरगा |
| ३१००० रायबाग | ३३००० तेरदळ |
| १०५०० शाहापूर | |
| २४४००० | |

१४०५००० प्रतिनिधि स्वार ५०००

| | |
|---|---|
| २१००० प्रतापगड | [illegible]०००० विजापूर |
| ३५००० मयाणी | ८०००० खटाव |
| ३००००० वाई | ७२००० काशीगाव |
| ६०००० वेलापूर | १०५००० विजापूर |
| [illegible]०००० विशाळगड | ५०००० बागवाडी |
| ७२००० गोठा | ३४००० कोक [ ला ! ] टनूर |
| २[illegible]७ ० सरदशमुखा | १४०५००० |
| ४०००० वागा | |

१११०००० रास्तेचे स्वार ३००० सि

| | |
|---|---|
| ३००००० तालिकोट सिदगी | १२५००० आथणी |
| ४५००० कोक [ ला ? ] टनूर | ५०००० उकली |
| ९०००० मुळवाड | १५०००० खानदेशपैका |
| २१०००० जतकरजगी | १११०००० |
| ५०००० नालतवाड | |

४०२५०० मुधोळकर मालोजी घोरपडे स्वार ८००

| | |
|---|---|
| ३२००० मुधोळ | १०३००००माचकनूर |
| १२५००० अलमेल | ७५००० इडी |
| ६७५०० तबा | ४०२५०० |

३०००० सकराजी घोरपडे जाहागीर बिलगा

३५८००० पानसे दिमत तोफखाना सरजाम

१६२००० हुनगुद ४२००० मुतला [ क ! ] वी,

२१००० हलसगी ४५००० हिपरगे

१८००० म्हमद्रापूर ४०००० वैराग पानगाव

३०००० मल्हारगड

३५८०००

१२५००० थोरात सिलेदार यास परगणे वाळवे स्वार ५००

६०००० भापकर मळी परगणे होरोती स्वार १५

१८०००० हरीपत फडके

३०००० कोलार ३' ००० सागोले

२१००० ब्रम्हपूर ' ०००० घाट नादूर

३०००० अवलनेर ३ ००० पिपळनेर

१२००० चिलर फुटगाव १८००००

४५०००० नानाफडणवास स्वार ५००

१९२००० चोपडा १०२००० नेरें

६०००० भाना ९६००० मलकापूर

४५००००

७५०००० त्रिंबकराव मामा पेठे खानदेश पैा स्वार १२००

४५०००० शाहाजी राजे भोसले अक्कलकोटकर स्वार १०००

३००००० बेदर परगणे अक्कलकोट

१५०००० हवेला पुरदरपैकीं सरदेशमुखी

४५००००

१५०००० सुलतानराव बडगर चोथाई मिा स्वार ५०० नेमणूक मोंग [ला ] ईवर

२१४९५७८३

बेरीज दफे चिलर वगैरे

२३२००० माधवराव पुरदरे ३०० स

१८०००० सासवड वगैरे ३२००० सरदेशमुखी चौथाई

२३२०००

२०००० जळगाव परगणे

६०००० सेखमिरा वाईकर स्वार१५० सि

८०००० माधवराव आबेकर यास आबे वगैरे

७५००० सुलतानजी भोसले खानदेश पैकीं स्वार २००
१५०००० रघुनाथराव नायगांवकर यास नायगाव वगैरे गगथडी स्वार ५००
९००००० रंगराव राजे बहादर यास हिंदुस्थान परगणे मालेगाव पैकीं स्वार ३०००
१२००००० विठ्ठलराव सुंदर स्वार ३००० राज्य हिंदुस्थान
२४०००० खंडेराव वोडेकर स्वार ८०० याशी वोढें वगैरे
२२००००० अली बहादर यास बुंदेलखंड परगणे सरकलपाल मशारनिले कडे आहे स्वार १००००

१८०८७००० राजमंडळकर

१३५००० त्रिंबकराव दाभाडे सेनापति तळेगाव वगैरे स्वार ५००
१०००००००० रघोजी राजे भोंसले नागपूर व छत्तीसगड वगैरे बंगाला कटक वगैरे मोगलाई घासदाणा बराड वगैरे सेनासाहेब सुद्धा २५०००
७२००००० गोविंदराव गायक्वाड यास ५००० [सर] खेल समसेर बहादर गुजराथ खास परगणे बडोदा सुरत अठ्ठाविसी
७५००० भास्करराव इसलामपूर वगैरे स्वार ३००
३००००० आबूराव आंगरे सेना सरखेल कुलाबा वगैरे स्वार सरमजाम
२५००० जयवंतराव सुमंत
७५००० कृष्णराव चिटणीस चिलर फुटगांव जाहगीर
१५००० अमात्य सातारे परगणे
२३२००० रघुनाथराव सचीव मालदेश
३०००० राजाज्ञा यास कसबे वाई

१८०७७०००

९२५००० कोलापूरकर राजमंडळ स्वार स्वार २०००

७५०००० राजास नेमणूक कोल्हापूर माल्वण राजानगर वगैरे.
५००० तोरगल सिंदे यास
१००००० नरगुंद व्यंकटराव यासि
१५००० कापसीकर घोरपडे यासि

९२५०००

१६५००० बापोजी नाईक बारामतीकर बारामती इंदापूर
बार्सी पैकीं स्वार २००
४५००० भोसले मंडली परगणे महादेव

२५७००० निंबाळकर मंडली
१०५००० फलटण
५२००० भालोणी
६०००० अकळोज
४०००० दहीगाव
२५७०००

२०००००० सरदेशमुखी चौथाईबद्दल मोक्तर घासदाणा वगैरे सरजामाबद्दल
२००००० फौज सरजाम दिल्हा आजमास
२९५८०००० दौलतराव शिंदे आलिजा बहादूर यासि
९०००००० सरंजाम नेमणूक स्वार २२०००

| | |
|---|---|
| ६३७०००० सुभे माळवे परगणे उज्जनी वगैरे | २५०००० गाडापूर |
| | २९१००० झालनापूर |
| १००००० बरानपूर वगैरे खानदेश | २१५००० आमदानगर |
| | ४०००० गोरवडी |
| ३५०००० सरकार हंडा | ३५००० वडेगांव |
| १८५००० खडाळा | ८२००० श्रीगोंदा उर्फ चाभारगोंदे |
| ११२००० चाळीसगाव | |

९००००००

२०५०००००० पादशाई मुलुख सुभा दिल्ली अकबराबाद वगैरे सर केले आहे वाटणी करार दर शेंकडा

| | |
|---|---|
| २२ सिंदे | २३ होळकर |
| १० पोवार | ४५ पेशवे |

१००

याप्रमाणे आहे वाटणी दिली नाहीं सबब होळकराशियास कज्जा

२९५०००००

१४६३०७ गुतीकर घोरपडे मंडळी मुरारराव घोरपडे सेनापति
३७३०७ संडूर
१८००० गजेंद्रगड दुवलतराव घोरपडे

१६००० गलगलें
३७५०० काळेनिडगुद
३७५०० वेळोति वरोळी वागेणूर वगैरे

१४६३०७

५६४,६९,३०७

एकूण ९५७१३७८ ॥ रुपये

यापैका चौथाई खडणी घासदाणा मोगलाई राजे वगैरे कडून खडणी येणें बद्दल वजा कुल्सरकार राखल ८४८३८७६॥ रु

जाता कुल

८७२२९९१९

निसबती राजेस चालिवणेचे

३६९९१०००

तपशील

३७३३००० उदेपूर राजेराणा हिंदुपनी यास सुभे दिले परगण पादशाई नेमणूक
१००५५००० राजे अमरसिग प्रतापसिग बिजेसिंग मारवाडी यात
७३६७००० जयसिग सवाई यास जयपूर वगैरे वाडोड वगैरे
११०२०००० बुदीकोट राजेस बुदाकोट सुभा आगरा परगणे
६००००० भुपाळकर नबाब यासि भुपाळ वगैरे
१७००००० बुदेलखड राजेस झन्ना पन्ना वगैरे
३००००० जाट यास भरतपूर वगैरे
२४४६००० काटेवाड राजे यास चालवणेचे सुभे गुजराथ परगणे

३६९९१०००

३४६७३३०४८७ नबाब निजाम आलीखा बहादूर याचे सरकारास कुल्

तपशील

३२४०३२८२६५ खालसात
२२००२२२ निसबती राहणार

३४६७३३०४८७

बेरीजपटी रुपये

तपसील

ऐन सरकार कुल् रुपये

३२४०३२८२६५

| तपसील | | | | रुपये |
|---|---|---|---|---|
| १०५३०२३७८५ सुभे हैदराबाद परगणे १३० | | | | |
| | ५७९४८७४ | सरकार गोलकुडा परगणे | | १२ |
| | ५२१८०९८८॥ | सरकार मेदक | | १२ |
| | ७७३१२३८५॥। | भोवानागिरी | | ११ |
| | ३२४८३२८१० | पानगल | | |
| | १२७०३३८१॥ | कौलकोंडा | | १३७ |
| | ८२१४५० | सरकार नलकोंडा | | ६७ |
| | २००७३६८९॥। | सरकार येलगदल | | २१ |
| | ५००६२५८१॥। | कवास | | ५ |
| | ७४२७२४८१५ | वरगल | | १६ |
| | २८०५५७८२। | खबमेट | | ११ |
| | १८९१०८२॥। | सरकार देवरकोंडा | | १३ |
| | १०५३०२३७८५ | | | |
| ७२०४५६५ सुभे बेदर | | | | ४३ |
| १४४००५० सरकार बेदर | | | | ७ |

| | | | |
|---|---|---|---|
| २०३७५० | हवेली बेदर ३१ | १९५००० | कारीमुगी |
| ३१३९०० | भालकी | २०७५०० | नारायणगाव |
| २९१३०० | चिटकी | ६३५०० | निदूर |
| १६५००० | हुसनाबाद | | |
| | | १४४००५० | |

१३२६६९४ सरकार मळीखेड ११

| | | | |
|---|---|---|---|
| ८२१६१ | हवेली | ९२३५ | उटकूर |
| १५६३० | सेडम | ३७९०० | अमराचिंतें |
| २८७६५३ | चितापूर | ९१,९०० | वेडमाल |
| ९७६०० | अबदलपुर | ६७९५० | कडेचूर |
| २०१०३५ | चिंचोळी | ९८९१५ | मगदरपक |
| २५३५०० | कालकोर्ती | | |
| | | १३२६६९४ | |

१४६७७२ सरकार यातागिरी कोटनूर वगैरे

८०५९४६ सरकार रामागिरी

३४८५१०३ सरकार नादेड १३

२६९९१३ हवेली
३१३७५५ वसमत
३६२७५० इदूर
१५०९४५ बोधन
११२७५० राहुरी
२७३५१५ निरमळ पचमहाल
९२६९५ बोलकोंडापूर
५१७५० वामेलवाडा

२३१८५५ कदार
३११५० रुद्रार
१६८७५० पेगलूर
२६४६०० रोजारा
३५६०० परळी
१३७६९० मुधोळ
९९१७८५ कोंडलवाडी वगैरे

३४८५१०३

७२०४५६५

३९४६९०० सुभे विजापूर परगणे १७

७३७१७७ कलबुरगामहाल १

१०२५२७४ सरकार नळदुर्ग

८५७९९४ सरकार मुदगल

९१६०० हवेली
५६३५० कुकनूर
१६१३२५ कोपल
१०६५०० येलबारगा
८७५०० कुष्टगी
६८३५० तावरगेरा

७६५०० गगावती कमनगिरी वगैरे
३१५०० सिदनूर
२८९०० खडगुपी
१०२००० कायताल
४७४६९ मसकी

८५७९९४

१३२६४५५ सरकार रायचूर

४०६३७३ सस्थान गदवल परगणे २
२३३००० अमलपूर
६८७१०२ रायचूर

१३२६४५५

३९४६९००

५८८०९८० सुभे अवरगाबाद

३०६५६१ सरकार दौलताबाद
२७७९५० अवरगाबाद
६५३६०० बीड सरकार
३९७५०० पाथरी
३०२५६१ सरकार पैठण

७४६०१३ पुरब हवेली
२९८७९० सहगड
१८९८६९५ धारूर वगैरे भुमघाट
९९९३०० परडा

५८८०९८०

१६५६०० सुभे हतुरानपूर पैकीं ३० गावे वगैरे

४६७५००० सुभे वराड वगैरे

६७५००० वासीम

१५३६००० एलचपूर

१४६४००० माहावर

१०००००० छतीसगड परगणे

४६७५०००

३२४०३२८२८५

निसबतीवार राहणार

९२२९५० मुरापूरकर

११५७५२२८२ कर्नोळकर नबाब

७२६३६७८२ गाजीपूर नदपाळ

४३११६५ अदवानी परगणें नाकनोल

११५७५२२८२

१८९५५० बनगाज [ न ? ] अली गुलाम अली खानास

२२७००२२८२

एकुण बेरीज पटी ३४६७३३०४८७ रुपये

इुम्रज बहादर १२३५७८७०९८१ रुपये

तपशील रुपये

९४१२११८४८१ खालसात

२९४५७५२५ निसबत राहणारा

१२३५७८७०९८१

तपशील रुपये

खालसात कुल् ९४१२११८४८१ रुपये

तपशील रुपये

३०२३५४०० नवाब कासम अली खान बहादर याजकडून घेतल्याबद्दल

२१५७२५००० सुभे डाका उर्फ बगाला सरकार कुल् १०९

८६६२९०० सुभे उडाखा सरकार १४

३०२३५४००

४१०००० सुरतकर नवाब याणीं दिले सुरत कसबा
९००२५०॥ सुभे अवरंगाबाद परगणे झमई साष्टी वगैरे
१८१९६८५२ नवाब महंमद अलीखान यास चालत होते ते
८९४०८५२ सुभे हैदराबाद पैकीं

| | | | |
|---|---|---|---|
| १०१०५२७८१० सरकार कची १५ | | ८१८६५५ पालकोट | १२ |
| ५०७६१९८१० चंद्रागिरी | ९ | ८९११२० त्रिणामल | १५ |
| ६७५६८९८१५ सरवपल्ली | १२ | ७४७८६५॥ राये वेलूर | ८ |
| ४८०९४८८३ तिरपासूर | | ६५१२०० वालकोंडापूर | ५ |
| ५११४१५८० चेंगलपेठ | | ९२४८०० वरदावर | |
| ५७४७३१ वाहवासा | | ७१९२५०। सरकार चंदी | ८ |
| ४२७५३७८१० उदयगीरी | ६ | | |

८९४०८५२

९३५६००० तिरचेनापल्ली त्रिणावली रामनाथपूर वगैरे सरकार तिरचनापल्ली

१८१९६८५२

२२४१२८८९ टिपूसुलतान याजकडून घेतले ते
६०२४७८९ श्रीरंगपट्टण पैकीं

| | |
|---|---|
| २१५००० श्रीरंगपट्टण | ९१४५५ बालम |
| ११२००० म्हैसूर | १०६००० महाराज दुरग |
| १२४००० सत्यमगळ | ५९२०० हरोली रामगिरी |
| १२००० हरपनपल्ली [ ? ] | ५६५६० तेरकाणाबा |
| ६२००० पिरीयापट्टण | ८०००० चिकलूर |
| १०७६०० मदुर | १६८९८० इराडे |
| ७२००० ह [ब] गण देवरकोट | ७२१७१ दुरवी केरव |
| ५४००० बेटपपर | ४२५२० किलोरी |
| ६४००० ताईऊर | ९१६५५ चनरायपट्टण |
| ८०००० यलदूर | ४६००० जुगनेहल्ली |
| ५२०००० मलवली | ८१६०० गरडनागिरी |
| ६४८०० तलकाड | ४६१३४ चिकामगलूर |
| २१६०० नरसिंहपूर | ३१५०० भैरवदुर्ग |
| ४३२०० येडोतोरा | २४५००० सत्यमगल |
| २१४००० चेऊर | २३८५०० सेखगिरी |
| १४२००० चेजरी | १५६००० सत्यमगळ |

| | |
|---|---|
| २१२७ ,० धारापूर | ११२००० नागमगळ |
| १,३७५० केरूर | ११५ ०० परमती |
| १६७००० कागेम | ४२२०० वामचूर |
| ४७५०० उतगुडी | १३ ००० अनतगिरी |
| १०५ ५० हेरतूर | ४८००० कावेरीपूर |
| १२७५०० विज्यमगळ | २९ ७५०० दिंडगल |
| ४८' ०० आतूर | ८३४७ ० कोईमतूर |
| -७,९० होसूर | १८,००० शालम |

० ४,७८९

५७९२ ९४ सरकारा सी रा ज ग पे ब वगरे

| | |
|---|---|
| ४,८९३९ हवेली | ८८९९ अकुसगिरी |
| ३७१०३१ हसनबेलूर | ८४,७७ हडीपीहाल |
| २०९०० नागमगल | ५ ८७५' निडगळ |
| ८९९८ गगाबेलूर | १८९५० पावगड |
| ७ ००० कुणगल उतरी दुर्ग | ६५ ०० हागलवु [ बडी? ] |
| २१ ०० मेलकोठा | १,८,४५ नेलवगल |
| २८१२९, सुकरायपट्टण | २७००० देवडनहल्ली |
| ३२१८३१ बंगन्रूर | ३२४००० बालापूरखुर्द |
| १०८,५५ मागडी [ उ ? ] | ३१८७८९ होसकोट |
| २५३८९३ मदगिरी | ४७९२३४ बसवापटण चेनगिरी |
| ९१७५० खानखानली | ३९३१२७॥ कोलारमुलबगल |
| ,८१२५ कडूर | ५९२५० रायसमुद्र |
| २२२२५५ तुमकूर दवरायदुर्ग | ३५७९१॥ सत्यमारडनहल्ली |
| २८९५७ त्यामगोडक | ६१५०० पालकोट पनागर |
| ३३३७५ शिवगगा | ५८७०० धर्मपूर |
| -४७३९ माकलीदुर्ग, | ३९८,०० बारामाहाल |
| ६२३५५ मनकोलार | ११,००० केगरीकोट |
| २२५००० रसूलपूर ची ना ना इ ला न के री | १०९५०० ला [क ? ] गुदी |
| ८४३७५ उकणीकोट | २२०९१० बालापूर |

५७९२ ९४

४०२४,९० सरकार इला [ क ? ] रा ऊर्फ नगर

| | |
|---|---|
| ३६४१७० हवेली | ,५८२० नावलदहावे |

२९१८५४ बिदनूर नगर — १०८५३० बेरूर [ स्त ! ]
१६८५३५ कौलदुर्ग — १३८६९५ तरीकरा
७२३६५ खुमसी — ८०४५० अनतपूर
७८९६५ बिनगी — ११३२९५० मगलूर काडयाल
२१९९४८ कोपा
९८१८३ वस्तारी — ४८८६५० बालतूर
१०९६५ चेंद्रगुती — २६५००० कुदापूर
८९९० सोरबतवानदा — ९१७५० कारकल
७४२०० जेडेआनवटी — १६८५० शिवमोघा
७७५०० उडगणी सिकारीपूर — १०१९१ अजमपूर
१०२५०० लकाळी दानवास — ९१९२० गिरमिबा

४०२४६९०

१४३४८६७ चित्रदुर्ग
२९८६०० हवेली — ११९०० तलख
११२६५० भीमसमुद्र — ९१५०० हणमखर
१०६९५० होमदुर्ग — ८०६०० कणकुपा
११४३६७ हालेलकेरी — १२६५०० हिरूर
११२९६५ दौडरी — १००००० आईमगल
११७६३५ मायकोडा — ४५००० गुडी [ तु ? ] कोट
११६५०० मालेकालमुरू

१४३४८ ७

१४३२००० सस्थान सोदा
३९१४३२ बाईदनाड ऊर्फ कोंडग
२६७७५५ पालघाट
२९७६५०० कलीकोट वगैरे मलेबारपैकीं
९८१६२ गुमी नाईडपाल

२२४१२८८९

१२००२२०२८१० नवाब निजामअल्लीखान [ यांणीं ] दिल्हा तो
४२०८५१८८१४ अवल दफा दिल्हा ते
११६७७०९ सरकार हूजूर — ५४०९५८ मछेली बदर
१७४२६८ सरकार नाजूर — ६८५५०९ राजमहेश्वर
५५३२५८२ गुप वेलूर — ८४०८२२८१२ सिकाकोल
२४६००० निजामपटण

४२०८५१८८१४

७७९३६८३८१२ दुयम दफा दिल्हा ते
७०४००० परगणे रायदुर्ग

१०८००० कुर्प्पा ५ १००० रायदुर्ग
५००० धर्मवार
७०४०००

६४०००० हरपनहल्ली
४५३०० जरीमला [ क ? ]
१८८००० आनेगोंदी
४३१२८१८॥ हैदराबादपैकीं सरकार

७३८२०५८५ उरमकोंड १ ०७८७१८० गजेकोटा
८९८६९६ गुत्ती १४६८०४-८१ सीदोट
४३१२८१८॥

३५३७५८४ सिरे परगणे रत्नागिरी
१३५५१४० सरकार अदवानी

१०१४००० हवेली ४७८५० तलो [ के ? ] ल कोट
१०९५३४ बेलारी ९२६०० सिर गुपा
९१३५५ कुरुगोड
१३५५१४०

९७३५० नदपाळ पैका काईल कुल
७७९३६८३॥।
१२००२२०२८१०

९९५६००० चदावर राजे यासी चालत होते ते हाली कुपणीदाखल
९४१२११८४८
निसबतीस

१५९८६५२५ सुजायत दौला बहादर यासि

१२७१५०० सुभे दिल्ली परगणे अतरवेदा
८००१५२५ सुभे इलाबाद ऊर्फ प्रयाग
६६१३५०० सुभे अयोध्या
१५९८६५२५

९२०००००० नजनाड कीरीट राजा राजराजे यासि
४२७१००० सस्थानिक

१६५००० व्यकटागिरीकोट
१३२५००० काळहस्री

१२९६००० नगरी नारायण वर्म

४२७१०००

२९४२७२ ५

जमानशहा अबदाली यास चाल्वणेचे १६३०१५०० रुपये

तपशील

६११८३७५ सुभे मुलतान

३२५७१२५ सुभे कास्मिरी

२१२३००० सुभे काभोज काबूल

३८६५००० सुभे केदार

१६३०१५००

चिलर

२३७४ ५० गुलामशहा शिद्दी यास सुभा ठठ्ठा

१९३३४२२० शिक यास सुभे लाहोर

१०००००००० परतीर्य राज्य ज्वालामुखा नेपाळ गोरख वगैरे

५२६४८३। सावतवाडी परगणे गोशा श्रीवर्धन हबसी वगैरे

३२२३४९८३। एकूण सदर रुपये

---

ले ४७६
[ १५२ ] ता १० ११ १८०९ (?)

॥ श्री ॥

पुरा। राजश्री बाबा स्वामीचे सेवेशी विनती ऐसीजे इकडील राजकातीचे वर्तमान तरि जलचराचीं पळटणें बंगाल्यातील व चिनापट्टन लगायेत गुजराथ वगैरे या प्रातीचे दरोबस्त जमाव पलटनें सुमारी पाऊणशें कमकसर याचा कौसल ठहरून बादबरसाद आश्वीन अखेर तयारी करून हिंदुस्थान प्राती आपल्या मुकाबिलास येतात यात संदेह नाहीं जंगी सरजाम तयार करण्याकरिता या प्रातीचे महालानिहाय मिळोन येथें साहुकारापासून पन्नास लक्ष रुपये घेतले वराता सावकार म॥रास कलकत्याकडे लाऊन दिल्या पोख्त सरजाम लेश करविला आहे याप्रमाणें तांब्राचे अधिकारी यानीं मसलतीचे घाट बाधून स्वार सरजाम सुद्धा येत आहेत तरी आपण श्रीमंत महाराजास राजकातीचे भाव सुचवून तयारींत असावें दुसरे तेथून होडिया नेमावर घाट येथील मुक्काम पावतों माणसाची डाक रवाना जाहली आहे हालकरे चारशें व कारकून इग्रेजानीं नेमून पाठविला आहे आज पधरा रोज जाहले बेटात आपल्याकडील गृहस्थ आहे त्याना तथ्य वृत्त सांगितले त्यावरून

सुचना लिहिण्यात आली आहे कारण कीं, सर्वांस आधार तेथील येथील उमेद तिळमात्र नाहीं आता छद्म [ छनद ? ] करिता परतु सिद्धीस जाणार नाहा

---

ले ४७७
[ ४५० ]

ता।१७ २ १८११
माघ व ९ श १७३२

श्री

( छ २२ मोहरम इहिदे अशर मयातैन अल्फ ११२० फसली माघ वद्य ९ रविवार शके १७३२ प्रमोद तारीख १७ फेब्रुवारी सन १८११ इसवी पौ छ २६ मोहरम सन इहिदे अशर मयातैन व अलफ माघ मास )

श्रीमत महाराज मातुश्री माईसाहेब साहेबाचे सेवेशीं

विनती सेवक बाजीराव रघुनाथ प्रधान कृतानेक विज्ञापना ता छ ११ मोहरम सन इहिदे अशर मयातैन पावेतो साहेबाचे कृपें करून सुखरूप असो विशेष राजश्री येशवतराव होळकर याचे बोलणें कीं, " माझे प्रकृतीस समाधान नाहीं याजकरिता मजला जेजुरीस येऊन देवदर्शन घ्यावयाचे देवदर्शनावाचून माझा प्राण जातो, त्यापक्षीं मजला आज्ञा आली असता जेजुरीस यावयाचें, अथवा आज्ञा न जाली तरी जेजुरीस येऊन देवदर्शनावाचून येथें माझा प्राण जातो, त्यापक्षीं मजला जेजुरीस येणें प्राप्त, मग प्राण जावो अथवा राहो परतु मजला जेजुरीस यावयाचें " म्हणोन होळकराकडील वकील सरकारात बोलतात त्यास होळकरास येण्याविषयीं सरकारांतून आज्ञा न जाली तरी जबरदस्तीनें दक्षणेंत यावयाचा इरादा त्याचा आहे तेव्हा होळकर याचे वास्तविक प्रकृतीस ठीक नाहीं म्हणोन जेजुरीस देवदर्शनाकरिता येणार किंवा देवदर्शनाचे निमित्यानें इकडे जबरदस्तीनें येणार, कोणत्या मतलबाकरिता येतो याचा निश्चय नाहीं त्यास होळकर याचें आमचें वाकडे कसे व त्याणें प्राताची दशा कशी केली, या सविस्तर मजकुराची समक्ष विनती केलीच आहे व हा मजकूर जगप्रसिद्धही आहे यास्तव होळकराचें इकडे येणें जहालें असता मी पुण्यास रहावें हें मसलतीस येत नाहीं याजकरितां होळकराचा दक्षणेंत येण्याचा प्रकार दिसला म्हणजे मी विजयदुर्गास जाऊन रहावयाचा बेत केला आहे होळकर इकडे आलियावर प्रसग कसा पडतो याचा नियम आज समजत नाहीं महाराजाची स्वारी सातारियास पेशजी परशरामभाऊ पटवर्धन यांणीं चिरजीव राजश्री चिमणाजी रघुनाथ यास यशोदा बाईचे माडीवर बसवून चिमणाजी माधवराव असे शिके व पेशवाईचीं वस्त्रें आणून दिल्हीं, तसेच यशवतराव होळकर यांणीं चिरजीव राजश्री विनायक अमृतराव यास पेशवाईचीं वस्त्रें आणिलीं पूर्वी असे बखेडे जाले कारण सातारा जागा नाजूक, बाकी नव्हे बळकुबळीस रहावयाचे उपयोगीं नाहीं सबब पूर्वी शिवाजी महाराज यांणीं रायगडासारख्या जागा बसवून दौलती केल्या प्रसगाचे दिवसांत साताऱ्यास खासा स्वारी रहाणें हें माझे व राजश्री सदाशिव माण-

केश्वर याचे विचारास येत नाहीं रायगड जागा चांगली मजबूत, कोणी म्हणेल कीं तेथें फौज पाठवून वस्त्रे आणू किंवा बडबखेडा करू, तर होणार नाहीं, असें माझे व मशारनिलेचे विचारात आलें याजकरिता साहेबाचे मर्जी मु ब र कें त आल्यास यशवतराव होळकर दक्षणेंत येऊन कोठें लढाईचा प्रसग न करिता कराराप्रमाणे नर्मदापार माघारा गेल्यास मी विजयदुर्गाहून पुण्यास येईन ते समयीं साहेबाची स्वारी सातारियास जावी कदाचित् यशवतराव होळकर लढाईच्या इराद्यावर येऊन बखेडा करू लागल्यास ते मसलत शेवटास जाय तों रायगडास महाराजानीं कुटुबसुद्धां आनदात असावे मसलत शेवटास गेल्यावर मग सातारियास यावें याचें मनन करून हे मसलत बाहेर कोठें न फोडतां आज्ञोत्तर यावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले ४७८ }
[१५३] }

{ ता १४ १० १८११
{ आश्विन व १२ श १७३३

श्री

श्रीमत राजश्री आबासाहेब साहेबाचे सेवेशीं—विनती सेवक मल्हार चिंतामण बोधनी अकबरनीस कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना छ २५ माहे रजमान पावेतों आपले कृपें करून सरकार कामावर हजर असों विशेष ता॥ वाफगाव येथील आकबार येणेंप्रमाणें श्रुत व्हावी

कलमें

१ हुजुरोंहून नारायणराव हाल्कारे सरकार आज्ञेवरून श्रीजेजुरीलिंगाचे नवस फेडावयाकरिता आश्वीन शुद्ध ७ पुणें मुक्कामीं येऊन राजश्री बाबाजी बाजीराव मामलेदार ताळुके म॥ हे नारायणराव वरोबर जेजोरीस जाऊन तेथें श्रीचा गोंधळ व कुळधर्म व ब्राह्मणभोजन उत्तम प्रकारचें करून देवाची पूजा अर्चा वस्त्रप्रावर्णासह उत्तम प्रकारे केली, व सर्व आश्रित व पाध्ये वाघे मुरळी याचा सन्मान करून बहुत चागला समारभ केला आसमतात जेजुरीचे मोठा लौकीक जाहला या कृत्यास बारा चौदा दिवस कमावीसदार तेथें होते. नतर नारायणराव श्रीपढरपुरास गेले व बाबाजी पुण्यास सरकार कामावर हजर आहेत

१ ता॥ वाफगाव देहे नव येथील इकडील रिवाजाप्रमाणें गावकरी यानीं कमावीसदार याजकडे पीक पाणीचे आर्ज्या केल्या आहेत कीं आमची पहाणी पिकाची करून नजरेस आणावें, त्यावरून क॥दार यानीं कोठें कोठें कारकून पाठविले आहेत व आणखी पाठविण्याची योजना आहे

कलम

१ नवगावीं शकून पोत्याच्या चिठ्या केल्या आहेत नवगाव मिळोन शेंसवाशें रूपयाचा आकार होईलसा दिसतो

कलम.

१. क॥×आले येथील पाटील कुळकर्णी याचा व रयतेचा तटा त्रिंबकराव रामचद्र याचे अमलापासून वाटला दिसतो रयतीस फूस देणार क॥ माराच्या दोन तीन असाम्या

× कमावीसदार

येक गोपाळराव बारेकर व एक आनदराव शेटे व एक नारायणराव पा॥ भुजबळ हे त्रिवर्ग आणीक एक दोन असे मिळोन असे रयतेस बिछडून कुभाड गावात मोठें माडलें आहे रात्रदिवस कचेरी दरबार साहेब लोकापर्यत अर्ज्या रयतीकडून देऊन पुढें बोलण्यास आपण होऊन तकरार कुभाड करीत आहेत पाटील कुळकर्णी याजकडे विशेष दोष आहे असें नाहीं, परतु कुळकर्णी यानें लिहू नये, गावात पाटलानीं कामात येऊ नये, असे नाना प्रकारचे तकरारी करून मोठा बखेडा माडला आहे अशा खटल्यानें का॥दार यास रात्रादिवस मोठी दगदग पडून वसुलाशींही हरकत गु॥ ही अखेरसालपर्यंत केली असें दिसोन आलें यंदाही तसाच प्रकार दिसण्यात येतो याविशीं साहेबाकडे यादबिद देऊन बदोबस्त करण्याचे तजविजींत अक्षयी आहेत परतु बारेकर वैगेरे तीन असाम्या याचा बदोबस्त इग्रज सरकारातून अगर आपले सरकारातून जाल्या वाचून गावचा बखेडा मोडत नाहीं असें दिसतें ही मोठी जिकीर आहे

कलम.

सदरहू कलमें लिहिल्याप्रमाणें मनन होऊन उत्तरास आज्ञा जाहली पाहिजे कळावे सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले ४७९ }
[ ६३ ] }

{ता। १५-७—१८१२
{ आषाढ शु. ७ श १७३४

॥ श्री म्हाळसाकांत ॥

राजश्री रावजी गोविंद गोसावी यासि—

छ अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य—स्ने॥ मल्हारराव होळकर दडवत विनति उपरी तुम्ही ज्येष्ठ वद्य ६ व एकादशीचीं पत्रें पाठविलीं तीं पावून लेखनार्थ अवगत जाहला येथें पावल्यावर सरकार पत्रें उभयता बाबास दाखऊन आज्ञेचे भाव सर्व दर्शविले त्यानींही बोलण्याचा क्रम चालू केला आहे वन्याचा लोभ कारभारी याचे मन पूर्वक जपणें हें बारीकपणें ध्यानीं आल्यावरून लेखन केले आहे राजश्री बाळाजी लक्ष्मण नि॥ विंचूरकर याची भेट करविली त्याचेही बोलण्यात उचित तेंच निदर्शनास आलें पुढें घडल्याचें लेखन होईल म्हणोन लि॥ ऐशियासि तुम्ही सरकार पत्रें व आज्ञेअन्वयें बोलून क्रम चालू करविला हें नीटच यावर दिनावधीवर न पडता आरभिला विचार सत्वर बनून ये तें करवणें खावदाचा लोभ दिवसेंदिवस दिसण्यात येईल तसें सेवाही करण्याची उमेद, इकडे हे भाव कारभारी व बाळाजी लक्ष्मण यास दर्शवून त्याचें जपणें मन ज्या दौलतीविशीं आहे त्याची वृद्धी घडे तें करणें

(मुद्रा: श्री म्हाळसाकांत चरणीं तत्पर येशवंतराव सुत मल्हारराव होळकर)

करीम पेंढारी सरकार कैदेंत त्याचें बोलणें लाऊन सुटका होती ह्या आवया राजश्री खडो माहादेव व सखाराम जगजीवन यानीं ऐकून तेथील मर्जीचे भाव विस्तारें लेहून पाठविले, त्यास येथें होणें ते दूरदेशीने तेथील सल्लेनेंच होणें तें होईल तुम्ही बोलण्याचा क्रम.

चालता जाला ते पक्षीं दररोज होईल तसे लेहून वरचेवर कळवीत जाणें आळस न करणे रा। छ। ५ रजब सु।। सल्लास अशर मया तैन व अलफ बहुत काय लिहिणे हे विनंती

मोर्तब

सूद

---

ले ४८०
[ ९३ ]

आषाढ व ३ श १७३४
ता २७-७-१८१२

॥ श्री ॥

राजश्री रावजी गोविंद गोसावी यासि—

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य-स्नो मल्हार होळकर दंडवत विनंति उपरि तुम्ही राजश्री खंडो माहादेव व सखाराम जगजीवन सह श्रीपंढरपुराकडे छ ५ रोजीं गेल्याचे वर्तमान राजश्री माधवराव येशवंत याचे लिहिल्यावरून समजण्यात आलें तेथें गेल्यावर श्रीचे दर्शनाचा गुंता उर्कोन सरकार प्रकर्णी बोलण्याचा प्रसंग पडून घाटावर आणिलेच असेल कारभारी याजकडून प्रतिकूलता कोणतीही नाही येक दोस्ताचे रुकाराची गुंता तेही बोलून चालून पल्यावर आणिलेंच असेल सारांश प्रसगीं कोणेही विशीची न्यूनता न पडता आरंभिला कार [ * ] अविलंब शेवटास जाय ते करणे दुसरें इग्रजांनीं काम काजें उगऊन घेण्याची बहुत निकड लाविली होती, त्यात पन्हाळेकराची कुमक करून मसलत वाढवावी हा इरादा दिसण्यात येतो याचें बारीकपणे वास्तविक असेल तसें लेहून सविस्तरें कळविणें रा छ १७ रजब सुा सल्लास अशर मयातैन व अलफ बहुत काय लिहिणें

---

ले ४८१
[ ७० ]

शके १७३४
सन १८१२

॥ श्री ॥

राजश्री सदाशिवपंत भाऊ गोसावी यासि—

छ सकळ गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अळंकृत राजमान्य स्नो मल्हारराव होळकर दंडवत विनंती उपरि येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशळ लिहित असावें विशेष—इकडील सरदारींत खर्चाची वोढ महालात पेशजी प्रा उत्पन्नास जागा नाहीं फौज बाहेर मोहिमीस रहात गेली सध्या तो प्रकार सर्व आपले ध्यानात तीर्थरूप कैलासवासी बाबासाहेबानीं पद-रचे माणस सर्व लोभात ठेऊन फौजेची हुशारी ठेविली तो ओघ यथास्थित चालून सरकार चाकरी घडावी याहून दुसरे लक्ष नाहीं राजश्री गणपतराव नारायण येथें कामाकाजात व

---

* येथें शिक्का बाजूवर आहे

राजश्री बाळाजी लक्ष्मण देशींहून आले, त्याचें म्हणणें श्रीमत स्वामींचे अभयोत्तरें व भाऊचे लोभाने सर्व विचार घडतील येविषयींच मारार राजश्री खंडो महादेव व सखाराम जगज्जीवन याजला लिहिण्यात आला आहे उभयता कलवितील त्याप्रों श्रीमतास विनती होऊन क्रमें यथापूर्व प्रवाहास येऊन वडिलाचा लौकिक राहणें आपल्याकडे आहे

---

ले ४८२ [ १५५ ] | वैशाख व ७ शके १७३५ ता २२-५-१८१३

॥ श्री ॥

रा विसाजी देवराव गोगा याशीं—

सुरुसन सलास आशर मयातैन व अलफ शेखचाद शिलेदार यास सरकारातून बक्षीस रुपये ५०० पाचशें पाठविले असत, तरि त्यास देऊन पावती घेऊन हुजूर पाठवून देणें जाणिजे छ २१ जावल असल पत्र बाळाजीपत कारकून निा त्रिबकजी डेंगळे याजकडे देऊन डाके बरोरर लष्करात रवाना केलें छ २३ जावल सुा सलास अशर मयातैन मुा नाशिक

---

ले ४८३ [ १५४ ] | वैशाख व १२ श १७३५ ता २७-५ १८१३

॥ श्री ॥

श्रीमत राजश्री भाऊ स्वामींचे सेवेशीं—

विनती सेवक लक्ष्मण बल्लाळ साष्टाग नमस्कार विज्ञापना येथील कुशळ ताा छ २६ राा वल मुक्काम वीरगाव पो आकोलें यथास्थित असे विज्ञापना पेंा दिंडोरीकडे बातमीस स्वार पाठविले होते, व राा फत्तेसिंग काळे याजकडे जासूद पाठविले होते दोहोंकडून तहकीक वर्तमान आलें कीं, जयराम मोरेश्वर सुटले खासा कामास आला, येविशीं फत्तेसिंग काळे यानीं म्जला पत्र लिहिलें त्याची नकल सेवेशीं पाठविली असे त्याजवरून सेवेशीं विदित होईल मातुश्री उमाबाईकडील वर्तमान तरि नाशिकावरि आहेत परतु गंगातिरीं मौजे निफाड पेंा चांदवड येथें मीर महमद बाकर नाशिकचा अमीन हजार बाराशें फौज सुद्धा अकस्मात् सेनापतीचें कूच होऊन पुढें जाणार येका दो दिवशीं जातील, सेवेशीं कळावें म्हणून लिहिलें असे बहुत काय लिहिणें हे विज्ञापना

---

ले- ४८४ }
[ ६४ ] }

{ आश्विन शु ६ श १७३६
{ ता १९-१०-१८१४

।। श्री म्हाळसाकांत ।।

राजश्री रावजी गोविंद गोसावी यांसि—

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ मल्हारराव होळकर दंडवत विनती उपरी तुम्हीं भाद्रपद व॥ ५ चें पत्र पाठविलें तें पाऊन लेखनार्थ अवगत जाहला फणशा मदाणकर निंबोण्यास पावून उत्तर आलें चादवडचें पत्र आलें नाहीं आल्यावर लेखन करीन. श्रीमताची स्वारी भिमातीरीं कपिला षष्ठी करून येणार अजम अलफिस्टन साहेबांस व खुशरुदीन मोदी व त्र्यबकजी डेंगळे यास पत्रें सरकारचीं येतात तीं योग्यते प्रमाणें येत असावीं म्हणोन राजश्री खंडोपत बाबानीं साहेबास लिहिलें आहे त्या अन्वयें पत्रें येण्यास आज्ञा व्हावी म्हणोन लिहिलें ऐशियाशि फणशा व मूल आज पावेतों चादवडीं पोंहोचऊन तुम्हाकडे पत्रें आलींच असतील त्याजला तेथें ठेवणें साप्रतचे प्रसगास अप्रशस्त जाणोन नेमाडी प्रांतीं आणावयाचें ठरून

श्री
म्हाळसाकात चरणीं तत्पर
येशवराव सुत मल्हारराव
होळकर

राजश्री परशराम होळकर याजपाशीं पावते करण्याविशीं पत्र राजश्री रामजी आगरवाले व भिकाजी गोमाजी यांस पाठविलीं त्याप्रमाणें ते करतील याचा तपशील राजश्री खंडो महादेव यांचे पत्रीं लिहिला आहे तेथें प्रसगानुरूप बोलावयाचें तें बोलून इकडेही कळविणें आज पावेतों श्रीमताची स्वारी पर्वाचें स्नान करून पुण्यास आलीच असेल पुढें श्री स्वामीस×जाण्याचें ठरेल तैसें कळविणें साहेब मोदीव डेंगळे यास पत्रें यावर मशारनिलेचे लिहिल्या अन्वयेंच लिहिण्यात येत जातील र॥ छ ५ जिलकाद सु॥ खमस अशर मयातैन व अलफ बहुत काय लिहिणें हे विनती

मोर्तब
सूद

---

ले ४८५ }
[ १५७ ] }

{ ता १४-१२ १८१४
{ मार्गशीर्ष शु ३ श १७३६

श्री

पै॥ छ १८ मोहरम सन खम्मस अशर

साहेब साहेबाचे सेवेशीं आज्ञांकित बयाजी नाईक§ विज्ञापना मेस्त्र इलफिस्टन वकील-दिम्मत इंग्रज कलकत्तेकर याजकडील दिनचर्येची बातमी—

१ छ १ मोहरमचें वर्तमान—मशारनिले प्रात काळीं गणेशखिंडी पावेतो जाऊन

---

× कार्तिकस्वामीस § बयाजी नाइक—हा एक हुजुऱ्या असून हेराचे काम त्याच्याकडे होतें

सहल करून आले गोपाळ खंडेराव रास्ते याजकडील कारकून प्रात काळीं मशारनिलेशीं बोलून गेले जिऊबाई भानूकडील कारकून मेत्र रसल याशीं बोलून गेले गगाधर शास्त्री यांजकडील जासूद एक लखोटा घेऊन आला तो मुबईचे डाकेवर रवाना करावयास मशारनिले जवळ पावता करून गेला मुबई व हैद्राबाद व श्रीरगपट्टण व बऱ्हाणपूरचीं पत्रें डाके बरोबर आलीं जाब रा। जाले

१ छ २ मोहरमचे वर्तमान—मशारनिले व कपतान कलोस वगैरे पाच असामी प्रात काळीं गारपीरचे लष्करात जाऊन तेथून घोरपडी पावेतो सहल करून आले खुसरवजी मोदी येऊन मशारनिलेशी दोन घटका बोलणें केलें कप्तान कलोस व मेत्र रसल व बापूजी गोपाळ साने बोलण्यात होते नतर निघोन आदितराम साहुकार याचे येथें जाऊन घरास गेले करवीरकाराकडील कारकून मशारनिलेशीं बोलून गेले गगाधर शास्त्री याजकडील आगशीकीरस्ताई मेत्र रसल याशीं बोलून गेला पाडोबा नाईक पिपडी करवीरकराकडील पत्र घेऊन आले ती थैली मशारनिलेस पावती करून दोन घटका बोलून गेले जीऊबाई भानू कडील कारकून व प्रभाकरपत जोशी मोघीशीं बोलून गेले मुबई व हैदराबाद व श्रीरगपट्टण व बऱ्हाणपूरचीं पत्रे डाके बरोबर आलीं जाब रा। जाले शीरूरनजीक लष्करचे छावणीचे गीर्दनवाईस पेंढारी येऊन उपद्रव केला म्हणोन छावणींतील टोपकाराकडून डाके बरोबर बारा घटका रात्रीं मशारनिलेस पत्र आलें एक टोपकर व दहा शिपाई छावणीनजीक जखमी जाले, अशी बातमी आहे हैदराबादचे डाकेस इग्रजाकडील जासूद आहेत त्यास मौजे चिंचोली येथील टप्यावरील जासूद डाकेचीं पत्रे घेऊन येत होता, त्याची पेंढाऱ्याची गाठ पडून पेंढाऱ्यानीं भाला मारिला जासूद जखमी झाला म्हणोन मशारनिले कडे बातमी आली कप्तान फोट मुबइस गेले होते ते बोर घाटावर खंडाळ्याचे मुक्कामीं आले, म्हणोन दापोडीचे छावणींत बातमी आली त्याजवरून छावणींतील टोपकारानीं लौकर येण्याविशीं पत्र पाठवून डाक बसावयास घोडे रवाना केले

२

दोन रोजा वर्तमान निवेदन जालें पाहिजे सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले ४८६ }
[ १४९ ] }

{ मार्गशीर्ष शु १२ श १७३६
{ ता २४-१२-१८१४

श्री

साहेबाचे सेवेशीं आज्ञाकित बयाजी नाईक, विज्ञापना, मेस्तर एलफिनइष्टेन वकील हिम्मत इंग्रज कलकत्तेकर याजकडील दिनचर्येची बातमी

१ छ १० मोहरमचें वर्तमान मशारनिले प्रात काळीं दापोडी पावेतो जाऊन सहल करून आले. अनुमिया हैदराबादकर नारायणजी डाकवाले याशीं बोलून गेले मुबई व

हैदराबाद व श्रीरंगपट्टण व बऱ्हाणपुरचीं पत्रे डाके बरोबर आलीं जबाब रा जाले रिकाब कोशलदार व कर्णेल ग्राट मुबईहून नगल्यास आले सात मुक्काम केले होते वेहरास येऊन देऊळ वगैरे जागा पाहून, कारल्यास मुक्काम करून, मागती मुबईस गेले सरकारचा जासूद व मारनिले कडील खिजमतगार तरतुदी करिता मारनिलेनीं पाठविले होते ते माघारे आले

१ छ ११ मोहरमचे वर्तमान बापूजी गणेश गोखले यास मारनिलेनीं पत्र लिहून, थैली तयार करून रवाना करावयास त्याजकडील सखोपत टेंभे यास बोलावून आणोन त्याचे हवाली केलीं सखोपतानी एक घटका बोलणें करून गेले बापूजी गोपाळ साने येऊन कप्तान कलोस याशीं बोलून गेले करवीरकराकडील कारकून मेस्त्र रसल याशीं बोलून गेले प्रभाकरपत जोशी मोधीशीं बोलून गेले आगरे याजकडील बापूभट सोमण मेस्त्र रसल याशीं बोलून गेले गगाधर शास्त्री याणीं जासुदाबरोबर लखोटा पाठविला तो मुबईचे डाकेवर रवाना करावयास मारनिले जवळ पावता करून गेला मुबईचे डाकेवर व हैदराबाद व श्रीरगपट्टण व बऱ्हाणपूरचीं पत्रें आली जाब रा। जाले दोन रोजा वर्तमान निवेदन जाले पाहिजे सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले ४८७ [ १५० ] } { ता २२ १२ १८१४ मार्गशीर्ष शु १० श १७३६

श्री

साहेब साहेबाचे सेवेशी आज्ञाकिंत बयाजी *नाईक विज्ञापना, मेस्त्र इलफिनइस्टान वकील दिम्मत इग्रज कलकत्तेकर याजकडील दिनचर्येची बातमी—

१ छ ७ मोहरमचें वर्तमान मशारनिले प्रात काळीं दापोडी पावेतों जाऊन सहल करून आले गोपाळराव खंडेराव रास्ते याजकडील कारकून व बापूजी गोपाळ साने मार निलेशीं वेगळालें बोलून गेले करवीरकर याजकडील कारकून मेस्त्र रसल याशीं बोलून गेले प्रभाकर पत जोशी मोधीशीं बोलून गेले मुबई व हैदराबाद व श्रीरगपट्टण व बऱ्हाणपूरचीं पत्रे डाकें बरोबर आलीं जाब रा। जाले

१ छ ८ मोहरमचें वर्तमान करवीरकराकडील वासुदेवभट गुरुजी व तीन असामी कारकून ऐसे येऊन मा।निलेशीं बोलणें करून गेले गगाधर शास्त्री व बापू मैराळ मानिलेशीं दोन घटका बोलणे करून सायकाळीं गेले चिंतामणराव पटवर्धन व मिरजकर व तासगावकर व कुरुदवाडकर यास मा।निलेनीं पत्र लिहून चार थैल्या तयार करून त्याजकडील कारकून बोलावून आणोन चौघाचे हवालीं चार थैल्या रवाना करावयास केल्या त्या घेऊन चौघानीं कपतान कलोस याशी बोलणें करून गेले बापूजी गोपाळ साने मशारनिलेशा व मोधी याशीं बोलून गेले मुबई, हैदराबाद व श्रीरगपट्टण व बऱ्हाणपूरचीं पत्रें डाके बरोबर आलीं जाब रवाना केले गारपीरचे लष्करातील शिपाई व गगाधर शास्त्री याज

---

* बयाजी नाईक हुजऱ्या हेराचें काम करीत होता

कडील माणसें मोहरमची फकीरी मागावयास आले सबब मशारनिलेनीं लष्करवाले यांस रुपये दहा व शास्त्री यांजकडील माणसास पाच एकूण पधरा रुपये दिल्हे

१ छ ९ मोहरमचे वर्तमान निपाणीकर यास मशारनिलेनीं पत्र लिहून थैला करून रवाना करावयास बापूजी गोपाळ साने यांचे हवालीं केली ती घेऊन साने गेले मशारनिले व कप्तान कलोस व मेत्र रसल व कप्तान पार्टेजर व दु स रे व जी [ खुसरुजी ? ] मोधी ऐसे चार घटका दिवस राहता राजश्री सदाशिवपत* भाऊ याजकडे नाना फडणीसाचे वाड्यात येऊन भाऊशीं बोलणें केलें श्रीमत महाराज साहेबाचे सेवेशी मशारनिलेनीं पत्र बापू साने याचे हाते लिहून बराबर थैली करून आणली ती भाऊचे हवालीं करून दोन घटका रात्रीं गेले मोधी मागें राहून एक घटका बोलून गेले आनदराव मल्हार व धोंडो मल्हार बोलण्यात होते. कप्तान फोर्ट+ श्रीरगपट्टण दोन वेळा येऊन मशारनिलेशीं बोलणें करून, खाना खाऊन दोन प्रहर रात्रीं गेले आगरे याजकडील कारकून प्रात काळीं मशारनिलेशीं बोलून गेले मुबई, हैदराबाद व बऱ्हाणपूरची पत्रें डाके बरोबर आला जाब रा जाले भिकाऱ्यास चार रुपयाचा खुर्दा मशारनिलेनीं खैरात केला

---

३

तान रोजा वर्तमान निवेदन जालें पाहिजे सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

ले ४८८ [ ४४१ ] — सन १८१७ पूर्वी, शके १७३९

श्रीनाथ स॥

राजश्री सदाशिव भाऊ गोसावी यासि

छ सकळ गुणालकरण अखडीत लक्ष्मी अलकृत राजमान्य स्ने॥ दौलतराव शिंदे दडवत विनती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष कैलासवासी श्रीमत नानासाहेब व दादासाहेब याणीं सरकारातून कैलासवासी ती॥ जयापा शिंदे दत्ताजी शिंदे यास समागमें दिवाणगिरीचे व फडणविशीचे कामावर रामचद्र मल्हार यास दिल्हे होतें, त्याचे व वडिलाचें न बने, तेंव्हा ते उठोन पुण्यास गेले नतर राजश्री रामराव अपाजी दाभुळकर याचे आजे रामाजी अनत व लक्ष्मण केशव वैद्य याजला उभयता श्रीमत याणीं सनदापत्रें देऊन रवाना केले श्रीमताचे कृपे करून वडिलाचे चाकरीचा उत्कर्षसा दिसोन आला पादशाहा याचीही प्रसन्नता जाली पुढलि हुजूर आले

---

* सदाशिवपत भाऊ माणकेश्वर टेभुर्णीचे कुळकर्णी आरभी हरदासाचा धदा करीत पुढें गोविंदराव पिंगळे याचे मार्फत हैदराबादेस होते

\+ क फोर्ड हा मराठी फौज मोडून इग्रजी पलटण बाजीराव साहेबानीं तयार केली होता त्याजवरील मुख्य यालाच पेशव्याचे बखरात पोट साहेब म्हटलें आहे

ते समयीं रामाजी अनत यास पादशह याणीं सरजाम इनाम करार करून सोनई बाम्हणीच्या सनदा पन्नास हजाराच्या करून दिल्या, त्यास सरकारात भेटीच्या प्रसगीं रामाजी अनत याणीं श्रीमत याचे चरणीं अर्पण केल्या तेव्हा त्याजपैकीं श्रीमत मातोश्री बायाचे नावें तीस हजाराचा सरजाम ठेवून बाकी वीस हजाराचा सरजाम रामाजी अनत याजला कृपावत होउन मुबदला कसबे अकूळनेर पा। पाडे पेडगाव व मौजे नवगाव होऊन पा। आबाड व मौजे खेडलें परमानदाचें पे॥ नेवासे येण प्रमाणे तीन गाव मशार निल्हेस धर्मदाय देऊन पुत्रपौत्रादि वशपरपरा सनदा करून देऊन पुष्टीकरणास्तव राजपत्रेंही दिलीं व लक्ष्मण केशव याजला मौजे टेभरी प्रात कल्याण हा गाव दिल्हा, याच्याही सनदापत्रें करून देविल्या आहेत त्यास सदहू चार गाव निर्वेध आजपर्यंत चालत आहेत साप्रत सरकारातून गाव जप्ती जाली आहे, म्हणोन ऐकिलें त्यास रामजी अनत पाणिपतचे स्वारीस कामास आले व अपाजा राम हेही सरकार चाकरीचे उपयोगी पडून मारवाडचे स्वारीस कामास आले आलीकडे गोपाळ जनार्दन वैद्य हेही जयपूरचे लढाईत जुरत करून कामास आले रामराव अपाजी व जनार्दन लक्ष्मण सरकार चाकरीचे जागीं लक्ष ठेवून राहत आहेत साप्रतकाळचा प्रकार दग्यामुळे वगैरे खर्चाची वगैरे अडचण पडून देण्याचे पेंचात आहेत याचा उलगडा वोढीस्तव होउन न आला प्रपचास वगैरेस आधार सरजामाचाच आहे हें श्रीमत स्वामीचे ध्यानात येउन पूर्वीपासून अभिमानपुर सर साभळ होत आला त्यापक्षीं आताही श्रीमत स्वामी याणीं कृपावत होऊन चार गावच्या सोडचिठ्या जप्तीच्या मोकळकोविषयी देऊन गाव चालविले पाहिजेत श्रीमतास विज्ञाप्ति लिहिण्यात येऊन हें पत्र आपणास लिहिले आहे त्यास आपण येविशीं श्रीमतास विनती करून रामराव आपाजी तिकडे आले आहेत, त्याजवर श्रीमत प्रसन्न होऊन गावच्या मोकळिकेविशीं सोडचिठ्या देऊन इकडे रवनगी होय ते करावें रवाना छ १९ जमादिलावल बहुत काय लिहिणे लोभ कीजे हें विनती मोर्तब सुद †

[ सदाशिव माणकेश्वर दुसरा बाजीरावाचे कारभारावर सन १८०६ ते १८१७ पर्यंत होता त्या वेळचें हें पत्र आहे ]

---

ले ४८९ [ ४९२ ] | माघ शु ६ श १७३९ ता ११-२-१८१८

श्री

मेस्तक सवत्सर नावें व शालिवाहन शक व यवनी फसली दिल्लीचा व सन अर्बा व शिवाजी राजे भोसले छत्रपती याचा शक सुरूसन समान अशरीन मयातैन व अलफ

---

† हा व पुढें येणारे आणखी २ म्हणजे जुने ले ४३९ व ४४० असे तीन कागद मुरलीधर एकनाथ पळशीकर याजकडून मिळाले

[ १ ] अबदुल्लाखान जावलीस शिवाजीराजे यांणीं मारिला

आज संवत्सर चैत्र शुद्ध १ दे मृगापासून मृगापासून जेष्ठ शुद्ध १३ पासून
शार्वरीनाम पासून शक फसली अर्बी शिवाजीराजे याचा
३४ १५८२ १०७० १०६१ ०
सन इहिद्दे सितैन अल्फ

[ २ ] शास्ताखानाचा सुभा येऊन चाकण किल्ला घेतला,
प्लवनाम ३५ १५८३, १०७१ १०३२ ० सन
इसने सितेन अल्फ

[ ३ ] त्यानतर भाद्रपदमासीं खानाचा पुत्र शिवाजीराजे यानीं आगठा कापून मारिला व विठ्ठल मोरदेव देशपाडे परगणा पुणें कार्तिक वद्य ४ मेने [ ले ? ] व सुभा पुरदर या खालीं आला त्याचा तळ कोंडितावर आला
क्रोधीनाम ३८ १५८६ १०७४ १०६५ ०
सन खमस सितेन अल्फ

[ ४ ] थोरले चिंतामण देव पौष वद्य ४ समाप्त झाले
कीलकनाम? ४२ १५९० १०७८ १०६९ ०
सन तिसा सितन अल्फ

[ ५ ] शिवाजीराजे सिंहासनारूढ जाहले ज्येष्ठ शुद्ध १३ जाहले शक आनद-नाम सवत्सरे ४८ १५९६ १०८४ १०७५ १
खमस सबेन अल्फ

[ ६ ] शिवाजी राजे शात चैत्र शुद्ध १५ जाहले मग संभाजी राजे सिंहासनारूढ झाले श्रावण शुद्ध १५
रौद्रनाम ५४ १६०२ १०९० १०८१ ७
इहिदे समानीन अल्फ

[ ७ ] रामदासस्वामीचा अवतार समाप्त जाहला
दुर्मतिनाम ५५ १६०३ १०९१ १०८२ ८
इसने समानीन अल्फ.

[ ८ ] शाहूराजे याचा जन्म
दुदुभिनाम ५६ १६०४ १०९२ १०८३ ९
सलास समानीन अल्फ

[ ९ ] अवरगजेब पातशहा यांणीं विजापूरची पातशाई घेतली
रक्ताक्षीनाम ५८ १६०६ १०९४ १०८५ १०.
खमस समानीन अल्फ

[ १० ] भागानगरची पातशाही अवरंगजेब याणीं घेतली क्षयनाम

संवत्सर ६० १६०८ १०९६ १०८७ १२

सबा समानीन अल्फ

[ ११ ] संभाजीराजे फाल्गुन वद्य तुळापुरीं अवरंगजेब पातशहा याचे लष्करांत शांत जाहले

विभवनाम २ १६१० १०९८ १०८९ १०

तिसा समानीन अल्फ

[ १२ ] राजाराम राज्यारूढ झाले राजाराम चंदीस होते म्हणोन जाल्पुगारखान यानें जाऊन वेढा घातला शुक्लनाम

संवत्सर ३ १६११ १०९९ १०९० १६

तिसैन अल्फ

[ १३ ] संताजी घोरपडे सेनापती यास रा धाबाईने म्हैसवाडीस मारला

ईश्वरनाम ११ १६१९ ११०७ १०९८ २४

सुरुसन् समान तिसैन अल्फ

[ १४ ] राजाराम फाल्गुन वद्य ९ सिंहगडी शांत झाले

प्रमाथीनाम १३ १६२१ ११०९ ११०० २६

सु॥ मया व अल्फ

[ १५ ] धरणीधर महाराज देव याचा जन्म श्रावणमासीं जहाला

सुभानुनाम १७ १६२५ १११३ ११०४ ३०

सु॥ अर्बा मया व अल्फ

[ १६ ] अवरंगजेब पातशहा माघ वद्य ४ नगरी शांत झाले अमरसिंग स ला ज चे द डा गी चा पुत्र किंवा पुतण्या याचे वेळेस रभाजी निंबाळकर याणें पुणें लुटलें

व्ययनाम २० १६२८ १११६ ११०७ ३३

सु॥ सबा मया व अल्फ

[ १७ ] शाहूराजे राज्यारूढ झाले बहादूरशाहा पातशाई करू लागले बहादूरशा व अजमशा याचे युद्ध झालें अजमशाहा पडिले रामसिंग बब्या यांचें कबध उठले तेंच वर्षी शाहूराजे मोंगलाईतून दक्षिणेस आले खेडावर ताराबाईचे फौजेची लढाई झाली, फत्ते जाहली

सर्वजित्नाम २१ १६२९ १११७ ११०८ ३४

सन समान मया व अल्फ

[ १८ ] बहादूरशा पातशा भागानगरीस जाऊन कामबक्षास मारून पातशाई घेतली

सर्वधारीनाम २२ १६३० १११८ ११०९ ३५

सु॥ तिसा मया व अल्फ

[ १९ ] त्रिंबकजी ढमढेरे याणीं पुणें लुटून आपलें ठाणें फाल्गुनमासीं बसविलें

विकृतीनाम २४ १६३२ ११२० ११११ ३७

सु॥ इहिदे अशर मया व अल्फ

[ २० ] रभाजी निंबाळकर याणीं त्रिंबकजी ढमढेरे याचे ठाणे उठवून बाजी कदम फौजदार ठेविला त्याणें ७ वर्षे अमल केला

खरनाम २५ १६३३ ११२१ १११२ ३८

सु॥ इसन्ने अशर मया व अल्फ

[ २१ ] बाळाजीपंत यास पेशवाई जाहली बहिरोपंत पिंगळे याची काढून दिली

विजयनाम २७ १६३५ ११२३ १११४ ४०

सु॥ आर्बा अशर मया व अल्फ

[ २२ ] बाळाजी विश्वनाथ प्रधान याणीं सय्यदाची फौज आणून हिंगणगाव घेतले, दमाजी थोरात धरिला, आणि सय्यदाबरोबर दिल्लीस गेले भिवरे अलीकडे स्वराज्याचा तह सैदानीं केला बाजी कदम याचे ठाणें पुणियात होते ते उठवून पेशवे याणीं आपला अमल बसविला अबाजी त्रिंबक पुरंदरे यास अमल सांगितला मुलुखास कौल देऊन वसाहत केली

विलंबीनाम ३२ १६४० ११२८ १११९ ४५

सन तिसा अशर मया व अल्फ

[ २३ ] श्री नारायणदेव भाद्रपद शुद्ध ७ शांत झाले

विकारीनाम ३३ १६४१ ११२९ ११२० ४६

सन अशरीन मया व अल्फ

[ २४ ] बाळाजी विश्वनाथ सासवडास चैत्र शुद्ध ८ शांत झाले त्याचा पुत्र बाजीराव यास वैशाखमासी पेशव्याचीं वस्त्रे जाहलीं

शार्वरीनाम ३४ १६४२ ११३० ११२१ ४७

सन इहिदे अशरीन् मया व अल्फ

[ २५ ] बाजीराव प्रधान यासि बाळाजी बाजीराव पुत्र मार्गशीर्षमासीं लोहगडीं जन्मले

प्लवनाम ३५ १६४३ ११३१ ११२२ ५८

सन इसन्ने अशरीन मया व अल्फ

[ २६ ] नारायण गोसावी तुकोबाचे पुत्र श्रावण शुद्ध ७ मृत्यू पावले

शुभकृत् ३७ १६४५ ११३३ ११२४ ५०

सन आर्बा अशरीन मया व अल्फ

[ २७ ] ताराबाईचे पुत्र शिवाजीराजे चैत्र शुद्ध २ शांत झाले

पराभवनाम ४० १६४८ ११३६ ११२७ ५३

सन सबा अशरीन् मया व अल्लफ

[ २८ ] धाकटे संभाजी यांणीं निजाम उल्मुल्ख यासि पुण्यास आणून सल्ला बिघडला बाजीराव याणीं अवरंगाबादेभोंवतीं धामधूम करून पैठणानजीक युद्ध झालें बाजीराव याची फत्ते झाली निजाम उल्मुल्ख याणें सल्ला केला संभाजी राजे दक्षिणेस येऊन आपले स्थळीं कोल्हापुरीं राहिले

प्लवगनाम ४१ १६४९ ११३७, ११२८ ५४

सन समान अशरीन् मया व अल्लफ

[ २९ ] राजश्री सदाशिव चिमणाजी याचा जन्म श्रावण शुद्ध ४ झाला

साधारणनाम ४४ १६५२ ११४० ११३१ ५७

सु॥ इहिदे सल्लासीन मया अल्लफ

[ ३० ] सरकारचे वाड्यापाशीं प्राचीन गांवकुसू होतें ते काढून चिमाजी आप्पा यांनीं पेठ मोहीयाहाबादीची जमीन घेऊन मदार वेसीपासून मावळत वेसीचे सुमारें घेतली.

पिंगलनाम ५१ १६५९ ११४७ ११३८ ६४

सन समान सलासीन मया व अल्लफ

[ ३१ ] श्रीमत दादासाहेब याचा व्रतबध माघ शु २ झाला

सिद्धार्थीनाम ५३ १६६१ ११४९ ११४० ६६

सन आर्बैन मया व अल्लफ

[३२] बाजीराव बल्लाळ प्रधान मुक्काम काकडे प्रांत रावेर रेवत्तीरीं वैशाख शुद्ध १३ स शांत झाले त्याचे पुत्र बाळाजी बाजीराव यासि पेशवाई झाली त्याजवर त्यांचे चुलते चिमाजीअप्पा पौष शुद्ध ११ स वारले

रौद्रनाम ५४ १६६२ ११५१ ११४१ ६७

सन इहिदे आर्बैन मया व अल्लफ

[ ३३ ] श्रीमत विश्वासराव बल्लाळ याचा जन्म श्रावण शुद्ध २ झाला

दुंदुभिनाम ५६ १६६४ ११५२ ११४३ ६९

सन सल्लास आर्बैन मया व अल्लफ

[ ३४ ] श्रीमत दादासाहेब याचें लग्न वैशाख शुद्ध ३ झालें श्रीमत माधवराव याचा जन्म वद्य ५ स झाला

रक्ताक्षीनाम ५८ १६६६ ११५४ ११४५ ७१

सन खमस आर्बैन मया व अल्लफ

[ ३५ श्रीमत राव परशराम प्रतिनिधि शांत झाले स्त्रीनीं सहगमन केलें मार्गशीर्ष शुद्ध ८ मुक्काम सातारा

क्षयनाम ६० १६६८ ११५६ ११४७ ७३

सन सबा आर्बैन मया व अल्लफ

[ ३६ ] निजाम उल्मुल्ख ब्-हाणपुरीं शात झाले

विभवनाम २ १६७० ११५८ ११४९ ७५

सन तिसा अर्बैन मया व अल्फ

[ ३७ ] शाहूराजे मार्गशीर्ष वद्य ३ शात झाले पुढें शुद्ध ८ स धाकटे शिवाजी याचे पुत्र ताराबाईचे नातू राजाराम राज्यारूढ झाले

शुक्लनाम ३ १६७१ ११५९ ११५० ७६

सन खमसेन मया व अल्फ

[ ३८ ] निजाम उल्मुल्ख याचे पुत्र नाजरजग फुलबारीस वारले ते सालीं श्रीमत भागानगरास स्वारीस गेले मागे दमाजी गायकवाड सातारियास जावयाकरिता आले सबब पुणें पळालें

प्रमोदनाम ४ १६७२ ११६० ११५१ ७७

सु॥ इहिदे खमसेन मया व अल्फ

[ ३९ ] सलाबतजग व निजामअल्ली व रामरावपत चढाई करून वद्धकर गाव पावेतों आले तीन महिने लढाई झाली मागती सल्लख झाला ते समयीं पुणें वोस झालें श्री त्रिबक किल्ला घेतला

धातानाम १० १६७८ ११६६ ११५७ ८३

सु॥ सबा खमसेन मया व अल्फ

[ ४० ] आश्विन अधिक वद्य ४ टोळधाड आली व भूमिकप श्रीगगातीरीं व श्रीकृष्णतिरी धोमीं झाला

ईश्वरनाम ११ १६७९ ११६७ ११५८ ८४

सु॥ समान खमसेन मया व अल्फ

[ ४१ ] सन ११६९ मध्यें नजीबखान रोहिले याणी दिल्लीस अबदुल अलीखान यास आणून त्याचें व दत्ताजी शिंदे याचे युद्ध झालें दत्ताजी शिंदे ठार पडिले व देशीं श्रीमत विश्वासराव व भाऊसाहेब यांणीं सलाबतजग व निजामअल्ली वल्लद निजाम उल्मुल्ख याजवर चढाई करून शिकस्त केलें पांसष्ट लक्षाची जहागीर व दवलताबाद किल्ला घेतला त्याजवर दत्ताजी शिंदे पडले याची खबर आली म्हणून पडदुरा नजीक राजश्री नानासाहेब याची भेट घेऊन उभयता दिल्लीस चढाई करून गेले भाऊसाहेब यांणीं ६५ लक्षाची जहागीर घेतली ते समयीं दवलताबाद व असेरी व ब्-हाणपूर विजापूर चान्ही स्थानें घेतलीं

बहुधान्यनाम १२ १६८० ११६८ ११५९ ८५

सुा तिसां खमसेन मया व अल्फ

[ ४२ ] चैत्र शुद्ध ६ तारा रात्रौ दुसरे घटकेस पडून नगाऱ्यासारखा नाद उठला. कार्तिक शुद्ध ९ स श्रीमत भाऊसाहेब यांणीं मुशाफरजग गारपिराशीं मारिला व देकारास

ब्राह्मण गेले होते ते ओढ्यास पूर येऊन दोन चारशें वाहून गेले, ते मेले
प्रमाथीनाम १३ १६८१ ११६९ ११६० ८६
सन सितैन मया व अलफ

[ ४३ ] वैशाख शुद्ध ११ स अरुणोदयीं ईशान्येस तारा पडला केतूचा उदय झाला व अधिक श्रावण वर्षांत १३ दिवसाचा पद्योडा पडला व संभाजी राजे करवीरनिवासी मार्गशीर्ष शुद्ध ११ स शात झाले १२ स दहन झाले व फत्तेसिंग भोंसले शाहूराजे याचे पाळक ल्येक कार्तिक शुद्ध १२ स शात झाले व भाद्रपदमासीं वद्य पक्षीं कपिलाषष्ठी पडली व फाल्गुन वद्य ७ मौजे दउडज ताल्लुके नीरथडी येथे वोढ्यात करगळी एवढा रक्ताचा झरा चार घटका वाहिला, म्हणोन गावकरी याणीं रा॥ नारो आपाजी जिल्हेदार यास अर्जदास्त पाठविली व चैत्र शुद्ध १ स श्रीमत भाऊसाहेब व विश्वासराव साहेब अबदुलअली दिल्लीस आला म्हणोन गेले त्याचे व याचें पौष शुद्ध ८ स युद्ध झालें श्रीमत विश्वासराव पडले फौजेनें शिकस्त खाल्ली फार नाश झाला भाऊसाहेब याचा ठिकाण नाहीं मुक्काम पानिपत नजीक दिल्ली
विक्रमनाम १४ १६८२ ११७० ११६१ ८७
सन इहिदे सितैन मया व अलफ

[ ४४ ] बाळाजी बाजीराव प्रधान पर्वतीस जेष्ठ वद्य ६ मगळवारीं आवशीचे प्रहर रात्रीस कैलासवासी झाले त्याचे पुत्र माधवराव साहेब यास दादासाहेब याणीं समागमें घेऊन जाऊन मातोश्री ताराऊ आईसाहेब याजकडोन आषाढ वद्य ३ स वस्त्रें व शिक्के देवविले त्याजवर कार्तिकमासीं निजामअली वल्द निजाम उल्मुल्ख याणीं सल्ला मोडिला ह्याज मुळे श्रीमत रावसाहेब व दादासाहेब चढाई करून गेले ते समयींचे प्रसगात ताराऊसाहेब वारली महिना तीथ लागणे आहे मार्गशीर्ष चतुर्दशीस निजाम अली उरळी पावेतों प्रात जाळीत आला त्या मुक्कामीं मोंगलाकडलि रामचद्र माधवराव व चद्रसेनाचा पुत्र व मोंगल अलीचा धाकटा भाऊ पेशवे याजकडे फुटोन आले सबब मोंगलाचा वर सुटला आणि सल्ल-झाला तदनतर कर्नाटकात पत प्रधान याची स्वारी गेली दादासाहेब रुसून पुण्यास आले निळकठराव महादेव व सखाराम भगवत कारभार सोडून घरीं बसले त्रिंबकराव विश्व-नाथ मामा कारभारी झाले
वृषनाम १५ १६८३ ११७१ ११६२ ८८
सन इसने सितैन मया व अलफ

[४५] दादासाहेब माधवरावसाहेब याजवर रुसून एका घोड्यानिशीं गेले त्याणीं वीस हजार फौज दोन महिन्यात जमा करून माधवराव साहेब याजवर चढाई करून आले त्याचे व याचें युद्ध कार्तिक वद्य ११ स न्हावरें ताल्लुके कर्डे भीमे पलीकडे झालें रावसाहेबाचा मोड झाला त्रिंबकराव मामा व बाबूराव राम फडणीस व गोपाळराव पळून गेले चुलत्या पुत-ण्यांच्या भेटी कार्तिक वद्य १२ स झाल्या उभयता एक झाले कारभार सखाराम भगवत

निळकंठराव महादेव करू लागले प्रधान पंताच्या व मोंगलाच्या भेटी मुक्काम पारगांव भिमातीरा झाल्या भाऊसाहेब यांणीं पासष्ट लक्षाची जहागीर घेतली होती ती माघारी दिली मोंगल भागानगराकडे गेला पंतप्रधान मिरजेस जाऊन मोरचे लाऊन पंतांचा व मोंगलाचा सल्ला झाला तदनंतर फौजेसुद्धा मार्गशीर्ष वद्य १३ स साताऱ्यास जाऊन महाराज रामराजे यास बाहेर काढून अधिकार दिले

रामचंद्रराव जाधव यास सेनापती १
नारो शंकर यास प्रतिनिधी १
विठ्ठल शिवदेव यास राजाज्ञा १
कानोजी मोहिते यास सरलष्कर १

चार पदे जुन्याचीं काढून दिलीं वरकड ज्याचीं त्यास दिलीं आणि मिरजेस गेले नंतर प्रतिनिधी नारो शंकर यासि दिली म्हणोन गोमाजी यमाजी प्रतिनिधीचे कारभारी जानोजी भोंसले याजकडे जाऊन भोंसले यास मोंगलाकडेस घेऊन गेले आणि सल्ला बिघडला मोंगल भागानगरचा रोंख सोडून मिरजेवर प्रधान पंताकडे स्वारी केली प्रधान-पंत मिरज हस्तगत करून दरकूच अवरंगाबादेस शहरास जाऊन हल्ला करून शहरापासून दोन लक्ष रुपये घेतले आणि वराडात गेले म्हणोन हेही त्याचे मागें लागून वराडांत गेले म्हणोन पंत भागानगर प्रांतीं गेले मोंगल व भोंसले वराडातून पुणियास येऊन ज्येष्ट शुद्ध ११ शके १६८५ पुणे जाळलें आणि मोंगल माघारा धारुरास गेला

सुभानुनाम १७ १६८५ ११७३ ११६४ ९०
सन अर्बा सितेन मया व अल्फ

[ ४६ ] श्रावण शुद्ध १ मोंगलाचा दिवाण विठ्ठल सुंदर वगैरे सरदार यासि पंत प्रधान यांणीं राक्षसभुवनावर मारलें, दहा हजार फौज लुटली निजामअल्ली पळून शहरास गेला पंतानीं मोंगल शहरात कोंडून नऊ लक्षाची जहागीर घेतली अवरंगाबादेहून आश्विन अखेर श्रीमंत रावसाहेब पुणियास आले गाव जळाला होता त्याची आबादी करून पौषमासीं कर्नाटक प्रांतीं गेले तिकडे हैदर नाईक याची लढाई पहिली, पौष शुद्ध २ होऊन परस्परें लढाई लागली याजमुळें छावणी करून भाद्रपदमासी येऊन धारवाड घेतले दादासाहेब नाशिकास आनंदवल्ली जवळ आले

तारणनाम १८ १६८६ ११७४ ११६५ ९१
सु॥ खमस सितेन मया व अल्फ

[ ४७ ] धारवाड घेऊन फिरून हैदराची गाठ घातली हैदर झाडींत बिदनुराकडे पळून गेला दादासाहेब देशीं येऊन अनंतपुरास सल्ला झाला

पार्थिवनाम १९ १६८७ ११७५ ११६६ ९२.
सु॥ सित सितेन मया व अल्फ

[ ४८ ] रावसाहेब दादासाहेब वराडात जाऊन भोंसले यास शह देऊन दादासाहेब फौज घेऊन हिंदुस्थानात स्वारीस गेले

व्ययनाम २० १६८८ ११७६ ११६७ ९३

सु॥ सब्बा सितेन मया व अल्लफ

[ ४९ ] श्रीमताची स्वारी कर्नाटकात जाऊन सीरे मदगिरी हूसकोट हैदराकडील घेऊन आणखी खडणी घेऊन आले

सर्वजित्नाम २१ १६८९ ११७७ ११६८ ९४

सन सम्मान सितेन मया व अल्लफ

[ ५० ] आषाढमासीं हिंदुस्थानातून दादासाहेब आले श्रीमत रावसाहेब जाऊन भेट घेतली पुढें कलह वाढला दादासाहेब आनदवल्लीहून गगातीरानें घोडपेस आले

सर्वधारीनाम २२ १६९० ११७८ ११६९ ९५

सु॥ तिस्सा सितैन मया व अल्लफ

[ ५१ ] ज्येष्ठमासीं श्रीमत रावसाहेब धोडप किल्यानजीक जाऊन लढाई झाली. चिंतो विठ्ठल जोशी सापडले फौज लुटली गेली व काहीं पळाली दादासाहेब किल्याखालीं येऊन भेटले नतर पुणियास स्वारी आषाढमासीं आल्यावर गगाधर यशवत होळकराकडील याचें पारिपत्य केले पुढें मार्गशीर्षमासीं श्रीमत स्वारीस निघाले, ते तुळजापुराहून निजामअल्लीखान याचा दिवाण रुकमत दौला फौजे सुद्धां घेऊन वऱ्हाडात जानोजी भोंसला याजवर चढाई करून गेले ते गाठ न घालता दूर दूर होते वऱ्हाड नागपूर सुद्धा झाबडले जानोजी भोंसले फौजे सुद्धां गगातिरास निर्मळचे रोंखे आले श्रीमत फौजसुद्धा पाठीवर गेले गाठ पडू दिली नाहीं चैत्रमासीं भेटून सल्ला झाला रामचद्र गणेश व विसाजी कृष्ण फौज पचवीस हजारानिशीं रवाना केले

विरोधीनाम २३ १६९१ ११७९ ११७० ९६

सुरूसन सबैन मय्या व अल्लफ

[ ५२ ] श्रावणमासीं धूमकेतु एक महिनाभर निघत होता व पर्जन्याची अतिवृष्टि झाली त्याजमुळें पिकें गेलीं भाद्रपद मासापासून पर्जन्य अगदीं गेला महर्गता झाली मार्गशीर्षमासीं धूमकेतु आठ दिवस निघत होता व सात दिवस पर्जन्य लागला शाळू वगैरे पेरले पिकें झालीं स्वस्ताई झाली हैदर नायक याचा बिघाड झाला " श्रीमत रावसाहेब याची स्वारी कर्नाटकात वैशाख मासपर्यंत होती शरीरीं समाधान नाहीं म्हणून खासा स्वारी पुणियास आली त्रिबकराव पेठे फौजे सुद्धा तुगभद्रेपार छावणीस ठेविले विसाजी कृष्ण व रामचद्र गणेश व तुकोजी होळकर व महादजी शिंदे पन्नास हजार फौज सुद्धा आषाढमासीं खेचीवाडा प्रातीं जाऊन छावणी केली जयनगरकर याजपासून दहा लक्ष रुपये खडणी घेतली. आणि जयनगरकर याची फौज बरोबर घेऊन सुरजमल्ल जाट याचा प्रात कुंमेर भरतपूर डाडीगड येथें जाऊन जाटाशीं लढाइ झाला जाट पळून भरतपुरास गेला

फौज तीस हजार लुटली दहा हत्ती व दोन हजार घोडे व तोफखाना वगैरे सरकारात आला आणि जाटापासून पासष्ट लक्ष रुपये खडणी करार केली नजीबखान रोहिले याचें राजकारण होळकर यांणीं करून रोहिले यांच्या भेटी झाल्या जाटाकडील पासष्ट लक्षा पैकीं दहा लक्ष रुपये वसूल आले बाकी ऐवज वसूल न देतां नजीबखान याचे सूत्रे रामचद्र गणेश व विसाजी कृष्ण बिनीवाले फौज सुद्धा छावणीस राहिले नजीबखान अपमरणानें मेला त्याचा लेंक जाबतेखान फौज सुद्धा अतरवेदींत राहिला

विक्रमनाम २४ १६९२ ११८० ११७१ ९७

सु॥ इहिदे सबैन मय्या व अलफ

[ ५३ ] कार्तिकमासीं माधवराव साहेब कर्नाटक प्रातीं जाण्याकरिता सिद्ध होऊन कृष्णातीरपर्यंत गेले परतु शरीरीं बहुत समाधान नाहीं म्हणोन फौजा पुढे त्रिबकरावमामा पेठे याचे कुमकेस कृष्णराव अप्पा मेहेंदळे वगैरे सरदार रवाना करून फाल्गुनमासीं स्वारी पुण्यास आली त्रिबकराव मामाची व हैदर नाईक याची लढाई श्रीरगपट्टणानजीक झाली हैदर जातीनें पुत्रासुद्धा पळून पट्टणास गेला फौज व पचवीस हजार प्यादा मारला गेला मोठें युद्ध झाले मामा फौजे सुद्धा छावणीस राहिले सल्ला झाला नाहीं विसाजी कृष्ण व रामचद्र गणेश याचा व नजीबखान याचा लेक जाबतेखान यास होळकर यांणीं शुक्रतालास नेऊन पोंचविला विसाजीपत बिनीवाले व शिंदे होळकरसुद्धा दिल्लीस राहिले त्याचें ठाणें होतें तें उठवून आपले ठाणें बसविलें रामचद्र गणेश व विसाजीपत बिनीवाले या उभयताचा कारभार सबधे कलह लागला सबब श्रीमतानीं रामचद्र गणेश देशीं आणविले विसाजीपत फौजे सुद्धा दिल्लीस छावणी करून राहिले

खरनाम २५ १६९३ ११८१ ११७२ ९८

सु॥ इसने मय्या व अलफ

[ ५४ ] श्रीमत माधवराव साहेब यास कार्तिक वद्य ७ स प्रात काळीं प्रहर दिवसास मौजे थेऊर येथें श्रीचिंतामणीपाशीं देवाज्ञा झाली श्रीमत सौभाग्यवती रमाबाई साहेब यांणीं सहगमन केलें धरणीधर देव चिंचवडकर याचा काल मार्गशीर्ष वद्य ६ स मगळवारीं आवशीचे चार घटिका रात्रीस झाला व श्रीमत नारायणराव साहेब यांसि पेशवाईचीं वस्त्रें महाराज रामराजे छत्रपति यांणीं मार्गशीर्ष वद्य ४ रविवारीं दोन घटिका रात्रीस दिलीं

नदननाम २६ • १६९४ ११८२ ११७३ ९९

सु॥ सलास सबैन मय्या व अलफ

[ ५५ ] श्रीमत नारायणराव राज्य करू लागले नतर दादासाहेब व आनदी बाईसाहेब याचे मनास काहीं विकल्प येऊन बाहेर सखाराम भगवत वगैरे मुत्सद्दी याचे सल्ल्यानें रावसाहेब यांस कैद करून आपण राज्य करावें असें झालें ती मसलत बाईनीं मोडून शस्त्रघात करून फडशा राव यांचा करावा असें केलें आणि सरकार वाड्यात हजेरी लोकाची आहे, असें पुणें शहरात वर्तमान फोडून गारदीनवाई चौकी पहारे यांत जुने लोक

होते ते काढून परदेशी लोक ठेविले त्याजवर भाद्रपद शुद्ध १३ स रावसाहेब यास दादा याणा बोलावून दोन प्रहरीं पाठवून आपले समक्ष आणून सुमारसिंग व खरगसिंग व तुळाजी पवार याजकडून रायावर जखमा करून मारिले वरता चापाजी टिळेकर खिजमतगार तोही खाशाच्या आगावर तेथें मारला गेला इच्छारामपत ढेरे गर्दीत तेसमयीं मारले गेले गोहत्या व ब्रह्महत्या व स्त्रीहत्या वगैरे फार झाल्या हें वर्तमान तिसरे प्रहरीं शहरात सखाराम भगवंत व बाळाजी जनार्दन फडणीस व हरी बल्लाळ फडके वगैरे मुत्सद्दी व सरदार मानकरी यास कळल्यावर राव याचें दहन केलें दादासाहेब याशीं बिघड करून श्रीमत मातुश्री गगाबाई साहेब रावयाची स्त्री यास एक महिना गरोदर होती, तिजला किल्ले पुरदर येथें नेऊन त्याचें नावें मामलेदार व महालनिहाय वगैरे लोकास सनदा पाठवून चार महिने कारभारी याणीं राज्य केलें इकडे श्रीमत दादासाहेब दसेऱ्याचे मुहूर्ताने वाड्यातून स्वारी सीमोल्लघनास बाहेर निघाली, ती शहरात न येता परभारे गारपिरावर डेरे मुक्कामीं दाखल झाली मागून श्रीमत सौभाग्यवती आनदीबाई ही गेली नतर मागें शहरचा व वाड्याचा कारभारी याणी बदोबस्त पक्का करून दादासाहेब यास नबाब भागानगरकर याजवर खासा स्वारी फौज सुद्धा जाणें असें मुत्सद्दी याणीं ठरवून समागमें नाना फडनवीस आदि सरदारमडळी शरीरास समाधान नाहीं, हा मजकूर खाशास समजाऊन पुण्यास निरोप घेऊन माघारे आले दादासाहेब याणीं तिकडचा रोख सोडून प्रात सुरत गुजराथ या रोखानें स्वारी कूचदरकूच चालली ती सुरतेस गेली मागे सरकारी फौजा हरीपततात्या फडके बरोबर होते, तेही फौजेनिशीं माघारे आले

विजयनाम २७ १६९५ ११८३ ११७४ १००

सु॥ आर्बा सबैन मय्या व अलफ

[ ५६ ] श्रीमत माधवराव नारायण साहेब याचा जन्म अधिक वैशाख शु॥ ७ इदुवारीं १६ घटका दिवसास पुरदरीं झाला नाना फडणवीस व हरीपततात्या वगैरे मुत्सद्दी किल्ले पुरदरीं होते पुणें शहरचें काम नारो अप्पाजी तुळशीबागकरी याजकडे होतें त्याजला किल्याहून बातमी येताच सरकारी तोफाखान्यातील तोफा सोडावयास प्रारभ केला व महालनिहाय राज्यातील मामलेदार व किल्लेदार यास सनदा पाठवून किल्लेनिहाय तोफा सोडाव्या अशी परवानगी आली नारो अप्पाजी फाल्गुन शु० ५ शात झाले नतर श्रीमत बाजीरावसाहेब याचा जन्म किल्ले धार येथे माळव्यात, मार्गशीर्षमासीं झाला, तेव्हा श्रीमत दादासाहेब सुरतेस होते

जयनाम २८ १६९६ ११८४ ११७५ १०१

सु॥ खमस सबैन मय्या व अल्फ

[ ५६ अ ] कोळ्याचा दगा कल्याण प्रातीं झाला साष्टी इग्रजानें सरकारात होती ती घेतली शके १६९७ फ स ११७६

[ ५६ ब ] तोतया भाऊसाहेब म्हणून कोंकणात रत्नागिरीस झाला तेथून

कोंकणप्रांतीची खडणी घेत घेत राजमाची पावेतो आला तेथे पुण्याहून फौजा रवाना होऊन चौकशी करिता खोटा होऊन मारिला शके १६९८

मोरो बाबूराव फडणीस सरकारचे इतराजींत आले दस्त श्रावणमासी झाले

[ ५७ ] राजाराम राजे छत्रपति मार्गशीर्ष शुद्ध १० स भोमवारी कैलासवासी झाले व धरणीवर देव याचे पुत्र नारायण देव गगास्नानास सिंहस्तास जात होते वाटेने घोड-नदीवर काठीं स्नानास उतरले तो श्री गणपतीची मुहूर्त चोरानें नेली दुसरे तिसरे दिवशीं देवाचे नेत्र व बेंबी काढून घेऊन देव नदीत टाकिला माघ वद्य ३

हेमलंबी नाम ३१ १७९९ ११८७ ११७८ १०४

सु॥ समान सबेन मय्या व अल्फ

[ ५८ ] पत प्रधान याजकडील कारभारी माधवराव निलकठ पुरंदरे व अमृतराव विश्वनाथ पेठे याणीं राजाराम ह्याचा पुत्र आणून किल्ले सातारा येथें तक्तावर बसून राजा शाहू नाव ठेवून राजमुद्रा नवी जाहली राजे याणी पतासही नवी मुद्रा करून दिली

विलंबीनाम ३२ १७०० ११८८ ११७९ १०५

सु॥ तीसा सबेन मय्या व अल्फ

[ ५९ ] श्रीमत माधवराव साहेब वाकटे याचा व्रतबध मौजे पर्वती येथें माघ मासीं जाहला

प्लवनाम ३५ १७०३ ११९१ ११८२ १०८ सु॥ इसने समानीन मया व अल्फ

[ ६० ] श्रीमंत माधवराव साहेब धाकटे यांचें लग्न समारभ मोठा झाला

शुभकृत्नाम ३६ १७०४ ११९२ ११८३ १०९

सु॥ सल्लास समानीन मया व अल्फ

[ ६१ ] श्रीमत दादासाहेब यास मौजे सीतापखेड कसबे वरणगाव परगणे कुभेरी श्रीगोदातीरीं मार्गशीर्ष वद्य ३ सह ८ स देवाज्ञा जाहली तेसमयीं मातुश्री आनदीबाई चिमाजी अप्पाचे वेळेस गरोदर होती

शुभकृतनाम ३७ १७०५ ११९३ ११८४ ११०

सु॥ अर्बा समानीन मया व अल्फू

[ ६२ ] श्रीगंगेस महा थोर पूर आला दोन्ही थडींचे गाव बहुत गेले तीन महिने श्रावण मासापासून दीड पायलीची धारण पुणे प्रातीं जाहली होती पुढें स्वस्थता झाली. कपिलाषष्ठी पडली

पराभवनाम ४० १७०८ ११९६ ११८७ ११३

सु॥ सबा समानीन मया व अल्फू

[ ६३ ] श्रीगोदातीरीं नासिकाकडे वगैरे प्राता थडी बहुत पडून मोठे वृक्ष सुद्धां झाडें जळालीं

कीलकनाम ४२ १७१० ११९८ ११८९ ११४
सुरू० तीसा समानीन मया व अल्फ़ू

[ ६४ ] परशराम रामचद्र पटवर्धन मिरजकर फोज सुद्धा कर्नाटकात टिपूवर रवाना केले ते धारवाड किल्यास प्रथम जाउन किल्ला सरकारात घेतला मागाहून हरी बल्लाळ फडके मोंगलाची फौज घेऊन पट्टणास गेले पट्टणाकडून इग्रज ही आला

साधारणनाम ४४ १७१२ १२०० ११९१ ११७
सुरू० इहिदे तिसेन मया व अल्फ़ू

[ ६५ ] हरी बल्लाळ व मोंगलाची व इग्रजाची फौज मिळोन बेंगरूल वगैरे ठाणीं घेऊन पट्टणावर जाऊन हल्ला करून टिपू जेर केला तेव्हा टिपूनें तीन कोट रुपये तीघास खडणी देऊन दीड कोटीचा मुलूख देउन सल्ला केला श्रीमताची फत्ते झाली

विरोधकृत्नाम ४५ १७१३ १२०१ ११९२ ११८
सुरू० इसन्ने तिसेन मया व अल्फ़ू

[ ६६ ] हरी बल्लाळ फडके कर्नाटकातून चैत्रमासीं फौजसुद्धा पुणियास आले नंतर काहीं दिवसांनीं शरीरीं समाधान नाहीं सबब श्रीमताची आज्ञा घेऊन मौजे सिद्धटेक येथें श्रीगणपतीपाशीं गेले तेथे शात झाले महिना तीथ लागणे असे व पुढे ज्यैष्ठमासीं हिंदुस्थानातून बारा वर्षांनीं मोठमोठे सस्थानी होते, त्यांस मोडून दिलीस नवा बादशहा बसवून पताचे नावें वजीरी माहीमरातब व नालकी व पोषाक जवाहीर वगैरे घेऊन महादजी शिंदे फौजसुद्धा पुण्यास आले श्रीमताची भेट घेऊन वजीरीचीं वस्त्रे वगैरे नजराणा नालकीसुद्धा आणिला तो सरकारात निवेदन करून रावसाहेब यास नालकींत बसवून खासा स्वारी पुणें शहरातून मोठ्या समारभानें वानवडीस लष्करास गेले तेथे श्रीमतानीं वजीरीचा दिवाणागिरी व दुसरी नालकी शिदे यास दिली त्या वर्षी महागाई मोठी तीन चार शेराची चारी मुलखात धारण झाली ते शके १७१५ चे भाद्रपदपर्यंत होती माणसाचा वगैरे संहार फार जाहला आश्विन मासापासून पर्जन्य पडून स्वस्थता जाहली

परिधावीनाम ४६ १७१४ १२०२ ११९३ ११९
सुरू० सलास तिसेन मया व अल्फ

[ ६७ ] महादजी शिंदे यास नवज्वर होऊन माघ शुद्ध त्रयोदशास अवशीचे पाच घटका रात्रीं मृत्यु पावले. पोटीं पुत्रसतान नाहीं ते समयीं तुकोजी शिंदे याचे तिसरे पुत्र अमृतराव शिंदे याचा पुत्र दौलतराव शिंदे हे महादजी शिंदे याणीं जिवत असतां पुत्र म्हणून जवळ ठेविले होते परतु अंत-काळीं जवळ नव्हते तुळजापुरीं देवीचे दर्शनास गेले होते नतर कारभारी याणीं तेथून आणून शिंदे याची क्रिया त्याचे हातें करवून १३ वे दिवशीं श्रीमत माधवराव साहेब याणीं सरदारीचीं वस्त्रें दिलीं

प्रमाथिनाम ४७ १७१५ १२०३ ११९४ १२०
सुरू० आर्बा तिसैन मया व अलफ

[ ६८ ] श्रीमत माधवराव साहेब मार्गशीर्ष मासा खासा स्वारा समागमे दौलतराव शिंदे व होळकर वगैरे तमाम सरदार फौजेसुद्धा व बाळाजी जनार्दन फडनवीस व चिंतामण हरा फडके वगैरे तमाम मुत्सद्दी घेऊन निजाम अलीखान मोगल ह्याजवर चढाई करून सीनेवर गेले तेथें मोगलाची गाठ खर्ड्यानजीक शिंदे व हुजरात व भोसले यांणीं घालून लढाई मोठी झाली, खासा खर्ड्यात कोंडिला, तेव्हा मोगलाचा तह होऊन मशीर उत्मुल्मुख दिवाण व तीन कोट रुपये खडणी व ३५ लक्षाचा जहागीर व दौलताबाद किल्ला सरकारात घेऊन स्वारी फत्ते करून शके १७१६ चे वैशाख शुद्ध त्रयोदशीस पुण्यास दाखल जाहले, मोगलाचा दिवाण कैद करून ठेविला

आनदनाम ४८ १७१५ १२०४ ११९५ १२१
सुरु० खमस तिसैन मया व अल्फ

[ ६९ ] श्रीमतास काहीं शरीरास स्वारी खर्ड्याहून आल्यापासून स्वस्थ नव्हते पुढे आश्विन मासीं शुद्ध १० स गणपतीचे रगमहालाचे दुसरे मजल्यावरून सात कारज्याचे हौदात उडी टाकिली त्याने कारजें लागून पाय मोडिला व काही आगासही दगड लागले त्यानी प्रकृति विलक्षण होऊन शुद्ध पौर्णिमेस ४ घटका दिवसास वाड्यात रावसाहेब कैलास वासी जाहले नतर शहरचा बदोबस्त करून मग दहन झाले त्याजवर बाळाजी जनार्दन फडणीस यांणीं मातोश्री यशवदाबाईसाहेब ह्याचे माडीवर दत्तक देऊन पूववत्प्रमाणे चालवावें म्हणून आग्रह धरून चार महिने राज्याचा कारभार चालविला ही मसलत दौलतराव शिंदे ह्याचे कारभारी याचे मनास न ये सबब शिंदे फोजसुद्धा श्रीमत बाजीराव व चिमाजी आपासाहेब जुन्नरास होते तेथे त्याजकडे सधान बाधिले तों नाना फडनवीस यांणीं राजश्री परशराम रामचद्र पटवर्धन वगैरे सरदार यास फौजेसुद्धा पाठवून उभयता श्रीमतास माघ वद्य पचमीस खडकीचे पुलापाशीं आणिलें पधरा दिवस मुक्काम तेथेच होता नानाची भेट जाहली नतर दौलतराव शिंदे फौज जमावानिशीं श्रीमताचे भेटीस आले त्याचे भयाने नाना फडनवीस फाल्गुन शुद्ध त्रयोदशीस साताऱ्यास स्वारी गेली नतर श्रीमताची व शिंदे याची भेट फाल्गुन वद्य द्वितीयेस झाली स्वारी वाड्यात येऊन दाखल जाहली एक दिवस वाड्यात राहून शहरात पाण्याचा दुकाळ भारी यामुळे माघारा खडकी मुक्कामीं स्वारी आली तेथून मौजे थेऊर येथे मुक्काम करून राहिले व मौजे वीर नजीक जेजुरी येथे ब्राह्मणाचे घरीं गाई माणसासारखी माघमासीं सारखी तीन दिवस मनुष्या सारखी रडत होती व मौजे बेलसरनजीक जेजोरी कऱ्हातीरीं झऱ्यास करगली येवढा रक्ताचा प्रवाह माघ वद्य पचमीस एक प्रहरभर वाहिला व श्रीकृष्णातीरीं फाल्गुनमासीं क्षेत्र वाई येथें मासेवलण तीन दिवस जाहलें सहार फार जाहला

राक्षसनाम ४९ १७१७ १२०५ ११९६ १२२

सुरु॰ सीतातिसैन मया व अल्फ्

[ ७० ] नाना फडनवीस याची ममजूत करून श्रीमत बाजी साहेब याणीं पुण्यास आणिले काही दिवस नानानीं कारभार केला नतर श्रीमतानीं शिंदे याजकडून नानास धरविले तेव्हा नानानीं सखाराम घाडगे याजकडे कारस्थानी लावून मोकळे जहाले नतर श्रीमत अमृतराव यासी व बाजीराव साहेब यासी बिघाड होऊन होळकर पुण्यावर चालून आले मोठी लढाई झाली बाजीराव साहेब पळून वसईस गेले नतर इग्रज बहादर याशीं सल्ला करून त्याजला मदत आणिले जाहीरनामा सरकार दौलत मदार कंपिणी इग्रज बहाहर सु॰ समान अशर मयातैन व अल्फ तमाम लोकानी जाहीरनामा समजोन त्याप्रमाणे वर्तणूक करावी याजकरिता लिहिले जातें जे —

" बाजीराव साहेब राज्यावर आल्यापसून नानाप्रकारचे बेखेड व बडे होत होतों राज्यात मुलखावर हुकमत कधीं चालली नाहीं पुढे होळकर याचा दगा झाला तेव्हा राज्य सोडून पळून वसईस जाऊन खडेराव रास्ते या या मदतीनें गुजराण करून राहिले नतर कंपिणी सरकारची दोस्ती केली त्याजवरून कपिणी सरकारची फौज येऊन बाजाराव साहेब यासि गादीवर बसवून तमाम बडें व बखेडे होते ते मोडून मुलखात बाजीराव साहेब याचा हुकूम चालू करून दिला पाहिल्याने दग्यामुळें व पुढे पुष्कळ दुष्काळ पडला त्यानें मुलूख बहुतेक उध्वस्त झाला होता तो कपिणी सरकारच्या भरवशावर आबाद झाला बाजीराव साहेब याणीं मामलती करून मक्त्यानें लावल्या ते मक्तेदार रयतेपासून जाजती ऐवज घेत गेले तत्रापि बहुत आबादी झाली तेव्हा मुलखाचा ऐवज जमा जाहला त्याजवर बाजीराव साहेब याणीं दौलतीचा खर्च व ऐषआराम करून खजिना बहुत जमा केला व मराठे सरदार याजवर बाजीराव साहेब याचा दाब बहुत दिवसापासून नव्हता तो लागू करावा असें कपिणी सरकाराहून कबूल केलें नव्हतें जें वाजवी असेल ते चालते करून द्यावें अशी कपिणी सरकारची खायश होती त्यावरून गायकवाड याजकडील जाबसाल ठरावयाकरिता गायकवाड याणीं आपले कारभारी गगाधरशास्त्री यास कपिणी सरकारच्या बहादरीवर पुण्यास पाठविलें ते येऊन बहुतेक जाबसाल लवकरच उलगडावे ऐसे जाहलें होतें त्यात बाजीराव साहेब याची किफायत बहुत होती इतक्यात गगाधरशास्त्री यास बाजीराव साहेब याचे कारभारी याणी पढरपूर क्षेत्री मारिलें त्या वेळेस तमाम रयत व यात्रेकरी वगैरे सर्व म्हणत होते कीं, शास्त्री यास त्रिंबकजीने बाजाराव साहेब याचे हुकुमाशिवाय मारिलें नाही असे असता बाजीराव साहेब दोस्त, मोठे दौलतदार, असे करतील हा गुमान मनात न आणिता ज्या त्रिंबकजीनें मारिलें त्यास हवाली करून द्यावा असा कपिणी सरकारचा विचार होऊन, त्रिंबकजीस हवाला करावा असे बोलणें पडलें तेव्हाच हवाला करावा तो न केला याजकरिता कंपिणी सरकारची फौज बहुत जमा झाली नतर त्रिंबकजीस हवाला केला त्यासमयीं कपिणी सरकारात खर्च बहुत जाहला तो दोस्तिवर नजर देऊन न मागता त्रिंबकजीस हवाला करून घेतला आणि दोस्ती पहिली चालत होती त्याप्रमाणें कायम ठेविली नतर बाजीराव साहेब याणीं बाहेरचे सरदार यास पत्रें पाठवून त्याची फौज तयार करावी अशी तजवीज केली व आपले राज्यात

बडे उभा करून बडाचे कुमकेकरिता आपली फौज तयार करून कपिणा सरकारचा लढाई पडावी आणि नुकसान व्हावें अशी तजवीज करू लागले त्याजवरून बखेडा मोडावा याजकरिता कपिणी सरकारची फौज तयार होऊन पुण्यास आले आणि बाजीराव साहेब यांस शहराभोंवता तबी केली त्या वेळेस बाजीराव साहेब हातीं मापडलें होते, तेव्हा मुलखाचा बदोबस्त करावयाजोगी कपिणी सरकार फौज बहुत तयार होती, परतु तहनामा झाल्यापासून हरवख्त बाजीराव साहेब याचे बोलणें पडत होतें, जे आम्हास राज्य प्राप्त जहाले व आम्ही ऐषआराम करितों हे सर्व कपिणी सरकारचे देणें आहे आमचा शुकार गुजारा कपिणा सरकारचे भरवशावर होत आहे, असें बहुत तऱ्हेनें बोलत होते याजकरिता गादी कायम ठेवून त्याचे हातीं फिशाद न व्हावा याजकरितां वसईचा तहनामा कायम ठेवून नवा तहनामा जहाला पाच हजार स्वार व तीन हजार पायदळ मदतीस देत जावे असा बाजीराव साहेब याचा पहिलाच करार होता, ती फौज कपिणी सरकारातून ठेवावी, असे होऊन फौजेचे खर्चास मुलूख लावून दिला तेव्हा पासून दोस्ती पहिल्याप्रमाणें चालेल नतर पेंढारी चहूकडून रयतेस दरसाल उपद्रव करितात बाजीराव साहेब याचे मुलाखात बहुत उपद्रव होता याजकरिता पेंढारी याचा बदोबस्त व्हावा अशी कपिणी सरकारातून तजवीज जाहली तेव्हा बाजीराव साहेब याचे बोलणे पडले जे, पढारी याचा बदोबस्त झाल्यानें आमची बहुत किफायत आहे आम्ही ही फौज सामील देतों असे खात्रीने बोलून बहाण्यानें कपिणी सरकारच्या आश्रयावर जो खजिना जमा केला होता तो ऐवज बाहेरचे सरदारास पाठवून त्यास बिघडविले व आपला फौज तयार केली कपिणी सरकारची फौज जवळ होती ते दूर जावा याजकरिता दोन हजार स्वार व कपिणी सरकारची फौज बराबर देऊन फौज दूर केली अशी सधि पाहून एकाएका कांहीं कारण व जाबसालाची तक्रार नसता फौज तयार करून कपणी सरकारचे फौजेशीं लढाई केली व कोणत्याही मुलुखात चाल नाहीं तशी चाल करून इग्रजी वकिलाचे बगले व छावणीची जागा जाळून लुटून टाकिली कपिणी सरकारचे मुलखाची रयत व वाटसरू सल्याचा भरवसा धरून येत होते त्यास धरून कैद करून व कित्येक लुटले व दोन इग्रजी सरदार मुबईकडून येत होते त्यास तळेगावाजवळ चोराचेही पारिपत्य करीत नाहीं त्या तऱ्हेने मारिलें ते मारणार अद्याप चाकरीवर आहेत त्याजवरुन बाजीराव साहेबाचे हुक्माशिवाय मारिलें नाहीं, असा निश्चय होतो व ज्या त्रिंबकजीनें गगाधरशास्त्री मारिले त्यास जवळ आणून कारभारात वागवू लागले त्यावरुन बाजीरावाचे हुक्माशिवाय त्रिंबकजीनें शास्त्री यास मारिले नाहींत असे पहिल्यापासून लोक बोल्तात तो मुद्दा शाबूद करून घेतला व पेंढारी बोलावून मुलूख लुटवावा अशी तजवीज करू लागले या तऱ्हेचे दौलतदारीचे साप्रदाय सोडून वर्तणूक करू लागले आणि कपिणी सरकारास बुडवावें असे केले त्यावरून कपिणी सरकारचा निश्चय जहाला जे बाजीराव साहेब राज्याच्या उपयोगी नाहींत याजकरिता बिलकूल राज्यातून काढून कपिणी सरकारातून मुलुख व किल्ले काबिज करून अमल करावा अशी तजवीज होऊन एक सडी फौज बाजीराव साहेब याचे मागे रवाना करून एक-

फौज किल्ले घेण्याकरिता जात आहे व दुसरी फौज अहमदनगराजवळ येऊन पोहोंचला व एक मोठी फौज खानदेशात आली आहे व जनरल मनरोसाहेब कर्नाटकाचा बदोबस्त करीत आहेत, व मुबईकडून फौज येऊन कोकणचे किल्ले घेऊन त्या प्राताचा बदोबस्त होत आहे आता थोडे दिवसात बाजीराव साहेब यांचें ठिकाण नाहीं असे होऊन महाराज छत्रपति सातारकर बाजीराव साहेब याचे कैदेंत आहेत त्यास सोडवून मोकळे करून त्याचे मडळींत शानशोकीकरिता त्याजकडे काहीं राज्य चालेल, अशी तजवीज करून कपिणी सरकारचे हातून सातारे किल्यावर महाराजाचे झेंडे कायम करून त्याचे तर्फेचे लोक होते त्याची खातरजमा केली असे त्यास जो मुलुक महाराज याजकडे होईल त्याचा न्यायइनसाफ व हुकमत व अमलात करितील कपिणी सरकारात मुलुख राहील तेथें सरकार कपिणीचा अमल होईल परतु कोणाचे वतनास व इनामास व वषसनास व देवस्थानास व खर्चास व खैरातीस व कोणाचे ज्ञातीस व धर्मास खलेल न होता वाजवी असेल तसें चालेल बाजीराव साहेब मक्तेदारास मामलती देत होते ते महकूब होऊन कमावीसदार याजकडे सागून वाजवी ऐवज असेल त्याची उगवणी होईल कोणावर जास्ती जुलूम काहीं एक होणार नाहीं येविशी कोणी अदेशा घेऊ नये बाजीराव साहेब याजकडे चाकरीस कोणी असतील त्याणीं चाकरी सोडून आजपासून दोन महिन्या आत घरी यावे जे कोणी न येतील त्यांचें वतन जप्ती होऊन खराबी झाल्याशिवाय रहाणार नाहीं जमेदार याणी आपले परगण्यातून जे बाजीरावसाहेब याजकडे चाकरीस असतील त्याची याद तूर्त समजवावी चाकरी सोडून जसे जसे घरी येतील त्यावेळेस यादी समजावीत जाव्या बाजीराव साहेब याची कुमक करू नये त्याजकडे वसूल एकदर देऊ नये न दिल्यास सालमजकुरीं मुलुकास उपद्रव लागला असेल त्याची फिर्यादीची दर्याप्ती होऊन सूट मिळेल बाजीरावसाहेब याजकडे वसूल दिल्यास तो ऐवज मजुरा न देता दरोबस्त घेतला जाईल व जमेदार कुमक करितील व ऐवज देतील त्याचे वतन व जमिनी त्याजकडे चालणार नाहींत तारीख ११ माहे फेब्रुवारी सन १८१८ इसवी मुा छ ५ रबिलाखर *

---

ले ४९० [४९२] — ता २०-११-१८३० मार्गशीर्ष शु ५ शके १७५२

श्री

†श्रीमत सवाई माधवराव याचा व्रतबध चैत्रमासीं जाहला इग्रजाचे भयानें

---

* हे'' मेस्तक' विष्णु धोंडदेव वरिमाडकर याणीं कोल्हापुराहून पाठविलें हे खर्ची कागदाच्या चिकट बदावर लिहिलें आहे अक्षर वाटोळे वळणदार सुवाच्य आहे शेवटचा जाहीरनामा राजवाड्यानीं इ ऐ च्या बखरींत व भाव्यानीं रुमाल २ यात छापला आहे

† येथपासून पुढील मजकूर अताजी रामचद्र हरडीकर याणीं एक प्रकरण पाठविलें त्यावरून जसाचा तसाच उतरून घेतला आहे ह्या प्रकरणाच्या पूर्वभागांतील माहिती "ले ४९२ च्या ' मेतकांत ' आली आहे सबब तो मात्र घेतला नाहीं

पुण्यात पळण झाली सखाराम बापू वोकील सरकारांत इतराजीत येऊन कैद झाले, फाल्गुनमासी शके १७०१

वसई सरकारात होती ती इग्रजानें घेतली १७०३

श्रीमत माधवराव यांचें लग्न माघ शुद्ध ९ स पुण्यात झाले कृष्णाजी बहिरव थत्ते याची कन्या सौभाग्यवती रमाबाई साहेब केली शके १७०५ फ० स० ११८४

श्रीमत रघुनाथराव दादासाहेब मार्गशीर्ष वद्य [ पक्षीं ] गगातीरीं मौजे सितापखेडें प्रा धरणगांव प्रांत कुभारी एथें शात झाले, ते समयीं मातोश्री आनदीबाई गरोदर होती पुढें चिमाजीआपा यांचा जन्म जाला

इग्रजानें वसई घेतली होती ती पुन सरकारात घेतली

मातोश्री पार्वतीबाई साहेब यासि देवाज्ञा झाली श्रावण वद्य ३ शके १७०६

चिमाजीआपा यांचा जन्म चैत्र शुद्ध ९ स झाला शके १७०७

श्रीगोदेस महापूर येऊन गाव वहावले तीन महिने श्रावण मासापासून दीड पायलीची धारण झाली पुढें स्वस्तता जाली कापिलाषष्ठी पडली शके १७०९

श्रीगगातीरीं नाशिकाकडे वगैरे थडी फार पडली त्यानें मोठे वृक्ष सुद्धा जळाले

सरकारचे वाड्यात थोरले चौसोपीस बाधावयाचा प्रारभ केला कार्तिक वद्य १२

सदाशिव दीक्षित दात्ये यास मार्गशीर्ष वद्य २ स देवाज्ञा झाली तात्या पेंडसे यांस माघ वद्य ३ स देवाज्ञा झाली श्रीमत मातोश्री गोपिकाबाईस श्रावण वद्य १ स देवाज्ञा झाली १७११

रामशास्त्रीबावा यांस कार्तिक शुद्ध ३ सह ४ स देवाज्ञा झाली शके १७१२

राजश्री परशुरामभाऊ पटवर्धन मिरजकर करनाटक प्रातीं रवाना केले त्यानीं सरकारांत धारवाड किल्ला सर केला मागाहून राजश्री हरि बल्लाळ फडके व मोंगलाची फौज घेऊन टिपूवर गेले इग्रज ही चिनापटणाकडून आला शके १७१३ फ० स० ११९२.

लक्ष्मणराव रास्ते याना नहर आणिला तो पेठेंत श्रावणमासीं दाखल जाला शके मजकूर

हरि बल्लाळ व इग्रज व मोंगल तिघे मिळून बेंगळूर वगैरे ठाणी घेऊन पटणावर जाऊन हल्ला केला टिपू जेर होऊन तीन कोटी तिघांस खडणी देऊन व दीड कोटीचा मुलूक देउन सल्ला केला सरकारची फत्ते झाली

सरकारवाड्याचे चौसोपीची वास्तुशांत वैशाख वा। ७ स झाली

वैशाख वा। १ स तिसरे प्रहरीं पर्वतीस कार्तिक स्वामीचे देवाल्यावर वीज पडली श्री देवास धक्का लागला नाहीं

नाना फडणीस याचा नहर पुण्यात सदाशिव पेठेंत हौदात मुहूर्तानें सोडला मिति ज्येष्ठ वद्य ५ तेच दिवशीं तिसरे प्रहरीं सरकारची सातखणी व बगला कोठीस अग्न लागून जळालीं

घाशीराम कोतवाल यानें ब्राह्मण मारिले, सबब भाद्रपद शुद्ध प्रतिपदेस रात्रीस धरून

आणिला दुसरे दिवशीं दोनप्रहरीं शहरात धिंड काढून गारपिरावर ब्राह्मणाकडून मारविला, १७१४ फ० स० ११९२

हरि बल्लाळ फडके कर्नाटकातून चैत्रमासी पुण्यास आले तेच सालीं महादजी शिंदे हिंदुस्थानात मोठे मोठे संस्थानी होते त्यांस मोडून दिल्लीस नवा पादशहा बसवून श्रीमंत पंत प्रधान याचे नावे वजिरी व काहीं मरातब व नालकी घेऊन ज्येष्ठमासीं पुण्यास आले श्रीमंताचें दर्शन घेऊन वजिरीचीं वस्त्रे वगैरे सर्व आणिलीं होती तीं निवेदन करून समारंभाने नालकींत श्रीमंतास बसवून स्वारी करून शहरात मिरवत आले नंतर श्रीमंतानीं वजिरी, दिवाणगिरी, व मोरचल व दुसरी पालखी महादजी शिंदे यास दिली वानवडी वर मुकाम करून राहिले तेच वर्षां ज्येष्ठापासून महागाई चार शेराची धारण मुलकात जाली शके १७१५ भाद्रपद पावेतो होती शहरात माणसें फार मेलीं पुढे स्वस्ताई झाली श्री ओंकारेश्वर याचे देवालयात नदीचे पाणी पुराचे आले श्रीमंत रमाबाई यास माघ वा १४ स शके १७१५ फ० स० ११९४ सालीं देवाज्ञा झाला

महादजी शिंदे यास माघ शुद्ध १३ स देवाज्ञा झाली पाटील बावा याचे बंधु तुकोजी याचा पुत्र अमृतराव याचा पुत्र दौलतराव यास मरणाचे पूर्वी पुत्र म्हणविले होतें तेरावे दिवशीं श्रीमंताना सरदारीचीं वस्त्रे दौलतराव यास दिलीं

फाल्गुन वद्य ११ स मातोश्री आनंदीबाईस देवाज्ञा झाली आनंदनाम संवत्सर (४८) शके १७१६ फ० स० ११९५ खमस तिसैन मया व अल्फ

श्रीमंत माधवराव नारायण मार्गशीर्ष मासीं खासा स्वारीं समागमें शिंदे होळकर वगैरे तमाम फौजा घेऊन निजाम अलीखान याजवर चढाई करून शिना नदीवर गेले तेथें मोंगलाची गाठ खर्ड्यानजीक पडोन लढाई झाली मोगल शिकस्त होऊन पळोन खर्ड्यात गेला मश्रुलमुल्क मोगलाचा दिवाण व तीन कोटी रुपये खंडणी व तीस लक्षाची जहागीर दौलताबाद किल्ला सरकारात घेउन शके १७१७ वैशाख शुद्ध १० स कैद करून हरि बल्लाळ फडके यास सिद्धटेकास शुद्ध ७ स देवाज्ञा झाली राक्षसनामसंवत्सर शके १७१८, सन ११९६ त तिसन मय्या व अल्फ

श्रीमंत माधवराव साहेब यानी आश्विन शुद्ध १२ रविवारीं श्रीगणपतीचे रंगमहालावरून उडी टाकिली त्याने पाय मोडला शुद्ध १४ सह १५ स अस्तमानीं देवाज्ञा झाली नाना फडणीस याचे मनात दत्त पुत्र देउन पूर्ववतप्रमाणे चालवावे म्हणून आग्रह धरून चार महिने चालविले शिंदे याचे कारभारी बाळोबा पागनीस याचे विचारास न ये सबब शिंदे फौज सुद्धां गंगातीरास गेले म्हणून नाना फडणीस यानीं राजेश्री परशुराम भाऊ वगैरे यास पाठवून उभयता श्रीमंत माघ वद्य ५ स पुण्या नजीक खडकीचे पुलाजवळ आणिले पंधरा दिवस मुकाम त्याच ठिकाणी होता शिंदे ही फौज सुद्धा भेटीस आले तेव्हां त्याचे भयानें नाना पळून सातार्‍याम गेले श्रीमंत व शिंदे याच्या भेटी झाल्या फाल्गुन वद्य २ स वाड्यात स्वारी येऊन एक दिवस राहून उदकाचे दुकाळामुळें स्वारी माघारी जाऊन खडकीवर राहिली

मुकाम वीर एकलपूर नजीक जेजुरा एथे ब्राह्मणाचे घरीं माघमासीं गाय माणसा-सारखी तीन दिवस रडत होती

मौजे बेलसर नजीक जेजुरी ऐथे कऱ्हेच्या तीरीं कराराळी एवढी रक्ताची धार वाहिला माघमासीं नळनाम ( ५० ) सवत्सर शके १७१८ सन ११९८ सबा तिसैन म-या व अल्फ

दौल्तराव शिंदे रुसले, म्हणून श्रीमत बाबासाहेब समजुतीस गेले तेथें त्यानीं अट-काव करून ठेविले मागें परशुराम भाऊ व बाबा फडके यानीं चिमाजी आपास बला-त्कारे पालखींत घालून वैशाख वद्य १० स दत्तविधान केले त्रिंबकराव अमृतेश्वर थत्ते यास पाठवून शाहूराजे याजपासून वस्त्रे आणून चिमणाजी माधवराव जहाले परशुराम भाऊ कारभार करू लागले यानीं मश्रुल सोडिला नाना फडणीस यानीं

मा काढून परत आले जहागीर मोगलाची सुटली कालयुक्तनाम-सवत्सर शके १७२० सन ११९९ तिस्सा तिसैन मय्या व अल्फ

शिंदे याचे व बायाचे न बने,झाऊन फौज बायाकडे जाला पूढे लढाई जाली नतर बाया मिरज प्रातीं गेल्या तेथून बाईस आल्या तेथें समजूत पडली नतर बाया बऱ्हाणपुरास गेल्या.

गोविंदराव काळे व शिवराम नारायण थत्ते पौष शुद्ध ८ स केद केले

श्रीमत विनायकराव याचा व्रतबध माघ शुद्ध १३ स जाला चैत्र वैशाख मासीं टोळ अति होते झाडास पान राहिले नाहीं, नाना फडणीस शिंदे याचे कैदेंतून सुटून श्रावणमासीं पुण्यास आले, सिद्धार्थीनाम सवत्सर शके १७२१ सन १२०० मयातैन व अल्फ

श्रीरगपट्टण इग्रजानें टिपूस मारून वैशाख वद्य ३ स घेतलें नाना फडणीस यास फाल्गुन वद्य ३ स देवाज्ञा जाली सरकार वाड्यात शागीर्द होता तो जिनगर निघाला, सबब आश्विन ६ स त्याचे पारिपत्य केले, आणि शहरास प्रायश्चित दिले परशुराम भाऊ भाद्रपद वद्य ४ स कोल्हापूरकर याचे लढाईत ठार मेले

यशवतराव होळकर व शिंदे याजकडील पलटणे याची लढाई पुण्या नजीक होऊन शिंदे याचा मोड झाला सबब बाजीराव साहेब महाडास पळून गेले तेथून सुवर्णदुर्गास गेले तेथून वसईस गेले बाजीराव साहेब यानीं इग्रजाशी सला करून इग्रजास बरोबर घेऊन वैशाख वद्य ९ शके १७२९ शकीं पुण्यास दाखल जाले श्रावणमासी मोठी महागाई होऊन तीन मापटीं म्ह० दीडशेर कैली दाणे रुपयास धारण झाली माणसे फार मेला शके १७२६

श्रीत्रिंबकेश्वरची अर्चा बाजीराव यानी माघमासी केली शके १७२८

शेंडेनक्षत्र मार्गशीर्ष मासीं निघत होते शके १७२९

गतभर्तृका स्त्रिया याचें क्षौर नाक्झरीवर पुण्यात श्रावण शुद्ध १२ स केले यशवत-राव होळकर यास कार्तिक शुद्ध १३ स देवाज्ञा जाला

शेंडेनक्षत्र आश्विनमासीं धूमकेतु निघाला धरणीकप फाल्गुनमासा शुद्ध १२ जाला १७३.

फाल्गुन शुद्ध १२ स सरकार वाड्यास अग्न लागून बंगला व कोठी जळाली १७३४+

( मूळ प्रतीचे ) हस्ताक्षर गोविंद रघुनाथ वाडदकर रहाणार कसबे भिवडी प्रगणें साकसे प्रांत कल्याण भिवडी हल्लीं वस्ती कसबे भिवडी तालुके वसई, यांचें असे. सु स इहिदे सलासीन मयातैन व अल्फ ( १७३१ ) माहे मार्गशीर्ष शुद्ध ५ शनिवारीं सकाळीं लिहिली कोणी घेऊ नये इंग्रेजी ता० २० माहे नवंबर सन १८३० संवत १७७४ विकृतिनाम संवत्सरे

समाप्त

---

ले ४९१ ]
[ ४९३ ]

## पेशवे यांची वंशावळ

बाळाजी विश्वनाथ यास वस्त्रें शके १६३५ माघमासीं झालीं नंतर शके १६४२ शार्वरीनाम संवत्सरीं चैत्र शुद्ध ७ स सासवड मुकामीं शांत झाले

बाजीराव बल्लाळ यास शके १६४२ वैशाखमासीं वस्त्रें झालीं नंतर पुढे शके १६६२ रौद्रनाम संवत्सरीं रेवातीरीं मुकाम काकर्डे येथे शांत झाले

बाळाजी बाजीराव यास शके १६६२ त वस्त्रें झालीं नंतर पुढें शके १६८३ ज्येष्ठ वद्य ९ स प्रहर रात्रीं पर्वतीस शांत झाले

माधवराव बल्लाळ यांस शके १६८३ वृषनाम संवत्सरीं आषाढ वद्य ३ स वस्त्रें झालीं पुढें शके १६९४ विकृतिनाम संवत्सरीं कार्तिक वद्य ८ स थेउरास प्रातःकाळीं प्रहर दिवसास शांत झाले श्री रमाबाई अग्निप्रवेश झाली

नारायणराव बल्लाळ यास शके १६९४ मार्गशीर्ष वद्य ४ रविवारीं दोन घटका रात्रीस वस्त्रें झालीं नंतर पुढें शके १६९५ भाद्रपद शुद्ध १३ दोन प्रहरीं सुमेरसिंग व खरगसिंग व तुळाजी पवार यानीं मारिलें

रघुनाथ बाजीराव यास शके १६९५ त वस्त्रें झालीं पुढें शके १७०५ मिति मार्गशीर्ष वद्य ३ स शांत झाले

माधवराव नारायण याचा जन्म शके १६९५ मिति आधिक वैशाख शुद्ध ७ दोन प्रहरीं झाला पुढें शके १७०१ चैत्र शुद्ध १ स वस्त्रे झालीं नंतर पुढें शके १७१७ आश्विन शुद्ध १२ स दिवाणखान्यांतून तिसरे खणातील माडीवरून उडी टाकिली तिसरे दिवशीं शुद्ध १४ स शांत झाले

चिमणाजी माधवराव यास शके १७१८ नलनामसंवत्सरे वैशाख शुद्ध ३ प्रहर दिवसास वस्त्रें झालीं

---

+ ही शकवार माहिती रा० रा० अताजी रामचंद्र हरडीकर यानीं महाडाहून ता २४ अक्टोबर १८८३ रोजीं पाठविली तिचें हस्ताक्षर रा० नारायण बळवंत हरडीकर यांचें आहे.

बाजीराव रघुनाथ यांस शके १७१८ मार्गशीर्ष शुद्ध ५ भानुवासरीं श्रवणनक्षत्रीं रात्रौ वस्त्रें झालीं षष्ठस्थानीं चद्र

## सातारचे राजे याची वशावळ

शके १५९६ आनदनाम सवत्सरे ज्येष्ठ शुद्ध १३ स राज्याभिषेक [ शिवाजी महाराजास ] झाला समाप्त झाले चैत्र

सभाजी शिवाजीचे पुत्र सिहासनारूढ श्रावण शुद्ध ५ शके १६०२ रौद्रनाम सवत्सरीं शके १६१० फाल्गुन वद्य ३० स तुळापुरीं औरगजेब पादशहा याचे लष्करात शात झाले शके १६०८ त वरून नेले पुढें भालेराई झाली

शाहू सभाजीचे लेंक सिंहासनारूढ झाले शके १६२९ शके १६७१ मार्गशीर्ष वद्य ३ स समाप्त झाले

रामराजे दत्तक शके १६७१ पासून पुढें शके १६९९ मार्गशीर्ष शुद्ध १० स समाप्त झाले

शाहू राजे दुसरे दत्तक सिंहासनारूढ झाले शके १७०० मार्गशीर्ष वद्य ७ स पुढें वैशाख शुद्ध ९ शके १७३० विभवनामसवत्सरीं समाप्त झाले

शाहू राजे तिसरे सिंहासनारूढ झाले शके १७३० विभवनामसवत्सरे मिति वैशाख शुद्ध १३ स ते समयीं पहिलें नाव टाकून शाहूच ठेविलें सबब दुसरे शिक्के फिरविले नाहींत

---

ले ४९२　　　　　सन १८३२
[ ३३२ ]

श्री

यादी पेशवे यानीं पेशवाईचा उपभोग कधीं पासून कसा केला त्याची अनुक्रमणिका जुने कागदावरून लिहिली सुरूसन सल्लास सल्लासीन मयातैन व अलफ

बाळाजी विश्वनाथ यांसि पेशवाईचीं वस्त्रें शाहू छत्रपति यानीं शके १६३५ विजयनाम सवत्सरे सन ११२३ फसली अर्बासन अर्बाअशर मया व अलफ या सालीं माघमासीं जहालीं त्यानीं सात वर्षें कारभार केला त्याचा विस्तार——वर्षें

१ प्रथम सालीं वस्त्रें जाहल्यानतर स्वारी कोकणात कानोजी आगरे याजकडे जाऊन, भेटी होऊन सलूख जहाला लोहगड कोरीगड वगैरे किल्ले घेतले लोहगडास बहिरो मोरेश्वर पिंगळे अटकेस होते त्यास घेऊन सातारियास आले

१ सन खमस अशर मया व अलफ, सन ११२४ शके १६३६ जयनाम सवत्सरे, या सालीं तमाम रयतेस कौल दिल्हा, आणि आबादी केली

१ सनसीत अशर मया व अलफ या सालीं सासवडास वगैरे ठिकाणीं होते

१ सन सबा अशर मया व अलफ स्वारीस सहकुटुब निघोन दमाजी थोरात यांची भेट होऊन हिंगणगांव नजीक दमगडास अटकेंत होते

१ सनसमान अशर, थोरातास खड देऊन मुले माणसें ठेऊन स्वारी दिल्लीस गेला

२ सन तिसा अशर शके १६४० कोटिहोम केला दिल्लीहून स्वारी येऊन थोरातांचे पारिपत्य केले आणि स्वारी सातारियास गेली ते सन अशरान सातारियास होते,

१ सन इहिदे अशरीन मया व अलफ, शके १६४२ शार्वरानाम संवत्सरे सासवडास निधन जाले

---

७

बाजीराव बल्लाळ याची कारकीर्द—वर्षे

१ सन इहिदे अशरीन मया व अल्फ, शके १६४२ शार्वरी संवत्सरे छ० २० जमादिलाखर वस्त्रे जाहलीं स्वारी देशीं

१ सन इसन्ने अशरीन स्वारी बऱ्हाणपूर भडभुज्याचे पारिपत्य केलें

१ सन सल्लास अशरीन गोदऊचे पारिपत्य केले

१ सन आर्बा अशरीन सैद याचे पारिपत्य केलें

१ सन खमस अशरीन औरंगाबादेस किलीजखान याचा भेट दाऊदखान वगैरेचे पारिपत्य केलें

२ सनसीत अशरान दिल्लीस स्वारीस गेले बरावर अबाजीपत पुरंदरे मुख्यत्व होते. ते सनसबा अशरीनात दिल्लीहून सातारियास आले

१ सनसमान अशरान सातारियास होते

१ सनतिसा अशरीन स्वारीस आपासाहेब हिंदुस्थानात दया बहादूर याजवर गेले बाजीराव यास पुत्र जहाला दमाजी गाईकवाड याचे पारिपत्य केले

११ इा सनसल्लासीन मया व अल्फ ता सन आर्बैन मया व अल्फ अकरा वर्षे स्वारी शिकारी करून स्वामी सन्निध राहून कृपा संपादन होते या सालाचा तपशील लागला नाहीं कर्नाटकात मोगलावर अशा स्वाऱ्या जाल्या असतील

१ सन इहिदे आर्बैनात रेवातीरीं निधन पावले

---

२०

बाळाजी बाजीराव नाना साहब

किता

१ सन इहिदे आर्बैनात [ ११६१ ] वस्त्रे जहाली. सातारियास होते

१ सन अर्बा आर्बैनात [ ११६४ ] स्वारी भोंसले पायागडावरून उज्जनीस

कित्ता

२ सन इसन्ने आर्बैन [११४२] हिंदुस्थानात गडेमंडळे येथील खंडणी घेऊन मखसुदाबादेस जाऊन भागिरथास्नान करून, सन सल्लास आर्बैन [ ११४३ ] पुण्यास आले.

खंडणी घेऊन स्वारी माघारी आली भाऊसाहेब कोंकणात किल्ले पहावयासि गेले ते सालीं बयबाईचें लग्न जहालें

१ सनसीत आर्बैन [ ११४६ ] साता रा मुक्कामीं होते जनार्दन बाजीराव निज धामास गेले

१ सन समान व सनतिसा [ ११४८ ४९ ] देशीं होते लहान स्वारी शिकार केली असेल सर्व राजकारण सातारा येथें होत असे

१ सन इहिदे खमसेन [ ११५१ ] खासा व भाऊ बरोबर स्वारी कर्नाटक सावनूर पावेतों गेले पुढे महादोबा पुरंदरे रवाना केले स्वारी पुण्यास आली दमाजी गाईकवाड सातारियास आले पुढे माहादोबाही आले अखेर साली

१ सन सल्लास खमसेन [ ११५३ ] खासा व भाऊ व दादा नाशीक पावेतों गेले पुढें खासा व भाऊ कोकणातून पुण्यास आले दादासाहेब अमदाबादेस जाऊन, ती घेऊन आले थाळनेरास होळकर सुद्धा मिळोन हिंदुस्थानात गेले

१ सन खमस खमसेन [ ११५५ ] स्वारी कृष्णे पावेतों जाऊन आले पुढें सिंहस्थ सबब नाशिक त्रिंबकास गेले दादासाहेब हिंदुस्थानांत

१ सन सब्बा खमसेन [ ११५७ ] खासा स्वारी श्रीरंगपट्टणास गेली बराबर भाऊसाहेब होते दादासाहेब लाहूरचे स्वारीस गेले तोफा रात्रौचा रिवाज चालू

१ सन समान खमसेन [ ११५८ ] खासा स्वारी व भाऊ बरोबर ताडुळजे पर्यंत जाऊन नबाबापासून पन्नवीस लक्षाची जागीर घेतली दादासाहेब लाहूरचे स्वारीस होते

विश्वासराव साहेब याचा जन्म इसन्ने आर्बैनात जहाला

१ सन सबा आर्बैन [ ११४७ ] स्वारी कर्नाटकात जाऊन बहादूरबिंडा घेऊन पुण्यास आले ताई यात्रेहून आली

१ सन खमसेनात [ ११५० ] स्वारी सातारे येथे होती शाहूमहाराज निजधामास गेली व उमबाई निधन पावली

१ सन इसन्ने खमसेन [ ११५२ ] खासास्वारी पुण्यात भाऊसाहेब सांगोले पावतो गेले मार्गे उमाबाई दाभाडीमुळें माघारी फिरोन चन्होलीस भेटी जहाल्या पुढें गाजुदिखान आला गंगथडीवरून गेले पुढें नासरजंग व रामदासपंत आले लढाई जहाली बाबूराव फडणीस यास गोळा लागला

१ सन अर्बा खमसेन [ ११५४ ] खासा व भाऊ माधवराव याचें लग्न करून कर्नाटकात गेले तरदळ व जमखंडी घेऊन स्वारी माघारी आली दादासाहेब हिंदुस्थानात कुंभेरीस गेले

१ सन सीत खमसेन [ ११५६ ] नारायणराव याचा जन्म पुढें स्वारी कर्नाटकात सावनूर पावेतों जाऊन अखेरीस पुण्यास आले दादासाहेब कुंभेरीहून देशीं आले श्री जानकी बाई प्रसूत होऊन मृत्यु पावली उपरातिक गलगल्यास दुसरें लग्न करून सावनुरास स्वारींत मिळोन बरोबर आले तुळाजी आंगरे यासि धरून आणिले

१ सन तिसा खमसेन [ ११५९ ] खासा स्वारी कोंकणात पुळ्याचे गणपतीस गेली मातोश्री ताई मृत्यु पावली भाऊसाहेब पुण्यात होते दादासाहेब लाहूरचे

१ सन सितैन [ ११६० ] खासा स्वारी व दादासाहेब तादूळज्याचे मुक्कामीं मोगलापासून साठ लक्षाची जहागीर घेऊन माघारे आले तेच साली भाऊसाहेब व विश्वासराव साहेब नगरचा किल्ला घेऊन हिंदुस्थानात गेले

स्वारीहून दसरियास देशीं आले तेही पुण्याचे गणपतीस गेले

१ सन इहिदे सितन [ ११६१ ] खासा वारी मार्गशीर्षमासीं पैठणास लग्न केले पुढें पाणीपतचें वर्तमान विपरीत आले सबब हिंदुस्थानात खेचिवाड्या पावेतो जाऊन माघारे पुण्यास आले भाऊसाहेब पाणीपतास गर्द झाले फौज गारद जहाली दादासाहेब गु ट म ट क ला कडे जाऊन अखेर साली पुण्यास आले नानासाहेब याणीं ज्येष्ठ वद्य ६ स कैलासवासी जाले तेच सालीं करवीरकर संभाजी राजे शात जहाले पुढे पुत्र घेऊन शिवाजी नाव ठेवले

नानासाहेबाची कारकीर्द

माधवराव बल्लाळ थोरले रावसाहेब

१ सन इसने सितैन [ ११६२ ] शके १६८३ वृषानाम सवत्सरे वस्त्रे जहालीं यानतर मोगल उरळीवर आला त्याजवर स्वारी करून त्यास माघारा लाऊन कितूर पावेतो कर्नाटकात जाऊन पुण्यास आले नतर नारायणराव साहेब याचा व्रतबंध जहाला

१ सन सल्लास सितैन मया व अलफ उभयता पुण्यास होते दरम्यान घोडनदीवर खासा व दादासाहेब दोनी फौजाची लढाई होऊन खासा हस्तगत जाले सन्निध दादा येऊन उभयता फौजा घेऊन मिरजेस जाऊन मिरज घेऊन भागानगर प्राती गेले मोगल पुण्यास येऊन जाळपोळ करून माघारा गगेवर गेला तों स्वारी गगेचे आसपास आली सरजाम लोकास दिल्हे सिंहगडास नारायण राव साहेबाचे लग्न झाले

१ सन अर्बा सितैन मया व अलफ खासा व दादासाहेब भागानगरच्या पेठा जाळून गगेनजीक आले राक्षसभुवनावर मोंगलाशीं लढाई होऊन त्याची खराबी जाली तो पळून औरगाबादेस गेला उपरात स्वारी पुण्यास आली पुण्याहून [ दादा ] साहेब आनंदवल्लीस गेले दोन तीन महिने झाल्या नतर स्वारी कर्नाटकांत धारवाडास गेली तेथें छावणी जाली

१ सन खमस सितैन मया व अलफ खासा स्वारी धारवाड घेऊन पुढें गेले हैदरखानापासून खंडणी घेतली तों दादासाहेब आनदवल्लीहून कर्नाटकात येऊन स्वारींत मिळाले नतर उभयता पुण्यास आले

१ सनसीत सितैन मया व अलफ खासा स्वारी भोंसल्यावर जाऊन पुढें गगापुराकडून पुण्यास आले. दादासाहेब श्रावणमासची दक्षिणा होऊन आनदवल्लीस गेले तेथून हिंदुस्थानास

जावयास निघाले ते खासा स्वारींत मिळाले नंतर पुढे गोहदेस गेले तेथे छावणी जहाली रामचंद्र गणेश खासा स्वारींतून फौजेसुद्धा भवानराव प्रतिनिधीवर जाऊन त्यास घेऊन आले

१ सन सबा सितैन मया व अल्फ खासा स्वारी कर्नाटकात जाऊन सिरे मदगीर व खडर्णा घेऊन अखेरीस पुण्यास आले दादासाहेब गोहदेस छावणीस होते ते पुढें अखेरीस देशी आनंदवल्लीस आले

१ सन समान सितैन मया व अल्फ स्वारी दक्षणा श्रावणमासची होऊन आनंदवल्लीस जाऊन दादासाहेबास भेटून पुण्यास आले अखेरीस मागती गंगातीरास धोडपपावेतों गेले दादासाहेब आनंदवल्लीस होते पुढे वैशाखमासी अमृतराव यास घेऊन, आणखी फौज धरून, स्वारीस धोडपे पावेतो गेले आणि खासा व आपण पुण्यास आले गोपाळ राव गोविंद मिरजकर फौज घेऊन कर्नाटकात गेले होते, ते अखेरीस गंगातीरास स्वारींत मिळाले

१ सन तिसा सितैन मया व अल्फ खासा व दादासाहेब पुण्यातच होते श्रावणमासची दक्षणा जहालियानंतर आपण भोसल्यावर गेले विसाजी कृष्ण व रामचंद्र गणेश यासि हिंदुस्थानात फौज देऊन रवाना केले

१ सन सबैन मया व अल्फ खासा स्वारी कर्नाटकात जाऊन निजगल किल्ला घेतला तेथे नारायणराव साहेब याचे हातास गोळी लागली तेथे त्रिंबकराव मामास फौज सुद्धा छावणीस ठेऊन अखेर साली पुण्यास आले विसाजी कृष्ण व रामचंद्र गणेश व शिंदे होळकर हिंदुस्थानात

१ सन इहिदे सबैन मया व अल्फ खासा स्वारी कर्नाटकात जाण्यास निघाली ते तादुळवाडी प्रांत वाई पावेतो गेली तेथे समाधान नाहींसें झाले सबब कृष्णराव बळवंत याजबरोबर दहा हजार फौज देऊन त्रिंबकरावमामाकडे पाठविलें आणि खासा पुण्यास आले त्रिंबकरावमामा कर्नाटकात होतेच रामचंद्र गणेश, शिंदे, होळकर हिंदुस्थानात

१ सन इसने सबैन मया व अलफ खासा स्वारी गंगातीरास कटोरे पावेतों जाऊन नगरावरून पुण्यास आले मागाहून नारायणराव साहेबही कटोरे यास येऊन स्वारींत मिळाले रामचंद्र गणेश व शिंदे व होळकर यास हिंदुस्थानातून माघारे खासा स्वारींत आणविले हिंदूस्थानात विसाजी कृष्ण बिनीवाले राहिले त्याणीं नजीबखान मोडिला तेंच सालीं राधाबाई *निजधामास गेली

१ सन सलास सबैन मया व अलफ त्रिंबकरावमामा हैदरखान याजपासून खडणी घेऊन भाद्रपदमासीं पुण्यास आले खासास्वारी कटोरियाहून पुण्यास आले बागेंत राहिलें होते तेथून निघोन थेवरास गेले अत्यंत दुखणें जाले, येणेंकरून कार्तिक वद्य ८ कैलासवासी

* नानासाहेबाची बायको वाखरे याजकडील, लग्न २७-१२-१७६० व मृ १९-११-१७७०

झाले रमाबाईसाहेब यांणीं सहगमन केले दादासाहेब व नारायणरावसाहेब सनिधच होते. पुढें पुण्यास आले

१२

नारायणरावसाहेब

१ सन सलास सबैनात मार्गशीर्षमासीं वर्त्रे झालीं नतर गगापुरास गोपिकाबाईसाहेब यास भेटावयास गेले भेटून माघारे पुण्यास आले

१ सन आर्बा सबैनात भाद्रपदमासीं गाडद्याचा दगा होऊन गाड्यातच मारले गेले शके १६९५

२

दादासाहेब यास वस्त्रे सन आर्बा सबैनात अश्विनमासीं वस्त्रे आणविली नतर दसरा करून स्वारीस निघाले ते बेदराहून बऱ्हाणपावेतो गेले बिसाजी कृष्ण हिंदुस्थानांतून आश्वीनमासीं पुण्यास आले त्रिंबकरावमामा यास साबाजी भोंसले याचे पारिपत्यास रवाना केले व हरी बल्लाळ याजबरोबर फाज जमावून स्वारी झाली सरासरी मिळून दादासाहेब कारकीर्द वर्षे १

माधवराव नारायण सवाई—कारकीर्द वर्षे

१ सन आर्बा सबैन या सालात राज कारणे जालीं —

१ माघमासीं पार्वतीबाई साहेब व गगाबाई साहेब पुण्याहून निघोन पुरंदरास गेली तेथून सर्व बदोबस्त जाला साशाचा जन्म अधिक वैशाख मास शके १६९६ शुद्ध ७ स जहाला वस्त्रे मातारियाहून आणविली

१ त्रिंबकरावमामा व मोंगल मिळाले दादासाहेबाचे मागे लागले पढरपुरा नजीक लढाइ होऊन मामास धरिले चैत्रमासीं

१ हरि बल्लाळ फडके मामास धरिल्यावर फौज सुद्धा दादासाहेबाचे मागे लागले

३

१ सन खमस सबैन

१ खासा स्वारी पुरंदरास

१ हरि बल्लाळ खानदेशातून गुजराथेंत गेले

१ सखाराम भगवत व बाळाजी जनार्दन बऱ्हाणपुरा पावेतों दादाचे तहाकारितां गेले मार्गशीर्ष मासी साष्टीचा किल्ला इग्रजानी घेतला विसाजी कृष्ण कुमकेस गेले, ते अखेरीस पुण्यास आले

३

१ सन सीत सबैन
१ खासा स्वारी पुरंदरास
१ होळकर, शिंदे देशीं आले
१ हरि बल्लाळ गुजराथेंत
१ रामचद्र गणेश तळेगावीं जाऊन करवीरास गेले
१ कोन्हेरराव पटवर्धन कर्नाटकांत गेले

—
५

१ सन सबा सबैन
१ खासा स्वारी पुरंदरास
१ हरि बल्लाळ गुजराथेतून येऊन कर्नाटकात गेले
१ बाजी गोविंद तोतया आगरे यानीं व सरकार फौजेनें धरिल्यावर कोंकणातून घुमट शिराळे यावर रामचद्र गणेश होते त्याजकडे गेले
१ पाडुरगराव गोविंद कर्नाटकात गेले ते हैदरखानानें धरून नेले
१ भीवराव पानशी कोंकणात बदोबस्तास गेले

—
५

१ सन समान सबैन
१ खासा स्वारी पुरंदरास
१ हरि बल्लाळ कर्नाटकात शिरेटीस
१ शिंदे वगैरे करविरास
१ मोरो बाबूराव फाल्गुन अखेर कारभार करू लागले, ते पुरंदरीं गेले
० गगाबाई साहेब निजधामास गेलीं
१ रामचद्र गणेश करविराहून आले ते कोरेगाव पावेतों गेले

—
५

१ सन तिसा सबैन
१ खासा स्वारी पुरंदराहून वैशाखमासीं व्रतबधा करितां पुण्यास आली.
१ इग्रज व दादा साहेब तळेगावास आले. त्याचा तह होऊन झाशीस रवाना झाले ते नर्मदा तीराहून मागती गुजराथेंतून मुबईकडे गेले.
१ सरकारी फौज इग्रजांचे पारपत्यास तळेगावा नजीक गेली हरिबल्लाळ कर्नाटकातून अव्वलीस पुण्यास आले.

—
३

१ सब समानान

१ खांसा स्वारी पुण्यास

१ सरकारचे डेरे गारपिरावर जाले बाजी गोविंद, कल्याण इग्रजाने घेतले सबब कोंकणात गेले

—

२

१ सन इहिदे समानीन

१ खासा स्वारी पुणें गडबडी मुळें माघमासीं पुरंदरास गेले

१ इंग्रज बोरघाट चढोन आला, त्याचें पारपत्य जालें वसई किल्ला इग्रजानें घेतला लढाई जाली रामचंद्र गणेश ठार जाले त्याचे पुत्र माधवराव व बाजी गोविंद गुजराथेंतून आले व गणेश विश्वनाथ गुजराथेंतून आले

—

२

१ सन इसन्ने समानीन खासा स्वारी पुणें गणेश विश्वनाथ बेहरे खानदेशातून आले ते निर्मळास मोंगलाचे कुमकेस गेले

१ सन सल्लास समानीन खासा स्वारी पुणें —प्रथम लग्न जालें

१ सन आर्बा समानीन खासा स्वारी पुणें दादा साहेब इग्रजाकडे गेले होते ते सुरतेहून आले पुढें मार्गशीर्षमासीं कैलासवासी जाहाले याच साली पार्वतीबाई व सगुणाबाई निधन पावलीं बाळाजी जनार्दन व हरि बल्लाळ येदगिरीस मोंगलाचे भेटीस गेले इग्रजाचा तह होऊन गुजराथ मुलुख सुटला

१ सन खमस समानीन खासा स्वारी गंगापुरास बाईस भेटून आले भाऊसाहेब याचा पालाशविधी केला बाळाजी जनार्दन मोंगलास भेटून अव्वलीस नतर हरी बल्लाळ गंगापुरास गेले

१ सनसमानीन खासा स्वारी पुणें, बाळाजी जनार्दन व हरी बल्लाळ कर्नाटकात गेले ते नाना बदामीहून माघारे आले, हरी बल्लाळ पुढें गेले

१ सन सबा समानीन खासा स्वारी पुणें हरि बल्लाळ कर्नाटकातून अखेर सालीं पुण्यास आले

१ सन समान समानीन खासा स्वारी गंगापुरास जाऊन आली अली बाहादूर हिंदुस्थानात रवाना केले, व होळकर ही रवाना केले ते सालीं शिंदे यांजवर रागडे फिरून पडले सबब

१ सन तिसा समानीन, खांसा स्वारी पुणें श्रावणमासीं गोपिकाबाई साहेब यांणीं कैलासवास केला, दक्षणा पुढें जाहली,

१ सन तिसैन, खासा स्वारी सिंहस्थ सबब त्रिंबकेश्वरास जाऊन पुण्यास आले

१, सन इहिदे तिसैन, खासा स्वारी पुणें, परशराम रामचंद्र कर्नाटकात होते, ते धारवाड घेऊन पुढें गेले हरि बल्लाळ माघमासीं कर्नाटकात इग्रजाचे कुमकेस गेले.

१ सन इसने तिसैन खासा स्वारी कन्यागत निमित्य वाईस गेले, रास्ते यांणीं मोठा समारभ केला तेथून राजदर्शनास सातारियास गेले हरि बल्लाळ व पर्शराम रामचद्र श्रीरगपट्टण पावेतो गेले, पुढें टिपूशीं खडणी घेऊन तह केला

१, सनसल्लास तिसैन खासा स्वारी पुणें दुसरें लग्न झाले, हरी बल्लाळ कर्नाटकातून अव्वलीस आले शिंदे हिंदुस्थानातून आले परशुरामभाऊ तोफखाना घेऊन कर्नाटकातून आले रगाचा समारभ अलौकिक झाला

१ सनआर्बा तिसैन, आनदीबाई व महादजी शिंदे व हरी बल्लाळ फडके त्रिवर्ग याच सालीं मृत्यु पावले दौलतराव शिंदे यास वस्त्रें झाली गोविंदराव गाईकवाड यास सेनाखासखेल समशेर बहादूर हें पद दिलें

१ सनखमस तिसैन खासा स्वारी मोगलावर झाली भोंसले व परशुराम भाऊ व होळकर स्वारीबरोबर होते मुख्यत्वें दौलतराव शिंदे याजकडील जिवुबादादा बक्षी मोंगलाचा पराभव करून माशिरास घेऊन पुण्यास आले, मोठी फत्ते झाली अलीबहादूर मोठे फौजेनिशी हिंदुस्थानांत होते

१ सन सीत तिसैन, खासा अश्विन शुद्ध १२ माडीवरून पडून अत्यावस्थ झाले तें शुद्ध १५ कैलासवास केला, राज्याचा शेवट नानासाहेबाचे वशाचा झाला ब्रम्हप्रळय होईल, रावसाहेब बोलले, त्याप्रमाणें पुढें निदर्शनास आलें

२३

---

ले ४९३ [ ४१० ] — सन १८३३ श १७५५

श्री

फेरिस्त नबर १ — सन १०३६ फसली

यादी चदावराकडील वशावळ व राज्यकारकीर्द मूळ शहाजी महाराज हे दौलताबादेकडून शके १५४८ क्षय नाम सवत्सरात विजापुरीं आले

त्यास पुत्र तीन आणि पत्न्या दोन ज्येष्ठ पत्नी जिजाबाईसाहेब लुकजी जाधवराव देऊळगाकर याची कन्या दुसरी पत्नी तुकाबाई साहेब मोहिते याची कन्या तिघां पुत्रांचा तपशील

जिजाबाई साहेब याचे पुत्र

१ ज्येष्ठ पुत्र सभाजी महाराज यांचा जन्म दौलताबादेस कनकागिरी [ येथें ] तोफेचा गोळा लागुन उडाले त्याची नकल

तुकाबाई साहेब याचे पुत्र

व्यकटेशराजे यांचा जन्म चदावरीं जाहला प्रवृत्ति नाव यमाजीराजे †याची स्त्री देशच्या घाडग्याची कन्या भुयेकर किंवा

---

† यकाजी किंवा येकोजी असावें

१ शिवाजी महाराज याचा जन्म शिवनेरी किल्यावर हे छत्रसिंहानाधीश जाहाले याचा तपशील अलाहिदा आहे

कागलकर या उभयतातून कोणीची असेल ती असो .. कलम

३

मूळ पुरुष शहाजी महाराज, एक शिवाजी महाराज स्वदेशीं राज्य व वंशावळ अलाहिदा आहे यमाजी महाराज याचा वंश चंदारावकडील मूळ पुरुष शहाजी महाराज याचा काळ होदिक्री तुंगभद्रातीरी शके १५८३ प्लवनामसंवत्सरे माघ शुद्ध ५ रोजीं काळ जाहला

यमाजीराजे यास पुत्र तिघे, ज्येष्ठ शहाजीराजे, याची स्त्री इगळे यांची कन्या, यात संतान नाहीं दुसरे सरफजीराजे यास स्त्रिया दोन कोयाजी घाटगे याची बहीण, दुसरी शिर्के याची कन्या एक. उभयतांच्याही पोटीं संतान नाहीं तिसरे तुकोजीमहाराज हे वंशधर व्यंकाजी राजपुरुष २ रे

तुकोजीमहाराज व्यंकाजीचे औरसपुत्र यास स्त्रिया चार इगळे याची कन्या एक मोहिते याची कन्या एक, नलवडे यांची कन्या एक, व खेबोडेराव याची कन्या एक एकूण चार इगळे याच्या कन्येच्या पोटीं बाबासाहेब महाराज पुत्र व एक कन्या, ती शिर्के याच्या घरीं दिली मोहिते याच्या कन्येच्या पोटीं प्रतापसिंह राजे पुत्र एक व कन्या एक ती कन्या मल्हारजी गाढे यास दिली नलवडे याच्या कन्येच्या पोटीं चवघी कन्या, चवघी पैकीं एक सटवोजी गाढे यास दिली एक पुजाजी गाढे यास दिली सुलतानजी जगताप यास एक दिली व ढुबे यास एक दिली खेबोडेराव याच्या कन्येच्या पोटी दोघे पुत्र, एक अण्णा साहेब व दुसरे नानासाहेब उभयतांस संतान नाहीं बाबासाहेब व प्रतापसिंह असे उभयता पुत्र तुकोजी महाराज हे पुरुष तिसरे ३

बाबासाहेब महाराज यास स्त्रिया तीन, कामराजे घाटगे यांची कन्या एक व बाबूराव इगळे याची बहीण एक यडोहत याची कन्या तिसरी घाटगे याच्या कन्येच्या पोटीं दोघी कन्या मात्र, तिघींसही पुत्रसंतान नाहीं याचे सापत्न बंधु मोहिते याच्या कन्येचे पुत्र प्रतापसिंह राजे यास बायका पांच, प्रथम लक्ष्मणराव मोहिते याची कन्या एक दुणगो याची कन्या एक, शिंदाची कन्या एक, महाडकाची एक व काटकर याची एक, एकूण पांच दुणगो याच्या कन्येच्या पोटीं तुळजा महाराज जाहले व काटकर याच्या कन्येच्या पोटीं अमरसिंह महाराज जहाले मोहिते यांच्या कन्येच्या पोटी कन्या दोन, एक महाडकाच्या घरीं व एक निंबाळकर याच्या घरीं अशा दोघी दोघाच्या घरीं दिल्या बाबासाहेब यास पुत्रसंतान नाहीं सबब कनिष्ठ सापत्न बंधु प्रतापसिंह महाराज वंशधर यास पुत्र दोघे तुळजा महाराज, दुसरे अमरसिंह महाराज प्रतापसिंह महाराज हे . . पुरुष ४ थे

तुळजामहाराज ज्येष्ठ व अमरसिंह महाराज कनिष्ठ तुळजामहाराज याचीं लग्नें चार

पैकीं महाडकाच्या दोन, इगळ्याची एक व मोहित्याची एक एकूण ४ चार महाडकाच्या कन्येच्या पोटीं कन्या एक जहाली, ती निळकंठराव घाटगे यास दिली तुळजामहाराजास पत्रसतान नाहीं याच्या कारकीर्दीत इग्रजी जहाली अतकाळ समयी बुवाजी भोसले याचे भाऊ शहाजी भोसले याचा पुत्र दत्तक घेऊन नांव शरफजी राजे ठेवून अमरसिंह बधु याच्या हाती पुत्र देऊन तक्तावर बधूस बसवून त्याचा काळ जहाला हे परुष ५ वे

शरफजी राचे तुळजामहाराजाचे दत्तकपुत्र व सापत्नबधु अमरसिंह, उभयता मिळून राज्य करीत असता अमरसिंह यास स्त्रिया चार, गोविंदराव गाढे याची कन्या एक, कृष्णराव गाढे याच्या कन्या दोन व पिराजी शिंदे याची कन्या एक, एकूण चार स्त्रिया गोविंदराव गाढे याच्या कन्येच्या पोटीं कन्या एक, ती भानजी मोहिते याच्या पुत्रास दिली कृष्णराव गाढे याच्या कन्या दोघी पैकीं एकीच्या पोटीं प्रतापी राामराजे साप्रत आहेत याच्या स्त्रिया दोघी, काशीराव इगळे याची कन्या एक, व रामचद्र मोहिते याची कन्या एक, एकूण दोघी स्त्रिया साप्रत आहेत शरफजी राजे याची लग्नें दोन पैकीं सर्जेराव घाटगे याची कन्या एक व झुजारराव घाटगे याची कन्या एक, एकूण दोघी सर्जेराव घाटगे याच्या कन्येच्या पोटी कन्या चार व झुजारराव घाटगे ह्याच्या कन्येच्या पोटीं कन्या एक एकूण कन्या पाच व पुत्र एक नाव शिवाजी एकूण सहा कन्या इगळयाच्या घरीं एक, सुर्वे याच्या घरीं एक, मोहिते याच्या घरीं तीन, याप्रमाणें पाच कन्या दिल्या शिवाजी महाराज यांस स्त्रिया तीन सुर्वे याची कन्या एक, मोहिते याची कन्या एक व महाडीक याची एक, एकूण स्त्रिया तीन त्या साप्रत आहेत अमरसिंहराजे राज्य करीत असता इग्रज याची चार हिस्से चाकरी बद्दल आम्हास द्यावे, एक हिस्सा तुम्ही घ्यावा असें असता अमरसिंह याणीं कबूल केलें नाही शरफजीमहाराज ज्येष्ठ बधूचे पुत्र, राज्याचे अधिकारी ते जाणून इग्रजानीं त्याजकडे साधन केलें शरफराजे याणीं मान्य केलें अमरसिंह याणीं शरफजीस बोलले की, वडील व राजधर तुम्हीं होऊन कबूल केले फार उत्तम आहे आम्हांस राहण्यास जागा दुसरी योजून द्यावी त्याजवरून शरफजीमहाराजा याणीं मध्यार्जुन नेमून दिलें तेथें जाऊन राहिले व मानकरी काहीं बरोबर गेले तेही तेथेंच आहेत तेथें गेल्यावर अमरसिंह याचा काळ जहाला त्याचा पुत्र प्रतापराम महाराज कुटुबसुद्धा मध्यार्जुनींच आहेत. शरफजी महाराज चदावरीं राहून राज्य करीत असता शके १७५५ सालीं काळ जहाला याचे औरस पुत्र शिवाजीमहाराज साप्रत चदावरी राज्य करीत आहेत शरफजी वशधर हे पुरुष ६

ले ४९४ [४९६] — श्रावण शु १५ शके १७६२ ता २-८-१८४१

श्री

यादी पेशवे यांचे मूळपुरुष वशावळ §

---

§ हें प्रकरण रा बापू दीक्षित श्रोत्री बेकनाळकर इनामदार याजकडील रा विष्णु धोंडदेव भागवत याणीं कोल्हापुराहून पाठविले

१ मूळपुरुष विसाजीपंत, गोत्र गार्ग्य, उपनाम भट, वतन श्रीवर्धन देशमुख, प्रांत दंडाराजापुरी पंचमहाल यांचे पुत्र

१ कृष्णाजी विश्वनाथ वडील
१ जानो विश्वनाथ दुसरे
१ रुद्राजी विश्वनाथ तिसरे
१ बाळाजी विश्वनाथ चवथे

चवघे पुत्र यांपैकी

१ बाळाजी विश्वनाथ नानासाहेब यांची स्त्री, मल्हार दादाजी बर्वे यांची बहीण, नांव राधाबाई, क्टोरेकर पुण्यास आले

१ समागमें कृष्णाजी विश्वनाथ यांचे पुत्र नारोबा यांची स्त्री गोदूबाईस घेऊन आले वरकड कोणी आले नाहींत

३ बाळाजी विश्वनाथ यास पुत्र

१ बाजीराव बल्लाळ प्रधान
जन्म काळ शके १६४१

१ चिमणाजी बल्लाळ आपासाहेब

१ अनुबाई कन्या घोरपडी इचलकरजा व्यंकटराव घोरपडे यास दिली

याच्या स्त्रिया

१ बाजीराव प्रधान याची स्त्री काशीबाई बळवंतराव जोशी चासकर याची कन्या, कृष्णराव याची बहीण.

१ चिमणाजी बल्लाळ आपासाहेब यास त्रिंबकराव विश्वनाथ मामा पेठे याची बहीण

बाजीराव प्रधान यास पुत्र व कन्या

१ बाळाजी बाजीराव प्रधान नानासाहेब

१ दुसरे रघुनाथराव दादासाहेब उमर वर्ष ५४ कापूरगावीं [ कोपरगांवी ? ] शके

१ तिसरे जनोबा बाबासाहेब

१ भिऊबाई कन्या आबाजी नाईक जोशी बारामतीकर यांस दिल्ही +

या त्रिवर्गांच्या स्त्रिया

२ बाळाजी बाजीराव प्रधान नानासाहेब यास दोघी बायका.
१ गोपिकाबाई भिकाजी नाईक रास्ते वाईकर याची कन्या
१ दुसरी राधाबाई पैठणकर बाखरे देशस्थ याची कन्या
२

३ दादासाहेब यास उमर ५४ काळ कोपरगावीं जहाला
१ गोपाळराव बर्वे याची कन्या जानकीबाई
१ दुसरी आनंदीबाई राघो महादेव ओक म ल ण क र याची कन्या
१ तिसरी भिकाजीपंत पेंडसे याची कन्या मथुराबाई
३

+ ही बाजीरावाची बहीण, मुलगी नव्हे

१ जनोबा बाबासाहेब यास बायको नारोबानाईक भिडे याची बहीण, नाव सगुणाबाई बाबासाहेब मयत १२ वर्षांचे

बाळाजीपंत नानासाहेब यास पुत्र व कन्या

१ विश्वासराव यास स्त्री सदाशिव हरी दीक्षित पटवर्धन याची कन्या, नांव लक्ष्मीबाई पाणपतास गेली होती माघारे येऊन पण्यमुक्कामा मेली

१ माधवराव याची स्त्री रखमाबाई शिवाजी बल्लाळ जोशी याची कन्या थेऊरावर सती गेली शके १६९४ कार्तिक वद्य ८ रोज बुधवार

१ तिसरा मोरोबा ल्हानपणीं देवाज्ञा जहाले

१ चवथा नारायणराव याची बायको कृष्णाजी हरी साठे याची कन्या नाव गगाबाई

—

४

चौघांपैकीं वश जाहला [ तो ] नारायणराव साहेब यांजे पोटीं माधवराव सवाई जहाले नारायणराव साहेब यांजवर गर्दी होऊन मयत जहाले शके १६९५ भाद्रपद मास शुद्ध १४ राज्य केलें मास ९ सवाई माधवराव यांसि बायका

१ रमाबाई केशव नाईक टोंकेकर थत्ते याची कन्या.

१ दुसरी यश्वदाबाई गणेशपत गोखले याची कुबोशीकर

—

चिमणाजी बल्लाळ आपासाहेब यासि बायका त्रिंबकराव विश्वनाथ पेठे मामा यांची बहीण आपासाहेब वसईस जाऊन तीन वर्षे लढाई करून ठाणें घेतले पुण्यास आले नंतर मयत जहाले पोटीं वश

१ सदाशिवराव भाऊसाहेब

१ बयाबाई कन्या गगाधरराव नाईक ओंकारास यास दिली

—

सदाशिवराव भाऊसाहेब याची स्त्री

१

१ दुसरी पार्वताबाई भिकाजी नाईक कोल्टकर यांचा कन्या

भाऊसाहेब व बयाबाई पांच वर्षांची होती आपासाहेब देवाज्ञा जहाले बाई सती गेली पुण्य मुक्कामीं ओंकारेश्वराजवळ

१ भाऊसाहेब पाणपतच्या स्वारींत गेले शके १६८२, उमर ३३, समागमें विश्वासराव गेले होते

रघुनाथराव दादासाहेब यांचे पोटीं

१ प्रथम पुत्र जहाले विनायकराव नाव ठेविले होतें, मुलास घेऊन खेळवीत होते हातावर घेऊन उडविता खालीं पडून मयत जाहला

१ नंतर दुर्गाबाई कन्या जाहली ती पांडुरंगराव बाबा बारामतीकर जोशी यास लग्न करून दिले तें लग्न माधवराव साहेब व नारायणराव साहेब याणा केलें समारंभ बहुत केला

१ दत्त अमृतराव रावसाहेब

१ मग बाजीरावसाहेब धारेस जन्म

१ चिमणाजी आपासाहेब कोपरगावीं जन्मले दादासाहेब याचा काल जहाल्यावर चार महिनेनीं उपजले

१ दादासाहेब मयत होताच आनंदीबाईचे आगावरील जवाहीर घेऊन येणे म्हणोन नाना फडणीस याणीं अन्याबा मेहेंदळे यासि पाठिवले जवाहीर देणे म्हणोन मशारनिल्हे बोलिले बाईनीं उत्तर केलें कीं, आगावर आहेत ते काढून घेणे म्हणोन बोलली हे उत्तर मशारनिल्हे याणीं नानास लिहिलें त्याणीं उत्तर पाठिवलें कीं निघून येणे म्हणोन माघारे आले

बाळाजीपंत प्रधान यासि प्रथम बहिरो अनंत पिंगळे याजकडे पेशवाई होती त्याची गुमस्तगिरी सागून पिंगळे याणी श्रीमंत महाराज सातारेकर याजजवळ ठेविलें ते पांच वर्षे शके १६३० यात ठेविले ते पाच वर्षे करून शके १६३६ सालीं आपणच खुद्द पेशवाई करून घेतली पुढें मयत जाहले उपरात बाजीराव बल्लाळ प्रधान याणीं राज्य केले

१ सवाई माधवराव याणीं माडीवरून उडी टाकिली शके १७१७ आश्विन वद्य १२ रोज सोमवार अस्तमानीं नंतर देवाज्ञा जहाले चवथे रोजीं शुद्ध १५ राज्य केले वर्षे २२

१ शाहू महाराज यांचा काल जहाला शके १६७२ राज्य केलें वर्षे ४४

१ अवरंगजेब बादशहाचा काल शके १६२८ नंतर त्याचे पुत्र तक्तावर आजम तारासाहेब

१ बाजीराव रघुनाथसाहेब याणीं राज्य केलें वर्षे २२ जन्म शके १६९५ यासि बाइक

१ भागिर्थीबाई धोंडभट भागवत याची कन्या

१ दुसरी सावताचे वाडीकडील नाव लागणें

१ तिसरी दाजिबा फडके यांची कन्या

१ चवथी धोंडोपंत मंडलिक रास्ते याची कन्या, नाव वाराणशीबाई, याचे पोटीं पुत्र जहाले होते, नाव वामनराव

१ पाचवी हरि रामचंद्र ढमढेरे याची कन्या उपनाव देवधर

१ सहावी बळवंतराव पेंडसे नाव सरस्वतीबाई

---

६

बाळाजी बाजीराव नानासाहेब याचा काल जहाला शके १६८३ पर्वतीस जहाला दहन लाकडी पुलानजिक केलें वृंदावन तेथे आहे उमर वर्षे ४२

१ पुणें जाळिलें शके १६८५ सुभानुनाम संवत्सरे

१ तोतया होऊन मारिला शके १६६९ पौषमास

महादजा शिंदे याचा काळ जहाला शके सतराशेपधरा माघ शु॥ ११

१ दौलतराव शिंदे यांचा काल जहाला १७४९

१ नाना फडणीस याचा काळ जहाला शके १७२१, सिद्धार्थीनाम सवत्सरे

१ हरिपत फडके याचा काळ जहाला शके १७१६

१ परशुराम भाऊ याचा काळ जहाला शके १७२१ सिद्धार्थीनाम सवत्सरे, भाद्रपद वद्य ४ मगळवार

बद चार वेदशास्त्र सपन्न राजश्री बापूराव दीक्षित श्रोत्री इनामगाव सस्थान मौजे बेकनाळ कर्यात सोलापूर प्रात हुकेरी याचे आहेत हस्ताक्षर सखाराम गोविंद निसबत श्रोत्री यार्णी लिहिलें शके १७६३ प्लवनाम सवत्सरे श्रावण शु॥ १५ सन इसने आरबैन मग्यातैन व अल्फ जमादिलावर .

---

ले ४९५ } [४९४] }

{ता॥ ७-८-१८४१ { श्रावण व॥ ६ श १७६३

श्री*

## बाळाजी विश्वनाथ

कैलासवासी बाळाजी विश्वनाथ यासि पेशवाई महाराज शाहूराजे यार्णी दिली ती कधीं दिली ? कोणत्या कारणाने प्राप्त जहाली ? पूर्वी काय सपत्ति होती ? पेशवाई जहाल्यावर किती दिवस केली ! पराक्रम कसे कसे काय काय करून स्वामिकृपा सपादिली ! म्हणोन पुशिलें त्यास बाळाजीपत नाना [ याचें ] भट उपनाम हे कसबे श्रीवर्धन होते, सुभा प्रात राजापुरीं येथील देशमुख तेथेंच रहात होते त्याजवर शामलाचा कसाला जहाला म्हणून परागदा होऊन कसबे चिपळूण सुभे दाभोळ येथें राहून, काहीं दिवस जकाती वगैरे रोजगार करून, ससार करीत होते पुढें श्रीहरीनें कृपा केली, तेव्हा मोठा रोजगार मिळवावा ऐशी उमेद धरून श्रीमत पतसचिव शकराजी नारायणपत त्याजकडे आले तेथें काहीं दिवस योग्यतेनें राहिले तेथून किल्ले सातारा येथें मातुश्री ताराबाई आऊसाहेब राज्यकारभार चालवीत होती, त्याजपाशीं परशुराम त्र्यबक प्रतिनिधि होते, तसेच थोर सरदार धनाजी जाधवराव व त्र्यबकराव दाभाडे सेनापति व सताजी घोरपडे व हुजारातचे सरदार होते, त्याचे ममलतीने राज्यकारभार चालत होती शाहू महाराज दिल्लीस बेगमेजवळ अटकात होते दक्षिणेस कोट किल्ले मुलूख यवनाक्रांत सर्व होते, त्याची त मू ट मर्दाईनें चालवीत होते, तेथें बाळाजीपत नाना सचिव याजबरोबर गेले ते स्थळीं जाते समयीं अबाजीपत पुरदरे याची गाठ पडली दोघाचें बोलणें जहालें त्यात तुम्ही आम्ही बेरोजगारी, एकदु खी,त्यापक्षीं एक जागा रहावें

---

* हें प्रकरण रा बापू दीक्षित श्रोत्री बेकनाळकर याजकडील आमचे स्नेही रा० विष्णु धोंडदेव भागवत यार्णी कोल्हापुराहून पाठविलें खर्डा कागदावर लिहिलें असून बद ७ पाठपोट आहेत अक्षर साधारण आहे

नानानीं अबाजीपंतास वाचा दिल्ही कीं, वडील भाऊ तुम्ही, धाकटा भाऊ मी, रोजगार मिळविला तर तुम्हीं ससार पहावा तुम्हास मिळाला तर मी पाहीन याप्रमाणें निश्चय करून साताऱ्यास एकत्र राहिले दैवयोगेकरून धनाजी जाधवराव याचा दिवाणगिरी नानास मिळाली तेथेच दहा पाच वर्षे राहून सर्व दौलतीची यकत्यारी करून दौलत मिळविली

त्यानतर शाहू महाराज याविशी पादशहाजवळ बेगमेने बोलणें केलें कीं, "शाहू राजा माझा पुत्र, त्यापक्षीं बहुत दिवस आठरा वर्षे सरक्षण केलें आता यासि राज्यावर बसवावा" ऐशी भीड खर्चून बहाली करवून वस्त्रें देउन दिल्लीहून रवाना केले दहा हजार फौज दिल्ही तेथून येत येत खानदेशात आले याजवर इकडील वर्तमान सर्व सस्थानिकास पत्रे आलीं त्यावरून परशुराम भोंसले यासि पधरा हजार फौजेनिशीं नागपुराहून सताजी भोंसले याणा पाठविलें आणि सागितलें कीं, खोटा असल्यास मारून टाकावा, लुटणें त्याणीं महाराजास भेटल्यावर चौकशी केली त्यात सूर्यबिंब खरें असें भासलें तेव्हा विरोध करून लुटावें तो सशय गेला महाराजाची शर्तीने चाकरी करून सिंहासनीं बसला आहे हे निष्ठा करून नागपुरास लिहून आणखी फौज आणवून दरकूच चालले

इकडे साताऱ्यास आऊसाहेब याणीं निश्चय केला कीं, हा राजा नव्हे, जोगडा कोणी आला आहे, यासि मिळू नये याप्रमाणें सरदार व सरकारकून बोलावून सर्वास पुशिलें दूधभाताची पाटी पुढें ठेविली त्यात प्रथम प्रतिनिधि याणीं हात ठेवून सागितलें कीं, प्राण आहे तोंवर युद्ध करीन, भेटणार नाहीं तैसाच सचिव यानीं सर्कल्प केला सर्व निश्चय सागितले, परतु जोगड्यास मिळणार नाहीं ऐसा विचार होऊन तयार करून किल्ले रागणा येथें आऊसाहेब यास पाठविलें

तों खेडकडूस येथें महाराजाची स्वारी पचवीस हजार फौजेनिशीं आली हें ऐकून प्रतिनिधि खासा सरदार सुद्धा चाळीस हजार फौजेनिशीं चाकणेस आले दुसरे दिवशीं दोन्ही फौजा तयार होऊन दरम्यान गाठ पडोन लढाई जहाली त्या लढाईंत महाराजास यश आलें दहा पाच हजार घोडे प्रतिनिधीच्या फौजेंतील सापडले प्रतिनिधीचे फौजेचा मोड होउन मागती चाकणेस आले परशुराम भोंसले याचे खातरजमेमुळें बिंब खरें, ऐशी सर्वांची खातरजमा जहाली तेव्हा रात्रीस सर्व सरदारानीं जाधवराव याशीं विचार करून आपआपले कारभारी गुप्तरुपें पाठवून भोंसल्याचे हातून कोणास न कळतां भेटोन मुख्यत्वें करून बाळाजीपत नाना सर्वांचे येखलाशीचें बोलणें बोलले कीं, आम्ही महाराजाचे चाकर पाय पहावे ऐशी निष्ठा आहे हुकूम व्हावा प्रात काळीं येतों याप्रमाणें निखालस बोलणें करून, हुकूम घेऊन, जे कारभारी आले होते त्यासि शेले पागोटीं व झगे व विडे देऊन रवाना केलें नानानीं महाराजासि पचवीस हजार फौज घेऊन उदईक येतों म्हणोन कबूल केलें महाराजानीं बहुत प्रसन्न होउन आज्ञा केली कीं, "ही चाकरी केलियावर मागाल तें बक्षीस आहे निखालस मागा" याणीं अर्ज केला कीं, "आठां पदातून उत्तम

देखत बक्षीस व्हावें '' महाराजांनीं कबूल केलें आणि लागलेच गोटास आले सर्वांचा एक विचार जहाला कीं, भेटीस जावें

नतर प्रात काळीं प्रतिनिधि याणीं तयारीनिशीं फौजेस ताकीद केली परतु कोणींही जीव ठेविला नाहीं चार घटका दिवसास प्रतिनिधि तयार होऊन बसले सर्वांचे कारकून बोलावून आणून पुशिले सर्वांनीं उत्तर दिल्हें कीं, कालचे लढाईत कांहीं घोडीं गेलीं, काहीं जखमी जहालीं लोक जखमी फार जहाले, त्यामुळें त्याचे खबरदारीस आणखा लोक गोटात गुतले आज आमचें निघणें होत नाहीं हें ऐकून फितूर जहाला ऐशी [ शका ] मनात आणून आपले मायेची पाच सात हजार फौज होती तितकीच घेऊन पुण्यास येऊन जलद सातान्यास जाऊन किल्ला बळकावून राहिले वरकड फौज जाधवराव याजबरोबर जाऊन महाराजास नानानीं भेटी केल्या महाराजाची मर्जी बहुत सतोष जहाली तेथून शिरोळास येऊन किल्ले रोहिडा यावर शकरार्जी नारायण सचिव होते त्यास भेटीस बोलाविलें ते क्रियेस स्मरोन आले नाहींत त्याजवरून महाराजानीं सागून पाठविलें कीं, आम्ही भेटीस येतों हें वर्तमान ऐकून त्याणीं देहावसान केले दुसरे दिवशीं महाराज किल्याखालीं गेले तों त्याचें शव वरून उतरले हे पाहून वर जाऊन त्याची स्त्री येसूबाई याचें समाधान महाराजानीं बहुत प्रकारें केलें, आणि सातान्यास येऊन मोर्चेबदी केली ते एक वर्षपर्यंत किल्ला लढला तेव्हा शेखमिरा वाईकर हा दिल्लीस महाराजाजवळ अटकेंत होता, त्याजवर बहुत विश्वास होता त्यास सागून किल्यावर फितूर करविला आणि किल्यावर स्वारी जाऊन प्रतिनिधीस बेडी घालून कैद करून ठेविले महाराज शके १६०९ एकूणतिसाचे साली सिंहासनावर बसले मुलखाचा बदोबस्त करून सस्थानिक सरदारास निरोप जहाले तेव्हा महाराजानीं नानास सागितलें कीं, *मोरोपत पिंगळे पेशवे आहेत ही पेशवाई त्याजकडून दूर करून तुम्हास देतो तुम्ही करावी नानानीं अर्ज केला कीं, तूर्त '' मी जाधवरावाचा चाकर आहें त्याजपासून निरोप घेऊन येईन नतर चाकरी करीन तोंपर्यंत माझें बक्षीस जामदारखान्यात असावें ''

असें बोलून निरोप घेऊन जाधवरायाबरोबर गेले चार वर्षेपर्यंत जाधवराव याजवळच होते एके दिवशीं नानाकडील चाकर याजपासून बेकैदी जहाली म्हणोन जाधवरायांनीं हात तोडावयाचा हुकूम केला हें समजल्यावर नानानीं सांगून पाठविलें कीं, हात तोडू नये, मला बक्षीस द्यावे हें त्यानीं न ऐकता हात तोडिला इतक्यावरच नानानीं आपले मायेचे पांच हजार लोक होते ते तयार करून जाधवरायास सागितलें कीं, इतकी गोष्ट आमची चालली नाहीं, तेव्हा आम्हांस चाकरीची गरज नाहीं पोट भरेल तिकडे जाऊ असें म्हणून तेच समयीं कूच करून साताऱ्याचे वाटेनें वीस कोसाचा मुक्काम केला याची फौज काहीं घेऊन समजावयासि कारभारी आले त्याची गाठ पडों न देता कृष्णा उतरून माहुलीस मुक्काम केला, तेथून त्याची फौज माघारी गेली नाना येऊन महाराजास भेटले

* बहिरोपत पाहिजे

त्याचा निरोप घेऊन सेवेशी आलों म्हणोन अर्ज केला महाराजानीं बक्षास तयार आहे म्हणोन हुकूम केला नंतर मोरोपंत पेशवे यासि महाराजानीं आज्ञा केली कीं, तूर्त सरकारात गरज आहे तर तीस हजार रुपये तुम्हीं द्यावे पेशवे याणीं विनंति केली की, तूर्त ऐवज नाहीं महाराजानीं सांगितलें कीं तुम्हीं पेशवे, तुमच्यानें कार्य होईना, तेव्हा कसें करावें! त्याणीं अर्ज केला कीं, पेका तर नाहीं, महाराजाची मजा असेल तसे करावें महाराजानीं हुकूम केला की, याचा विचार होइल नंतर बाळाजीपंतनाना यासि बोलावून सुमुहूर्तावर पेशवाईवस्त्रें बहुमान केला रहावयासि किल्ला पुरंदर सचिवाकडे होता तो देविला तेथून आज्ञा घेऊन पुरंदरास येऊन सासवड येथें वाडा बांधून राहिले

ते समयीं पिलाजी जाधवराव हे वाघोलीस रहात होते, तेथून दिवे घाटावर चाहूर भर जागा इनाम घेऊन तेथें वाडी वसवून आपला किल्ला बांधून मजबूत वस्ती केली तेथें रहात होते ते सरंजामी सरदार दौलतदार पोक्त त्यास पूर्व स्नेह होताच परंतु पुढें केवळ घरोबा भाऊपणा जहाला तैसाच बाजी भिवराव रेटरे यासी घरोबा विश्वासाचाच जहाला तेही दौलतदार होते राणोजी शिंदे हे योग्यतेस पुढे विशेष आणिले, परंतु त्या वेळेस त्यांची चाल मर्दुमीची मनसोब्याची ऐशी होती मल्हारजी होळकर हे शिलेदारीनें बाड्याचे पदरीं होते तेथून आणून मर्द माणूस मसलतदार अशा योग्यतेने जवळ बाळगिले अशा माणसाचा संग्रह करावा ऐशी आवड नानास होती म्हणोन मध्य देशात सासवड ऐशी जागा पाहून वाडा बांधून वस्ती केली

तेथें चार सहा महिने जहाल्यावर दमाजी थोरात मवास हिंगणगाव ठाणें करून मुलूख मारून रहात होता, त्याणें हजार पांचशें प्याद्यानिशा येऊन पेशव्यास धरून नेलें तेव्हा त्याशीं खंडाचा ठराव पन्नास हजार रुपये केला आणि त्याजपाशीं वोलीस बाजीराव व आपासाहेब उभयता पुत्र मातुश्रीबाई सुद्धा व अबाजीपंत तात्या पुरंदरे असे हिंगणगावीं ठेवून, आपण निघोन साताऱ्यास येऊन महाराजास वर्तमान सांगितलेवर महाराजानीं पन्नास हजार रुपये सरकारातून देऊन रवाना केले तेथून सासवडास येऊन विचार करून आठ पधरा दिवस राहून, खातरजमेचे लोक चार हजार फौज ठेवून हिंगणगावावर चालून जाऊन सांगून पाठविलें कीं, लढाईस येणे, नाहीं तर वोली सोडून देणें हे ऐकून दमाजीनें बाई सुद्धा सर्वांस जिवे मारावें ऐशी तसदी केली, का तुम्हीं त्यास याप्रमाणें सांगून पाठविले नाही तर मारले जाल .ऐसे ऐकून अबाजीपंत तात्या याणीं उत्तर केलें की, "आमची आशा त्याणीं सोडली, म्हणोन चालून आले आहेत आम्ही प्राण तुम्हास अर्पिले आहेत तुम्हामध्ये मर्दुमी अस्ली तर त्याशीं लढाई करून धरून आणा, अथवा आम्हांस मार मारल्यानें तुमचे हातीं, उगेच सापडणार नाहींत" तेव्हा दमाजी याची लढाई जहाली दमाजीस धरून कैद करून हिंगणगाव लुटून मुलें माणसें यास भेटून दमाजी कबिले सुद्धा कैद करून बेड्या घालून, गावावर गाढवांचा नांगर फिरवून त्याची दौलत सापडली ती घेऊन सासवडास आले फौजेस निरोप देऊन मुलें माणसें तेथें ठेवून खासा नाना तात्याजी पुरंदरे यासि समागमें घेऊन दमाजीस घेऊन महाराजास

भेटले दमाजी कबिले सुद्धा महाराजानीं किल्ले परळी येथें बदात ठेविले मोठें खूळ मोडिलें येणे करून महाराज सतोषी जहाले पन्नास हजार रुपये सरकारचे नेले होते ते पोत्यास लाविले महाराजानीं आज्ञा केली कीं, " हे रुपये तुम्हास बक्षास दिले होते, त्यासि देऊन मुलें माणसें सोडून आणावीं तें का न केलें ! " यावर नानानीं अर्जी केली का, " महाराजानीं कमी केले नाहीं परतु पेशवाई मी करितो, मुलें माणसें खडणी बोलगारास देऊन सोड-विल्यानतर पेशवाई करावयाचे स्वरूप जातें, यास्तव केलें नाहीं स्वामीचे कृपेंकरून मुल-खाचें खूळ मोडलें स्वामींस यश आलें " हे ऐकून महाराजाची मर्जी बहुत प्रसन्न जहाली

नबाब †निजामन्मुलूख औरगाबादेंत होते त्याशीं लढाईचे प्रसग करून स्वराज्याचा बदोबस्त पूर्व मर्यादेप्रमाणें गोदेपर्यंत करून अम्मल चालता केला पुढें नबाब दिल्लीस जाऊ लागले, त्याकाळीं नानाशीं सधान त्यांणीं केलें कीं, तुम्ही दिल्लीस फौज पचवीस तीस हजार स्वार घेऊन यावें त्यावरून तीस हजार तयार करून रोज तीस हजार रुपये घ्यावे याप्रमाणें करार करून महाराजांची आज्ञा घेऊन दिल्लीस गेले त्याची खातरजमा बहुत जहाली तेव्हा नानास तगटी निशाण देऊ लागले त्यासि नानानीं उत्तर केलें कीं, आमचे स्वामींचें निशाण भगवें हें ठेवून दुसरें करावें हें आम्हास योग्य नाहीं त्यावर नबाबानीं त्या निशाणाची गौरव राखून बादली पटका निशाणास लावून उभयपक्षीं सतोष राखिला दिल्लीस जाऊन पादशा-हाच्या भेटी जहाल्यानतर बोलणें लाविलें कीं, राजा शाहू बेगम साहेबाचा पुत्र यासि कृपा करून राज्यावर रवाना केलें, त्याप्रमाणें सस्थानीं काईम जहाले साहेब सुभे दक्षिणेंत याची सरदेशमुखीचें वतन करून दिलें आहे, त्याचा सनदाचा हुकूम होऊन बक्षीस जहालें पाहिजे असें नबाबाचे सस्थानाचें बोलणें करून पादशाही सनदा दरोबस्त घेऊन दहा कोटी रुपये सरकारची नजर व एक कोट रुपये दरबारखर्च असे आकरा कोटी रुपये कबूल करून निशा सावकारी दिल्ही निरोपाचे [ पोशाख ] पादशहाचे गेले तेव्हा सर्व मुत्सद्दी याणीं एक विचार केला कीं, ब्राह्मण मर्दामर्दी नामोश घेऊन जाणार यासि कोठें नेऊन दरवाज्यात घालमेल करून सनदा हिरावून घ्याव्या पादशहा आमचें ऐकत नाहीं त्यापेक्षा हा सिद्धात करून शहरचे दरवाज्यात पाच हजार सोदे पाठविले ही बातमी नानास समजली त्याजवरून मनसोबा करून सर्व स्वारीचा सरजाम करून आपले नावकरी बाळाजीपत भाऊ, फडणीस याचे आजे बरोबर होते त्यास पालखींत बसवून, झाडून लवाजमा त्याजबरोबर देऊन, स्वारी त्याची लाविली आणि आपण शेपन्नास स्वारानिशीं कोणी शिलेदार असें लोकात भासवून दरवाज्याबाहेर निघोन लष्करात गेले, आणि पादशहास अर्जी लिहून पाठविली कीं दरवा-ज्यात सोद्याचा जमाव झाला आहे त्यात ताकीद व्हावी ऐशी अर्जी पाठविली तों स्वारींत हत्यार चाललें फडणीस ठार जहाले इतक्यात ताकीद सजावलाची आली त्याणीं सोदे दूर केले परतु फडणीस कामास आले वरकड स्वारीचे लोक येऊन लष्करात पोंचले ते वेळेस रामाजीपत भानू, बाबूराव फडणीस याचे तीर्थरूप, याचें समाधान करून वचन दिल्हे कीं,

† या ऐवजीं सय्यद हुसेनअली पाहिजे

तुम्ही चाकरीची शर्त केली त्यास जोंपर्यंत बाळाजी विश्वनाथ याचा वंश यास पेशवाई तोंपर्यंत तुमची फडणिशी, असा करार करून देऊन शांतवन केलें नंतर नबाबाची स्वारी देशीं आलियावर निरोप घेऊन महाराजाकडे येऊन भेटी जहाल्या सारे निवेदन करून सनदा व खिलत पादशाही म्हणजे वस्त्रें आणिलीं होतीं [ तीं ] महाराजास दिल्हीं त्याजवरून महाराजास अति उत्साह जाहला

पुढे नबाबाची एखलास यामुळें दक्षिणचे सहा सुभे विजापूर, दौलताबाद, बऱ्हाणपूर हे लगत यात अम्मल सरदेशमुखी व गनिमाची चौथाई बाबतीं पेशजीचे कराराचा हा अम्मल स्वारी करून सुरू [ करू ] लागले आणि विजापूर, बेदर, भागानगर हे तीन सुभे यात नागपूरकर भोसले यासि फावेल तसा अम्मल यांणीं बसविला

याप्रमाणें श्रम साहस करून बाळाजीपंत नाना यांणीं महाराजाची सेवा एकनिष्ठेनें करून पेशवाई केली थोरले पुत्र बाजीराव बल्लाळ व धाकटे पुत्र चिमणाजी बल्लाळ आपा, वडील कन्या अनूबाई ही व्यंकटराव घोरपडे यासि दिल्ही दुसरी कन्या भागूबाई* ही बाबूराव सदाशिव बाबूजी नाईक बारामतीकर याचे बंधूस दिल्ही याप्रमाणें सात वर्षें पेशवाई करून शके १६४२ बेचाळीस सालीं दिनगत झाले पुढें बाजीराव साहेब यांणीं पेशवाई चालविली [ हस्त अक्षर रामचंद्रभट्ट जोशी याचें असे मि० श्रावण वा॥ ६ मंदवारीं तिसरे प्रहरीं समाप्त शके १७६३ प्लवनाम संवत्सरे सु॥ इसन्ने अर्बैन मया तैन व अलफ ]

---

ले ४९६ [ ४९५ ]

ता॰ १६-८-१८४१ श्रावण व॥ ३० श १७६३

श्रीबाजीराव बल्लाळ

कैलासवासी बाजीराव बल्लाळ प्रधान यांणीं पेशवाई केली ती किती वर्षें केली ? यासि पेशवाई कधीं प्राप्त झाली ? पराक्रम काय काय केला ? म्हणोन प्रश्न केला त्यास बाळाजी विश्वनाथ यांणीं शाहू महाराज याची चाकरी एकनिष्ठपणें करून पेशवाई मिळविली त्या दवलतीचा उपभोग सात वर्षें केला स्वामींची कृपा पूर्ण संपादून ‡दिवसगत जाहले ते समयीं बाजीराव साहेब वीस बावीस वर्षांच्या वयात होते चिमणाजी आपा साहेब दहाबारा वर्षांचे उमरींत होते कारभारी अंबाजीपंत पुरंदरे दिवाण होते तसे ब्राह्मण मंडळींमध्यें बाजी भिवराव व कृष्णराव महादेव जोशी चासकर हे बाजीराव यांची स्त्री काशीबाई ताई याचें बंधु हे मोंगलाईत चाकरी करून दवलत करीत होते, शिपाई महाशूर होते त्याचे तीर्थरूप महादाजी कृष्ण बहुत बुद्धिवान् होते तसेंच चिमणाजी आपा याचे सासरे विसाजी कृष्ण, त्र्यिंबकराव मामा पेठे याचे तीर्थरूप, हे बुद्धिवान् तसेच मल्हार दादाजी बर्वे कचरेकर, रायाचे मामा, हेही शहाणे द्रव्यवान् मामलेदार व बाबूरावजी नाईक बारामतीकर शिपाई आणि द्रव्यवान् व व्यंकटराव घोरपडे हे सरकारचे सोयरे सरदार

---

* हिचें नांव अन्यत्र भिऊबाई असें आढळतें
‡ मूळात " दिवसगत ' झाले असें आहे तें बरोबर नाहीं

प्रसिद्ध पूर्वी नारोजी घोरपडे प्रसिद्ध होते त्याचे पुत्र हेही होते व मराठे लोकात पिलाजी जाधवराव व राणोजी शिंदे व मल्हारजी होळकर इत्यादिक मोठमोठे माणूस दवलतींत होते तेव्हा बाजीराव सातान्यास जाऊन महाराजास भेटले नतर वस्त्राचें बोलणें लागले तें ते काळीं बाजीराव साहेब बहुत उद्दाम प्रकृतीचे, शिपाईगिरींत अवघा वेळ मग्न, राज्यभार चालवावयास सबूरी असावी तो भाव नव्हता याजमुळे या पदाचे उपयोगा नाहींत असें राजश्री यासि बहुतानीं मसलत दिल्ही सर्वांचें ऐकून घेऊन सर्वास एक उत्तर दिलें कीं बाळाजी विश्वनाथ याणीं या राज्यात जिवादारभ्य श्रम साहस करून पुढें सुख भोगिले नाहीं याजकरिता यास वस्त्रें तूर्त देतों यावे दैवीं असल्यास श्रीशभु कृपा करील उपयोगीं नाहीं असें दिसल्यास पुढें विचार होईल अशी श्रीदेवाची प्रार्थना करून महाराजानीं बाजीराव साहेब यासि वस्त्रें दिल्हीं दिवाणगिरीचीं वस्त्रे चिमणाजी आपासाहेब यासि देऊन बहुमान केला काहीं दिवस हुजूर राहिले

नतर स्वारी तेथून निघोन सासवडास येऊन आपले दौलतीत किल्ले कोट महाल मुलुख याचा बदोबस्त करून फौजेचा जमाव करून औरंगाबाद प्राती गेले तेथें नबाब यांस भेटून खानदेशात जाऊन बागलाण प्रातात जाऊन खडण्या घेऊन यश घेऊन आले दुसरेयानें अशिरी किल्यापर्यंत जाऊन आशिरी हाल्याने घेतली ती स्वारी जय घेऊन आले फिरोन स्वारी हिंदुस्थानात जयनगरास गेले तेथें राजा जयसिंग याची भेट घेऊन खडणी मागितली त्याणी सागितलें कीं, खडणी कोणास आजपर्यंत दिल्ही नाहीं देणें ते ब्राम्हणास देतों रायानीं उत्तर केलें कीं, आम्ही चाकरी करितों, पोटास पाहिजे, आणि ब्राह्मण आहों तेव्हा राजानीं तीन लाख रुपये तुलसीपत्र घालून पाठविले ते रायानीं घेतले आणि राजाची मर्जी बहुत सतोष करून स्वारी करून येऊन फिरोन स्वारी हिंदुस्थानात जाऊन किल्ले कोट काहीं हस्तगत केले प्रात माळवे, सुभा मोठा, तेथें दया बहादूर का र ब्राह्मण होता त्याशीं ल्ढाई चिमणाजी आपा साहेब यानीं करून सुभा बुडविला वीस लक्षाचा प्रात घेऊन अमल बसवून हुजूर आले राजश्रीस मोठा सतोष जहाला फिरोन नबाब निजामउन्मुल्ख यासी विघाड होऊन लढाई होऊन सल्ला करून आपल्या मनोदयाप्रमाणें तह केला

त्यावर महाराजानीं सागितलें कीं, " राव, तुम्हीं त्रिंबकराव दाभाडे सेनापति हे गुजराथेंत फौजबद जह्लाले आहेत, ते हुकम गेला असता हुजूर येत नाहींत, त्यास घेऊन यावें तर तुमची शर्थ, " अशी आज्ञा जहाली आणि विडे दिल्हे, ते घेऊन गुजराथेंत गेले तेथें ऐशीं हजार फौज दाभाडे याजबरोबर व रायाबरोबर बाराहजार ते हस्तगत कसे होतील अशी मसलत झाली परतु बाजीराव साहेबांनी सर्व सरदारास सागितलें कीं, लढाईस जातों महाराजाचे पुण्यें करून यश आल्यास दाभाडे यास घेऊन जाऊ ते न आले तरि आम्ही तेथें खर्च जाहलों, तुम्ही देशीं जावें हें ऐकताच पिलाजी जाधव याणीं सिद्धात सागितला कीं, तुम्हांस टाकून आम्ही देशीं कशास जावें ? तरी लढाई उदयीक करावी जें होणें तें होवो असा विचार करून तरतूद चागली करून लढाईस उभे राहिले चार घटका लढाई

लागली तो ईश्वरइच्छेनें त्रिंबकराव सेनापति अबारींत बसून तिरदाजी करीत होते, तेथवर चालून जाऊन बंदुकीची गोळी कपाळात लागून ठार जाले ते काळीं दाभाडे याचे फौजेस पळ सुटला हे सर होऊन लूट केली दहा बारा हजार घोडे सापडले व हत्ती सापडले

नतर कूच करोन देशीं आले त्रिंबकराव पडल्यावर बाबूराव सवाई [ व ] त्याचे पुत्र यशवतराव हे दोघे कबिले सुद्धा पाठलाग करीत साताऱ्यासि आले तों अगोदर बाजीराव साहेब राजवाड्यात पोहोचले तेथवर दाभाडे येऊन महाराजापाशीं दाखल झाले तैसे पाहूनच माघारे माहुलीस जाऊन राहिले ते पंधरा दिवस पर्यंत होते महाराजानीं विचार केला कीं, "दोन्ही सरदार मोठे त्यात दाभाडे मारिले यामुळें त्याची स्त्री उमाबाई कीर्तिवंत आहे ही फिर्याद बाजीराव पेशवे याणीं मारिले म्हणून आली त्यास हुकुमाने आणविलें, तेथें लढाईस उभे राहिले तेव्हा मागे सरावें तें ठीक दिसत नाहीं दैव योगें दाभाडे पडले. परतु समजूत दोघांची करावी लागती या अर्थे माहुली सगमीं सरकारचा डेरा देऊन बाड कनाथांचें उभे केलें आणि खासा स्वारी महाराजाच्याच डेऱ्यात आली आणि उमाबाईस बोलाविले वर्तमान ऐकून घेऊन बाजीराव यासि बोलाविले तेव्हा खासे राव व दादासाहेब व जनार्दनपत बाबा दोघे पुत्र लहान दहा बारा वर्षांचे होते, ते बरोबर घेऊन डेऱ्यास येऊन मुजरे करून उभे राहिले एके बाजूस उमाबाई बसली होती दुसरे बाजूस यासि आज्ञा जाहाली, तेथें बसलेवर महाराजानीं पुसिलें तेव्हा यानीं अर्ज केला कीं, "उमाबाई काकी यासि बहुत प्रकारे हुजूर यावयाचा हुकूम आहे त्याप्रमाणें त्रिंबकराव काका यासि बोलावे त्याप्रमाणें काकी बोल्ली कीं, मीही काकास बहुत विचारे सांगितलें परतु एकदर लढाईवाचून दुसरें बोलणें चालेना युद्धास उभे राहिले तेव्हां मला दाली महाराजानीं बाधली तिची शरम राखावी लागेल त्यांत मी बारा हजारांनिशी, काकाजवळ ऐशीं हजार फौज, तेथें मला मारावयासि त्याला कठीण नव्हते परतु दैवगतीने त्यास गोळी लागली असें जाहलें असता महाराज आज्ञा करितील ते शिरसा [ वद्य ] असें म्हणाले तें ऐकोन महाराजानीं आज्ञा केली कीं, "राव! तुमचे दोघे पुत्र उमाबाईचे माडीवर बसवा" म्हणताच रायानीं दोघास बसाविले उमाबाईस हुकुम केला कीं, त्रिंबकराव आयुष्यानें गेले, चिंता नाही हे दोघे पुत्र बाजीराव याचे तुजला दिल्हे, हे तुझे यांसि वाढवून आपले म्हणावे असें समाधान करून मिठाई भरून ताटें आणवून मध्यें माडून हुकूम केला कीं, "या उपरि उभयपक्षीं मनांतील किंतु सोडून यावा आणि ताटात अवघीं बसून पेढे खावे साच क्रिया" इतकें बोलून महाराजानीं घास उचलिला सर्वांनीं पेढे मिठाई खाऊन एकलासी केली नतर स्वारीस जावयाची रवानगी केली

तेथून हिंदुस्थानात स्वारी केली राजा जयसिंग यासि भेटले शिंदे, होळकर व यशवतराव पोवार यांचे बाप आनद पोवार हे ते काळीं दौलतदार होते या सर्वांसीं तह केला कीं जो मुलख सरकारांत येईल त्याचे हिस्से करून फौजा जमा करून एक विचारें चालावें याप्रमाणें बोलणें ठरावून हिसे केले त्यात शेंकडा एकतीस रुपये सरकार एक हिसा, शिंदे रुपये

तीस एक हिसा, होळकर रुपये तीस एक हिसा, पोवार रु० नऊ याप्रमाणे करार करून फौज ठेवून दिल्लीस जयसिंग राजा सुद्धा जाऊन पादशहाचे दौलतीविषयीं चाकरींत उणे पडों देत जाऊ नये, ये प्रमाणे ठराव करून, सस्थानी करून, राजवाडे जे जे बेरोख होते त्याजवर मसलत केली बुदेलखडचें राज्य घेऊन राजाशीं तह करून सरकारात मुलुख आला त्याची कमावीस गोविंद बल्लाळ बुदेले यासि सागून ठेविले उज्जनी शिंदे याजकडे वाटणींत आली होळकर याजकडे इंदूर दिल्हें पवारास धारेचें सस्थान दिल्हे याप्रमाणें वाटणी केली दिल्लींत कोणी वकील ठेवावयाचा, परतु तीन वर्षें स्वारी होती याजमुळें कोणी मागें रहावयास अनमान करू लागले तेव्हा महादेव भट्ट हिंगणे नाशिककर याणीं कबूल केले त्यास राजाचे विद्यमाने दिल्लीस पातशहा जवळ ठेवून देशीं येऊन महाराजास भेटून सर्व वर्तमान निवेदन केले तेव्हापासून शिंदे होळकर पवार याचा तह हिंदुस्थानात चालला आहे

पुढे वसईस फितूर आपासाहेब याणीं करून फौज पायदळ पाठविलें तीन वर्षां अगोदर फितुराचा उद्योग चालला होता, तो मजकूर समयासि आतील फिरगी यास कळला तेव्हा आपासाहेब इरेस पडले जे खासा स्वारी वसईस गेली तेव्हा होळकर व जाधवराव व बाजी भिवराव व गणपतराव मेहेदळे सासवडकर व रामचद्र हरी पटवर्धन मानाजी आगरे आणखी सरदार बरोबर होते हशमी लोक बहुत ठेविले आणि मोर्चेबदी किल्ल्यास केली किल्ल्याभोंवतीं जमीन वाळूची, याजमुळें मोर्चे ढासळतात तीन वर्षें मोर्चे बसले पावसाळ्यात उपाय नाहीं लोकांनीं लढाई बहुत बाहेर फिरगीयाशीं प्रातात पडल्या त्यात बाजी भिवरावं चिंचणचे हल्ल्यात ठार जहाले तसेच दुसरे लढाईत शकराजी केशव फडके याचे बधु महादजी केशव हशमाचे सरदार हेही ठार जहाले माणूस दहा हजार साहेब चाकरीवर कामास आले तितक्यियाच्या बाळपर्वशा आपासाहेब यानीं चालविल्या शेवटीं आपासाहेब यास क्षयाचें दुखणें लागलें वसई तों येत नाहीं तेव्हा साहेबीं सर्व सरदार बोलावून सर्वांस विचारलें कीं, " वसई येत नाहीं माझा हेतु वसई पहावी, त्यास तुम्ही तोफा भरून मी पुढें उभा राहतों तुम्ही बत्ती द्यावी म्हणजे मेलेवर आत जाऊन पडेन तुम्ही देशीं जावें ' असें ऐकताच रामचद्र हरी पटवर्धन, पिलाजी जाधव व होळकर याणीं खातरजमा केली कीं, " धनियास टाकून गेल्यानें भिक्षा देखील आम्हास मिळणार नाहीं त्यापेक्षा आम्ही किल्ला घेतो चिंता नाहीं " त्याजवर सलाबत कूच करून दारूचे बुधले भरून सुरगानें* बुरूज उडविला तेव्हा आतील फिरगी याने जरब खाऊन दाणा आंतील सरला असें पाहून सवान लाविलें तेव्हा किल्ला दिवाण रहावयासि द्यावा आणि तीन दिवसास चीजवस्त जाईल ते नेऊ, असे सवान आलें याप्रमाणे कबूल करून फिरगी बाहेर काढून वसई सर करून आपासाहेबानीं किल्ला पाहून महाराजास विनतीपत्रें पाठविलीं कीं, " किल्ला सर जहाला कोणाकडे द्यावा ही आज्ञा द्यावी " म्हणोन त्याजबरोबर पत्रे पाहतांच महाराजास परम सतोष होऊन उत्तर लिहून सनदा नानासाहेब याचे नांवें पाठविल्या तीं पत्रें आलियावर प्रांताचा बदोबस्त केला शकराजी केशव याचे भाऊ चाकरी-

वर पडले सबब सुभा सागितला हशामी सरदार पडले त्याचे भाऊ व पुत्र व पुतणे कामकाजाचे उपयोगीं होते त्यास सरदाऱ्या करार करून वसईत ठेविले त्याचा वस्ती नेहमी केल्यावाचून मालवणचे रानची लावणी होणार यास्तव उजाड गाव होते ते सरजामास लावून दिल्हे त्याचे कबिले आणून लावणी करविली वसईचें बेट आगाशीपावेतों सहा कोश तितकियात कौल देऊन नारळीची झाडाची लावणी करून वीस वर्षे चालवू असा कौल दिला आरमार होते ते त्याची सुभा बाजीराव बेलोसे याणी पहिली फितुरीची मेहनत केली, सबब त्यास सागून किल्ला नवा जाजिरा बाविला व चद्रराव मोरे याणीं पहिली फितुरीची चाकरी करून श्रम केले होते त्यास वसईचे किल्याची हवालदारी सागितली याखेरीज ज्याणीं ज्याणीं तेथें श्रम केले त्यास बहुतेकास कामधदे सागून ठेविले नतर कूच करून हुजूर येऊन महाराजाची भेट घेऊन निवेदन केले महाराजाची पूर्ण कृपा जाहली ते समयीं भेटीचे वेळेस महाराजानीं बादली चादर आगावर घातली आणि चिमणाजी पडित म्हणोन किताब दिल्हा

बाजीराव साहेब याचे स्वारीची रवानगी केली तेथून सासवडास येऊन फौजेचा बदोबस्त करून औरगाबादेस स्वारी आली नबाबाशीं बोलण्याचाहा घाट बनला नाहीं सबब बिघड जाहला उभयपक्षींही लढाईस उभे राहिले नबाबाची फौज कोंडली पाणी नाहीं असें जाहलें दोन प्रहर भरत आले तेव्हा सेनापति यानीं एक बाजू धरली होती, त्यानीं रायासि सागितलें कीं आपण पाठीमागें जाऊन स्नान करून भोजन करून लवकर यावें तोंपावेतों आम्ही यास जाऊं देत नाहीं या बोलण्यावर कोसभर मागे बाज्यावर येऊन स्नान करून भोजन उरकून तेथें जाई तो चार घटिका लागल्या इतकियात नबाबानीं बातमी आणून लाख रुपये सेनापतीस अतस्थ देऊन याच्या फौजेतून पाण्यावर जाऊन हुशार जाहले त्याजवरून ते दिवशीं मनात निकर्ष होता तो राहिला दुसरे दिवशीं निकड बसवून नबाबाची रस्तबद केली आठ चार दिवस नबाबाचे लष्करात फार महागाई पडली बाजार बद जाहला त्या समयास त्याचे सणाचा दिवस जाला तेव्हा नबाबानी वाकिलास पाठविलें कीं, लष्करात महागाई जाहली आहे यास्तव दाणा किराणा पाठवून द्यावा त्याजवरून रायानीं सर्वांस पुशिलें, कोणी मसलत दिली कीं, या समयीं नबाब काहील होईल, तें ऐकून रायानीं उत्तर दिलें कीं, आपला शत्रु आजारी अथवा भुकेला अथवा निजेला असता नाश करणें आमचे शिपाईगिरीस योग्य नव्हे नबाबानीं सागून पाठविले त्यापेक्षां गौरव करावा असें बोलून शेटयांस सागून दाणा किराणा जिन्नस पाच हजार बैल आपल्या छबिन्यातून त्याचे लष्करांत पाठविले त्याजवरून नबाबास बहुत सतोष वाटला पुढें लवकरच सला होऊन भेटी जाहल्या

त्याजवर नबाबानीं सांगून पाठविलें कीं, तुमची आमची एखलास ह्या अर्थें बायकाचा मनोदय आहे कीं, आपले पुतणे आपले घरीं येऊन भेटावे याकरिता तुम्हीं जाऊन भेटून यावें तेव्हा रायानें उत्तर केलें कीं, त्याची आमची लढाई प्रसगें करून साहेबचाकरीकरिता होती, परंतु कैलासवासी नानांचा व त्यांचा भाऊपणा त्या अर्थीं आम्ही त्याचे पुतणे खरेच

म्हणून त्याणीं बोलाविले न गेलो तरि आम्ही भिऊन न गेलों असें होईल महाराजाचें पुण्य समर्थ आहे त्याणी काल सल्याचें बोलणें जालें ते समयी आण शपथी केल्या आहेत त्यापेक्षा बट्टा लावून घेणार नाहींत जावे हें योग्य असे म्हणोन पाच हजार खासा निवड करून फौजेतून स्वारा बरोबर घेतला लष्करात मुक्कामी आपासाहेब व अबाजीपत तात्या ठेविले आणि सागितले कीं तुमची तयारी असावी आम्ही जातों शहरात गेल्यावर एक प्रहरभर वाट पहावी आम्ही प्रहरात येतो न आलो तरि तुम्ही चालून यावे असे सागून पाच हजार स्वारानिशीं शहरच्या दरवाज्याजवळ गेले तेथे हजार स्वार उभे करून पुढे गेले दुसरे दरवाज्यात हजार स्वार उभे केले तिसरे दरवाज्यास हजार स्वार खासा वाड्यात दरवाज्याशी दोन हजार याप्रमाणे बदोबस्त करून शभर लोकानिशीं वाड्यास जाऊन दिवाणखान्यात बसले तेथून जनानखान्यात जातीनें राव व मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे हे दोन खिजमतगार करून बरोबर घेतले नबाबाचे कारभारी जनानखान्यात रहाणार असे चौघे आत गेले तेथे बागेमध्ये बैठक करून भोंवतालीं सोपियास चिकाचे पडदे लावून आत बायका बसविल्या खाशी बैठक बेगमेची होती त्या पडद्या बाहेर लगत रायास बैठक केली तेथे राव जाऊन बेगमेस सलाम करून बसले राव स्वरूपाने अति सुज्ञ होते ते पाहून बेगमेस व सर्व बायकास सतोष जाहला चार घटकापर्यंत बैठक होऊन निखालसपणाचीं बोलणीं बेगमे कडून वडीलपणाचे नात्यानें रायाकडून लेकरूपणाचे नात्यानें जाहलीं नतर बाटली वस्त्रें बेगमेने रायासि दिलीं जवाहीर उत्तम प्रकारें देऊन विडा देतेसमयीं बेगमेनें आपले हातीं विडा घेऊन चिरजीव म्हणून पडदा उचलोन रायाचे हातीं विडा दिला वरकड अत्तर गुलाब इत्यादिक उपचार केला आणि निरोप दिला तेथून राव उठून येथे अनुक्रमें शहराचे दरवाज्या बाहेर फौजे सुद्धा निघोन लष्करात प्रहराचे आत पोहोंचले हें सर्वांनीं पाहून रायाचे मर्दुमीचे लोकानीं आश्चर्य केले या नतर बेगमेनें नबाबास सागितलें कीं, आपली कन्या वधू आहे ही राव बाजी यास द्यावी, वर उत्तम द्यावयासि योग्य आहे हिचें लग्न करून देऊन घरोबा वाढवावा म्हणोन त्याजवरोन नबाबानीं सधान करविलें खजिरा बरोबर विवाह विधि केला लेंकीस आदण बहुत दिलें हत्ती व पागा व दासी असे दिले जवाहीर, वस्त्रें व भूषणें बहुत दिलीं त्या लोकात आपली कन्या पुतण्यास द्यावी असा मार्ग आहे म्हणोन केलें त्याप्रमाणें घेऊन आले तिचें नाव मस्तानी तिचें आदण आलें त्या घोड्याची पागा व हत्ती वगैरे व तिचें सस्थान निराळें राहून पुण्यातील वाड्यात निराळी हवेली करून ठेविली तिचे पोटीं दोन मुलें जहालीं तीं राहिलीं नाहींत एक पुत्र राहिला त्याचे नाव समशेरबहादूर ठेविलें त्याची योग्यता खासे पुत्राचे अन्वयें राखिली लग्न केलें त्यास सरदारी दिली पुढें नानासाहेब याणीं चौघडा साहेब नौबद सोन्याचे दाडीची चौरी दिली त्यास पुत्र एक अलीबहादर जहाले, त्याचाही तसाच मरातब राखिला समशेर बहादर भाऊसाहेब याजबरोबर गिल्याचे लढाईत जखमा लागून वाटेनें येतांना वारले

दिल्लीहून बाजीराव जय पावून आलियावर राजश्री यांसि सातार्‍याशीं मुत्सद्दी व

सरकारकून याणी गैरत बहुत सर्वांनी समजाविलें कीं बाजीराव आता चढून गेले आहेत पहिली मर्यादा होती आता महाराजान्या भेटी झाल्यावर जन बोलले त्याची खातरजमा करावी या अर्थी एक दिवशीं खासा मदारी हत्तीवर अबारी ठेवून खासास्वारी व सरकारकून प्रतिनिधि श्रीपतराव सुद्धा माहुलीस येऊन तिसरे प्रहरीं वडाचे झाडाखालीं गाशावर महाराज उभे राहिले इतक्यात बाजीराव लष्कराहून सडे आले तेथें सर्वास सागितलें कीं बागेंतून जाऊन येतों म्हणून सर्वांस हुकूम जहाला सर्वांकडे पाहून झाला तेव्हा सर्व जाग्यावरच राहिले पेशवे याजकडे पाहिलें नाहीं याजवरून ते बरोबर चालले पाच खिसमतखार मात्र बरोबर चालिले बाग जवळच होता, बागेच्या दरवाज्यापर्यंत खिजमतगार होते तेथें त्याजकडे पाहिलें, ते सारे तेथेंच राहिले, महाराज पुढे चालिले रायाकडे पाहिले नाहीं ते बरोबर चालिले शेपन्नास हातावर बागाचे नहर होते तेथे पायातील पैजार टाकून महाराज पुढें गेले तों बाजीराव याणीं पैजार महाराजाची घेऊन महाराज बगल्यात बसले, तेथें जाऊन उभे राहिले नतर महाराजानी आपले ठिकाणीं विचार केला कीं मुत्सद्दी सागत होते जे, बाजीराव पहिले पेक्षा उन्मत्त जहाले, पहिली मर्यादा राहिली नाहीं, असें सागितले होते, त्याची परीक्षा पहाता मर्यादेपेक्षा विशेष मर्यादा पाहून सतोष वस्त्रें व पैजारा बाजीराव याणी उचलिल्या होत्या त्याच रायास दिल्या, आणि निरोप दिला याप्रमाणे बाजीराव साहेब याणीं राज्य केले

शके १७८३ दुवनामसवत्सरे मिति श्रावण वद्य १४ स प्रारभ समाप्त मिति वद्य ३० स प्रात काळीं प्रहर दिवसास समाप्त माहे जमादिलाखर सन इसन्ने आर्बेन मया तैन व अल्फ *

---

लेख ४९७ [ ४४० ] | सन १८२६ शके १७४८

॥ श्री ॥

इ॥ शके १-३५ सन हिजरी ११२४ श्रीमत बाळाजी विश्वनाथ महाराज शाहूराजे भोसले याचे पतप्रधान जहाल्यापासून कारकीर्दी होत गेल्या त्यात कारभारी जाले त बितपशील.—

१ श्रीमत बाळाजी विश्वनाथ प्रधान, कारभारी अबाजीपत पुरदरे दिवाण

२० कारकीर्दी श्रीमत बाजीराव बल्लाळ प्रधान

---

* हेंही प्रकरण बापू दीक्षित श्रोत्री याजकडालच रा विष्णु गोडदेव भागवत यानीं पाठविले हें खर्चीं कागदाच्या उभ्या बदावर लिहिलें आहे नवव्या बदावर सपूर्ण झालें आहे अक्षर मध्यम प्रकारचे आहे शेवटीं शक १७८३ लिहिला आहे, तो प्रत केल्याचा किंवा बखर लिहिण्याचा हे कळण्यास मार्ग फारसा नाहीं तथापि प्रत केल्याचा असावा असें वाटतें

१७ कारभारी अबाजीपत पुरदरे दिवाण
३ श्रीमत चिमाजी बल्लाळ, भाऊ कारभारी
२०

२२ श्रीमत बाळाजी बाजीराव प्रधान
१२ महादाजी अबाजी पुरदरे दिवाणपणानतर [ सर ] दार
३ रामचद्र बाबा व भाऊसाहेब
६ भाऊसाहेब कारभार करून दिल्लीस गिलच्यावर गेले
१ नीलकठ महादेव पुरदरे स्वारी एक हिदुस्थान
२२

१२।≈ श्रीमत माधवराव बल्लाळ प्रधान कारकीर्दी वर्षे
३ नीळकठ महादेव पुरदरे, सखाराम भगवत बोकील
।।। त्रिंबकराव मामा
४॥ सखाराम भगवत बोकील
४ मोरो बाबूराव फडणीस भानु धोडप स्वारी
८= सखाराम भगवत बोकील, श्रीमत रघुनाथ बाजाराव वाड्यात होते ते मोकळे जाले-शके १६९४ कार्तिकमास-
१२।=

-।।।- श्रीमत नारायणराव बल्लाळ प्रधान इस्तक्बील पोष शके १६९४ तागाईत भाद्रपद शके १६९५ कारभारी सखाराम भगवत व बालाजी जनार्दन फडणीस व हरि बल्लाळ

फडके श्रीमत रघुनाथ बाजीराव वाड्यात आहेत

-।।।- रघुनाथ बाजाराव वाड्यातून मोकळे जाले कारभारी सखाराम भगवत महिने ३ श्रीमत रघुनाथ बाजीराव कार्तिक अखेर प्रधान जाले कारभार सदाशिव रामचद्र व चितो विठ्ठल व आबाजी महादेव करू लागले सखाराम भगवत व नाना फडणीस निरोप घेऊन पुण्यास आले पुणियात नारो आप्पाजी मुतालकीवर व केशव राव केतकर कोतवालीचे अमलावर श्रीमत स्वारीस कारकीर्द महिने ९ शिक्का लष्करात अधिक वैशाख पर्यंत चालला शके १६९६ कारकीर्द पुण्यात इस्तक्बाल माघ शके १६९५ शुद्ध ५ तागाईत अधिक वैशाख शुद्ध ७ शके १६९६ मातोश्री गगाबाई किल्ले पुरदरीं पुणियात केशवराव केतकर कोतवालीचे कामावर होते त्यास धरिलें नारो आणजीचा अमल पुण्यात किल्यावरून बाईचा हुकूम चालविला स्वारीत श्रीमत रघुनाथ बाजीराव आहेत किल्यावर बाई जवळ कारभारी सखाराम भगवत बोकाल व बाळाजी जनार्दन होते त्रिंबकराव मामा व हरिपत फौज सहवर्तमान निजाम अल्लीखान भागानगरकर नबाब एक होऊन श्रीमत रघुनाथ बाजीराव

यावर गेले असत स्वारीत फौजेत हुकूम श्रीमंताचा किल्यावरून हुकुम मातुश्री गंगाबाईचा एकूण महिने ९ कारकीर्दी २

२२ इ॥ शके १६९६ अधिक वैशाख शुद्ध ७ मातुश्री गंगाबाई गरोदर होतीं त्यास पुत्र किल्ले पुरधरीं श्रीमंत माधवराव नारायण जाले कारभारी सखाराम भगवंत व बाळाजी जनार्दन फडणीस असता वस्त्रें माधवराव नीलकंठ पुरंधरे याणीं सतऱ्यास जाऊन राजश्रीचा वस्त्रे पेशवाईचीं व शिक्के कटार आणिली, ती वैशाख मासीं शके मजकुरी किल्यावर बाळतीणीजवळ श्रीमंत असता चौरंगावर वस्त्रें जवाहीर व ढाल तरवार कटार १ व शिक्के कटार जाबते माफक आली, ती ठेवून सभा कचेरी नाच [ चालला ] असता नजरा लोकानीं करून माधवराव नारायण प्रधान याचा शिक्का पत्रावर जाहला त्यास कारभारी

५ सखाराम भगवंत बोकील व नाना फडणीस
१७ बाळाजी जनार्दन फडणीस व हरी बल्लाळ
―
२२

कारकीर्द श्रीमंत माधवराव नारायण इ॥ आश्विन शुद्ध १५ कोजागिरीची, शके १७१७ राक्षसनाम संवत्सरे वर्ष २१॥ वि॥ बाळाजी जनार्दन महिने ५ फाल्गुन शुद्ध १५ पर्यंत नंतर श्रीमंत बाजीराव चिमणाजी आपा साहेब परशराम रामचंद्र घेऊन आले

॥= कारकीर्द चिमणाजी माधवराव प्रधान ई॥ वैशाख शके १७१८ नलनाम संवत्सरे आश्विन वद्य १२ कारभारी परशराम रामचंद्र, बाबा फडके, बहिरोपंत मेहदळे. यात बाबा फडके कैद चाकणेत गेले, पुन्हा आले नारोपंत चक्रदेव मशीराचे लष्करात

२२ कारकीर्द श्रीमंत बाजीराव रघुनाथ प्रधान इ॥ मार्गशीर्ष वद्य ५ सह ६ नलनाम संवत्सरे शके १७१८ कारभारी —

१ बाळाजी जनार्दन फडणीस कैद झाले, सुटले, घरीं आले, मेले
१ नारोपंत चक्रदेव कैद जाले सुटले घरीं आले, मेले
१ बाबा फडके कैद जाले सुटले मिरजेस गेले
१ त्रिंबकराव परचुरे काशीस गेले मृत्यु पावले
१ चिमणाजी खंडेराव निा जाधव, कैदेंत आहेत
१ दौलतराव शिंदे आलिजाहाबहादूर हिंदुस्थानात
१ भोंसले नागपूरकर निरोप दिल्हा
१ मशिरीन्मुल्ख दिवाण निजामल्लीखा बहादूर भागानगरीचे निरोप दिल्हा
१ होळकर मल्हारराव मारिले, त्यास खंडेराव जाले त्याचे येशवतराव हिंदुस्थानात
१ संपूर्ण पागा वगैरे भेटल्या
१ गोपाळराव मुनशी निा पारसनीस कारकून कैदेंत आहेत कारभारास लागले होते.
१ गोविंदराव काळे कैद सोडले ते आहेत

